# बौद्धधर्मावरील चार निबंध

[ १. बुद्ध, धर्म आणि संघ, २. बौद्धसंघाचा परिचय,
३. समाधिमार्ग, ४. पार्श्वनाथाचा चातुर्याम धर्म ]

ग्रंथकार

धर्मानंद कोसंबी




महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ, मुंबई

१९८२

# निवेदन

मराठी भाषेला आणि साहित्याला आधुनिक ज्ञानविज्ञानाच्या व सांस्कृतिक मूल्यांच्या आविष्काराचे सामर्थ्य प्राप्त व्हावे, आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी, त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृती, इतिहास, कला इत्यादी विषयांत मराठी भाषा सर्वच स्तरांवर ज्ञानदान करण्यास समर्थ व्हावी आणि मराठी भाषेला जगात उच्च स्थान मिळावे या उद्देशाने महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने बहुविध वाङ्मयीन व सांस्कृतिक कार्यक्रम आखला आहे. तो व्यवस्थितपणे कार्यवाहीत आणण्याकरिता वाङ्मय, ललितकला, समाजविज्ञान, विज्ञान, इतिहास इत्यादी योजनांचे नियंत्रण व मार्गदर्शन करण्यासाठी मंडळाने विविध समित्यापण स्थापन केल्या आहेत.

याच दृष्टीने सर्वसामान्य माणसाला उपयुक्त होतील अशा विज्ञान, तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रे आणि तंत्रविज्ञान या विषयांवर मंडळ पुस्तके प्रकाशित करते. धर्म हे तर समाजजीवनाचे अंगच आहे आणि मानवी इतिहासाची आपणास ज्या काळापासून माहिती आहे, त्या काळापासून धर्मसंकल्पनेस महत्त्व प्राप्त झाले आहे. धर्म ही संकल्पना भारतीय संस्कृतीला मौलिकच आहे. या संकल्पनेचा सर्व बाजूंनी चौकस विचार व्हावयास पाहिजे. अशा अभ्यासामुळे भारतीय संस्कृतीची एकात्मता लक्षात येण्यास मदत होईल. यामुळेच मंडळाने धर्मविषयक पुस्तकेही प्रकाशित करण्याचे ठरविले आहे. मंडळाने धर्म या विषयावर आतापर्यंत भारतरत्न म. म. डॉ. काणेकृत "धर्मशास्त्राचा इतिहास" (पूर्वार्ध व उत्तरार्ध) लेख-अनुवादक श्री. य. आ. भट तसेच तिरुवल्लुवार विरचित "तिरुक्कुरळ" या तामिळ ग्रंथाचा श्री. पु. दि. जोशीकृत मराठी अनुवाद "तिरुक्कुरळ" व बर्ट्रान्ड रसेल लिखित "Religion and Science" या पुस्तकाचा श्री. वि. वा. कुवाडेकर यांनी केलेला "धर्म आणि विज्ञान" हा अनुवादही मंडळाने प्रकाशित केला.

मंडळाच्या वरील धोरणानुसार बौद्ध धर्मावरील पाली व संस्कृत भाषांत बौद्ध धर्माचे जे वाङ्मय आहे ते मराठी भाषेत आणण्याचे मंडळाने ठरविले. प्रा. धर्मानंद कोसंबी यांचे "बौद्धधर्मावरील चार निबंध" – १. बुद्ध, धर्म आणि संघ, २. बौद्धसंघाचा परिचय, ३. समाधिमार्ग, ४. पार्श्वनाथाचा चातुर्याम धर्म–मंडळाने पुनर्मुद्रित करण्याचे ठरविले. प्रा. धर्मानंद कोसंबी हे पाली भाषेचे पंडित होते. ज्या देशात त्या धर्माचा उदय व वाढ झाली त्यातील चालीरीती, साधारण परिस्थिती, विचारसरणी व त्या धर्माविषयी आदर व श्रद्धा त्यांच्या ठायी होती. म्हणूनच त्यांच्या या निबंधांमुळे मराठी वाचकांच्या बौद्ध धर्माच्या ज्ञानात निश्चितच मोलाची भर पडेल यात मला संशय नाही. बौद्धधर्मविषयक सर्व महत्त्वाच्या गोष्टींचा ग्रंथकर्त्याने मोठ्या कुशलतेने संग्रह केला आहे व त्या सुगम करून वाचकांपुढे मांडल्या आहेत. या ग्रंथात श्री. कोसंबी यांनी "धर्म", "अर्थ" व "काम" या तीनही जीवनअंगांचे सुबोध निवेदन केलेले आहे. मराठी वाचकांची बौद्ध धर्मविषयक जिज्ञासा काही अंशी या ग्रंथरूपाने पुरी होईल असे मंडळास वाटते. धर्मानंद कोसंबी यांचा हा ग्रंथ जनतेला सादर करण्यास आम्हाला अत्यंत आनंद होत आहे.

**सुरेंद्र बारलिंगे**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ,
मन्त्रालय मुंबई–४०० ०३२.

मुंबई,
पौष, ११, शके १९०३
शुक्रवार दि. १–१–१९८२

# १. बुद्ध, धर्म आणि संघ

## अनुक्रमणिका पृ. १ ते ८७



---

# २. बौद्धसंघाचा परिचय

## अनुक्रमणिका पृ. ८९ ते ३५९

### भाग पहिला

## भाग दुसरा

**प्रतिबंधक–नियम**

## भाग तिसरा

### महाश्रावकांचा परिचय

**उपासक—**



**उपासिका—**



**अंत्यज भिक्षू—**

# ३. समाधिमार्ग

## अनुक्रमणिका पृ. ३६१ ते ४४०

**प्रस्तावना–**



---

# ४. पार्श्वनाथाचा चातुर्याम धर्म

## अनुक्रमणिका पृ. ४४३ ते ५३१

---

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना

बुद्ध व बौद्धधर्म यांकडे पाश्चात्य पंडितांचे लक्ष्य अलिकडे बरेच लागलेले आहे. पालि व संस्कृत भाषांत बौद्ध धर्माचे जे वाङ्मय आहे त्याचे अध्ययन ते अत्यंत परिश्रमाने करीत आहेत; व या विषयावर सर्व पाश्चात्य भाषांत पुष्कळ ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. भगवान् बुद्धांनी केलेल्या उदात्त उपदेशाचे ज्ञान तिकडे पसरत आहे व त्याविषयी त्या लोकांचा आदरही सारखा वाढत आहे. बुद्ध आमच्या देशात अवतीर्ण झाले, त्यांचे शिक्षण आमच्या लोकांतच झाल्याने त्यांनी पुढे शिकविलेल्या धर्माचा पाया आमच्याच पूर्वजांच्या विचारांवर रचिलेला आहे, त्यांनी व त्यांच्या शिष्यांनी आपल्या धर्माचा प्रसार ज्या भाषेत केला, व अजूनही बौद्धांचे धर्मग्रंथ ज्या भाषेत आहेत ती आमच्याच देशांतील भाषा, असे असून बुद्धासंबंधी माहिती मिळविण्यास आम्हास पाश्चात्यांच्या तोंडाकडे पहावे लागते ! आमच्या देशातील परिस्थिती, आमची प्राचीन विचारसरणी व पालि व संस्कृत ग्रंथांचे हृद्गत पाश्चात्य लोकांना पूर्णपणे समजणे अत्यंत कठीण. शिवाय बौद्ध धर्मग्रंथांचा विस्तार फार मोठा व त्यामुळे त्यांचे अध्ययनही त्यांच्या हातून अजून पूर्णपणे झालेले नाही. यामुळे त्यांच्या ग्रंथांत बरेच दोष आढळून येतात हे साहजिकच आहे. हे ग्रंथ वाचून इकडच्या चार गोष्टी, तिकडच्या चार गोष्टी, व त्यांत स्वतःच्या कल्पनांची भर घालून निर्माण झालेले आमच्या देशी भाषांतील या विषयावरील ग्रंथ.

प्राचीन धर्मसंस्थापक व धर्म यासंबंधी विश्वसनीय ग्रंथ लिहावयाचा असेल तर पुढील गुणांची आवश्यकता आहे. प्रथमतः त्या धर्माच्या वाङ्मयाचे मूळभाषेत चांगले ज्ञान करून घेतले पाहिजे. ज्या देशात त्या धर्माचा उदय व वाढ झाली त्यांतील चालीरीती, साधारण परिस्थिती, लोकसमजुती, विचारसरणी वगैरेंचा चांगला परिचय पाहिजे. ज्या धर्माविषयी लिहावयाचे त्याविषयी मनःपूर्वक आदर व श्रद्धा पाहिजे. नाही तर त्या धर्माचे रहस्य कदापि लक्ष्यात येणार नाही. परंतु सध्याच्या काळी या श्रद्धेबरोबरच

स्वतंत्रपणे विचार करून सार काय, असार काय, अंधश्रद्धेने रचलेला भाग कोणता व धर्माचा सनातन अंश कोणता, अतिशयोक्ति, अज्ञान व धर्मभोळेपणा कोणता व शुद्ध सत्य कोणते हे निवडून स्पष्टपणे सांगण्याचे सामर्थ्य अंगी असले पाहिजे. या सर्व गुणांची बिनमोल मेळवण प्रस्तुत पुस्तककर्त्याच्या अंगी विशेषेकरून झालेली आहे. आमच्याच देशात ब्राह्मणकुली जन्म, कुशाग्रबुद्धी, धार्मिक स्वभाव, संस्कृताचे उत्तम ज्ञान, नंतर बौद्धधर्म प्रचलित असलेल्या सिलोन, ब्रह्मदेश, वगैरे देशांत जाऊन, तेथील विहारांत बौद्ध भिक्षूच्या वृत्तीने राहून नाणावलेल्या बौद्ध गुरूंच्या हाताखाली मूळ पालिभाषेत बौद्ध धर्मग्रंथांचे यथासांग अध्ययन; व हे अध्ययन कीर्तीच्या आशेने किंवा केवळ जिज्ञासाबुद्धीने केलेले नसून बौद्धधर्मावर जिवापाड श्रद्धा म्हणून अनेक दुःसह संकटे सोसून केलेले; व इतके सर्व असून या विसाव्या शतकातील कोणत्याही पंडितास शोभेल अशी सारासार पाहून (critical) व ऐतिहासिक दृष्ट्या विचार करण्याची पद्धती. या सर्व गुणांमुळे प्रो. धर्मानंद कोसंबी बौद्ध धर्मासंबंधी जे जे लिहितील ते सर्व विचारी विद्वानांच्या आदरास पात्र होईल व त्यांपासून आम्हा हिंदुस्तानवासियांनाच नव्हे, परंतु पाश्चात्य देशात बौद्ध धर्माच्या ज्ञानात निष्णात म्हणून गाजलेल्या पंडितांनाही पुष्कळ बोध होईल यात मला संशय नाही.

बौद्ध धर्म हा विषय अत्यंत विस्तृत; या छोट्या पुस्तकात त्याचा अत्यंत अल्प असा सारांशच येणार व तो काही स्थली दुर्बोध राहाणारच. तरी पण ग्रंथकर्त्यानें सर्व महत्त्वाच्या गोष्टींचा मोठ्या कुशलतेने संग्रह केला आहे व त्या होईल तेवढ्या सुगम करून वाचकांपुढे मांडल्या आहेत; व काही काही गोष्टींत तर बौद्धधर्माच्या स्वरूपाची कल्पना या लहानशा पुस्तकाच्या द्वारे जशी येईल तशी पाश्चात्यांनी लिहिलेल्या मोठमोठ्या ग्रंथाच्या वाचनानेही येणार नाही. असे जरी आहे, तरी हे पुस्तक पडले अत्यंत अल्पच; याच्या वाचकांस बौद्ध धर्माविषयीच्या पुष्कळ गोष्टी अज्ञात व अस्पष्ट राहणारच. त्यांच्या मनात जी जिज्ञासा उत्पन्न होईल ती तृप्त करण्याकरिता प्रो. धर्मानंद अधिक विस्तृत ग्रंथ लवकरच लिहितील अशी मला आशा आहे. पण याहूनही उत्तम गोष्ट म्हणजे वाचकांनी प्रो. धर्मानंदांसारखा सर्वस्वी योग्य मध्यस्थ शिक्षक मिळत असला, तरीही

पण दुसऱ्याच्या ओंजळीने पाणी न पिता स्वतः पालिभाषेचे ज्ञान प्राप्त करून घेऊन बौद्ध धर्माचे ज्ञान प्रत्यक्ष करून घ्यावे ही होय. आमच्या युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमात पालिभाषेचा अंतर्भाव आता झालेलाच आहे. तेव्हा या भाषेचे अध्ययन करण्यास सुरुवात करावी म्हणून मी आमच्या तरुण मंडळीला आग्रहाची विनंती करितो; व अशा रीतीने, विचारास पटणारा आत्मविजय हा ज्याचा पाया व सार्वत्रिक व अप्रतिहत प्रेमभाव हा ज्याचा कळस अशा कल्याणप्रद बौद्ध धर्माचे ज्ञान आमच्या देशात वाढून, प्रो. धर्मानंद म्हणतात त्याप्रमाणे "या रत्नाचा उज्वल प्रकाश आमच्या अंतःकरणावर पडून आमचे अज्ञान नष्ट होईल, आमच्यातील भेदभाव आम्ही विसरून जाऊ, व पुनः मनुष्यजातीचे हित साधण्यास समर्थ होऊ अशी आशा आहे.[१] "

**वा. अ. सुखठणकर.**

मुंबई, ता. ४ एप्रिल १९१०.

---

१ पृष्ठ १८–१९ पहा.

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

श्रीमंत महाराज श्रीसयाजीराव गायकवाड यांच्या आश्रयाखाली १९१० सालच्या फेब्रुवारी महिन्यात बडोदे येथे मी पाच व्याख्याने दिली. त्यांपैकी ही तीन श्रीमंत महाराजसाहेबांच्याच आश्रयाने त्या सालच्या एप्रिल महिन्यात पुस्तकरूपाने प्रसिद्ध करण्यात आली. यांची ही दुसरी आवृत्ती महाराष्ट्र वाचकांसमोर आणण्याचे सर्व श्रेय मासिक मनोरंजनाचे उत्साही संपादक श्रीयुत दामोदर रघुनाथ मित्र यांस आहे. पहिल्या आवृत्ती-प्रमाणे याही आवृत्तीस उदार आश्रय देऊन आमचे देशबांधव श्रीयुत मित्र यांचा प्रयत्न सफल करतील अशी आशा बाळगतो.

धर्मानंद कोसंबी.

मुंबई,
ता. ७ मे १९२४.

# बुद्ध, धर्म आणि संघ.

## बुद्ध

पौराणिक पंथामध्यें ब्रह्मा, विष्णु आणि शिव हीं तीन मुख्य दैवतें गणिलीं आहेत. ख्रिस्ती धर्मांत पिता, पुत्र आणि पवित्र आत्मा या तिहींनां प्राधान्य दिलें आहे. त्याचप्रमाणें बौद्ध धर्मांत बुद्ध, धर्म आणि संघ या त्रयीला श्रेष्ठत्व मिळालें आहे. बौद्ध धर्म पौराणिक धर्मापेक्षां किंवा ख्रिस्ती धर्मापेक्षां प्राचीन असल्यामुळें त्याचें अनुकरण पौराणिकांनीं आणि ख्रिस्त्यांनीं केलें असावें असें कित्येकांचें अनुमान आहे. या अनुमानाला संख्येचें साम्य यापलीकडे कांहीं आधार असेल असें मला वाटत नाहीं. पुराणांतील त्रिमूर्तीची किंवा बायबलांतील त्रयीची बहुतेक सर्व श्रोत्यांस माहिती असेलच. परंतु बौद्ध धर्मांतील त्रिरत्नांची[1] पारख अद्यापि आमच्या बांधवांपैकीं बऱ्याच जणांस झाल्याचें दिसून येत नाहीं. तेव्हा आजच्या या पहिल्या व्याख्यानांत या त्रिरत्नांपैकीं पहिलें रत्न बुद्ध त्याची, बौद्धांचा मूळग्रंथ जो **त्रिपिटक** त्यास अनुसरून, थोडीशी माहिती आपणांसमोर मांडण्याचा मी प्रयत्न करितों.

बुद्धाची माहिती देणारे **ललितविस्तर** आणि **अश्वघोष**कृत **बुद्धचरित**काव्य हे दोन ग्रंथ संस्कृत भाषेंत प्रसिद्ध आहेत. **पालि**भाषेंत **जातका**च्या प्रस्तावनेंत बुद्धचरित कथन केलें आहे. अलीकडे जे इंग्रजीभाषेंत बुद्धचरित्रावर ग्रंथ झाले आहेत, ते बहुतेक वरील ग्रंथांच्या आधारें लिहिले आहेत. या ग्रंथांतून बुद्धाच्या बालपणींच्या कित्येक चमत्कारिक आणि असंभवनीय गोष्टी सांगितल्या आहेत. आरंभीं जेव्हां युरोपियन पंडितांनीं या गोष्टी वाचल्या तेव्हां त्यांतील कित्येकांनीं बुद्ध ही ऐतिहासिक व्यक्ति नसून पौराणिक देवता असावी असें अनुमान केलें. प्रो० **सेनार** या फ्रेंच पंडितानें सूर्योपासनेपासून बुद्ध दैवताची कल्पना निघाली असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. हा त्याचा सिद्धांत चिरायु झाला नाहीं.

---

१. बुद्ध, धर्म आणि संघ यांनां बौद्ध वाङ्मयांत त्रिरत्न किंवा रत्नत्रय अशी संज्ञा आहे.

कांहीं वर्षांमागें आर्क्योलॉजिकल खात्यानें नेपाळी तराईतील **लुंबिनि-देवी** ह्या गांवीं नेपाळी सरकारच्या परवानगीनें जमिनींत गाडून गेलेल्या कांहीं मोडक्या इमारती खणून काढिल्या. त्यांत एक **अशोकराजाचा** शिलास्तंभ सांपडला. या स्तंभावर **अशोकानें** पालिभाषेंत लिहविलेला लेख आहे तो येणेंप्रमाणें :—

**देवान पियेन पियदसिन वीसति वसाभिसितेन अतन आगाच महीयिते हिध बुद्धे जाते सक्यमुनीति सिला विगडाभिचा कालापित-सिलाथंबेच उसपापिते हिध भगवं जातेति लुंमिनिगामे उबालिके कते अथभागियेच ।**

"**देवांचा प्रिय प्रियदर्शी** (ह्म० अशोक) राजानें आपल्या अभिषेकास वीस वर्षें झाल्यावर येथें **शाक्यमुनि बुद्ध** जन्मला होता ह्मणून स्वतः येऊन पूजा केली. चारी बाजूंस शिलास्तंभांची भिंत बांधिली, आणि (हा) शिलास्तंभ उभारिला. या ठिकाणीं भगवान् जन्मला होता म्हणून या **लुंबिनी** गांवाचा कर माफ करण्यांत आला, आणि (विहाराला ?) कांहीं नेमणूक करून देण्यांत आली."

या शिलालेखानें बुद्ध ही पौराणिक देवता नसून ऐतिहासिक व्यक्ति होती अशी पाश्चात्य पंडितांची खात्री झाली, व प्रो० **सेनारच्या** वर सांगितलेल्या कल्पनेची इमारत आपोआप ढांसळून पडली ! तथापि या पंडितांनीं वर सांगितलेल्या चरित्रविषयक तीन ग्रंथांच्या पलिकडे जाऊन अति प्राचीन पालिग्रंथांत बुद्धचरित्रासंबंधीं काय माहिती मिळते, **ललित-विस्तरादि** ग्रंथांतून सांगितलेल्या चमत्कारिक कथांस मूळ ग्रंथांत आधार आहे कीं काय, इत्यादि गोष्टींचा विचार केल्याचें दिसून येत नाहीं, व हें तर फार महत्त्वाचें आहे. तेव्हां केवळ मूळ पालिग्रंथ **त्रिपिटक** याच्या आधारें बुद्धचरित्राची माहिती देण्याचें येथें मीं योजिलें आहे.

**कपिलवस्तु** नांवाच्या शहरांत इ० स० पूर्वी ६०० वर्षांच्या सुमारास **शाक्य** नांवाच्या क्षत्रियांचें एक लहानसें महाजनसत्ताक[1] राज्य होतें. तेथल्या

---

१ निरनिराळ्या क्षत्रिय घराण्यांतील प्रमुख पुरुषांनां महाजन म्हणजे राजा असें म्हणत. हे राजे **संथागार** नांवाच्या नगरमंदिरांत जमून राज्यकारभार पहात असत. आपणांपैकीं एकाला अध्यक्ष निवडीत. त्याला **महाराजा** असें

महाराजांनां राजे अशी संज्ञा होती. या राजांपैकीं **शुद्धोदन** नांवाच्या एका राजाला दोन बायका होत्या, पहिलीचें नांव **मायादेवी** व दुसरीचें नांव **महाप्रजापती.** या दोघी **अंजनशाक्याच्या** मुली. **मायादेवी** प्रसूतीसाठीं माहेरीं जात असतां वाटेंतच **लुंबिनी** नांवाच्या वनांत प्रसूत होऊन तिला जो मुलगा झाला तो पुढें बुद्ध नांवानें प्रसिद्धीस आला. त्याचें नांव **सिद्धार्थ** असें ठेविलें होतें असें ह्मणतात. परंतु **त्रिपिटकां**त हें नांव माझ्या पाहण्यांत आलें नाहीं; ह्मणून **बोधिसत्त्व**–ह्मणजे **भावी बुद्ध**–या प्रसिद्ध नांवा**नेंच** मी येथें त्याचा उल्लेख करितों. बोधिसत्त्वाच्या जन्मसमयीं घडले ह्मणून ह्मणतात अशा अद्भुत चमत्कारांस **त्रिपिटक** ग्रंथांत आधार सांपडत नाहीं. अर्थात् या गोष्टी बुद्धचरित्रांत मागाहून सामिल केल्या गेल्या असाव्या हें फार संभवनीय दिसतें.

**बोधिसत्त्व** जन्मल्यावर त्याला आईसहवर्तमान **शुद्धोदन** राजानें परत आपल्या घरीं नेलें. तेथें **असित** नांवाच्या ऋषीनें येऊन हा मुलगा जगदुद्धारक होणार आहे, असें भविष्य कथन केल्याची कथा **सुत्तपिट-कांतील सुत्तनिपात** ग्रंथांत आढळते. **मायादेवी बोधिसत्त्वा**च्या जन्मानंतर ७ व्या दिवशीं निवर्तली, यालाही **विनयपिटकां**तील **चुल्लवग्ग** ग्रंथांत आधार सांपडतो.

तदनंतर घडलेल्या **बोधिसत्त्वाच्या** विवाहसंस्कारादि गोष्टींचा **त्रिपिटक** ग्रंथांत कोठें उल्लेख सांपडत नाहीं. तथापि २९ व्या वर्षीं जेव्हां **बोधिसत्त्वानें** गृहत्याग करून अरण्यवास पत्करला त्या वेळीं त्याला एक राहुल नांवाचा मुलगा होता असें **विनयपिटकां**तील **महावग्ग** ग्रंथांत आलेल्या **राहुला**च्या गोष्टीवरून दिसून येतें.

**बोधिसत्त्वा**च्या गृहत्यागाचा[१] प्रसंग **बुद्धचरित** काव्यादि ग्रंथांतून चमत्कारिक रीतीनें वर्णिला आहे. " त्याच्या बापानें त्याला मोठमोठाले तीन राजवाडे बांधून दिले होते, व तो त्या वाड्यांतून बाहेर न पडतां चैनीनें कालक्रमण करी. पुढें अकस्मात् त्याला बाहेर फिरावयास जाण्याची इच्छा

---

म्हणत. या प्रकारचीं आणखीहि कांहीं राष्ट्रें उत्तरहिंदुस्तानांत होतीं. विशेष माहितीसाठीं प्रो० ऱ्हिस् डेव्हिड्स्चें Buddhist India हें पुस्तक पहावें.

१ याला **महाभिनिष्क्रमण** अशी संज्ञा आहे.

उत्पन्न झाली, व तो आपल्या छन्न नांवाच्या सारथ्यासहवर्तमान रथांतून फिरत असतां एक देवता व्याधिग्रस्त, म्हातारा आणि मृत अशीं रूपें अनुक्रमें धारण करून त्याच्या समोर आली. छन्न सारथ्याकडून व्याधिजरामरणाचें उग्र स्वरूप त्याला समजलें, व संसाराविषयीं तीव्र वैराग्य त्याच्या मनांत उत्पन्न झालें. इतक्यांत ती देवता भिक्षुरूप धारण करून पुनः त्याच्या समोर आली, व तिला पाहून त्यानें गृहत्यागाचा दृढ निश्चय केला," इत्यादि गोष्टी आजकाल झालेल्या बुद्धचरित्रांतून सविस्तर वर्णिलेल्या आहेत; आणि आमच्या श्रोत्यांस त्यांचा बराच परिचय असण्याचा संभव असल्यामुळें त्या येथें सविस्तर सांगण्याची आवश्यकता नाहीं.

आतां या गोष्टींस त्रिपिटकाचा कांहीं आधार सांपडतो कीं काय तें पाहूं. बोधिसत्त्वाला राहण्यासाठीं तीन राजवाडे होते. याला सुत्तपिटकांतील अंगुत्तरनिकायांत आधार सांपडतो. आपल्या पूर्वस्थितींतील गोष्ट सांगत असतां भिक्षूंला उद्देशून बुद्ध भगवान् म्हणतो :—

" भिक्षु हो, मी फार सुकुमार होतों; माझ्या सुखासाठीं माझ्या पित्यानें तलाव खणून त्यांत नाना जातींच्या कमळिणी लावल्या होत्या. माझीं वस्त्रेंप्रावरणें रेशमी असत. शीतोष्णाची बाधा न व्हावी म्हणून बाहेर निघालों असतां माझ्यावर माझे नोकर श्वेतच्छत्र धरीत असत. हिंवाळ्यासाठीं, उन्हाळ्यासाठीं व पावसाळ्यासाठीं माझे निरनिराळे तीन प्रासाद होते. जेव्हां मी पावसाळ्यासाठीं बांधलेल्या महालांत राहण्यास जात असें, तेव्हां चार महिने बाहेर न पडतां स्त्रियांच्या गीतानें आणि वाद्यानें कालक्रमण करीत असें. इतरांच्या घरीं दासांना आणि नोकरांना निकृष्ट प्रतीचें अन्न देतात; पण माझ्या घरीं माझ्या दासदासींना मिळणारें अन्न म्हटलें म्हणजे मांसमिश्रित उत्तम भात.

" अशा संपत्तीचा उपभोग घेत असतां माझ्या मनांत असा विचार आला कीं, अविद्वान् सामान्य जन स्वतः जरेच्या तडाक्यांत सांपडणारा असून जराग्रस्त म्हाताऱ्या मनुष्याकडे पाहून कंटाळतो व त्याचा तिरस्कार करितो ! परंतु मी स्वतः जरेच्या तडाक्यांत सांपडलों असून त्या सामान्य मनुष्याप्रमाणें जराग्रस्त मनुष्याला कंटाळलों किंवा त्याचा तिरस्कार केला, तर तें मला शोभणार नाहीं, या विचारानें माझा तारुण्यमद समूळ नाहींसा झाला.

"अविद्वान् सामान्य जन स्वतः व्याधींच्या जबड्यांत सांपडणारा असून व्याधिग्रस्त मनुष्याकडे पाहून कंटाळतो व तो त्याचा तिरस्कार करतो, परंतु मी स्वतः व्याधीच्या तडाक्यांतून सुटलों नसतां त्या सामान्य जनाप्रमाणें व्याधिग्रस्ताला कंटाळलों किंवा त्याचा तिरस्कार केला तर तें मला शोभणार नाहीं. या विचारानें माझा आरोग्यमद समूळ नष्ट झाला.

"अविद्वान् सामान्य जन स्वतः मरणधर्मी असून मृत शरीराकडे पाहून कंटाळतो व त्याचा तिरस्कार करितो, परंतु मी स्वतः मरणधर्मी असून त्या सामान्य जनाप्रमाणें मृताला कंटाळलों किंवा त्याच्या शरीराचा तिरस्कार केला तर तें मला शोभणार नाहीं. या विचारानें माझा जीवितमद समूळ गळून गेला."

(अंगुत्तरनिकाय, तिकनिपात.)

या उताऱ्यावरून आपणांस असें दिसून येईल कीं, **बोधिसत्त्वाच्या** राहण्यासाठीं जरी तीन प्रासाद होते तरी **शुद्धोदन** राजानें त्याला त्यांत कोंडलें नव्हतें; किंवा तो गृहत्याग करील या भीतीनें त्याच्यावर नृत्यांगनांचा खडा पहारा ठेवला नव्हता. सध्यांच्या एखाद्या संस्थानिकाच्या मुलाप्रमाणें सर्व प्रकारचीं करमणुकीचीं साधनें त्याला अनुकूल होतीं, तरी त्याचें समाधान झालें नाहीं. जराव्याधिमरणांच्या उग्र स्वरूपांची कल्पना उत्तरोत्तर त्याच्या मनांत दृढ होत गेली आणि त्याचा तारुण्य, आरोग्य व जीवित यांचा मद नाहींसा झाला.

**मज्झिमनिकायांतील अरियपरियेसनसुत्तांत** बुद्ध भगवंतानें आपल्या गृहत्यागाची हकीगत येणेंप्रमाणें कथन केली आहे:—

"भिक्षु हो, मी सुद्धां **संबोधिज्ञान** होण्यापूर्वीं बोधिसत्त्वावस्थेंत, स्वतः जन्मधर्मी असतांना जन्माच्या फेऱ्यांत सांपडलेल्या वस्तूंच्या (पुत्र, दारा, दासी, दास इत्यादिकांच्या) मागें लागलों होतों. (म्हणजे माझें सुख त्यांजवर अवलंबून आहे असें मला वाटे.) स्वतः जराधर्मी असतांना, व्याधि धर्मी असतांना, मरणधर्मी असतांना, शोकधर्मी असतांना, जरा, व्याधि, मरण, शोक यांच्या फेऱ्यांत पडलेल्या वस्तूंच्याच मागें लागलों होतों. तेव्हां माझ्या मनांत असा विचार आला कीं, मी स्वतः जन्म, जरा, मरण, व्याधि व शोक यांनीं संबद्ध असतां त्यांनींच संबद्ध जे पुत्रदारादिक त्यांच्या मागें

लागलों आहें, हें ठीक नव्हे; तर मग मीं या जन्मजरादिकांनीं होणारी हानि पाहून अजात, अजर, अव्याधि, अमर आणि अशोक असें जें परमश्रेष्ठ **निर्वाणपद** त्याचा शोध करावा हें योग्य आहे.

" भिक्षु हो, असा विचार करीत असतां कांहीं कालानें, जरी मी त्या वेळीं तरुण होतों, माझा एकहि केंस पिकला नव्हता, भरज्वानींत होतों, आणि माझे आईबाप मला परवानगी देत नव्हते. डोळ्यांतून निघणाऱ्या अश्रुप्रवाहानें त्यांचीं मुखें भिजलीं होतीं, ते सारखे रडत होते, तरी मी ( त्या सगळ्यांची परवा न करतां ) शिरोमुंडन करून, काषाय वस्त्रांनीं देह आच्छादून, घरांतून बाहेर पडलों[1]. ( मी संन्यासी झालों. ) "

बोधिसत्त्वानें याप्रमाणें गृहत्याग केल्यावर तो **राजगृह** नगरास गेला. तेथें त्या कालीं **बिंबिसार** नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यानें बोधिसत्त्वास भिक्षेसाठीं फिरत असतांना पाहिलें. हा कोणी तरी अद्वितीय पुरुष असावा असें त्याला वाटलें व तो जेथें बोधिसत्त्व रहात होता, त्या **पांडव** नांवाच्या पर्वतावर स्वतः गेला. तेथें बोधिसत्त्वाची भेट घेऊन त्यानें त्याला संन्यास सोडून क्षत्रियधर्म स्वीकारण्यासाठीं बराच आग्रह केला. परंतु बोधिसत्त्वाच्या निर्वाण प्राप्त करून घेण्याच्या दृढनिश्चयापुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं. ही कथा **सुत्तनिपातांतील पब्बज्जासुत्तांत** वर्णिली आहे.

यापुढील बोधिसत्त्वाचें वृत्त **मज्झिमनिकायांतील महासच्चक**[2] सुत्तांत सांपडतें. त्याचें शब्दशः भाषांतर न देतां सारांश येथें देतों. **सच्चक** नांवाचा एक जैन ( निर्ग्रन्थ ) पंडित **वैशाली** नगरींत राहत असे. त्याला **अग्गिवेस्सन** असेंहि ह्मणत. त्याला उद्देशून बुद्ध ह्मणतोः—

---

१ या उताऱ्याचें शब्दशः भाषांतर केलें नाहीं. पुनरुक्ति गाळून तात्पर्य सांगण्याचा प्रयत्न केला आहे. येथें आईबाप असा उल्लेख आहे. बोधिसत्त्वाची आई सातव्या दिवशींच परलोकवासी झाली होती, तरी तिच्या निधनानंतर **महाप्रजापतीनें** बोधिसत्त्वाचें पुत्रवत् पालन केल्याचा उल्लेख **चुल्लवग्गांत** सांपडतो. शिवाय **महाप्रजापती** बोधिसत्त्वाची मावशी असून सावत्र आई होती, असें वर सांगितलेंच आहे. तेव्हां येथें **महाप्रजापतीलाच** आई म्हटलें आहे, हें उघड आहे.

२ महासच्चक सुत्तांतील मजकुराचा संस्कृत अनुवाद ललितविस्तराच्या १६ व्या अध्यायांत आला आहे.

"हे **अग्गिवेस्सन**, याप्रमाणें प्रव्रज्या धारण करून मी घरांतून बाहेर पडलों. परम सुखावह गोष्ट कोणती याचा मी शोध करीत होतों. अनुत्तर श्रेष्ठ शान्तिस्थानाचा पत्ता लावण्यासाठीं मी फिरत होतों. अशा समयीं **आळार कालामाजवळ** जाऊन त्याला मीं ह्मटलें कीं, 'भो **कालाम**, तुझ्या या धर्म-पंथांत प्रवेश करण्याची मी इच्छा करितों, तेव्हां कालाम ह्मणाला, 'आयुष्मन् , तूं या मताप्रमाणें **वाग**. विद्वान् मनुष्य या मताप्रमाणें वागला तर तो आमचें तत्त्व काय आहे हें लवकर जाणूं शकेल.'

"लवकरच **आळार कालामाचें** तत्त्वज्ञान **मी** शिकलों. वादविवाद करण्यांत मी पटु झालों. ती सारी पोपटपंची होती. दुसरेहि **कालामाचे** शिष्य माझ्याप्रमाणें पोपटपंचीत प्रवीण होते. या पोपटपंचीनें माझें समाधान झालें नाहीं. मीं माझ्या मनाशीं असा विचार केला कीं, केवळ श्रद्धा ठेवल्यानें **काला-माला** अनुभवज्ञान झालें नसावें, त्याला या तत्त्वज्ञानाचा पूर्ण अनुभव मिळाला असला पाहिजे. तेव्हां मी कालामाजवळ गेलों आणि त्याला असा प्रश्न केला, कीं 'भो **कालाम**, या तत्त्वज्ञानाचा तुला साक्षात्कार कसा झाला ?" तेव्हां कालामानें मला **आकिंचन्यायतन**[१] नांवाची समाधि शिकविली. तेव्हां मीं माझ्याशींच म्हटलें कीं, कालामाला जशी श्रद्धा आहे तशीच ती मलाहि आहे. कालामाला जसा उत्साह आहे तसाच तो मलाहि आहे. कालामाला जसा विवेक ( स्मृति ) आहे तसाच तो मलाहि आहे. कालामाला जशी एकाग्रताशक्ति ( समाधि ) आहे तशीच ती मलाहि आहे. कालामाला जशी प्रज्ञा आहे, तशीच ती मलाहि आहे. तर आळारकालामाप्रमाणें मींहि ह्या धर्माचा साक्षात्कार कां करून घेऊं नये ? असा विचार करून, हे **अग्गिवेस्सन**, थोडक्याच अवकाशांत मी **आकिंचन्य** समाधि साध्य केली. हें वर्तमान जेव्हां मीं कालामाला कळविलें, तेव्हां तो मला म्हणाला "ज्या समाधीचा मला साक्षात्कार झाला त्या समाधीचा तुलाहि साक्षात्कार झाला आहे. जें मी जाणत आहे तेंच तूंहि जाणत आहेस. माझी आणि तुझी योग्यता आतां सारखीच आहे. तेव्हां आजपासून तूं आणि मी मिळून या पंथाचे मुख्य होऊं या, व या शिष्यांस शिकवूं या." याप्रमाणें कालामानें माझा बहुमान केला. तो आचार्य व मी शिष्य असें असतां आपल्या योग्-

---

१ या समाधीनें मन वृत्तिशून्य होतें.

तेलाच त्यानें मला चढविलें. हे **अग्गिवेस्सन**, या थोरवीनें माझें समाधान झालें नाहीं, हा कालामाचा धर्म कांहीं निर्वाणप्राप्तीला उपयोगी पडणार नाहीं, याची आकिंचन्यायतनसमाधीपर्यंतच काय ती गति आहे असें मला वाटूं लागलें, व त्या कालामाच्या पंथांतून मी बाहेर निघालों.

" तदनंतर मी उद्दक **रामपुत्र** याजपाशीं गेलों. त्यानें मला **नैवसंज्ञानासंज्ञायतन**[1] नांवाची समाधि शिकविली. अल्पावकाशानेंच ही समाधि मला साध्य झाली. हें वर्तमान जेव्हां मीं **रामपुत्राला** कळविलें तेव्हां त्यानें माझा कालामाप्रमाणेंच सत्कार केला. तो आचार्य आणि मी शिष्य अशी स्थिति असतां त्यानें मला आपल्या योग्यतेस चढविलें. परंतु एवढ्यानें माझी तृप्ति झाली नाहीं. या रामपुत्राच्या धर्मानें कांहीं निर्वाणप्राप्ति होणार नाहीं, याची गति नैवसंज्ञानासंज्ञायतनसमाधीपर्यंतच काय ती आहे असें मला वाटलें, व रामपुत्राला सोडून मी निघालों.

" हे अग्गिवेस्सन, याप्रमाणें मी परमसुखाचा, परमशांतीचा, निर्वाणाचा शोध करीत करीत मगध देशांत फिरत असतां **उरुवेलेला**[2] येऊन पोहोंचलों. तेथील प्रदेश अत्यंत रमणीय होता. वनशोभा फारच चांगली होती, नदी मंद मंद वाहत होती, आसमंतात् कांहीं अंतरावर गांव वसले होते. या ठिकाणीं, हे अग्गिवेस्सन, मी माझे श्वासोच्छ्वास कोंडून घेत असे. श्वासोच्छ्वास कोंडल्यानंतर माझ्या मस्तकांत भयंकर वेदना उठत असत, पोटांतहि अशाच वेदना उठत असत, व सगळ्या अंगाचा अत्यंत दाह होत असे. परंतु माझा उत्साह दृढ होता, जागृति कायम होती, देह मात्र दुर्बल झाला होता. इतक्या दुःखकारक वेदना होत होत्या तरी त्यांचा माझ्या विचारावर परिणाम होत नसे.

" तदनंतर मीं आहार कमी करण्याचा निश्चय केला. मुगांचा किंवा कुळथांचा काढा पिऊनच मी रहात असें. अशा स्थितींत माझा देह अत्यंत कृश झाला, हातापायांच्या काड्या झाल्या, पाठीचा कणा स्पष्ट दिसूं लागला, मोडक्या घराच्या वांशांप्रमाणें बरगड्या खिळखिळून गेल्या, पाण्यांत पडलेलीं

---

१ ही समाधीची शेवटची पायरी.

२ सध्या ज्याला बुद्धगया असें म्हणतात, तो प्रदेश.

नक्षत्रांची प्रतिबिंबें जशीं खोल गेलेलीं दिसतात, त्याप्रमाणें माझ्या डोळ्यांचीं बुबुळें खोल गेलीं होतीं; कडू भोपळा कच्चा कापून उन्हांत टाकिला असतां जसा कोमेजून जातो तशी माझी अंगकांति करपून गेली होती, व पोट आणि पाठ एक झाली होती. त्या वेळीं माझ्या मनांत असा विचार आला कीं, या ज्या मी अत्यंत दुःखकारक वेदना अनुभवीत आहे त्यांच्यापेक्षां अधिक दुःखकारक वेदना दुसऱ्या श्रमणानें किंवा ब्राह्मणानें अनुभविल्या नसतील. परंतु या दुष्कर कर्मानें लोकोत्तर धर्मज्ञान प्राप्त होईल असें मला वाटत नाहीं. याहून दुसरा कोणता तरी निर्वाणप्राप्तीचा मार्ग आहे कीं नाहीं? ( घर सोडण्यापूर्वी मी ) माझ्या बापाबरोबर शेतांत गेलों असतां जंबुवृक्षाच्या छायेंत बसून प्रथम ध्यानाची समाधि साधल्याची मला आठवण आहे, तोच तर निर्वाणाचा मार्ग नसेल ना? या गोष्टीचें स्मरण झाल्याबरोबर, हे **अग्गिवेस्सन**, तोच मार्ग खरा असावा असें मला वाटूं लागलें. मी माझ्याशींच म्हणालों, त्या समाधिसुखाला मी कां भितों? तें चैनीनें मिळालेलें सुख नव्हे, किंवा पापकारकहि नव्हे. अशा सुखाला मी भितां कामा नये. परंतु या दुर्बल देहानें तें सुख साध्य होणार नाहीं. तेव्हां देहाचें संरक्षण करण्यापुरतें अन्न मीं खाल्लें पाहिजे.

तदनंतर मी देहसंरक्षणाला लागणारें अन्न सेवन करूं लागलों. त्या वेळीं माझ्या सेवेसाठीं पांच भिक्षु राहत असत. मला जें धर्मज्ञान होईल तें मी त्यांना सांगेन अशी आशा त्यांना वाटत होती. परंतु जेव्हां मी अन्न सेवन करण्यास आरंभ केला, तेव्हां त्यांची निराशा झाली, व मी ढोंगी आहें असें समजून ते मला सोडून चालते झाले. त्या अन्नग्रहणानें हळूहळू माझ्या अंगीं शक्ति आली व मी समाधिसुखाचा अनुभव घेऊं लागलों."

**आळार कालाम** व **उद्दक रामपुत्र** हे दोघे एका प्रकारच्या योगमार्गाचे प्रवर्तक होते. **बुद्धचरित**काव्यांत यांना सांख्यमताचे प्रवर्तक असें म्हटलें आहे; व त्यावरून बौद्धधर्म सांख्यमतापासून निघाला असें विधान कित्येक पाश्चात्य पंडितांनीं केलें आहे. परंतु या त्यांच्या विधानास **त्रिपिटकांत** कोठेंच आधार नाहीं. **अश्वघोषाचार्यांनीं** सांख्यमताची निष्फलता दाखविण्यासाठीं आणि काव्याला शोभा आणण्यासाठीं त्यांना सांख्यमतप्रवर्तक बनविलें असावें एवढेंच यावरून सिद्ध होत आहे.

यापुढील बोधिसत्त्वावर गुदरलेला मोठा आणीबाणीचा प्रसंग म्हटला म्हणजे माराबरोबर झालेल्या त्याच्या युद्धाचा होय. **बुद्धचरितकाव्यादि** ग्रंथांतून या प्रसंगाचें अद्भुतरसपरिप्लुत वर्णन आढळतें. तें काव्याच्या दृष्टीनें अत्यंत मनोरम आहे. परंतु **सुत्तनिपातांतील पधानसुत्तांत**[1] केलेलें मारयुद्धाचें वर्णन त्याहून भिन्न आहे. **पधानसुत्तांत** २५ गाथा आहेत, त्यांपैकीं कांहीं येथें देणें अप्रासंगिक होणार नाहीं.

**बुद्ध भगवान** म्हणतोः—

**तं मं पधानपहितत्तं नदिं नेरंजरं पति ।**
**विपरक्कम्म झायन्तं योगक्खेमस्स पत्तिया ॥ १ ॥**
**नमुचि करुणं वाचं भासमानो उपागमि ।**
**किसो त्वमसि दुब्बण्णो सन्तिके मरणं तव ॥ २ ॥**
**सहस्सभागो मरणस्स एकंसो तव जीवितं ।**
**जीवं भो जीवितं सेय्यो जीवं पुञ्ञानि काहसि ॥ ३ ॥**
**चरतो च ते ब्रह्मचरियं अग्गिहुत्तं च जूहतो ।**
**पहूतं चीयते पुञ्ञं किं पधानेन काहसि ॥ ४ ॥**

(१) मी **नेरंजरा** नदीच्या कांठीं निर्वाणप्राप्तीसाठीं मोठ्या उत्साहानें ध्यान करीत होतों. माझें सर्व चित्त निर्वाणाकडे लागलें होतें. (२) (असें असतां) **मार** माझ्याजवळ आला आणि करुणामय वाणीनें मला म्हणाला, 'तूं कृश झाला आहेस, तुझी अंगकांति फिकट झाली आहे, मरण तुझ्याजवळ आहे. (३) हजार हिश्शांनीं तूं मरणार, एका हिश्शानें काय तें तुझें जीवित बाकी राहिलें आहे. भो (गोतम), जिवंत रहा. जगलास तर पुण्यकर्में करूं शकशील. (४) (गृहस्थधर्माला विहित) कर्मांचें आचरण करून, अग्निहोत्र ठेवून, होम केला असतां पुष्कळ पुण्य संपादितां येतें, तर मग निर्वाणासाठीं प्रयत्न कशाला करतोस ?

**मारानें बोधिसत्त्वाला** असा उपदेश केल्यावर **बोधिसत्त्व** त्याला म्हणाला :—

**अणुमत्तेन पि पुञ्ञेन अत्थो मय्हं न विज्जति ।**
**येसं च अत्थो पुञ्ञानं ते मारो वत्तुमरहति ॥ १ ॥**

---

१ या सुत्ताचें संस्कृत रूपांतर ललितविस्तराच्या १८ व्या अध्यायांत सांपडतें.

अत्थि सद्धा ततो विरियं पञ्ञा च मम विज्जति ।
एवं मं पहितत्तं पि किं जीवितमनुपुच्छसि ।। २ ।।

( १ ) अशा प्रकारचें ( लौकिक ) पुण्य अणुमात्रहि मला नको आहे. ज्यांनां अशा पुण्याची आवश्यकता वाटत असेल त्यांनां पाहिजे तर मारानें हा उपदेश करावा. ( २ ) माझ्या अंगीं श्रद्धा आहे, उत्साह आहे आणि प्रज्ञाहि पण आहे. याप्रमाणें माझा अंतरात्मा निर्वाणपरायण झाला असतां मरणाची भीति कशाला घालतोस ?

आणखी बोधिसत्त्व म्हणाला :—

कामा ते पठमा सेना दुतिया अरति वुच्चति ।
ततिया खुप्पिपासा ते चतुत्थी तण्हा पवुच्चति ।। १ ।।
पंचमी थीनमिद्धं ते छट्ठा भीरुपवुच्चति ।
सत्तमी विचिकिच्छा ते मक्खो थंभो ते अट्ठमो ।। २ ।।
लाभो सिलोको सक्कारो मिच्छा लद्धो च यो यसो ।
यो चत्तानं समुक्कंसे परे च अवजानति ।। ३ ।।
एसा नमुचि ते सेना कण्हस्साभिप्पहारणी ।
न तं असूरो जिनाति जेत्वा च लभते सुखं ।। ४ ।।

( १-२ ) ( हे **मार** ) इंद्रियांनां सुखविणारे चैनीचे पदार्थ ही तुझी पहिली सेना होय, अरति ( कंटाळा ) ही तुझी दुसरी सेना, तिसरी भूक आणि तहान, चवथी विषयवासना, पांचवी आळस, सहावी भीति, सातवी कुशंका आणि आठवी गर्व ही तुझी सेना होय. ( ३ ) ( याशिवाय ) लाभ, सत्कार, पूजा ही तुझी ( नववी ) सेना आहे, आणि खोट्या मार्गानें मिळालेली कीर्ति ( ही दहावी ); या कीर्तीच्या योगानें मनुष्य आत्मस्तुति आणि परनिंदा करीत असतो. ( ४ ) हे काळ्याकुट्ट **नमुचि ( मार )**, ( साधुसंतांवर ) प्रहार करणारी ही तुझी सेना आहे. तिला भ्याड मनुष्य जिंकूं शकत नाहीं. परंतु जो शूर मनुष्य तिला जिंकतो तोच सुख लाभतो.

बोधिसत्त्व पुढें म्हणतो :—

पगाळ्हा येत्थ न दिस्सन्ति एते समणब्राह्मणा ।
तं च मग्गं न जानन्ति येन गच्छन्ति सुब्बता ।। १ ।।

(१) (हे मार) हे सगळे श्रमण आणि ब्राह्मण तुझ्या सेनेंत बुडून गेले आहेत; त्यामुळें ते (शीलादि गुणांनीं) प्रकाशत नाहींत, व त्यांनां ज्या मार्गानें महर्षि जातात तो मार्ग ठाऊक नाहीं.

**यं तेतं नप्पसहति सेनं लोको सदेवको ।**

**तं ते पञ्ञाय गच्छामि[१] आमं पत्तं व अम्हना ॥ २ ॥**

(२) या तुझ्या सेनेपुढें देव आणि मनुष्य उभे राहूं शकत नाहींत. तिचा, दगडानें कच्च्या मातीचें भांडें फोडून टाकावें त्याप्रमाणें, मी प्रज्ञेनें पराभव करून टाकतों.

येथें हा मार कोण, हें आपणांस सांगण्याची आवश्यकता नाहीं. मार म्हणजे मारणारा. तो वर सांगितलेल्या सेनेच्या साहाय्यानें मनुष्याच्या सद्वासनांचा नाश करितो. त्याचा जय करणें म्हणजे आत्मजय करणें होय. हा जय बाह्य शत्रूंवर मिळविलेल्या जयापेक्षां किती तरी पटीनें श्रेष्ठ आहे.

याप्रमाणें **बोधिसत्त्वाचा माराशीं** सारखा झगडा चालला होता. पुढें वैशाख शुद्ध पौर्णिमेच्या दिवशीं **सुजाता** नांवाच्या कुलीन स्त्रीनें दिलेला दुधाचा पायस सेवन करून तो एका **बोधिवृक्षा**खालीं (पिंपळाच्या झाडाखालीं) गेला. त्या रात्री त्यानें माराचा पूर्णपणें पराभव करून जगदुद्धाराचा धर्ममार्ग शोधून काढला. तेव्हां मार म्हणाला :—

**सत्त वस्सानि भगवंतं अनुबंधिं पदापदं ।**

**ओतारं नाधिगच्छिस्सं संबुद्धस्स सतिमतो ॥ १ ॥**

सात वर्षेपर्यंत सतत भगवंताच्या मागें सारखा लागलो होतों, परंतु या विवेकी (स्मृतिमान्) बुद्धाचें कांहींच वर्म सांपडलें नाहीं.

**तस्स सोकपरेतस्स वीणा कक्खा अभस्सथ ।**

**ततो सो दुम्मनो यक्खो तत्थेवंतरधायथा ति ॥ १ ॥**

याप्रमाणें **मार** शोकानें व्याकूळ झाला असतां त्याच्या काखेंतून वीणा गळून पडला. तेव्हां तो मार अत्यंत दुःखी होत्साता तेथेंच अंतर्धान पावला !

---

१ 'गच्छामि' हा सिंहली पाठ कांहीं ब्रह्मी पुस्तकांत 'वेच्छामि' असा सांपडतो. परंतु सेस्सामि (संस्कृत—सेत्स्यामि) हा इतर ब्रह्मी पुस्तकांत आढळणारा पाठ अधिक सयुक्तिक दिसतो. सिध् धातूचा जिंकणें असाहि अर्थ

मारांचा पराभव करून धर्ममार्ग शोधून काढल्यावर **बोधिसत्त्व** बुद्ध झाला. येथून पुढें त्याला **संबुद्ध, तथागत, सुगत, धर्मराज, मारजित्, जिन** इत्यादि संज्ञा लावतात. हा मार्ग त्यानें आपल्या वयाच्या ३६ व्या वर्षी शोधून काढला. यापुढील हकीगत **महावग्ग** ग्रंथांत दिली आहे. **महावग्ग** ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर उपलब्ध आहे, तें ज्यांनां इंग्रजी येत असेल त्यांनीं अवश्य पहावें. **महावग्गांतील** विस्तृत वर्णन येथें देण्यास सवड नाहीं, तथापि त्यांपैकीं कांहीं गोष्टींचा येथें उल्लेख केल्यावांचून राहवत नाहीं.

धर्मज्ञान झाल्या दिवसापासून भगवान्‌बुद्ध सात दिवसपर्यंत मोक्ष-रसाचा अनुभव घेत त्याच आसनावर बसला होता. सातव्या रात्रीच्या शेवटल्या प्रहरी त्यानें असा आनंदोद्गार काढिला :—

**यदा हवे पातुभवन्ति धम्मा आतापिनो झायतो ब्राह्मणस्स ।**
**विधूपयं तिट्ठति मारसेनं सुरियो व ओभासयमंतळिक्खं ति ॥**

ज्यावेळी ध्यानस्थ आणि उत्साही अशा ब्राह्मणाला धर्मज्ञानाचा साक्षात्कार होतो, त्या वेळीं तो मारसेनेचा विध्वंस करून टाकतो, आणि अंतरिक्षांतील सूर्याप्रमाणें प्रकाशतो.

नंतर या **नेरंजरा** नदीच्या कांठावरील प्रदेशांत भगवान् रहात असतां त्यांच्या मनांत असा विचार आला, कीं :—

**किच्छेन मे अधिगतं हलं दानि पकासितुं ।**
**रागदोसपरेतेहि नायं धम्मो सुसंबुद्धो ॥ १ ॥**
**पटिसोतगामिं निपुणं गंभीरं दुद्दसं अणुं ।**
**रागरत्ता न दक्खन्ति तमोखन्धेन आवुता ति ॥ २ ॥**

( १ ) मोठ्या प्रयत्नानें या मार्गाचें ज्ञान मला झालें आहे. आतां तें लोकांला सांगण्यांत अर्थ दिसत नाहीं. कारण लोभानें आणि द्वेषानें

---

आहे. या श्लोकाचें संस्कृत रूपांतर ललितविस्तरांत दिलें आहे तें असें :—

**या ते सेना धर्षयति लोकमेनं सदेवकं ।**
**भेत्स्यामि प्रज्ञया तां ते आमपात्रमिवाम्बुना ॥**

१ Sacred Books of the East. Vol. XIII & XVII.

भरलेले लोक तें लवकर जाणूं शकणार नाहींत. (२) हा मार्ग लोकप्रवाहाच्या उलट जाणारा आहे, हा ज्ञानयुक्त आहे, हा गंभीर आहे, हा दुरधिगम आहे, आणि हा सूक्ष्म आहे, (ह्मणून) अज्ञानावरणानें आच्छादित व कामासक्त मनुष्यांला त्याचें ज्ञान होणार नाहीं!

भगवंताच्या मनांतील हा विचार ब्रह्मदेवानें जाणला, आणि तो आपल्याशींच ह्मणाला, 'अरेरे! बुद्धानें जर धर्मोपदेश केला नाहीं, तर लोकांची मोठी हानि होणार आहे! लोकांचा नाश होणार आहे!' असे उद्गार काढून ब्रह्मदेव एकदम बुद्धासमोर प्रगट झाला व त्याला ह्मणालाः—

**उट्ठहि वीर विजितसंगाम सत्थवाह अनण विचर लोके।**

**देसेतु भगवा धम्मं अञ्ञातारो भविस्सन्ति ॥ १ ॥**

हे वीर, हे सार्थवाह, आतां उठ, तूं संग्राम जिंकिला आहेस, तूं ऋणमुक्त आहेस; सर्वत्र संचार कर. हे भगवन्, तूं लोकांनां धर्मोपदेश कर हा तुझा धर्म जाणणारेहि (कांहीं) असतीलच.

या ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेस अनुसरून बुद्धानें धर्मोपदेश करण्याचा निश्चय केला.

आतां हा ब्रह्मदेव कोण, हें येथें दिलेल्या उताऱ्यावरून किंवा **महावग्गांतील** कथेवरून समजणें अंमळ कठीण आहे. परंतु **तेविज्जसुत्त**, **महागोविंदसुत्त** इत्यादि सुत्तांतून जें त्याचें वर्णन सांपडतें, त्यावरून त्याची बरोबर कल्पना करतां येते.

**मैत्री, करुणा, मुदिता,** आणि उपेक्षा[1] या चार भावनांला **ब्रह्मविहार** असें ह्मणतात. **करणीयमेत्तसुत्तांत** ह्मटलें आहे:-

**माता यथा नियं पुत्तं आयुसा एकपुत्तमनुरक्खे।**

**एवं पि सब्बभूतेसु मानसं भावये अपरिमाणं ॥ २ ॥**

आई जशी एकुलत्या एका पुत्राचें आपले प्राण खर्ची घालूनहि परिपालन करते, त्याचप्रमाणें (त्यानें) आपलें मन सर्व प्राणिमात्रांविषयीं अपरिमित प्रेमानें भरून ठेवावें.

---

१ मैत्री— सार्वत्रिक प्रेमभाव; करुणा = दया; मुदिता = आनंदीवृत्ति; उपेक्षा = परवा न करणें.

**मेत्तं च सब्बलोकस्मिं मानसं भावये अपरिमाणं ।**
**उध्दं अधो च तिरियं च असंबाधं अवेरं असपत्तं ॥ ३ ॥**

आणि मनामध्यें अपरिमित मैत्रीची भावना करावी; वर, खालीं आणि चारी बाजू प्रेमानें भरून टाकाव्या, त्या प्रेमास कोठेहि अडथळा असूं नये किंवा सपत्न असूं नये !

**तिट्ठंचरं निसिण्णो वा सयानो वा यावदस्स विगतमिद्धो ।**
**एतं सतिं अधिट्ठेय्य ब्रह्ममेतं विहारं इधमाहु ॥**

उभा असतां, चालत असतां, बसला असतां किंवा अंथरुणावर पडल्यावर जोंपर्यंत नीज आली नाहीं तोंपर्यंत ही मैत्रीची भावना जागृत ठेवावी, कारण (पंडित जन) इलाच ब्रह्मविहार असें ह्मणतात.

यावरून असें दिसून येईल कीं, ब्रह्मदेव ह्मणजे मैत्री, करुणा, मुदिता, किंवा उपेक्षा यांपैकीं एखादी मनोवृत्ति होय. आई जशी दूध पिणाऱ्या मुलाचें मैत्रीनें (प्रेमानें) पालन करते, तो आजारी असला तर ती करुणेनें त्याची शुश्रूषा करते, पुढें विद्याभ्यासादिकांत त्यानें पाटव संपादन केलें असतां मुदित अंतःकरणानें ती त्याला कुरवाळते, व तो तदनंतर स्वतंत्रपणें संसार करूं लागला किंवा तिच्या मताच्या विरुद्ध वागूं लागला तर ती त्याची उपेक्षा करते; त्याचा ती द्वेष कधींच करीत नाहीं, व त्याला मदत करण्यास तयार नसते असेंहि होत नाहीं; त्याप्रमाणेंच महात्मे लोक या चार श्रेष्ठ मनोवृत्तींनीं प्रेरित होत्साते जनसमूहाचें कल्याण करण्यास तत्पर असतात. ज्या ब्रह्मदेवाला लोक पितामह ह्मणतात तो दुसरा कोणी नसून या चार मनोवृत्तींची साक्षाद् मूर्ति होय ! तेव्हां आतां बुद्धाजवळ ब्रह्मदेव आला ह्मणजे काय ? तर या चार मनोवृत्ति त्याच्या मनांत विकास पावल्या. ब्रह्मदेवाची प्रार्थना त्यानें ऐकिली ह्मणजे काय ? तर त्याच्या अंतः-करणांत वास करणाऱ्या अमर्याद प्रेमानें, अगाध करुणेनें सज्जनांविषयीं मुदितेनें, आणि जे कोणी त्याचें ऐकणार नाहींत किंवा अकारण शत्रु होतील अशांच्या उपेक्षेनें त्याला सद्धर्माचा प्रसार करण्यास प्रवृत्त केलें.

**आळारकालाम** व **उद्दक रामपुत्त** या दोघांस या धर्माचा उपदेश प्रथम करावा असा बुद्धाच्या मनांत विचार आला. कारण ते दोघेहि त्याचा

धर्म समजण्यास समर्थ होते. परंतु ते नुकतेच परलोकवासी झाले असें त्याला समजलें. तेव्हां त्यानें आपल्या धर्माचा वर वर्णिलेल्या देहदंडनाच्या प्रसंगीं आपणास मदत करणाऱ्या पांच भिक्षूंस प्रथमतः उपदेश करावा असा निश्चय केला. ते भिक्षु या वेळीं **वाराणसींतील ऋषिपत्तनांत** रहात असत. भगवान् बुद्ध आषाढ पौर्णिमेच्या सुमारास तेथें जाऊन पोंचला. त्याला पाहून ते पांच भिक्षु एकमेकांस म्हणाले, "हा ढोंगी श्रमण येत आहे, हा पतित गोतम येत आहे. याचा आम्हीं कोणत्याहि प्रकारें आदरसत्कार करतां कामा नये; एक आसन मात्र येथें टाकून ठेवावें; जर त्याची इच्छा असेल तर तो त्यावर बसेल, नाहीं तर नाहीं."

परंतु जसजसा बुद्ध जवळ येत चालला तसतसा या पांच भिक्षूंचा बेत ढांसळत गेला. त्यांपैकीं एकानें उठून आसन मांडलें, दुसऱ्यानें पाय धुण्यास पाणी तयार केलें. बाकीच्यांनीं सामोरे येऊन बुद्धाचें भिक्षापात्र आणि चीवर ( भिक्षुवस्त्र ) घेतलें व त्याचा सन्मान केला. बुद्धानें आपणास धर्म-ज्ञानाचा साक्षात्कार झाल्याचें त्यांना सांगितलें, परंतु तें त्यांना खरें वाटेना. शेवटीं आषाढपौर्णिमेच्या दिवशीं भगवन्तानें त्यांस उपदेश केला, तो असा:—

"भिक्षु हो, प्रव्रजितानें या दोन **अंतांचें** सेवन करूं नये. ते दोन अंत कोणते? चैनीचा उपभोग घेत पडणें हा एक अंत. हा हीन आहे, ग्राम्य आहे, अज्ञजनसेवित आहे, अनार्य आहे, अनर्थावह आहे. देह-दंडण करणें हा दुसरा अंत. हाहि दुःखकारक आहे, अनर्थावह आहे. म्हणून या दोन्ही अंतांनां न जातां **तथागतानें** मध्यम मार्ग शोधून काढला आहे. हा मार्ग ज्ञानचक्षु उत्पन्न करणारा आहे, ज्ञानोदय करणारा आहे. यानेंच उपशम, अभिज्ञा ( दिव्यशक्ति ), संबोध ( प्रज्ञा ) आणि निर्वाण यांची प्राप्ति होते. हे भिक्षु हो, हा मार्ग कोणता म्हणाल तर **आर्य अष्टांगिक मार्ग** होय. त्याचीं हीं आठ अंगें:— सम्यक् दृष्टि, सम्यक् संकल्प, सम्यक् वाचा, सम्यक् कर्मान्त ( कर्म ), सम्यक् आजीव, सम्यक् व्यायाम, सम्यक् स्मृति, आणि सम्यक् समाधि. हा तो **तथागतानें** शोधून काढलेला मार्ग, ज्याच्या योगें उपशम, अभिज्ञा, संबोध, निर्वाण यांची प्राप्ति होते.[1]

---

१. स्पष्टीकरणार्थ परिशिष्ट ३ पहा.

"भिक्षु हो, **दुःख** नांवाचें पहिलें आर्यसत्य तें हें:– जन्महि दुःखकारक, जराहि दुःखकारक, व्याधिहि दुःखकारक, मरणहि दुःखकारक अप्रियांशीं समागम दुःखकारक, प्रियांचा वियोग दुःखकारक; इच्छिलेली वस्तु मिळाली नाहीं म्हणजे तेणेंकरूनहि दुःख होतें. सारांश पांच **उपादनस्कंध**[1] हे दुःखकारक होत.

"भिक्षु हो, **दुःखसमुदय** नांवाचें दुसरें आर्यसत्य म्हणजे जी पुनःपुनः उत्पन्न होणारी व सर्वत्र आसक्ति उत्पन्न करणारी **तृष्णा**. ती हीः– **कामतृष्णा** ( ऐहिक सुखांची तृष्णा ), **भवतृष्णा** ( स्वर्गादिकांची तृष्णा ), आणि **विभवतृष्णा** ( नाहींसा होण्याची तृष्णा ).

"भिक्षु हो, **दुःखनिरोध** नांवाचें तिसरें आर्यसत्य म्हणजे या तृष्णेचा अशेष वैराग्यानें निरोध करणें, तिचा त्याग करणें, तिला फेंकून देणें, तिच्यापासून मुक्त होणें आणि तिजपासून परावृत्त होणें.

भिक्षु हो, **दुःखनिरोधगामिनी प्रतिपदा** नांवाचें चवथें आर्यसत्य म्हणजे ( वर सांगितलेला ) आर्य अष्टांगिक मार्ग."

या बुद्धाच्या पहिल्या उपदेशास 'धर्मचक्रप्रवर्तन' असें म्हणतात. या पांच भिक्षूंपैकीं कौंडिन्य नांवाच्या भिक्षूला बुद्धाचा उपदेश त्याच वेळीं पटला व तो बुद्धाचा शिष्य झाला. पुढें बाकीचे चारहि भिक्षु बुद्धाचे शिष्य झाले.

सभ्यगृहस्थ हो, येथून पुढें कुसिनारा[2] येथें परिनिर्वाण ( देहावसान ) होईपर्यंत ४५ वर्षांच्या अवधींत बुद्धानें केलेल्या परोपकाराचें वर्णन थोडक्यांतहि करण्यास–अवकाश फार झाल्यामुळें सवड राहिली नाहीं. त्यांनीं स्थापन केलेल्या संघाची थोडीशी माहिती मी दुसऱ्या एका व्याख्यानांत आपणासमोर ठेवणारच आहें. आतां त्यांच्या दिनचर्येची थोडीशी हकीगत सांगून आटोपतें घेतों.

बुद्ध भगवान् पहांटेस उठत असे. त्या वेळीं तो ध्यान करी किंवा विहाराच्या बाहेरच्या बाजूस चंक्रमण (इकडून तिकडे शांतपणें फिरणें) करी. सकाळीं उठून भिक्षेसाठीं तो गांवांत प्रवेश करी, तेथें कोणीं कांहीं प्रश्न

---

१. परिशिष्ट २ पहा. २. हें स्थान गोरखपुर जिल्ह्यांत आहे.

विचारला तर त्याचें त्याला उत्तर देई व मग त्याला उपदेश करून सन्मार्गाला लावी. कृषिभारद्वाज, शृगाल, इत्यादिकांना त्यानें अशाच प्रसंगीं उपदेश करून सन्मार्गाला लाविलें. भिक्षापात्रांत शिजविलेल्या अन्नाची जी भिक्षा एकत्र होई ती घेऊन तो विहारांत परत येत असे, व दुपारचें बारा वाजण्या-पूर्वी भोजन करीत असे. भोजनोत्तर थोडीशी विश्रांति घेऊन ध्यान करीत असे. संध्याकाळीं गृहस्थांला किंवा भिक्षूंला उपदेश करीत असे. रात्रीं पुन: ध्यान करीत असे अथवा चंक्रमण करीत असे. मध्यरात्रीच्या सुमारास तो उजव्या कुशीवर पायावर पाय ठेवून व उशीला हात घेऊन निजत असे. या त्याच्या निजण्याला **सिंहशय्या** असें म्हणतात. ज्या वेळीं तो प्रवासाला जाई त्या वेळीं बहुधा त्याच्याबरोबर भिक्षूंचा बराच मोठा समुदाय असे. तो सकाळीं एका गांवामध्यें भिक्षा ग्रहण करून दुसऱ्या गांवामध्यें रात्रीं मुक्कामाला जाई. जेथें विहार नसेल तेथें तो झाडाखालीं किंवा एखाद्या बागेमध्यें राही. कोणी पूर्व दिवशीं आमंत्रण केलें असतां भिक्षुसंघासह तो त्याच्या घरीं भिक्षाग्रहण करीत असे.

याप्रमाणें सतत ४५ वर्षे अनेक जनसमुदायावर आपल्या धर्मामृताचा वर्षाव करून वयाच्या ८० व्या वर्षी बुद्ध भगवान् कुसिनारा येथें परिनिर्वाण पावता झाला. क्षत्रियकुलांत त्याचा जन्म झाला असून परराष्ट्रांच्या विजया-पेक्षां मनोविजय त्याला श्रेष्ठ वाटला. आपल्या शत्रूंस त्यानें शस्त्रांनीं न जिंकितां श्रद्धा, क्षांति आणि लोककल्याणाचा अप्रकंप्य उत्साह याच उपायांनीं जिंकलें. ज्यानें मारास जिंकलें तो काय न जिंकील ?

सभ्यगृहस्थ हो, हें बुद्धरत्न या भारतभूमींत उत्पन्न झालें हें या भूमीचें मोठें भाग्य होय ! जगाच्या इतिहासांत या रत्नाच्या योगें केवढा फेरफार झाला हें आपणांस सांगण्याची आवश्यकता नाहीं. या सद्गुरूला, या जगद्गुरूला, – तुकारामबोवांच्या म्हणण्याप्रमाणें या खऱ्या देवाला[१] – आम्ही गेलीं हजार वर्षे अगदींच विसरून गेलों होतों; परंतु पाश्चात्य

---

१. सद्गुरुवांचोनि सांपडेना सोय । धरावे ते पाय आधीं त्याचे ॥
आपणासारिखें करितां तात्काळ । कांहीं काळवेळ नलगे त्यांशी ॥
लोहपरिसाची न साहे उपमा । सद्गुरुमहिमा अगाधची ॥
तुका म्हणे ऐसें आंधळें हें जन । गेलें विसरून खऱ्या देवा ॥

पंडितांच्या परिश्रमानें या रत्नाची पारख आम्हांस हळूहळू होत चालली आहे हें सुचिन्ह समजलें पाहिजे. या रत्नाचा उज्ज्वल प्रकाश आमच्या अंतः-करणावर पडून आमचें अज्ञान नष्ट होईल, आमच्यांतील भेदभाव आम्ही विसरून जाऊं, व पुनः मनुष्यजातीचें हित साधण्यास समर्थ होऊं अशी आशा आहे. सरतेशेवटीं स्थविर अनिरुद्धाचार्य यांच्या वाणीनें मी अशी प्रार्थना करितों कीं,

> भूतं भवद्भावि च धर्मजातं ।
> योऽनन्यथा स्वयमबोधि सुबोधिमूले ।
> ज्ञेयोदये सुधिषणावरणानभिज्ञः ।
> संबुद्ध एष भवतां भवताद्विभूत्यै ॥

भूत, भविष्य आणि वर्तमान धर्मतत्त्वें उत्तम बोधिवृक्षाखालीं ज्यानें स्वतः यथार्थ जाणिलीं, व ज्ञेय तत्त्वांचा ( अंतःकरणांत ) उदय होत असतां बुद्धीवर आवरण पडल्याचें ज्याला मुळींच माहीत नाहीं, असा हा संबुद्ध आपल्या कल्याणाला कारण होवो !

# धर्म

आलोकस्तिमिरे विपद्विषमणिः पाते करालंबनं
याञ्चाकल्पतरुर्जगज्जयरथं पाथेयमन्ते पथि ।
दुःखव्याधिमहौषधं भवभयोद्भ्रांताशयाश्वासनं
तापे चंदनकाननं स्थिरसुहृद्धर्मः सतां बांधवः ॥

धर्म हा अंधकारांत प्रकाश आहे; विपत्तिरूपी विषाचा नाश करणारा मणि आहे; पडलेल्याला हात देणारा आहे; इच्छेचें फल देणारा हा कल्पतरु आहे; जगताचा जय करणारा हा जणूं रथ आहे; परलोकप्रवासाची शिदोरी; दुःखरूपी व्याधीचें महौषध; भवभयानें भ्रांत झालेल्या अंतःकरणाला आश्वासन; दाह झाला असतां चंदनवन; हा कायमचा मित्र आहे; आणि हा सज्जनांचा ( खरा ) बांधव आहे.

—( क्षेमेंद्रमहाकवि. अवदानकल्पलता. )

*    *    *    *

सब्बपापस्स अकरणं कुसलस्स उपसंपदा ।
सचित्तपरियोदपनं एतं बुद्धान सासनं ॥ १ ॥

सर्व पापांपासून विरत होणें, ( सर्व ) कुशलाचा ( पुण्याचा ) संचय करणें, आणि स्वचित्ताचें संशोधन करणें हें बुद्धाचें अनुशासन होय. ( धम्मपद. )

बुद्धानें उपदेशिलेल्या धर्ममार्गाचा सारांश या गाथेंत सांगितला आहे. 'सर्व पापापासून विरत होणें' म्हणजे शीलाचें रक्षण करणें; 'कुशलाचा संचय करणें' म्हणजे समाधि साध्य करणें; आणि 'स्वचित्ताचें संशोधन करणें' म्हणजे प्रज्ञा संपादन करणें होय. अर्थात् **शील, समाधि** आणि **प्रज्ञा** या त्या धर्ममार्गाच्या तीन मुख्य पायऱ्या होत. यांनांच अनुक्रमें '**अधिशीलशिक्षा**,' '**अधिचित्तशिक्षा**' आणि '**अधिप्रज्ञाशिक्षा**' असें म्हणतात. या तीन शिक्षांत सगळ्या बौद्धधर्माचा अंतर्भाव होतो. गेल्या व्याख्यानांत सांगितलेल्या **आर्य अष्टांगिक मार्गाच्या** आठहि अंगांचा या

तीन शिक्षांतच समावेश होतो. **सम्यक् वाचा**, **सम्यक् कर्मान्त** आणि **सम्यक् आजीव** या तीन अंगांचा अधिशीलशिक्षेंत समावेश होतो; **सम्यक् व्यायाम**, **सम्यक् स्मृति** आणि **सम्यक् समाधि** या तीन अंगांचा अधिचित्तशिक्षेंत समावेश होतो; व **सम्यक् दृष्टि** आणि **सम्यक् संकल्प** या दोन अंगांचा अधिप्रज्ञाशिक्षेंत समावेश होतो.

आजच्या या व्याख्यानांत बुद्ध, धर्म व संघ या रत्नांपैकीं दुसऱ्या रत्नाची म्हणजे धर्माची माहिती सांगावयाची ती मी वरील शिक्षात्रयीच्या द्वारें सांगणार आहें. तेव्हां आतां अधिशीलशिक्षा किंवा शील म्हणजे काय याचा प्रथमतः विचार करूं. बौद्ध समाजांतील पुरुषांचे गृहस्थ, उपासक, श्रामणेर आणि भिक्षु असे चार भेद आहेत. त्याचप्रमाणें गृहिणी, उपासिका, श्रामणेरी आणि भिक्षुणी असे स्त्रियांचेहि चार वर्ग केले आहेत. पैकीं भिक्षुणीचा आणि श्रामणेरीचा वर्ग आजला अस्तित्वांत नाहीं. बाकी सहा वर्ग ब्रह्मदेश, सिलोन वगैरे देशांतील बौद्ध लोकांत आढळतात. यांतील भिक्षूंला आणि श्रामणेरांला लागू पडणारा जो **अधिशीलशिक्षेचा** भाग त्याचा आम्हांस येथें विचार करण्याची जरूरी वाटत नाहीं. एक तर तसें केल्यानें आजच्या विषयाचा फारच विस्तार होणार आहे; व दुसरें त्यापासून आपणाला तादृश फायदा होण्यासारखा नाहीं. तथापि ज्यांची तशीच जिज्ञासा असेल त्यांनीं विनय ग्रंथाचें "Sacred Books of the East" मध्यें प्रसिद्ध झालेलें भाषांतर वाचावें.

गृहस्थ आणि गृहिणी यांनां लागू पडणाऱ्या शीलाचे इतर वर्गांनां लागू पडणाऱ्या शीलाप्रमाणेंच **विहितशील** (चारित्तसील) आणि **निषिद्धशील** (वारित्तसील) असे दोन भेद आहेत. बुद्धानें करण्यास सांगितलेल्या गोष्टी करणें हें **विहितशील**; व वर्ज्य करण्यास सांगितलेल्या गोष्टी वर्ज्य करणें हें **निषिद्धशील** होय.

**मंगलसुत्त**, **सिगालसुत्त** इत्यादि सुत्तांतून गृहस्थांनीं आणि गृहिणींनीं पाळण्यासाठीं बुद्ध भगवंतानें कांहीं गोष्टी सांगितल्या आहेत. त्यांपैकीं, विधिशीलाची आपणांस नीट कल्पना व्हावी म्हणून **मंगलसुत्तांतील** गाथा येथें देत आहें.

कोणीएक देवता बुद्धास म्हणाली :—

**बहू देवा मनुस्सा च मंगलानि अचिंतयुं ।**
**आकंखमाना सोत्थानं ब्रूहि मंगलमुत्तमं ।। १ ।।**

अनेक देवांनीं आणि मनुष्यांनीं आपणांस सुख व्हावें म्हणून (अनेक रीतींनीं) मंगल काय आहे याची कल्पना केली. हे भगवन्, यांत उत्तम मंगल कोणतें तें सांगा.

यावर भगवान् म्हणाला :—

**असेवना च बालानं पंडितानं च सेवना ।**
**पूजा च पूजनीयानं एतं मंगलमुत्तमं ।। २ ।।**

मूर्खांच्या संगतीपासून दूर राहणें, पंडितांची संगति करणें आणि पूज्य जनांची पूजा करणें, हीं उत्तम मंगलें होत.

**पटिरूपदेसवासो च पुब्बे च कतपुञ्ञता ।**
**अत्तसम्मापणिधि च एतं मंगलमुत्तमं ।। ३ ।।**

योग्य देशांत वसति करणें, पदरीं पुण्याचा सांठा असणें, आणि मनास सन्मार्गांत दृढ करणें, हीं उत्तम मंगलें होत.

**बाहुसच्चं च सिप्पं च विनयो च सुसिक्खितो ।**
**सुभासिता च या वाचा एतं मंगलमुत्तमं ।। ४ ।।**

पुष्कळशी विद्या शिकणें, कला शिकणें, सद्वर्तनाची संवय लावणें, आणि समयोचित भाषण करणें, हीं उत्तम मंगलें होत.

**मातापितु उपट्ठानं पुत्तदारस्स संगहो ।**
**अनाकुला च कम्मन्ता एतं मंगलमुत्तमं ।। ५ ।।**

आईबापांची सेवा करणें, बायकोमुलांचें योग्य रीतीनें पालन करणें, आणि व्यवस्थितपणें कामें करणें, हीं उत्तम मंगलें होत.

**दानं च धम्मचरिया च ञातकानं च संगहो ।**
**अनवज्जानि कम्मानि एतं मंगलमुत्तमं ।। ६ ।।**

दानधर्म करणें, धार्मिक आचरण असणें, नातलगांवर उपकार करणें, व प्रशस्त कर्में आचरणें, हीं उत्तम मंगलें होत.

**आरति विरति पापा मज्जपाना च संयमो ।**
**अप्पमादो च धम्मेसु एतं मंगलमुत्तमं ॥ ७ ॥**

पापकर्माला कंटाळून त्याजपासून दूर राहणें, मद्यपानाविषयीं मनाचा संयम करणें व कुशल ( पुण्य ) कर्मांत दक्ष असणें, हीं उत्तम मंगलें होत.

**गारवो च निवातो च संतुट्ठि च कतञ्ञुता ।**
**कालेन धम्मस्सवनं एतं मंगलमुत्तमं ॥ ८ ॥**

सत्पुरुषांचा गौरव करणें, नम्रभावानें वागणें, संतुष्ट असणें, कृतज्ञ असणें, आणि वेळोवेळीं धर्मोपदेश ऐकणें, हीं उत्तम मंगलें होत.

**खंति च सोवचस्सता समणानं च दस्सनं ।**
**कालेन धम्मसाकच्छा एतं मंगलमुत्तमं ॥ ९ ॥**

क्षांति ( सहन करणें ), गोड बोलणें, श्रमणांची भेट घेणें आणि धार्मिक विषयावर वारंवार संभाषण करणें, हीं उत्तम मंगलें होत.

**तपो च ब्रह्मचरियं च अरियसच्चान दस्सनं ।**
**निब्बानसच्छिकिरिया च एतं मंगलमुत्तमं ॥ १० ॥**

तपश्चर्या, ब्रह्मचर्य, चार आर्यसत्यें जाणणें व निर्वाणाचा साक्षात्कार करून घेणें, हीं उत्तम मंगलें होत.

**फुट्ठस्स लोकधम्मेहि चित्तं यस्स न कंपति ।**
**असोकं विरजं खेमं एतं मंगलमुत्तमं ॥ ११ ॥**

( लाभ आणि हानि, यश आणि अपयश, निंदा आणि स्तुति, सुख आणि दुःख या आठ ) लोकस्वभावांशीं संबंध झाला असतां ज्यांचें चित्त न कांपतां शोकरहित, निर्मळ व सुखरूप राहतें त्याचें तें कृत्य उत्तम मंगल होय.

**एतादिसानि कत्वान सब्बत्थ अपराजिता ।**
**सब्बत्थ सोत्थिं गच्छन्ति तं तेसं मंगलमुत्तमं ॥ १२ ॥**

वर सांगितलेल्या मंगलांचें आचरण करून कोठेंहि पराभव न पावतां जे स्वस्तिसुख मिळवितात, त्यांचें तें कृत्य उत्तम मंगल जाणावें.

या सुत्तांत **विहितशीलाचा** बराच मोठा भाग आला आहे. येथें सांगितलेल्या कित्येक मंगलांचा **अशोक** राजानें आपल्या शिलालेखांत धम्म या सदराखालीं उल्लेख केला आहे. ९ व्या शिलालेखांत तो म्हणतो ;—

**आवाहविवाहेसु वा पुत्रलाभेसु वा प्रवासम्हि वा एतम्हि च अञ्ञम्हि च जनो उच्चावचं मंगलं करोते। निरथं च मंगलं करोते। अपफलं तु खो एतारिसं मंगलं। अयं तु महाफले मंगले, य धंममंगले। तत दासभतकम्हि सम्यप्रतिपती, गुरूनं अपचिति साधु, पाणेसु संयमो साधु, ब्राह्मणसमणेसु साधु दानं।**

लग्नकार्यांमध्यें, पुत्रलाभ झाला असतां, प्रवासास निघण्याच्या वेळीं, व अशाच तऱ्हेच्या अन्य प्रसंगीं, लोक मोठ्या समारंभानें मंगल करीत असतात, पण तें निरर्थक होय. तशा प्रकारचें मंगल अल्पफलदायक आहे; परंतु महत्फळ देणारें मंगल म्हटलें म्हणजे धर्ममंगल होय. (तें कोणतें?) दास आणि भृत्य यांनां चांगल्या रीतीनें वागविणें; गुरुजनांची सेवा करणें हें चांगलें; प्राणिहिंसेविषयीं मनाचा संयम करणें हें चांगलें; ब्राह्मणाला आणि श्रमणांला दानधर्म करणें हें चांगलें.

पति आणि पत्नी, मातापिता आणि पुत्र, गुरु आणि शिष्य, धनी आणि नोकर इत्यादिकांचीं परस्परांसंबंधीं काय कर्तव्यें आहेत, यांचें वर्णन **सिगालसुत्तांत** केलें आहे. या सिगालसुत्ताचें मराठी रूपांतर आपण अवश्य पहावें.[1]

निषिद्धशीलांत प्रथमारंभीं गृहस्थांनीं आणि गृहिणींनीं नित्य पाळावयाचे ५ नियम येतात. (१) प्राणघात न करणें; (२) अदत्तादान [चोरी] न करणें; (३) व्यभिचार न करणें; (४) खोटें न बोलणें; व (५) दारू वगैरे मादक पदार्थांचें सेवन न करणें. या पांच गोष्टी बौद्ध म्हणविणारानें वर्ज्य केल्या पाहिजेत.

दोन्ही अष्टमी, पौर्णिमा व कृष्ण चतुर्दशी या चार दिवसांस **उपोसथ** दिवस असें म्हणतात. या दिवशीं जे गृहस्थ आणि गृहिणी धर्मचिंतनांत काल घालवितात, त्यांना अनुक्रमें **उपासक** आणि **उपासिका** असें म्हणतात. उपासकांना आणि उपासिकांना या दिवशीं पाळण्यासाठीं बुद्धांनीं आठ नियम घालून दिले आहेत, त्यांचाहि **निषिद्धशीलांत** अंतर्भाव होतो. ते नियम येणेंप्रमाणें:– (१) प्राणघात न करणें; (२) चोरी न करणें; (३) अब्रह्मचर्य न करणें [म्हणजे ब्रम्हचारी राहणें]; (४) खोटें न

१. परिशिष्ट १ पहा.

बोलणें; (५) दारू वगैरे मादक पदार्थांचें सेवन न करणें; (६) मध्याह्नानंतर न जेवणें; (७) नृत्य, गीत वगैरे कामविकार उद्दीपित करणाऱ्या गोष्टी न पहाणें व मालागंधादि [ चैनीच्या ] पदार्थांचें धारण न करणें; (८) उंच आणि मोठ्या बिछान्यावर न निजणें.

या नियमांपैकीं १ ला, २ रा, ४ था व ५ वा, हे चार नियम पूर्वी सांगितलेल्या नियमांत आलेच आहेत. पांच नियमांतील ३ ऱ्या नियमांत व्यभिचार करूं नये अशी आज्ञा आहे; पण येथील ३ ऱ्या नियमाप्रमाणें उपोसथाच्या दिवशीं ब्रह्मचारीच राहिलें पाहिजे. वर सांगितलेल्या चार दिवशीं उपोसथ पाळण्यास सवड नसेल तर तो गृहस्थांनीं आणि गृहिणींनीं वाटेल त्या दिवशीं पाळण्यास हरकत नाहीं. ब्रह्मदेशांत आजकाल ज्या गृहस्थांना ऑफिसच्या वगैरे कामामुळें वर सांगितलेल्या चार दिवशीं उपोसथ पाळण्याची सवड होत नाहीं ते रविवारी उपोसथ पाळीत असतात.

कायावाचामनें दहा पापांचा त्याग करणें, ही निषिद्धशीलांत मुख्य गोष्ट आहे. या दहा पापांना पाली भाषेंत **दस अकुसलकम्मपथ** असें म्हणतात. तीं हीं:—

(१) **प्राणघात** (२) **अदत्तादान** (३) **व्यभिचार** हीं तीन कायिक पापें होत. (१) **असत्य भाषण** (२) **चहाडी** (३) **कठोर भाषण** व (४) **व्यर्थ बडबड** हीं चार वाचिक पापें होत. (१) **परद्रव्यासक्ति** (२) **क्रोध** व (३) **नास्तिकता**, हीं तीन मानसिक पापें होत. येथें नास्तिकता म्हणजे परोपकार करण्यांत कांहीं अर्थ नाहीं, शील पालन करण्यांत अर्थ नाहीं, समाधिपासून कांहीं लाभ नाहीं इत्यादि विचार. बाकी अर्थ स्पष्टच आहे. ज्याला आपलें शील पूर्णत्वाला न्यावयाचें असेल त्यानें या दहा पापांचा त्याग अवश्य केला पाहिजे. या दहा पापांचा **मनुस्मृतीच्या** १२ व्या अध्यायांतहि उल्लेख सांपडतो तो येणेंप्रमाणें:—

**परद्रव्येष्वभिध्यानं मनसानिष्टचिंतनम् ।**
**वितथाभिनिवेशश्च त्रिविधं कर्म मानसम् ।।**

परद्रव्याचें चिंतन करणें, दुसऱ्याचें वाईट चिंतणें, आणि भलत्याच मार्गाला लागणें ( नास्तिकता ) हीं तीन मानसिक ( पाप ) कर्में जाणावीं.

पारुष्यमनृतं चैव पैशुन्यं चापि सर्वशः ।
असंबद्धप्रलापश्च वाङ्मयं स्याच्चतुर्विधम् ॥

कठोर भाषण, असत्य भाषण, सर्व प्रकारची चहाडी, आणि वृथा बडबड, हीं चार वाचिक ( पाप ) कर्में होत.

अदत्तानामुपादानं हिंसा चैवाविधानतः ।
परदारोपसेवा च शारीरं त्रिविधं स्मृतम् ॥

अदत्तादान ( चोरी ), वेदविहित नसलेली हिंसा, व परदारागमन, हीं तीन कायिक पापकर्में होत.

**मनूनें** येथें वेदाला विहित असलेली हिंसा हें पाप नव्हे असें म्हटलें आहे. असा भेद करणें बौद्धांस पसंत होणार नाहीं. हिंसा म्हटली म्हणजे ती वेदविहित असो वा नसो, येथून तेथून सर्व सारखी आहे असें बौद्धांचें म्हणणें. एवढा मतभेद बाजूस ठेवला तर आद्य स्मृतिकारांनीं बौद्धमत जसेंच्या तसें उचललें आहे असें दिसून येईल[1]. आजकाल वेदविहित अशी हिंसा फारच क्वचित् घडते. पांचपंचवीस वर्षांतून एखादा यज्ञ झाला तर होतो. कालिपूजा, दसरा इत्यादि प्रसंगीं होणाऱ्या बलिदानास वेदविहित असें म्हणतां येणार नाहीं. तेव्हां वरील दहा पापांचा पूर्णपणें त्याग करण्याचा एखाद्या कर्मठ हिंदुगृहस्थानें निश्चय केला असतां स्मृतिग्रंथ त्याच्या आड येणार नाहींत, इतकेंच नव्हे तर वर दिलेल्या मनुस्मृतींतील उताऱ्याचा त्याला बळकट पाठिंबा मिळेल.

आयुर्वेदालाहि या दहा पापांचा त्याग मान्य आहे. **अष्टांगहृदय-संहितेच्या** २ ऱ्या अध्यायात **वाग्भट** म्हणतात :—

सुखं च विना धर्मात्तस्माद्धर्मपरो भवेत् ।
भक्त्या कल्याणमित्राणि सेवेतेतरदूरगः ॥

धर्मावांचून सुख नाहीं, म्हणून धर्मपरायण व्हावें, श्रद्धापूर्वक सज्जनांची सेवा करावी व खलांपासून दूर रहावें.

---

१. मनुस्मृति इ० स० च्या चवथ्या शतकांत लिहिली असावी असें अलिकडील पंडितांनीं ठरविलें आहे. डॉ. भांडारकरांचा A Peep into the Early History of India, ( Page 46 ) हा निबंध पहावा.

हिंसास्तेयान्यथाकामं पैशुन्यं परुषानृते ।
संभिन्नालापव्यापादमभिध्यादृग्विपर्ययम् ।
पापं कर्मेति दशधा कायवाङ्मानसैस्त्यजेत् ॥

हिंसा, स्तेय ( चोरी ), व्यभिचार, चहाडी, कठोर भाषण, असत्य भाषण, वृथा बडबड, व्यापाद (क्रोध ); परधनचिंता आणि मिथ्यादृष्टि ( नास्तिकता ) या दहा पापांचा कायेनें, वाचेनें आणि मनानें त्याग करावा.

**वाग्भट** हा जरी बौद्ध होता तरी बौद्धधर्म लोकांनीं पाळावा या हेतूनें या दहा पापांचा त्याग करण्यास त्यानें सांगितलें नाहीं. आरोग्यप्राप्तीला या दहा पापांचा त्याग अत्यावश्यक आहे असें त्याचें म्हणणें आहे.

या दहा पापांच्या त्यागाला पालिभाषेंत मनुष्यधर्म असें म्हटलें आहे. यावरून व वरील दोन उताऱ्यांवरून आपणांस असें दिसून येईल कीं, प्राचीन कालीं या देशांत या दहा पापांचा त्याग सर्वसंमत झाला होता. नागरिकत्वाला पोहोंचण्यास या पापांचा त्याग आवश्यक आहे असें सर्वांस वाटे. तेव्हां, सभ्यगृहस्थ हो, सर्व पंथांच्या लोकांना पसंत पडण्यासारखा हा दशपापकर्मांचा त्याग आपण आपल्या तरुण पिढीस कृतीनें आणि शब्दांनीं शिकविण्यास कोणती हरकत आहे ?

याप्रमाणें निषिद्धशीलाचें स्वरूप थोडक्यांत आपणासमोर ठेविलें आहे. या सर्व शीलाचे–विहित आणि निषिद्ध शीलाचे– पुनः हीन, मध्यम आणि उत्तम असे तीन भेद केले आहेत. कीर्तीच्या आशेनें पाळलेले शील हीन, पुण्यफळाच्या आशेनें पाळलेलें मध्यम व हे माझें कर्तव्यच आहे अशा भावनेनें पाळलेलें उत्तम समजावें. 'मी मोठा शीलवान्, हे दुसरे लोक दुःशील आहेत, हे पापी आहेत,' अशा प्रकारें ज्या शीलाचा आत्मस्तुति आणि परनिंदा करण्यांत उपयोग होतो, तें हीन शील, ज्याचा असा उपयोग होत नाहीं परंतु जें ज्ञानयुक्त नाहीं, तें मध्यम, व प्रज्ञापूर्ण शील उत्तम जाणावें. आपणांस दुसऱ्या जन्मीं सुख मिळावें म्हणून पाळलेलें शील तें हीन, आपणाला मोक्ष मिळावा या हेतूनें पाळलेलें मध्यम, व सर्व प्राणिमात्राच्या हितासाठीं पाळलेलें शील उत्तम होय.

आणखी या शीलाचे हानिभागि, स्थितिभागि, विशेषभागि आणि निर्वेदभागि असे चार भेद करितात.

योध सेवति दुस्सीले सीलवन्ते न सेवति ।
वत्थुवीतिक्कमे दोसं न पस्सति अविद्दसु ॥
मिच्छासंकप्पबहुलो इंद्रियानि न रक्खति ।
एवरूपस्स वे सीलं जायते हानभागियं ॥

जो अविद्वान् मनुष्य पाप्यांचा सहवास करितो आणि शीलवंतांच्या समागमांत राहात नाहीं, जो नियमभंगाची परवा करीत नाहीं, ज्याच्या मनांत विशेषतः पापविचार घोळत असतात, व जो आपल्या इंद्रियांचें रक्षण करीत नाहीं, त्याचें शील हानिभागी होतें.

यो पनत्तमनो होति सीलसंपत्तिया इध ।
कम्मट्ठानानुयोगम्हि न उप्पादेति मानसं ॥
तुट्ठस्स सीलमत्तेन अघटन्तस्स उत्तरिं ।
तस्स तं ठितिभागियं सीलं भवति भिक्खुनो ॥

जो कोणी शीलसंपत्तीनें आनंदित होतो, ध्यानसमाधि साध्य करण्याचा विचार करीत नाहीं, जो शीलानेंच संतुष्ट होऊन पुढील प्रयत्न सोडून देतो, त्या भिक्षूचें तें शील स्थितिभागी होतें.

संपन्नसीलो घटति समाधत्थाय यो पन ।
विसेसभागियं सीलं होति एतस्स भिक्खुनो ॥

जो शीलसंपन्न भिक्षु समाधि साधण्यासाठीं प्रयत्न करितो त्याचें तें शील विशेषभागी होतें.

अतुट्ठो सीलमत्तेन निब्बिदं योनुयुंजति ।
होति निब्बेधभागीयं सीलमेतस्स भिक्खुनो ॥

ज्या भिक्षूची केवळ शीलानें तृप्ति होत नाहीं, व जो सतत वैराग्यमय प्रज्ञेच्या प्रयत्नास लागतो, त्याचें तें शील निर्वेधभागी[१] होतें.

हे चार भेद भिक्षूंस उद्देशून सांगितले आहेत. तथापि ते गृहस्थ आणि गृहिणी यांनांहि लागू पडतात. हे व पूर्वीचे तीन भेद येथें सांगण्याचें कारण हेंच कीं, आम्हीं आपलें शील हीन किंवा हानिभागी होऊं न देतां उत्तरोत्तर वरच्या पायरीचें होत जाईल अशाविषयीं प्रयत्न करावा.

---

१. निर्वेधभागी म्हणजे निर्वाणाचा साक्षात्कार करून देणारें.

अधिशीलशिक्षा संपादिल्यावर अधिचित्तशिक्षा किंवा समाधि संपादण्याचा प्रयत्न केला पाहिजे, शीलसंपत्ति संपादन केल्यावांचून समाधिलाभ व्हावयाचा नाहीं. भगवान् बुद्धानें म्हटलें आहे:—

**आकंखेय्य चे भिक्खवे भिक्खु चतुन्नं झानानं आभिचेतसिकानं दिट्ठधम्मसुखविहारानं निकामलाभी अस्सं अकिच्छलाभी अकसिरलाभी ति। सीलेस्वेवस्स परिपूरकारी॥ ( आकंखेय्यसुत्त, मज्झिमनिकाय. )**

भिक्षु हो, जर एखाद्या भिक्षूची प्रत्यक्ष सुख प्राप्त करून देणाऱ्या चारीहि ध्यानांचा यथेच्छ लाभ व्हावा, सहज लाभ व्हावा, वाटेल तेव्हां लाभ व्हावा, अशी इच्छा असेल तर त्यानें शीलाचें उत्तम रीतीनें पालन केलं पाहिजे.

समाधि म्हणजे चित्ताची एकाग्रता. तिचे अकुशल समाधि आणि कुशल समाधि असे दोन भेद आहेत. एखाद्या नाटकगृहांत नाटक चाललें असतां तेथील कांहीं श्रोते शृंगारपरिप्लुत पद्य ऐकून तल्लीन होऊन जातात. त्या प्रसंगीं त्याच्या चित्ताची जी एकाग्रता ती अकुशल समाधि होय. त्याचप्रमाणें दुसऱ्याच्या घातपातात एखादा मनुष्य गढून गेला असतां त्याच्या चित्ताची तावत्कालिक एकाग्रता अकुशल समाधींत गणिली जाते. या अकुशल समाधीचा अर्थातच अधिचित्तशिक्षेंत समावेश होत नाहीं. केवळ कुशल समाधिलाच अधिचित्तशिक्षा म्हणतात.

कुशल समाधीचे **उपचार समाधि** आणि **अर्पणा समाधि** असे दोन भेद आहेत. उपचार समाधि अल्पकाळ टिकणारी असते. लहान मूल उभें राहण्यास शिकत असतां फार वेळ उभें राहूं शकत नाहीं, त्याप्रमाणें योग्याला आरंभींच साध्य होणारी **उपचार समाधि** फार वेळ टिकत नाहीं. **अर्पणा समाधि** उपचार समाधि साधल्यावर प्राप्त होते. ती अभ्यासानें पाहिजे तितकी टिकूं शकते. तिचे ध्यानभेदानें चार भेद होतात. वितर्क, **विचार, प्रीति, सुख** आणि **एकाग्रता** हीं प्रथम ध्यानाचीं पांच अंगें. द्वितीय ध्यानांत वितर्क आणि विचार राहत नाहीं, बाकी तीन अंगें राहतात. तृतीय ध्यानांत प्रीति राहत नाहीं. सुख आणि एकाग्रता हीं दोन अंगें राहतात. चतुर्थ ध्यानांत एकाग्रता आणि उपेक्षा अशीं दोनच अंगें असतात.

कुशल समाधि चाळीस पदार्थांचें चिंतन करून साधितां येते. त्या पदार्थांस **कर्मस्थानें** असें म्हणतात. त्या सगळ्यांचें सविस्तर वर्णन करूं लागलों तर एक मोठा थोरला ग्रंथच होणार आहे. ह्मणून यांपैकीं उदाहरणादाखल चारांचेंच दिग्दर्शन करितों.

## १ कायगता स्मृति

**विशुद्धिमार्ग** ग्रंथामध्यें सर्वसाधारणपणें मनुष्यांचे सहा भेद सांगितले आहेत. त्यांत **रागचरित, द्वेषचरित** आणि **मोहचरित** हे तीन मुख्य आहेत. ज्याची **कामवासना** इतर मनोवृत्तींहून बळकट तो रागचरित, ज्याचा द्वेष बळकट तो द्वेषचरित, व ज्याचा मोह ह्मणजे आळस बळकट तो मोहचरित असें समजावें.

रागचरिताला **कायगतास्मृति** हें **कर्मस्थान** योगारंभी विहित आहे. **कायगतास्मृति** ह्मणजे विवेकानें आपल्या शरीराचें अवलोकन करणें. ज्याला **कायगतास्मृतीचा** अभ्यास करावयाचा असेल त्यानें शरीरांतील निरनिराळ्या पदार्थांकडे वैराग्यपूर्ण दृष्टीनें पाहण्याची संवय करून घ्यावी. केश, नख, चर्म इत्यादि बाह्य पदार्थ पाहून जर वैराग्य उत्पन्न होत नसेल तर मांस आंतडें, अस्थि इत्यादि आभ्यंतर पदार्थांकडे ज्ञानदृष्टीनें पहावें. जेथें फाडलेलें प्रेत पाहाण्यास सांपडेल तेथें जाऊन तें अवश्य पहावें, व त्यांतील ज्या भागाकडे पाहून विशेष वैराग्य उत्पन्न होईल, त्या भागाची आपल्या शरीराच्या भागाशीं तुलना करावी. किंबहुना तोच आपल्या शरीराचा भाग आहे अशी कल्पना करावी यासंबंधी **शांतिदेवाचार्य** ह्मणतात:—

> **कायभूमिं निजां गत्वा कंकालैरपरैः सह ।**
> **स्वकायं तुलयिष्यामि कदा शतनधर्मिणम् ।।**

या देहाच्या हक्काच्या भूमींत (श्मशानभूमींत) जाऊन मृत मनुष्यांचे हाडांचे सांगाडे पाहून, कुजून जाणाऱ्या या देहाची त्या सांगाड्यांबरोबर मी कधीं तुलना करीन ?

> **अयमेव हि कायो मे एवं पूतिर्भविष्यति ।**
> **शृगाला अपि यद्गंधान्नोपसर्पेयुरन्तिकम् ।।**

हें ( हल्लीं चांगलें दिसणारें ) माझें शरीर या श्मशानांतील प्रेतांप्रमाणें इतकें कुजणार आहे कीं, त्याच्या दुर्गंधीला त्रासून कोल्हे देखील त्याजवळ येणार नाहींत !

**अस्थैकस्यापि कायस्य सहजा अस्थिखंडकाः ।**
**पृथक् पृथग्गमिष्यन्ति किमुतान्यः प्रियो जनः ।।**

या माझ्या एका देहाचीं एकत्र असलेलीं हाडें ( या श्मशानांतील हाडां-प्रमाणें ) निरनिराळीं होऊन पडणार आहेत ! मग प्रियबांधव मला सोडून जातील यांत आश्चर्य कसलें ? ( कारण ते माझ्यापासून सर्वदा निराळेच आहेत. )

अशा रीतीनें शरीरांतील एखाद्या भागाचें वैराग्यपूर्ण विचारानें चिरकाळ चिंतन केलें असतां पुरुषाला सुंदर स्त्रीकडे आणि स्त्रीला सुंदर पुरुषाकडे पाहून सहसा कामविकार उत्पन्न होत नाहीं. भागशः शरीराकडे पाहण्याची संवय झाल्यामुळें तो मनुष्य बाह्य कांतीला पाहून एकदम भुलत नाहीं. त्या त्या अमंगळ शरीरभागांची त्याला आठवण होते, व ते त्या सुंदर कांतीच्या आड दडून बसलेले त्याला स्पष्टपणें दिसत असतात. याविषयीं **विशुद्धिमार्गांत** एक गोष्ट आहे, ती येथें सांगितल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं.

प्राचीनकाळीं सिंहलद्वीपामध्यें **अनुराधपुर** नांवाचें एक शहर होतें. त्याच्या आसपास पुष्कळ विहार असत. बुद्धघोषाचार्यानें **विशुद्धिमार्ग** व इतर ग्रंथ या विहारांपैकीं **महाविहार** नांवाच्या विहारांत राहत असतां लिहिले. महाविहारादिक जुन्या इमारतींचे अवशेष अद्यापि पाहण्यास सांपडतात. या शहरापासून थोड्या अंतरावर असलेल्या एका टेंकडीस **चैत्यपर्वत** म्हणत असत. तेथें एक **महातिष्य** नांवाचा **भिक्षू** राहत असे. तो एके दिवशीं भिक्षाटनासाठीं अनुराधपुरास जात होता. त्याच वाटेनें आपल्या नवऱ्याशीं भांडून माहेरीं जाण्याकरितां एक स्त्री येत होती. त्या भिक्षूला पाहून त्याला भुलवण्यासाठीं ती मोठ्यानें हसली. त्यानें एकदम डोकें वर करून त्या स्त्रीकडे पाहिलें, तोंच त्याला तिचे दांत दिसले, व त्यांनीं त्याला त्याच्या नित्य चिंतनाचा विषय जो हाडांचा सांगाडा त्याची आठवण दिली. त्यामुळें त्या स्त्रीच्या अंगकांतीकडे त्याचें लक्ष्य न जातां

मूर्तिमंत हाडांचा सांगाडाच डोळ्यांसमोर उभा आहे कीं काय असा त्याला भास झाला. तो तसाच पुढें चालता झाला. त्या स्त्रीच्या मागोमाग तिचा पति येत होता, तो याला पाहून म्हणाला:– "महाशय, या मार्गानें गेलेली अलंकृत अशी सुंदर तरुण स्त्री आपण पाहिलीत काय?" तेव्हां भिक्षु म्हणाला:–

**नाभिजानामि इत्थी वा पुरिसो वा इतो गतो।**
**अपिच अट्ठिसंघाटो गच्छतेस महापथे॥**

येथून स्त्री गेली किंवा पुरुष गेला हें कांहीं मला ठाऊक नाहीं. तथापि या मोठ्या रस्त्यानें एक हाडांचा सांगाडा जात आहे खरा!

या कर्मस्थानानें कामविकार नष्टप्राय होतो, व योग्याला प्रथम ध्यानापर्यंत मजल मारतां येते. तदनंतर दुसऱ्या कर्मस्थानाच्या योगें इतर ध्यानेंहि संपादितां येतात.

## २ मैत्री

**द्वेषचरिताला मैत्रीभावना** पथ्यकारक आहे.

मैत्रीभावनेचें विधान:—

**अत्तूपमाय सब्बेसं सत्तानं सुखकामतं।**
**पस्सित्वा कमतो मेत्तं सब्बसत्तेसु भावये॥**

आपल्याप्रमाणेंच सर्व प्राणिमात्र सुखाची इच्छा करितात, असें जाणून क्रमाक्रमानें त्या सर्वांविषयीं प्रेमभाव उत्पन्न करावा.

**सुखी भवेय्यं निदुक्खो अहं निच्चं अहं विय।**
**हिताच मे सुखी होन्तु मज्झत्ता चथ वेरिनो॥**

सदासर्वदा मीं सुखी असावें, मीं निर्दुःखी असावें. माझ्याप्रमाणें माझे मित्रहि सुखी होवोत, मध्यस्थहि सुखी होवोत, आणि माझे वैरीहि सुखी होवोत!

**इमम्हि गामक्खेत्तम्हि सत्ता होन्तु सुखी सदा।**
**ततो परं च रज्जेसु चक्कवाळेसु जंतुनो॥**

या आसपासच्या शेतांतील आणि या गांवांतील सर्व प्राणी सर्वकाल सुखी होवोत. या राज्यांतील प्राणी सुखी होवोत. या विश्वांतील (सर्व) प्राणी सुखी होवोत.

**तथा इत्थी पुमा चेव अरिया अनरिया पि च ।**
**देवा नरा अपायट्ठा तथा दशदिसासु च ॥**

त्याचप्रमाणें स्त्रिया आणि पुरुष, आर्य आणि अनार्य, देव आणि मनुष्य हे सर्व सुखी होवोत. दुर्गतीप्रत गेलेले प्राणीहि सुखी होवोत. दाही दिशांला सर्व प्राणी सुखी होवोत.

या श्लोकांत क्रमाक्रमानें प्रेमभाव कसा वाढवावा, हें सांगितलें आहे. प्रथमतः स्वतःवरच प्रेम उत्पन्न करून तें आपल्या मित्रांवर, मध्यस्थांवर व तदनंतर आपल्या शत्रूंवरहि उत्पन्न केलें पाहिजे. तसच तें पहिल्यानें आपल्या गांवच्या प्राण्यांवर उत्पन्न करून हळूहळू त्याची मर्यादा विश्वमर्यादेपर्यंत नेऊन पोंचविली पाहिजे. सगळा प्राणिसमुदाय आपल्या डोळ्यांसमोर उभा आहे कीं काय अशी कल्पना करून त्यांजवर मी मनोभावें प्रेम करीत आहें, माझें अंतःकरण प्रेममय झालें आहे, मला शत्रु म्हणून कोणीच राहिला नाहीं, व्याघ्र, सिंह इत्यादि हिंस्र प्राणी देखील माझे मित्र झाले आहेत, सर्प माझ्या अंगावर लोळत आहेत, हा वाघ या बाजूला माझ्या मांडीवर डोकें ठेवून स्वस्थ झोंपी गेला आहे, कोणापासूनच मला भय म्हणून राहिलें नाहीं, अशी भावना केली पाहिजे.

एखाद्याच्या अंतःकरणामध्यें द्वेषभाव तीव्र असल्यामुळें त्याच्या शत्रूची त्याला वारंवार आठवण होते; आणि तिच्या योगें मैत्रीभावनेस जबरदस्त अडथळा येतो. अशा मनुष्यानें बुद्धोपदेशाचें आणि साधुसंतांच्या उपदेशाचें पारायण करून आपल्या मनांतील वैरभाव दूर दवडण्याचा प्रयत्न करावा. यासंबंधीं **ककचूपमसुत्तांत** भगवान् **बुद्धानें** भिक्षूंस केलेला उपदेश ध्यानांत ठेवण्यासारखा आहे.

बुद्ध म्हणाला, " भिक्षु हो, प्राचीन काळीं या **श्रावस्ती** नगरींतच एक **वैदेहिका** नांवाची कुलीन स्त्री राहत होती. ती गोड बोलणारी आहे, नम्र आहे व ती फार शांत आहे, अशी तिची सर्व शहरांत ख्याति होती. भिक्षु हो, त्या वैदेहिकेची एक परम दक्ष आणि उद्योगी **काली** नांवाची दासी होती. एके दिवशीं त्या दासीच्या मनांत अशी शंका आली कीं, ही माझी धनीण खरोखरच शांत वृत्तीची आहे, किंवा मी वेळच्यावेळीं कामें

करीत आहें म्हणून तिला रागावण्याला संधिच सांपडत नाहीं ? या शंकेच्या समाधानार्थ आपल्या मालकिणीची परीक्षा पाहण्याचा तिनें बेत केला व ती एके दिवशीं जरा उशीरा उठली. तेव्हां ती वैदेहिका तिला म्हणाली, 'काय ग काली, आज इतका उशीर कां केलास ?' तेव्हां काली म्हणाली, 'बाईसाहेब, सहज उशीर झाला.' वैदेहिकेनें कपाळाला आंठ्या घालून व भृकुटी वर चढवून म्हटलें, 'कसली ही पापी दासी ! उशीरा उठते म्हणजे काय ?' कांहीं दिवस गेल्यावर काली दासी आणखी थोडासा उशीर करून उठली. त्या दिवशीं बाईसाहेबांनीं तिला बऱ्याच शिव्या दिल्या. आणखी कांहीं दिवस गेल्यावर बाईसाहेबांची पुनः एकदा परीक्षा पहावी म्हणून कालीनें उठण्यास फारच उशीर केला. मग काय विचारतां ! बाईसाहेबांचा क्रोधवन्हि एकदम भडकला. तिनें जवळ पडलेली लोखंडाची खीळ घेऊन ती कालीच्या डोक्यांत घातली. काली बिचारी घाबऱ्याघुबऱ्या आरडत ओरडत रस्त्यावर धांवली. तेथें शेजारीपाजारी गोळा झाले, व त्यांनीं कालीला काय झालें, तिच्या डोक्यांतून रक्त कां वाहतें वगैरे चौकशी करण्यास आरंभ केला. तेव्हां काली त्यांना म्हणाली, 'आपण ज्यांना मोठ्या शांत समजत होतां, त्या आमच्या बाईसाहेबांचें हें कृत्य आहे !' या कृत्यानें, ही स्त्री साध्वी दिसत होती, पण ती साध्वी नव्हे, ही मोठी क्रूर आहे, अशी वैदेहिकेची शहरभर अपकीर्ति पसरली.

"भिक्षु हो, त्या कुलीन स्त्रीप्रमाणेंच कांहीं भिक्षु, जोंपर्यंत कटु शब्द ऐकण्याचा प्रसंग आला नाहीं तोंपर्यंत, मोठे शांत दिसतात. परंतु जेव्हां एखाद्या भिक्षुवर कटु शब्दांचा प्रहार होतो, तेव्हां तो खरोखरच शांत आहे कीं नाहीं, हें जाणण्याची पाळी येते... भिक्षु हो, कोणी तुम्हाला वेळ पाहून बोलेल, कोणी अवेळीं बोलेल, कोणी तुमच्या हातून झालेला अपराध सांगेल, कोणी तुमच्यावर नसता आळ घालील, कोणी तुम्हाला मृदु शब्दांनीं बोलेल, कोणी कठोर शब्दांनीं बोलेल, कोणी प्रेमभावानें बोलेल आणि कोणी द्वेषभावानें बोलेल. या सर्वांविषयीं आपलें मन विकृत होणार नाहीं अशी तुम्हीं खबरदारी घेतली पाहिजे; तुमच्या तोंडांतून वाईट शब्द निघूं नयेत अशाबद्दलहि तुम्ही सावध असलें पाहिजे; आणि ज्यानें आपल्यावर वाग्बाणांचा प्रहार केला असेल त्यावरच प्रेम करूं लागून तेथून सर्व

जगाविषयीं प्रेमभाव उत्पन्न करण्यास तुम्हीं शिकलें पाहिजे. जरी दुष्ट चोरांनीं करवतीनें तुमचें डोकें कापलें, तरीदेखील तुम्ही रागावतां कामा नये. अशा प्रसंगीं जो रागावेल तो माझा शिष्य होण्यास लायक नाहीं. त्या चोरांवर देखील तुम्हीं प्रेम करावें; व त्यांनां निमित्त करून सर्व प्राणिमात्रां-विषयीं तुमच्या अंतःकरणांत प्रेमभाव उत्पन्न व्हावा."

साधुसंतांच्या उदाहरणानें आणि उपदेशानेंहि आपल्या मनांतील क्रोधशल्य उपटून काढण्याचा प्रयत्न करावा. एकनाथ, तुकाराम इत्यादि सत्पुरुषांनीं अनेक प्रकारें खलांनीं केलेला छळ सहन करून आपली शांतवृत्ति कायम ठेविली हें उदाहरण माझ्या डोळ्यांसमोर असतां एवढ्या-तेवढ्यासाठीं मी दुसऱ्यावर रागावतों, व कोणी लहानसहान अपराध केला असतां त्याचा सूड उगविण्याची दुष्ट वासना उराशीं घट्ट धरून बसतो, हें काय? या कुबुद्धीचा मीं त्याग न केला तर--

**ऐसें भाग्य कईं लाहाता होईन। अवघें देखें जन ब्रह्मरूप ॥**
**मग तया सुखा अंत नाहीं पार। आनंदें सागर हेलावती ॥**

अशा सुखाचा मी अनुभव घेऊं शकेन काय? अशा रीतीनें विचार करून मनांतील वैरभाव नष्ट करावा, व प्रेमभावना परिपूर्ण करावी. या भावनेनें तीन ध्यानें साध्य होतात. शिवाय आणखीहि बरेच फायदे या भावनेमुळें होत असतात. शांतिदेवाचार्यांनीं म्हटलें आहे:—

**प्रासादिकत्वमारोग्यं प्रामोद्यं चिरजीवितम्।**
**चक्रवर्तिसुखं स्फीतं क्षमी प्राप्नोति संसरन् ॥**

या संसारांत क्षमावान् मनुष्याला सौंदर्य, आरोग्य, आनंद, दीर्घायुष्य आणि चक्रवर्तिराजासारखें विपुल सुख प्राप्त होतें.

## ३ मरणस्मृति

**मोहचरिताला मरणस्मृतिकर्मस्थान** योगारंभीं पथ्यकारक होतें. त्याचें विधान:—

**पवातदीपतुल्याय सायुसंततिया खयं।**
**परूपमाय संपस्सं भावये मरणस्सतिं ॥**

वाऱ्याच्या झोतावर ठेवलेल्या दिव्याप्रमाणें आपल्या आयुष्याचा नाश होत चालला आहे, हें इतरांच्या उदाहरणानें जाणून **मरणस्मृति वाढवावी** ( मरणाचें चिंतन करावें ).

**महासंपत्तिसंपत्ता यथा सत्ता मत्ता इध ।**
**तथा अहं मरिस्सामि मरणं मम हेस्सति ॥**

ज्यांना मोठी संपत्ति प्राप्त झाली होती, ते पुरुषहि या जगांतून जसे नाहीसे झाले, तसा मीहि ( कधींना कधीं ) मरणार आहें. मरण हें मला येणारच !

**ईसकं अनिवत्तन्तं सततं गमनुस्सुकं ।**
**जीवितं उदया अत्थं सुरियो विय धावति ॥**

सूर्य जसा उदयापासून अस्तापर्यंत सारखा धावत असतो, तसें गमनाला अत्यंत उत्सुक जीवित थोडेंसेंहि मागें न सरतां धावत आहे !

अशा रीतीनें मरणाचें निर्भयपणें चिंतन केलें असतां आळस नष्टप्राय होऊन जातो. या **मरणस्मृतिकर्मस्थानानें उपचार समाधिच** साधते; **अर्पणा समाधि** साध्य होत नाहीं, तथापि आळस नष्ट होऊन अंत:करणांत जागृति उत्पन्न झाल्यामुळें मनुष्य कर्तव्यदक्ष होतो व इतर कर्मस्थानांच्या योगें अर्पणासमाधि साधण्यास समर्थ होतो.

## ४ पृथ्वीमंडळ

पृथ्वी, उदक, तेज, इत्यादिकांची मंडळाकार आकृति डोळ्यांसमोर ठेवून तिचें चिंतन केलें असतां **अर्पणा समाधि** साधतां येते. या मंडळांचें चिंतन सर्व प्रकारच्या मनुष्यांना हितकारक आहे.

ज्याला पृथ्वीमंडळावर ध्यान करावयाचें असेल त्यानें नांगरलेल्या जमिनींत किंवा जेथें गवत वगैरे उगवलें नसेल अशा ठिकाणीं जाऊन तेथें जमिनीचा वर्तुलाकार भाग डोळ्यांसमोर ठेवून त्यावर चित्त एकाग्र करण्याचा प्रयत्न करावा. अशानें ध्यान साध्य होत नसेल तर एक वीत चार अंगुलें व्यासाचें अरुणवर्ण मृत्तिकेचें एक मंडल तयार करावें; व एकांतांत बसून त्याचें ध्यान करावें. उदकमंडळाचें ध्यान करणारानें वर्तुलाकृति तलाव, विहिरी इत्यादिकांवर ध्यान करावें. तेजोमंडळाचें ध्यान करणारास सूर्यमंडळ, चंद्रमंडळ किंवा दिव्याची ज्योति इत्यादिकांवर ध्यान करितां येतें. या मंडलाच्या चिंतनानें अर्पणा समाधीचीं चारांहि ध्यानें साध्य होतात.

## समाधीला प्रतिबंधक गोष्टी

वसतिस्थान, आसपासचा प्रदेश, संभाषण, सोबती, भोजन, ऋतु इत्यादि गोष्टी यथायोग्य नसल्यावर त्यांपासून समाधि साधण्याला वारंवार अडथळा येतो. म्हणून दूरवर विचारानें अशा गोष्टींची योग्य निवड केली पाहिजे.

जेथून रम्य भूमिभाग दृष्टीस पडेल अशा उंचवट्याच्या, नदीकिनाऱ्याच्या किंवा समुद्रकिनाऱ्याच्या प्रदेशांत योग्याचें वसतिस्थान असणें समाधीला अनुकूल आहे. कार्ली, कान्हेरी वगैरे ठिकाणीं जीं भिक्षूकरितां लेणीं कोरलीं आहेत त्याचें कारणहि हेंच असलें पाहिजे. वसतिस्थानाच्या आसपासचा प्रदेश चांगला असला पाहिजे. दारूबाज वगैरे दुराचारी लोकांचा किंवा सर्पव्याघ्रादि हिंस्र प्राण्यांचा योग्याच्या वसतिस्थानाच्या आसपास सुळसुळाट असेल तर त्यांपासून वारंवार समाधीस अंतराय होणार आहे. योग्यानें अधार्मिक संभाषण अगदींच वर्ज्य केलें पाहिजे, व धार्मिक संभाषणातहि परिमितता ठेविली पाहिजे. चंचल मनुष्याची सोबत योग्यानें आरंभीं मुळींच करतां कामा नये. त्यानें स्थिर धार्मिक मनुष्याचीच संगति केली पाहिजे. भोजनाची निवड ज्याच्या त्याच्या तब्येतीवर अवलंबून आहे. जेणेंकरून अंगांत हुषारी राहील असें अन्न परिमितपणें आणि नियमितपणें सेवन केलें पाहिजे. योगारंभीं योग्याला मानवेल असाच ऋतु असावा लागतो. कोणास उन्हाळा मानवतो, कोणास पावसाळा मानवतो व कोणास हिंवाळा मानवतो. ज्यानें त्यानें आपल्या अनुभवानें ही निवड करावी. एकंदरीत,

> **युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।**
> **युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥**

"ज्याचे आहारविहार बेताचे असतात, सर्व प्रसंगीं ज्याचे व्यापार नियमित असतात. तसेंच ज्याचें निजणें आणि जागणें बेताचें असतें अशा मनुष्याचा योग त्याच्या दुःखाचा समूळ नाश करतो." भगवद्गीतेंतील हा उपदेश बौद्ध मतास अनुसरूनच आहे.

सभ्यगृहस्थ हो, आतां बौद्धधर्ममार्गाची जी तिसरी पायरी अधिप्रज्ञाशिक्षा किंवा प्रज्ञा, तिचा आपण थोडक्यांत विचार करूं. प्रज्ञा दोन

प्रकारची आहे. **लौकिकप्रज्ञा** आणि **लोकोत्तरप्रज्ञा**. जिच्या योगानें मनुष्य प्रपंचामध्यें अल्पप्रयासानें परोपकार करण्यास समर्थ होतो किंवा खलांचा कावा चालूं देत नाहीं ती लौकिकप्रज्ञा होय. **जातकग्रंथामध्यें** गोष्टींच्या रूपानें तिचीं अनेक उदाहरणें सांपडतात. **लोकोत्तर** प्रज्ञा ह्मटली ह्मणजे चार **आर्यसत्यें**. **प्रतीत्यसमुत्पाद** इत्यादिकांचें यथार्थ ज्ञान होय. या लोकोत्तर प्रज्ञेलाच येथें **अधिप्रज्ञाशिक्षा** किंवा प्रज्ञा असें ह्मटलें आहे.

**समाहितो यथाभूतं पस्सति, पजानाति**

'ज्याला समाधिलाभ झाला तोच यथार्थतया पाहतो व जाणतो.' या वचनानुरोधानें **अधिचित्तशिक्षा** पुरी झाल्यावर योग्यानें प्रज्ञालाभासाठीं प्रयत्न केला पाहिजे. पहिल्या व्याख्यानांत सांगितलेल्या चार आर्यसत्यांचें– **दु:ख, दु:खसमुदय, व दु:खनिरोध दु:खनिरोधगामिनी प्रतिपदा**, (मार्ग) यांचें–योग्यानें प्रथमत: यथार्थ ज्ञान प्राप्त करून घेतलें पाहिजे, दु:ख सत्य हें केवळ परिज्ञेय म्हणजे जाणण्यास योग्य आहे, **दु:खसमुदय** म्हणजे तृष्णा ही त्याज्य आहे, **दु:खनिरोध** म्हणजे निर्वाण हे ध्येय आहे, आणि **दु:ख-निरोधगामिनी प्रतिपदा** म्हणजे **आर्य अष्टांगिक** मार्ग हें सत्य अभ्यसनीय आहे. तेव्हां योग्यानें परिज्ञेय सत्य केवळ जाणावें, त्याज्याचा त्याग करावा, ध्येयाचा साक्षात्कार करून घ्यावा, व अभ्यसनीयाचा अभ्यास करावा.

**अविद्येपासून संस्कार, संस्कारांपासून विज्ञान, विज्ञानापासून नामरूप, नामरूपापासून षडायतन, षडायतनापासून स्पर्श, स्पर्शापासून वेदना, वेदनेपासून तृष्णा, तृष्णेपासून उपादान, उपादानापासून भव, भवापासून जाति ( जन्म ), जातीपासून जरा, मरण, शोक, परिदेवन, दु:ख, दौर्मनस्य, उपायास** उत्पन्न होतात. या कारण-परंपरेला **प्रतीत्यसमुत्पाद** असें म्हणतात. जरामरणाचें कारण जन्म, जन्माचें कारण भव म्हणजे कर्म, कर्माचें कारण उपादना म्हणजे लोभ, लोभाचें कारण तृष्णा, तृष्णेचें कारण वेदना म्हणजे सुख, दु:ख, उपेक्षा या तीन अवस्था, वेदनांचें कारण स्पर्श म्हणजे इंद्रियविषयसंयोग, स्पर्शाचें कारण षडायतन म्हणजे मन आणि पांच ज्ञानेंद्रियें, षडायतनाचें कारण नामरूप, नामरूपाचें कारण विज्ञान म्हणजे जाणीव, विज्ञानाचें कारण संस्कार म्हणजे प्रवृत्ति, संस्कारांचें कारण अविद्या म्हणजे अयथार्थ ज्ञान. अयथार्थ ज्ञानाचे

बौद्धमताप्रमाणें संक्षेपतः तीन प्रकार आहेत : ( १ ) जग अनित्य—म्हणजे रूपांतर पावणारें—असतां तें नित्य आहे, असें मानणें; ( २ ) आत्मा म्हणून अविनाशी, अविकारी असा पदार्थ नसतां तो आहे असें मानणें; (३) संसार दुःखमय असतांना त्यांतच सर्व सुख आहे असें मानणें. या प्रकारचें अयथार्थ ज्ञान सर्व संसारदुःखाचें आद्यमूळ होय. चार आर्यसत्यांच्या ज्ञानानें या अविद्येचा नाश होतो; आणि अविद्येचा नाश झाला म्हणजे तिच्यावर अवलंबून असलेल्या संस्कारादिकांचा आपोआप नाश होतो; अविद्या उत्पन्न होण्यापूर्वी प्राण्यांची काय स्थिति होती हें कोणाच्यानेंहि सांगतां येणार नाहीं. हा सगळा संसार अनादि आहे, अर्थात् अविद्याहि अनादि आहे. बुद्ध भगवान् म्हणतो :—

**अनमतग्गोयं भिक्खवे संसारो, पुब्बा कोटि न पञ्ञायति, अविज्जानीवरणानं सत्तानं तण्हासञ्ञोजनानं संधावतं संसरतं ॥**

भिक्षुहो, हा संसार अनादि आहे. अविद्येनें आच्छादिलेल्या आणि तृष्णेनें बद्ध झालेल्या संसारचक्रांत सांपडलेल्या प्राण्यांची पूर्वस्थिति काय होती, हें कांहीं समजत नाहीं. ( **संयुत्तनिकाय.** )

**आर्य अष्टांगिक मार्ग** जसा साधनमार्गांत दोन्ही अंत टाळून **मध्यमवर्ती** आहे, तसा हा **प्रतीत्यसमुत्पाद** तत्त्वज्ञानमतांत मध्यमवर्ती आहे. बुद्धाच्या वेळीं **अस्तिवादी** म्हणजे आत्मा शाश्वत वस्तु आहे असें म्हणणारे कांहीं तत्त्ववेत्ते होते. दुसरे **नास्तिवादी** म्हणजे आत्मा अशी कांहींच वस्तु नाहीं असें म्हणणारे होते. या दोहोंच्यामधील मत **प्रतीत्यसमुत्पाद** हें आहे. कारण त्याप्रमाणें आत्मा शाश्वत किंवा अशाश्वत पदार्थ नसून कार्यकारण नियमानें बदलणारा आहे. **इदं सति इदं होति इदं असति इदं न होति.** कारण असेल तर कार्य होतें, कारण नसेल तर कार्य होत नाहीं. बुद्ध भगवान् कात्यायनाला म्हणतो :—

**सब्बं अत्थीति खो कच्चान अयमेको अंतो। सब्बं नत्थीति अयं दुतियो अंतो। एते ते उभो अंते अनुपगम्म मज्झेन तथागतो धम्मं देसेति अविज्जापच्चयासंखारा ॥ पे ॥**

हे कात्यायना, सर्व आहे ( आत्मा नित्य आहे ) हा एक अंत. सर्व नाहीं ( आत्मा मुळींच नाहीं ) हा दुसरा अंत. या दोन अंताला न जातां तथा-

गत मधल्या मार्गानेंच धर्मोपदेश करितो. (तो असा:–) अविद्येपासून संस्कार इत्यादि प्रतीत्यसमुत्पाद. **( संयुत्तनिकाय )**

अविद्येपासून संस्कारांची उत्पत्ति, अविद्येचा नाश झाला म्हणजे संस्कारांचा नाश होतो इत्यादि नियम न बदलणारे आहेत; त्यांस **धर्मनियामता, धर्मस्थिति** इत्यादि शब्दांनीं संबोधिलें आहे. बुद्ध म्हणतो:–

**उप्पादा वा तथागतानं अनुप्पादा वा तथागतानं ठिताव सा धातु धम्मट्ठितता धम्मनियामता इदप्पच्चयता। तं तथागतो अभिसंबुज्झति अभिसमेति। अभिसं बुज्झित्वा अभिसमेत्वा आचिक्खति, देसेति . . . पस्सथाति चाह।**

तथागत जन्मला काय किंवा न जन्मला काय, ही जी शक्ति, धर्मस्थिति, धर्मनियामता, कार्यकारणपरंपरा, ती आहेच आहे. तथागत तिला जाणतो, तिचा साक्षात्कार करून घेतो, तिला जाणून आणि तिचा साक्षात्कार करून घेऊन लोकांला सांगतो, लोकांला तिचा उपदेश करितो आणि हिला तुम्ही आपल्या बुद्धीनें जाणा, असें म्हणतो. **( संयुत्तनिकाय )**

हें जग शाश्वत आहे कीं, अशाश्वत आहे, या जगाचा अंत होणार आहे कीं नाहीं, शरीर आणि जीव एकच आहेच कीं भिन्न आहेत, प्राणी मेल्यावर उत्पन्न होतो कीं नाहीं. इत्यादि प्रश्न सोडवीत बसल्यानें **प्रज्ञाप्राप्तीला** मोठा अडथळा येण्याचा संभव आहे. कारण हे प्रश्न योग्य रीतीनें केलेलें नाहींत ( **न कल्लो पञ्हो** ), म्हणून हे प्रश्न बाजूस ठेवून योग्यानें **प्रतीत्यसमुत्पादाचें** यथार्थ ज्ञान करून घ्यावें आणि **प्रज्ञा** पूर्णत्वास न्यावी. कारण प्रज्ञेनेंच निर्वाणप्राप्ति होणार आहे.

सभ्य गृहस्थ हो, याप्रमाणें **अधिशीलशिक्षा, अधिचित्तशिक्षा** आणि **अधिप्रज्ञाशिक्षा** यांच्या द्वारें बौद्ध धर्माचा सारांश आपणापुढें ठेविला आहे. विषय मूळचा फार कठीण आहे. त्याला सौम्य स्वरूप देण्याचा होतां होईल तो प्रयत्न केला आहे. तो कितपत साधला आहे, हें कांहीं माझ्यानें सांगवत नाहीं.

# संघ

## ( भाग १ ला )

बुद्धानें धर्मोपदेशास सुरवात करण्यापूर्वी उत्तरहिंदुस्तानमध्यें निरनिराळ्या पंथांचे **अनेक श्रमण** ( संन्यासी ) होते. एकेका पंथाच्या श्रमण लोकांच्या समुदायास **संघ** किंवा **गण** असें म्हणत असत. अशा कित्येक संघांचा त्रिपिटक ग्रंथांत उल्लेख सांपडतो, परंतु त्यांची विशेष माहिती उपलब्ध नाहीं. बुद्धानें स्थापिलेल्या संघाचा मात्र विस्तृत वृत्तांत **विनयग्रंथांत** उपलब्ध आहे. त्यांतील थोडासा भाग बौद्ध संघाची माहिती देण्यासाठीं आज मी आपणां-समोर ठेवीत आहें.

बुद्ध भगवंतानें **ऋषिपत्तन** नांवाच्या प्रदेशांत राहत असतां आपले पूर्वीचे सहाय पांच भिक्षु यांस उपदेश करून आपले अनुयायी केल्याची हकिगत पहिल्या व्याख्यानांत आलीच आहे. या पांच भिक्षूंपैकीं **कौण्डिन्य** हा बुद्धाचा पहिल्या शिष्य झाला. तदनंतर **वप्प** ( वप्र ) आणि **भद्दिय** ( भद्रिय ) हे दोघे व तदनंतर **महानाम व अस्सजि** ( अश्वजित् ) हे दोघे शिष्य झाले. ते सर्व जातीनें ब्राह्मण होते. बुद्धभगवान् आणि हे त्यांचे पांच शिष्य ऋषिपत्तनांत रहात असत. त्या वेळीं जवळ असलेल्या वाराणसी नगरींत **यश** नांवाचा एक श्रीमंत व्यापाऱ्याचा मुलगा रहात होता. त्याला राहण्याकरितां त्याच्या बापानें एक उन्हाळ्या-साठीं, एक पावसाळ्यासाठीं, व एक हिवाळ्यासाठीं **असे** तीन वाडे बांधले होते. परंतु यशाला या वैभवानें कांहीं सुख झालें नाहीं. त्याला सर्वत्र दुःखच नांदत आहे असें वाटावयास लागलें. एके दिवशीं रात्रीं ‘ अहो दुखं, अहो कष्टं ’ असें म्हणत तो आपल्या वाड्यांतून बाहेर पडला आणि जेथें बुद्ध राहत होता तेथें गेला. पहाटेच्या प्रहरी बुद्ध भगवान् इकडून तिकडे चंक्रमण करीत होता, त्यानें यशास पाहिलें. यश पुनः ‘ उपद्रुतं बत भो उपसृष्टं बत भो ’ ( अहो सर्वत्र उपद्रव आहे, सर्वत्र उपसर्ग आहे ) असे ओरडला. तें ऐकून बुद्ध भगवन् म्हणाला, “ यशा, येथें उपद्रव नाहीं

येथें उपसर्ग नाहीं." तेव्हां यश बुद्धाजवळ जाऊन बसला. त्यानें भगवंताच्या उपदेशश्रवणानें तेथल्या तेथें निर्वाणपद प्राप्त करून घेतलें, व भिक्षुसंघांत प्रवेश केला.

दुसऱ्या दिवशीं यशाचा बाप त्याचा शोध करीत ऋषिपत्तनांत आला. त्यानें बुद्धाला, यशास पाहिलें आहे काय ? असा प्रश्न केल्यावर बुद्ध त्याला म्हणाला, " हे गृहपति, तूं घाबरूं नकोस, यशाला तूं या ठिकाणींच पाहशील." हें ऐकून त्याला धीर आला, व तो बुद्धाच्या बाजूस एका आसनावर बसला. तेव्हां बुद्धानें त्याला धर्मोपदेश केला, तो ऐकून त्याच्या मनामध्यें पूर्ण वैराग्य उत्पन्न झालें, आणि तो बुद्धाचा ताबडतोब उपासक झाला. तेव्हां बुद्धानें त्याची आणि यशाची तेथल्या तेथें गांठ घालून दिली. यशानें संसारत्याग केला याबद्दल त्याच्या बापास कांहींच वाईट वाटलें नाहीं, कारण बुद्धोपदेशानें त्याच्या मनांत तसाच प्रकाश पडला होता. तो बुद्धाला म्हणाला, " भगवन्, यशाची आई यशास पाहण्यास फार उत्सुक झाली आहे. ती त्यासाठीं फार शोक करीत आहे. तेव्हां कृपा करून आपण यशास बरोबर घेऊन उद्यां आमच्या घरीं भोजनास यावें." बुद्ध यशास बरोबर घेऊन दुसऱ्या दिवशीं त्या व्यापाऱ्याच्या घरीं गेला. तेथें त्यानें यशाच्या आईला व पूर्वाश्रमांतील बायकोला धर्मोपदेश केला. त्या उपदेशानें त्यांच्या मनांत प्रकाश पडला. त्या दोघी तत्काल बौद्ध उपासिका झाल्या. अर्थात् यशाच्या गृहत्यागाबद्दल त्यांना कांहीं वाईट वाटलें नाहीं.

यश भिक्षु झाला, हें वर्तमान जेव्हां **विमल**, **सुबाहु**. **पूर्णजित्** आणि **गवंपति** या त्याच्या चार मित्रांनीं ऐकिलें, तेव्हां ते ऋषिपत्तनांत जाऊन यशास भेटले. यशानें त्यांना बुद्धाजवळ नेलें. बुद्ध भगवंताच्या उपदेशानें त्यांच्या मनांत प्रकाश पडला व त्यांनीं तेथल्यातेथेंच भिक्षुसंघांत प्रवेश केला. ही गोष्ट त्या प्रांतांतील यशाच्या पन्नास मित्रांस समजल्यावर त्यांनींहि ऋषिपत्तनांत बुद्धाची भेट घेऊन बौद्धसंघांत प्रवेश केला. याप्रमाणें भगवान् ऋषिपत्तनांत राहत असतां त्याजपाशीं साठ भिक्षूंचा संघ जमला. हे सगळे भिक्षु **अर्हत्पदाला** पावले होते. त्यांना एकत्र जमवून बुद्ध ह्मणाला:– " भिक्षु हो, प्रापंचिक आणि स्वर्गीय पाशांतून मी मुक्त झालों आहें, आणि भिक्षु हो, तुह्मीहि या पाशांतून मुक्त झालां आहांत. तेव्हां आतां, भिक्षु हो, बहुजनांच्या हितासाठीं, पुष्कळांच्या सुखासाठीं, लोकांवर अनुकंपा

करण्यासाठीं, देवांच्या आणि मनुष्यांच्या कल्याणासाठीं धर्मोपदेश करण्यास प्रवृत्त व्हा. एका मार्गानें दोघे जाऊं नका. प्रारंभीं कल्याणप्रद, मध्यंतरीं कल्याणप्रद व शेवटीं कल्याणप्रद अशा या धर्ममार्गाचा उपदेश करा."

या साठ भिक्षूंना बुद्धानें स्वतः दीक्षा दिली होती. 'एहि भिक्षु' या बुद्धोक्त वाक्यानेंच त्या वेळीं प्रव्रज्याविधि होत असे. परंतु जेव्हां हे भिक्षु चोहोंकडे पाठविण्यांत आले, तेव्हांपासून नवीन भिक्षूंची संख्या वाढत चालली. दूरच्या प्रदेशांतून भिक्षुसंघात प्रवेश करण्याची इच्छा करणाऱ्यांना बुद्धाजवळ घेऊन जाणें कठीण पडूं लागलें. ह्मणून बुद्धानें भिक्षूंला अशा उमेदवारांना परस्पर संघांत घेण्याची परवानगी दिली. बुद्ध ह्मणाला:– "भिक्षु हो, यापुढें भिन्नभिन्न राष्ट्रांत तुह्मींच **प्रव्रज्या** द्या, व तुह्मीच **उपसंपदा** (संघांत घेण्याचा विधि) करा. पुढील नियमास अनुसरून **प्रव्रज्या** आणि **उपसंपदा** करा. त्यानें (उमेदवारानें) मुंडन करावें व काषाय वस्त्रानीं अंग आच्छादावें. नंतर मांडी न घालतां त्याला खालीं बसवावें, व हात जोडून, **बुद्धं**[1] **सरणं गच्छामि** (मी बुद्धास शरण जातों), **धम्मं सरणं गच्छामि** (धर्माला शरण जातों), **संघं सरणं गच्छामि** (संघाला शरण जातों), असें त्रिवार ह्मणावयास लावावें. याप्रमाणें **प्रव्रज्या** आणि **उपसंपदा** करण्यास मी तुह्मांस परवानगी देतों."

चातुर्मास्य संपल्यावर भगवान् बुद्ध वाराणसीहून धर्मोपदेश करीत गयेला आला. तेथें उरुवेल काश्यप नांवाचा जटाधारी ब्राह्मण राहत असे. त्याचे पांचशें जटिल शिष्य होते. सर्व मगध देशांतील लोक त्याला फार मानीत असत. त्यानें व त्याच्या शिष्यांनीं बुद्धाचें अलौकिक तेज व विलक्षण धैर्य पाहून आणि अनुपम धर्मोपदेश ऐकून आपल्या जटा कापून त्या व अग्निहोत्राचीं उपकरणें पाण्यांत टाकून दिलीं, व ते बुद्धाचे शिष्य झाले. **उरुवेल काश्यपाचा नदीकाश्यप** या नांवाचा भाऊ जवळच नदीकांठीं आपल्या तीनशें शिष्यांसह राहत असे. त्यानें अग्निहोत्राचीं उपकरणें आणि जटा नदींत वहात चाललेल्या पाहिल्या. आपल्या वडील भावास कांहींतरी उपसर्ग झाला असला पाहिजे असें त्याला वाटलें, व तो त्याच्या राहण्याच्या

१. बुद्धाला गुरु– संघाचा संस्थापक– या नात्यानें शरण जातात; तो देवाचा अवतार या नात्यानें नव्हे.

ठिकाणीं आला. तेथें भावाला बुद्धाचा शिष्य झालेला पाहून तोहि आपल्या शिष्यांसह बुद्धाचा शिष्य झाला. **उरुवेल काश्यपाचा गया काश्यप** नांवाचा तिसरा भाऊहि त्याच प्रदेशांत राहत होता. तोहि आपल्या दोनशें जटाधारी शिष्यांसहवर्तमान बुद्धाचा शिष्य झाला.

या सर्व पूर्वीं जटिल असलेल्या भिक्षुसंघासह भगवान् बुद्ध राजगृह नगरास गेला. तेथें त्या वेळीं **बिंबिसार** राजा राज्य करीत होता. तो बुद्धाच्या आगमनाचें वर्तमान ऐकून मोठ्या समुदायासह बुद्ध राहत होता तेथें गेला. त्या वेळीं लोकांना, बुद्ध काश्यपाचा गुरु किंवा काश्यप बुद्धाचा गुरु, अशी शंका उत्पन्न झाली. काश्यप जेव्हां बुद्धाच्या पायां पडला तेव्हां लोकांची ही शंका दूर झाली. बिंबिसार राजानें **वेळुवन** नांवाचें उत्तम उद्यान बुद्धप्रमुख भिक्षुसंघास राहण्यासाठीं दान दिलें.

या उद्यानांत भिक्षुसंघासह बुद्ध भगवान् राहत होता. त्या वेळीं **राजगृहाजवळ संजय** नांवाचा प्रसिद्ध परिव्राजक राहत असे. **सारिपुत्त** आणि **मोग्गल्लान** हे दोघे ब्राह्मण **संजयाच्या** शिष्यांत प्रमुख होते. त्या दोघांनीं, ज्याला प्रथम शांतिपद सांपडेल त्यानें तें इतरांस सांगावें असा बेत केला होता. एके दिवशीं **अस्सजि** राजगृहांत भिक्षेसाठीं फिरत असतां **सारिपुत्तानें** त्याला पाहिलें. **अस्सजीची** आनंदी आणि वैराग्ययुक्त मुद्रा पाहून **सारिपुत्ताच्या** मनांत त्याजविषयीं अत्यंत आदरभाव उत्पन्न झाला. तो **अस्सजीच्या** मागोमाग **राजगृहांतून** बाहेर पडला, व वाटेंत त्यानें **अस्सजीस** गांठलें. **अस्सजीला** कुशल प्रश्नादि करून झाल्यावर **सारिपुत्त** म्हणाला:— " आयुष्मन्, तुझी मुखचर्या प्रफुल्लित दिसत आहे. तुझा गुरु कोण ? कोणत्या धर्मास अनुसरून तूं वागतोस ? "

**अस्सजि** – आयुष्मन्, महाश्रमण **शाक्यपुत्र** ( बुद्ध ) माझा गुरु आहे. त्याच्या धर्माप्रमाणें मी वागतों.

**सारिपुत्त** – तुझ्या गुरूचा धर्म कोणता ? कोणतें मत तो प्रतिपादन करतो ?

**अस्सजि** – मी नुकताच बुद्धाचा शिष्य झालों आहें; विस्तृत धर्मोपदेश करण्यास मी समर्थ नाहीं. तथापि संक्षेपानें सारांश काय आहे हें मी सांगू शकेन.

सारिपुत्त – कांहीं हरकत नाहीं. थोडें किंवा फार जें कांहीं तुला येत असेल तेवढें सांग. मला सारांश पाहिजे आहे. वाग्जाल घेऊन काय करायचें ?

अस्सजि —

**ये धम्मा हेतुप्पभवा हेतुं तेसं तथागतो आह।**
**तेसं च यो निरोधो एवंवादी महासमणो[1]॥**

कारणापासून उत्पन्न झालेले जे पदार्थ ( पंचस्कन्धादिक दुःखद पदार्थ ) त्यांचें कारण **तथागतानें** सांगितलें आहे, आणि त्यांचा निरोध कसा होतो हेंहि सांगितलें आहे. हेंच महाश्रमणाचें मत होय.

हें समजल्यावर सारिपुत्ताच्या अंतःकरणांत एकदम प्रकाश पडला. हें वर्तमान त्यानें **मोग्गल्लानाला** कळविलें. तेव्हां ते दोघेहि बुद्धापाशीं गेले, आणि त्यांनीं भिक्षुसंघात प्रवेश केला. त्यांजबरोबर **संजय** परिव्राजकाचे आणखीहि २५० शिष्य बुद्धाचे शिष्य झाले. सारिपुत्त व मोग्गल्लान हे दोघे पुढें **अग्रश्रावक** ( बुद्धाचे प्रमुख शिष्य ) झाले.

बुद्धभगवंताच्या आगमनानें **राजगृह** नगरींत जिकडेतिकडे गडबड उडून गेली होती. आज हा बुद्धाचा शिष्य झाला, उद्यां हे परिव्राजक बुद्धाचे शिष्य झाले, हाच काय तो त्या वेळीं लोकचर्चेचा विषय होऊन बसला होता. कांहीं लोक तर उघडपणें बुद्धास दोष देऊं लागले. हा श्रमण गोतम आमचा देश अपुत्रक करण्यासाठीं आला आहे कीं काय ? असें ते म्हणूं लागले. भिक्षु दृष्टीस पडले तर ते असें म्हणत असतः—

**आगतो खो महासमणो मागधानं गिरिब्बजं।**
**सब्बे संजये नेत्वान कंसु दानि नयिस्सति॥**

हा महाश्रमण मागधांच्या गिरिव्रजं[2] ( राजगृह ) नगरास आला. हा सर्व संजयाच्या शिष्यांना घेऊन गेला. आतां हा कोणास नेणार ?

---

१. ही गाथा फार प्रसिद्ध असून प्राचीन शिलालेखांत पुष्कळ ठिकाणीं सांपडते.

२. राजगृह नगरास गिरिव्रज असें म्हणत असत. हें शहर डोंगराच्या मध्यभागीं वसलें होतें, म्हणून त्याला हें नांव पडलें असावें.

हें वर्तमान भिक्षूंनीं भगवंतास कळविलें. तेव्हां तो म्हणाला, " भिक्षु हो, हा लोकप्रवाद कांहीं फार दिवस टिकावयाचा नाहीं, एका आठवड्यांतच हा प्रवाद नाहींसा होईल. जे तुम्हांला या (वर दिलेल्या) श्लोकानें दोष देतील त्यांनां तुम्ही या श्लोकानें उत्तर द्या—

**नयन्ति वे महावीरा सद्धम्मेन तथागता ।**
**धम्मेन नीयमानानं का उस्सुय्या विजानतं ।।**

महाशूर **तथागत** लोकांनां सद्धर्मानें नेत असतात. ते धर्मानें लोकांना वळवितात, हें जाणणारांनीं त्यांचा मत्सर कां करावा ? "

पहिल्या गाथेनें लोकांनीं भिक्षूंस दोष दिला असतां या गाथेनें भिक्षु त्यांस उत्तर देत असत. धर्मानेंच शाक्यपुत्रीय[1] श्रमण लोकांस वळवितात, अधर्मानें वळवीत नाहींत, हें जेव्हां लोकांस समजलें तेव्हां त्यांनीं भिक्षूंस दोष देणें सोडून दिलें. एका आठवड्यांतच तो लोकप्रवाद नष्ट झाला.

भिक्षुसंघाचा चोहोंकडे बहुमान होऊं लागला, हें पाहून कांहीं उदरंभरी लोकहि त्यांत प्रवेश करूं लागले. एकदां कांहीं दिवसपर्यंत शहरांत सारखीं भिक्षूंनां आमंत्रणें होत होतीं. लोक सुग्रास अन्न तयार करून भिक्षूंस मोठ्या आदरानें जेवावयास घालीत असत. हें एका ब्राह्मणानें पाहिलें, आणि आपणास यथेच्छ भोजन मिळावें या उद्देशानें भिक्षुसंघांत त्यानें प्रवेश केला. जेव्हां हीं आमंत्रणें संपलीं, तेव्हां भिक्षूंनीं, भिक्षापात्र घेऊन आपणाबरोबर भिक्षेस चल, असें त्याला सांगितलें. त्यावर तो म्हणाला, " जर तुम्ही मला जेवावयास घालाल तर मी राहीन, नाहीं तर भिक्षुसंघ सोडून चालता होईन. " याच्यासारखे दुसरेहि कित्येक प्रापंचिक लाभासाठींच संघांत प्रवेश करूं लागले. त्यांच्या बंदोबस्ताकरितां निरिच्छ भिक्षूंच्या विनंतीस मान देऊन बुद्ध भगवंताला **उपसंपदेचे** नवीन नवीन नियम करणें भाग पडलें. हे नियम कोणत्या कोणत्या प्रसंगीं करण्यांत आले, हें सांगण्यास येथें सवड नाहीं. तथापि प्रस्तुत ब्रह्मदेश, सिलोन इत्यादि ठिकाणीं जो **उपसंपदाविधि** सुरू आहे त्यांत बुद्धानें घालून दिलेल्या बहुतेक सर्व नियमांचा समावेश होत असल्यामुळें त्याचा सारांश येथें सांगितल्यावांचून राहवत नाहीं.

---

१. बौद्ध संघांतील भिक्षूंस शाक्यपुत्रीय श्रमण म्हणत असत.

संघांत प्रवेश करूं इच्छिणाऱ्या उमेदवारास प्रथमतः एका भिक्षूस आपला उपाध्याय करण्यास सांगतात. भदन्त (महाराज), तुम्ही माझे उपाध्याय व्हा, असें, त्या भिक्षूस त्रिवार त्यानें विनविलें पाहिजे. त्या भिक्षूनें उपाध्याय होण्याचें कबूल केल्यावर उमेदवाराचें भिक्षापात्र व चीवर (भिक्षुवस्त्र) त्याला दाखविण्यांत येतें. नंतर ज्या ठिकाणीं जाऊन रहाण्यास त्याला सांगण्यांत येतें तेथें तो राहतो. नंतर भिक्षुसंघापैकीं दुसरा एक विद्वान् भिक्षु पुढें होऊन त्याला, त्यानें काय काय केलें पाहिजे, कोणत्या प्रश्नांचीं काय काय उत्तरें दिलीं पाहिजेत, हें नीट समजावून सांगण्यासाठीं परवानगी मागतो. संघाची परवानगी मिळाल्यावर तो उमेदवार असेल तेथें जाऊन तो भिक्षु त्याला सर्व समजावून देतो, व सर्व गोष्टी समजावून दिल्याचें वर्तमान पुनः येऊन संघास कळवितो. तेव्हां संघ त्या उमेदवारास पुनः परत येण्यास सांगतो, संघ बसलेला असेल तेथें जाऊन उमेदवारानें संघाची येणेंप्रमाणें त्रिवार प्रार्थना केली पाहिजे:— "भदन्त, संघापाशीं मी उपसंपदेची याचना करितों. अनुकंपा करून संघ माझा उद्धार करो." नंतर दुसरा एक विद्वान् भिक्षु उपसंपदेला प्रतिबंध करणाऱ्या गोष्टींपासून हा नवीन उमेदवार मुक्त आहे किंवा नाहीं हें त्याला विचारण्याची संघाजवळ परवानगी मागतो. ती मिळाल्यावर तो भिक्षु त्याला प्रश्न करितो ते असे:—

**भिक्षु**—हे नाग (शूर) हा सत्य बोलण्याचा प्रसंग आहे. येथें घडलेली गोष्ट सांगितली पाहिजे. मी तुला आतां प्रश्न विचारणार आहें. जें असेल तें आहे, असें सांगितलें पाहिजे. जें नसेल तें नाहीं म्हणून सांगितलें पाहिजे. पुढील रोग तुला आहेत काय? कुष्ठरोग तुला आहे काय?

**उमेदवा**—नाहीं महाराज. (नत्थि भन्ते.)

**भिक्षु**—गंडरोग?

**उ०**—नाहीं महाराज.

**भिक्षु**—किलास रोग?

**उ०**—नाहीं महाराज.

**भिक्षु**—क्षयरोग?

**उ०**—नाहीं महाराज.

**भिक्षु**—अपस्मार?

उ०---नाहीं महाराज.

भिक्षु---तूं मनुष्य आहेस ना ?

उ०---होय महाराज. (**आम भन्ते.**)

भिक्षु---तूं पुरुष आहेस ना ?

उ०---होय महाराज.

भिक्षु---तूं स्वतंत्र आहेस ना ?

उ०---होय महाराज.

भिक्षु---तूं ऋणमुक्त आहेस ना ?

उ०---होय महाराज.

भिक्षु---तूं राजाचा योद्धा नाहींस ना ?

उ०---होय महाराज (मी राजाचा योद्धा नाहीं.).

भिक्षु---आईबापांची तुला परवानगी आहे ना ?

उ०---होय महाराज.

भिक्षु---तुझ्या वयाला वीस वर्षे पुरी झालीं आहेत ना ?

उ०---होय महाराज.

भिक्षु---तुला लागणारें पात्र आणि चीवरें तुझ्या जवळ आहेत ना ?

उ०---होय महाराज.

भिक्षु---तुझें नांव काय ?

उ०---अमुक.

भि०---तुझा उपाध्याय कोण ?

उ०---अमुक.

या प्रश्नांचीं वर सांगितल्याप्रमाणें यथायोग्य उत्तरें दिल्यावर तो संघाला त्रिवार विनंती करितो कीं, हा उमेदवार उपसंपदेला अंतराय करणाऱ्या गोष्टींपासून मोकळा आहे, याला लागणारें पात्र व चींवरें याजपाशीं आहेत. आता हा उपसंपदेची याचना करीत आहे. याचा उपाध्याय अमुक. जर संघाला योग्य वाटत असेल तर संघानें यास उपसंपदा द्यावी. ज्याला योग्य वाटत असेल त्यानें मुकाट्यानें रहावें, ज्याला योग्य वाटत नसेल त्यानें बोलावें. सगळा संघ मुकाट्यानें राहिला म्हणजे तो म्हणतो कीं:---संघाला ही गोष्ट मान्य आहे म्हणून संघ मुकाट्यानें आहे, असें मी समजतों."

नंतर त्या उमेदवारास आपली छाया पावलांनीं मोजावयास सांगतात[1]; त्याला ऋतु, मास वगैरे सांगतात; आणि पुढील चार **आधार** (अवलंबून राहण्यासारख्या गोष्टी) सांगण्यांत येतात.

**भिक्षु**—भिक्षान्नावर अवलंबून राहण्यासाठीं तुझा हा संन्यास; म्हणून यावज्जीव भिक्षान्नावर अवलंबून राहण्याचा तूं प्रयत्न केला पाहिजे. संघ-दानादिक प्रसंगीं मिळालेलें अन्न विशेष लाभ, असें तूं समजावें.

उ०— होय महाराज.

**भि०**—मार्गांत वगैरे पडलेल्या चिंध्या गोळा करून केलेल्या चीवरांवर अवलंबून राहण्यासाठीं तुझा हा संन्यास; म्हणून यावज्जीव तशा चीवरांवर अवलंबून राहण्याचा तूं प्रयत्न केला पाहिजे. क्षौमादि वस्त्रांची चीवरें (कोणी गृहस्थाकडून) मिळालीं, तर तो विशेष लाभ असें तूं समजावें.

उ०— होय महाराज.

**भि०**— तरुतलवासावर अवलंबून राहण्यासाठीं हा तुझा संन्यास; म्हणून यावज्जीव झाडाखालीं राहण्याचा तूं प्रयत्न केला पाहिजे. विहारादिक (राहण्यासाठीं) मिळाले तर तो विशेष लाभ, असें तूं समजावें.

उ०— होय महाराज.

**भि०**— गोमूत्राच्या औषधावर अवलंबून राहण्यासाठीं हा तुझा संन्यास; म्हणून यावज्जीव गोमूत्राच्या औषधावर निर्वाह करण्याचा तूं प्रयत्न केला पाहिजे. घृतनवनीतादिक (औषधोपयोगी पदार्थ) मिळाले तर तो विशेष लाभ, असें तूं समजावें.

उ० — होय महाराज.

तदनंतर **चार अकार्य** गोष्टी सांगण्यांत येतात.

**भि०** — संघांत प्रवेश केलेल्या भिक्षूनें मैथुनव्यवहार करतां कामा नये.... जो भिक्षु मैथुनव्यवहार करील, तो अश्रमण होईल, अशाक्यपुत्रीय होईल. जसा डोकें कापलेला मनुष्य नुसत्या धडानें जगूं शकत नाहीं, तसा

---

१. पूर्वी आपली छाया मोजून वेळ समजत असत.

मैथुनव्यवहार केला असतां भिक्षु अश्रमण होतो, अशाक्यपुत्रीय होतो; म्हणून ही गोष्ट तूं यावज्जीव करतां कामा नये.

उ०— होय महाराज.

भि०— संघांत प्रवेश केलेल्या भिक्षूनें चोरी करतां कामा नये. गवताची काडी सुद्धां त्यानें दिल्यावांचून घेतां कामा नये. जो भिक्षु.... चोरी करील, तो अश्रमण होईल, अशाक्यपुत्रीय होईल,... म्हणून यावज्जीव ही गोष्ट तूं करतां कामा नये.

उ०— होय महाराज.

भि०— संघात प्रवेश केलेल्या भिक्षूनें जाणूनबुजून प्राणघात करतां कामा नये. त्यानें किडा, मुंगी देखील मारतां कामा नये. जो भिक्षु जाणून-बुजून—गर्भावस्थेंतील देखील—मनुष्य-प्राण्याला ठार मारील, तो अश्रमण होईल, अशाक्यपुत्रीय होईल...म्हणून यावज्जीव ही गोष्ट तूं करतां कामा नये.

उ०— होय महाराज.

भि०— संघात प्रवेश केलेल्या भिक्षूनें आपणास ध्यानसमाधि प्राप्त झाल्याच्या वल्गना करतां कामा नये. एकांतांतच राहण्यांत मला आनंद वाटतो, अशी प्रौढी देखील त्यानें सांगतां कामा नये. जो भिक्षु पापी इच्छेनें तृष्णावश होऊन आपणास ध्यानसमाधि प्राप्त झाल्याच्या खोट्या गप्पा (लोकांस) सांगेल, तो अश्रमण होईल, अशाक्यपुत्रीय होईल....म्हणून यावज्जीव ही गोष्ट तूं करतां कामा नये.

उ०— होय महाराज.

या **उपसंपदाविधीच्या** संक्षिप्त वर्णनावरून भिक्षूस मुख्यतः कोण-कोणते नियम पाळावे लागतात याची आपणास थोडीबहुत कल्पना करतां येईलच. आतां **श्रामणेर** म्हणजे काय? हें थोडक्यांत सांगतों.

**बुद्धभगवान्** कांहीं काल **राजगृहांत** राहून तेथून धर्मोपदेश करीत करीत **कपिलवस्तु** नगरीस गेला. तेथें तो **निग्रोधाराम** नांवाच्या विहारांत राहत होता. एके दिवशीं भिक्षेसाठीं कपिलवस्तु नगरींत त्यानें प्रवेश केला, व तो फिरत फिरत **शुद्धोदन** राजाच्या घरीं गेला. तेथें त्याला

बसण्यासाठीं मांडलेल्या आसनावर तो बसला असतां राहुलाच्या आईनें ( बोधिसत्त्वाच्या पत्नीनें ) त्याला पाहिलें, व ती राहुलकुमारास ह्मणाली "बाळ, हा पहा तुझा बाप. त्याच्या जवळ जाऊन तुझा हिस्सा ( दायभाग ) माग !" हे आईचे शब्द ऐकून राहुल बुद्धासमोर जाऊन उभा राहिला. बुद्ध भगवान् कांहीं वेळानें आसनावरून उठून चालता झाला. राहुलहि त्याच्या मागोमाग 'मला माझा हिस्सा द्या.' असें ह्मणत चालला. विहारांत गेल्यावर बुद्ध भगवंतानें सारिपुत्राला बोलावून– पैतृक धन देण्याच्या उद्देशानें–राहुल-कुमारास संन्यास देण्यास सांगितलें. राहुलाच्या वयास वीस वर्षे झालीं नव्हतीं ह्मणून त्यास श्रामणेर करण्यांत आलें. तेव्हांपासून श्रामणेर करण्याची पद्धत सुरू झाली.

श्रामणेरानें स्वतंत्र राहतां कामा नये. भिक्षूंच्या आश्रयानेंच राहिलें पाहिजे. त्याला दीक्षा देते वेळीं त्याचें मुंडन करितात; नंतर काषायवस्त्रें घेऊन तेथें जमलेल्या भिक्षूंला नमस्कार करून तो पुढील वाक्य त्रिवार उच्चारितो–

**सब्बदुक्खनिस्सरणनिब्बानसच्छिकरणत्थं इदं कासावं गहेत्वा पब्बाजेथ मं भन्ते अनुकंपं उपादाय ।**

सर्व दुःखापासून मुक्त अशा निर्वाणाचा साक्षात्कार करण्याकरितां हीं काषायवस्त्रें घेऊन अनुकंपा करून मला संन्यास द्या.

नंतर त्यांतील एक भिक्षु त्याला '**बुद्धं सरणं गच्छामि, धम्मं सरणं गच्छामि, संघं सरणं गच्छामि,**' हीं वाक्यें त्रिवार उच्चारावयास लावतो, व त्यानें पाळावयाचे दहा नियम त्याला शिकवितो. ( १ ) प्राणघातापासून विरत होणें ( २ ) चोरीपासून विरत होणें. ( ३ ) ब्रह्मचर्य धारण करणें. ( ४ ) खोटें न बोलणें. ( ५ ) सुरादि मादक पदार्थांचें सेवन न करणें. ( ६ ) माध्यान्हकालापूर्वी जेवणें. ( ७ ) नृत्य, गीत, वादित इत्यादिक कामविकार उत्पन्न करणाऱ्या गोष्टींपासून दूर राहणें. ( ८ ) मालागंधादि ( चैनीच्या ) पदार्थांचें धारण न करणें. ( ९ ) उंच आणि मोठ्या शय्येवर न निजणें. ( १० ) सोनें आणि रुपें यांचा स्वीकार न करणें. हे दहा नियम श्रामणेरानें पाळले पाहिजेत.

भिक्षुसंघानें महिन्यांतून पौर्णिमा आणि कृष्णचतुर्दशी या दोन दिवशीं एकत्र जमून **उपोसथकर्म** केलें पाहिजे. त्या दिवशीं भिक्षुच्या निषिद्ध-शीलांत समाविष्ट झालेल्या २२७ नियमांचा पाठ सर्व संघासमोर ह्मटला जातो. त्यापैकीं कोणत्याहि भिक्षूकडून एखाद्या नियमाविरुद्ध आचरण झालें असेल तर तो दोष त्यानें तेथल्या तेथें कबूल केला पाहिजे, व त्याला जें प्रायश्चित्त सांगितलें असेल तें केलें पाहिजे. या २२७ नियमांला **प्रातिमोक्ष** असें ह्मणतात, व त्यांच्या पाठाला **प्रातिमोक्षोद्देश** असें ह्मणतात.

बुद्धाच्या हयातींत आणि बुद्धानंतर कांहीं वर्षें भिक्षुसंघ पावसाळ्याचे चार महिने एके ठिकाणीं राहत असे, व बाकी आठ महिने चोहोंकडे उपदेश करीत फिरत असे. ही स्थिति अशोककाळापर्यंत टिकली असावी. अशोकाच्या वेळीं जरी पुष्कळ भिक्षु धर्मोपदेशासाठीं इतर देशांत गेले, तरी एकंदरींत भिक्षुसंघाला स्थायिक स्वरूप येऊं लागलें. त्याच्यायोगें बौद्ध वाङ्मयाची बरीच वाढ झाली. परंतु भिक्षुसंघाचा पूर्वींचा जोम कायम राहिला नाहीं.

## संघभेद

बुद्धाचा संघ आणि कीर्ति हीं दोन्ही सारखीं वाढत चाललीं होतीं. त्या वेळीं **भद्दिय** नांवाचा तरुण, शाक्यांच्या राज्याचा अध्यक्ष होता. त्याचा परम मित्र **अनुरुद्ध शाक्य** याच्या आग्रहानें त्यानें राज्य सोडून भिक्षुसंघांत प्रवेश करण्याचा विचार केला. या दोघांबरोबर **आनंद, भगु, किम्बिल** आणि **देवदत्त** हे चार शाक्यकुमार व त्यांचा न्हावी **उपालि** यांनी भिक्षुसंघांत प्रवेश केला. **उपालीला** सर्वांत प्रथम **उपसंपदा** देण्यांत आली. हा पुढें **विनयधर** म्हणजे भिक्षुसंघाच्या कायद्यांत प्रवीण झाला; **आनंद धर्मधर** म्हणजे बुद्धोपदेशांत प्रवीण झाला; आणि **देवदत्त संघभेदक** म्हणजे बौद्धसंघांत भेद उत्पन्न करणारा झाला.

बुद्ध भगवान् राजगृहांतील **वेळुवनविहारांत** राहत असतां **देवदत्त** त्याजकडे गेला आणि त्याला हात जोडून म्हणाला– "भगवन्, आपण आतां वृद्ध झालां आहां, आतां स्वस्थ बसण्याचा आपला काळ आहे. आतां आपण संघाला माझ्या स्वाधीन करावें. मी भिक्षुसंघाचें नायकत्व स्वीकारितों." यावर बुद्ध भगवान् म्हणाला, "**देवदत्त, सारिपुत्त** आणि **मोग्गल्लान** यांच्या

स्वाधीन सुद्धां भिक्षुसंघ करायास मी तयार नाहीं. मग तुझ्यासारख्या असमंजस सामर्थ्यहीन माणसाच्या स्वाधीन मी भिक्षुसंघ कसा करीन ?" हें ऐकून **देवदत्त** मनांतल्यामनांत फारच संतापला, आणि तेव्हांपासून तो बुद्धाचा सूड उगविण्याच्या दुष्ट वासनेला बळी पडला.

**बिंबिसार** राजाचा पुत्र **अजातशत्रु** हा **देवदत्ताचा** भक्त होता. स्वत: त्यानें आपल्या बापाला ठार मारून गादी मिळविली होती; व बुद्धाला ठार मारून देवदत्ताला बुद्धपद मिळवून देण्याच्या कामी मदत करण्याचें त्यानें अभिवचन दिलें होतें. कांहीं मारेकरी पाठवून बुद्धाला ठार मारण्याचा त्यानें प्रयत्न करून पाहिला, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. उलट ते मारेकरी बुद्धाचेच उपासक झाले. तेव्हां **देवदत्तानें** बुद्ध भगवान् राजगृहांत भिक्षेसाठीं फिरत असतां त्याजवर **नाळागिरि** नांवाचा मस्त हत्ती सोडविला. बुद्ध भगवंतानें प्रेममय अंतःकरणानें त्याजकडेस पाहिलें. तो कांहींएक इजा न करतां सरळ बुद्धापुढें जाऊन उभा राहिला, व त्याची पायधूळ त्यानें आपल्या मस्तकावर टाकिली. तेथून तो सरळ हस्तिशाळेंत आपल्या ठिकाणावर जाऊन उभा राहिला. हें परम आश्चर्य पाहून राजगृहवासी लोक फारच चकित झाले, व ते म्हणूं लागले कीं,

**दण्डेनेके दमयन्ति अंकुसेहि कसाहि च ।**
**अदण्डेन असत्थेन नागो दन्तो महेसिना ।।**

कोणी काठीनें, कोणी अंकुशानें आणि कोणी चाबकानें ( जनावराचें ) दमन करितात. पण महर्षि बुद्धानें काठीवांचून किंवा कोणत्याहि शस्त्रावांचून हत्तीचें दमन केलें !

अशा प्रकारचे बुद्धाला मारून आपण बुद्ध होण्याचे प्रयत्न निष्फळ झाल्यावर देवदत्तानें बौद्धसंघांत भेद उत्पन्न करण्याची एक नवीन युक्ति शोधून काढिली. देहदंडनाला मदत होईल अशा रीतीचे नवीन नियम भिक्षुसंघासाठीं बुद्ध भगवान् करणार नाहीं हें त्याला पक्कें माहीत होतें; आणि कांहीं लोक देहदंडन करणारांना भुलून जाऊन त्यांच्या नादीं लागतात हेंहि त्याला माहित होतें. म्हणून त्यानें अशी युक्ति योजिली कीं, बुद्धाजवळ जाऊन त्याची सम्मति मिळणार नाहीं, असे कांहीं नवीन नियम संघाला घालून देण्यास त्यास सांगावें, व त्यानें ही गोष्ट अमान्य केली

म्हणजे तो लोकांना पूर्ण वैराग्य शिकवीत नाहीं असा बोभाटा करून संघांतील कांहीं भिक्षूंना आपल्या नादीं लावावें. ही युक्ति त्यानें **कोकालिक** व **समुद्रदत्त** या संन्यासी सहायांस कळविली, व आपल्या मताचे जेवढे लोक होते, तेवढे गोळा करून तो बुद्धाजवळ गेला. बुद्धाला नमस्कार करून एका बाजूस बसल्यावर तो म्हणाला– " भगवन्, आपण अल्पेच्छ आणि संतुष्ट मनुष्याचे गुण वर्णन करतां, तेव्हां हे नवीन पांच नियम भिक्षुसंघानें पाळण्यासाठीं आपण घालून द्यावे, कारण हे पांच नियम अल्पेच्छता आणि संतोष वाढवितील. ( १ ) भिक्षूंनीं यावज्जीव अरण्यांतच रहावें, जो भिक्षु गांवांत वस्ती करील त्याला दोषी ठरवावें. ( २ ) भिक्षूंनीं यावज्जीव भिक्षान्नावरच निर्वाह करावा. जो आमंत्रण घेऊन जेवावयास जाईल त्यास दोषी ठरवावें. ( ३ ) भिक्षूंनीं यावज्जीव रस्त्यांत वगैरे पडलेल्या चिंध्या गोळा करून त्यांनीं बनविलेल्या चीवरावरच निर्वाह करावा. जो भिक्षू गृहस्थानें दिलेलें वस्त्र घेऊन त्याचें चीवर करील त्याला दोषी ठरवावें. ( ४ ) भिक्षूंनीं यावज्जीव वृक्षाखालीं वास करावा. जो भिक्षु आच्छादित ( झोंपडी वगैरे ) ठिकाणीं वास करील त्याला दोषी ठरवावें. ( ५ ) भिक्षूंनीं यावज्जीव मासे आणि मांस खाऊं नये. जो भिक्षू मत्स्य-मांस खाईल, त्याला दोषी ठरवावें."

बुद्ध भगवान् म्हणालाः– " देवदत्ता, या नवीन नियमांची कांहीं जरूरी नाहीं. ज्याची इच्छा असेल त्यानें अरण्यांतच रहावें, आणि नसेल त्यानें गांवाजवळ रहावें. ज्याची इच्छा असेल त्यानें भिक्षेवरच निर्वाह करावा, आणि नसेल त्यानें आमंत्रण केलें असतां जेवावयास जावें. ज्याची इच्छा असेल त्यानें चिंध्यांच्या चीवरावरच निर्वाह करावा, नसेल त्याला गृहस्थानें दिलेल्या वस्त्राचें चीवर शिवण्यास हरकत नसावी. पावसाळ्याचे चार महिने खेरीज करून आठ महिनें वृक्षाखालीं रहाण्यास मीं परवानगी दिलीच आहे. भिक्षान्न तयार करण्यासाठीं हे प्राणी मारले आहेत असें जर भिक्षूनें पाहिलें, ऐकिलें, किंवा अशी त्याला शंका आली, तर त्या माशांचें आणि मांसाचें त्यानें ग्रहण करूं नये, नाहींतर ग्रहण करण्यास हरकत नाहीं."

हें ऐकून देवदत्ताला फार संतोष झाला. ही गोष्ट त्यानें राजगृहांत जिकडे तिकडे प्रसिद्ध केली, व तिजमुळें कांहीं भिक्षूंनां आणि उपासकांना

आपल्या नादास लाविलें. कांहीं भिक्षुसंघ सोडून **देवदत्ताच्या** शिष्यशाखेंत जाऊन मिळाले आहेत, हें वर्तमान जेव्हां **सारिपुत्त** आणि **मोग्गल्लान** या बुद्धाच्या मुख्य शिष्यांना समजलें, तेव्हां ते बुद्धाच्या परवानगीनें देवदत्ता-जवळ गेले, आणि संघ सोडून गेलेल्या भिक्षूंस त्यांनीं पुनः संघांत आणिलें. देवदत्ताला आपल्या पापकर्माचा पुढें पश्चात्ताप झाला. परंतु तो बुद्धापाशीं प्रकट करण्यापूर्वींच त्याचें देहावसान झालें.

**कौशांबी** नगरीमध्यें बुद्धाच्या हयातींत भिक्षुसंघांत आणखी एक भांडण उपस्थित झालें होतें. बुद्ध भगवंताला हें वर्तमान समजल्यावर तो तेथें गेला. त्यानें अनेक प्रकारें उभय पक्षांचें समाधान करण्याचा प्रयत्न केला. तेव्हां त्यांपैकीं एक तरुण भिक्षू त्याला म्हणाला "भगवन्, आपण आतां वृद्ध झालां आहां, आतां आपण या भानगडींत कशास पडतां? आमचे आम्ही काय होईल तें पाहून घेऊं."

हें त्या तरुणाचें भाषण ऐकून बुद्ध भगवान् तेथून चालता झाला. त्या चातुर्मास्यांत तो एका अरण्यांत जाऊन राहिला. इकडे या भिक्षूंनीं बुद्ध भगवंताच्या सामोपचाराच्या गोष्टी ऐकल्या नाहींत, आणि हे भांडत राहिले, हें पाहून सगळ्या उपासक मंडळीस त्यांचा राग आला, व त्यांनीं, आजपासून या भिक्षूंस भिक्षा देऊं नये असा नियम केला, तेव्हां ते ताळ्यावर आले, व बुद्ध भगवंताजवळ जाऊन त्यांनीं कृतापराधांची माफी मागितली.

याप्रमाणें बुद्धाच्या हयातींत संघांत फाटाफूट होण्याचा दोनदा प्रसंग आला. तथापि त्यामुळें संघाला दुर्बळता न येतां उलट बळकटीच आली. या दोन्ही प्रसंगीं बुद्धाची निरपेक्षता व उपासकांची त्याच्या ठायीं असलेली दृढ श्रद्धा, हीं जनांच्या चांगल्या प्रत्ययास आलीं.

बुद्ध भगवंताला जातिभेद मुळींच माहित नव्हता. **सारिपुत्त-मोग्गल्लानादि** ब्राह्मण जसे भिक्षुसंघांत होते, तसाच **सोपाक** नांवाचा चांडाळहि त्यामध्यें होता.

**न जच्चा वसलो होति न जच्चा होति ब्राह्मणो ।**
**कम्मना वसलो होति कम्मना होति ब्राह्मणो ॥**

जातीमुळें कोणी चांडाळ होत नाहीं, किंवा कोणी ब्राह्मण होत नाहीं. कर्मानें चांडाळ होतो, आणि कर्मानेंच ब्राह्मण होतो.

हें तत्त्व बुद्धानें भिक्षुसंघास पूर्णपणें लागू केलें होतें. कांहीं काळपर्यंत भिक्षुणींचा संघ त्यानें स्थापिला नव्हता. परंतु पुढें त्याचीहि त्यानें स्थापना केली. भिक्षुणीसंघाला त्या काळच्या परिस्थित्यनुरूप कांहीं कडक नियम बुद्धानें घालून दिले होते. एवढयावरून बुद्धानें स्त्रीस्वातंत्र्याला विरोध केला, असें रा. ब. **शरच्चंद्र दास**, सी. आय्. इ., या तिबेटी भाषाभिज्ञ बंगाली गृहस्थाचें म्हणणें आहे. बौद्ध धर्मावर कित्येक निराधार आरोप करण्यांत येतात, त्यापैकीं हाहि एक आहे, असें मी समजतों.

हिंदुधर्मामध्यें स्त्रियांना आणि शूद्रांना वेदाधिकार नाहीं, त्यांनीं पुराणांवरच आपली तहान भागविली पाहिजे. असा प्रकार कांहीं बौद्ध धर्मामध्यें नाहीं. **बौद्ध** स्त्रियांना सर्व धर्मग्रंथ वाचण्याची मोकळीक आहे. आजला ब्रह्मदेशांत त्रिपिटक ग्रंथाचें अध्ययन केलेल्या आणि करणाऱ्या पुष्कळ स्त्रिया आहेत. इंग्रज सरकारच्या तर्फेनें ब्रह्मी राजांच्या पद्धतीस अनुसरून पालिभाषेंतील बौद्ध वाङ्मयाची परीक्षा घेऊन कांहीं बक्षिसें वाटण्यांत येतात. या परीक्षेंत उत्तीर्ण होऊन बऱ्याच स्त्रियांनीं बक्षिसें मिळविल्याचें मला माहित आहे.

**मंगलसुत्तांत** आणि **सिगालसुत्तांत** गृहस्थांनीं गृहिणींचा आदर करण्याविषयीं बुद्धानें उपदेश केला आहे. **अनाथपिंडिक** इत्यादि गृहस्थांनीं आपल्या गुणांनीं उपासकवर्गांत जसें अग्रस्थान मिळवलें होतें, तसेंच उपासिकावर्गांत **विशाखा** प्रभृति गृहिणींनीं मिळविलें होतें. नकुलमाता नांवाच्या एका प्रमुख उपासिकेनें आपल्या पतीस केलेला उपदेश आपण ऐकाल, तर तिला उपासिकावर्गांत अग्रस्थान कां मिळालें होतें याची आपणांस कल्पना करतां येईल, म्हणून त्या उपदेशाचा सारांश येथें देतों.

**भर्गदेशांत शिशुमारगिर** या ठिकाणीं भगवान् बुद्ध रहात होता. तेथें त्या वेळीं **नकुलपिता** नांवाचा गृहस्थ फार आजारी होता. त्याचा मरणकाळ समीप आहे असें सर्वांस वाटत होतें. तेव्हां त्याची पत्नी त्याला म्हणाली— " हे गृहपति, प्रपंचासक्त होऊन तूं मरतां कामा नये. अशा प्रकारचें सापेक्ष ( प्रपंचाच्या तळमळीनें आलेलें ) मरण दुःखकारक आहे, असें भगवंतानें सांगितलें आहे. हे गृहपति, कदाचित् तुझ्या मनांत अशी शंका येईल कीं, ' मी मेल्यावर, नकुलमाता मुलांचें पालन करूं शकणार

नाहीं, प्रपंचाचा गाडा हाकूं शकणार नाहीं.' परंतु गृहपति, अशी शंका तूं मनामध्यें आणूं नकोस. कारण मला कापसाचें सूत काढण्याची कला माहिती आहे, व मला लोंकर तयार करतां येत आहे. या कलेनें मी तुझ्या मरणानंतर मुलांचें पोषण करूं शकेन. म्हणून हे गृहपति, प्रपंचाची तळमळ मनामध्यें ठेवून तुला मरण येऊं नये, असें माझें म्हणणें आहे. हे गृहपति, दुसरी तुला अशी शंका येण्याचा संभव आहे कीं, 'नकुलमाता माझ्या पाठीमागें पुनर्विवाह करील,' परंतु ही शंका तूं सोडून दे. मी आज सोळा वर्षें गृहस्थब्रह्मचर्य (उपोसथव्रत) पाळीत आहें हें तुला ठाऊकच आहे. मग मी तुझ्या मृत्यूनंतर पुनर्विवाह कसा करीन? हे गृहपति, तुझ्या मरणानंतर मी बुद्धभगवंताचा आणि भिक्षुकसंघाचा धर्मोपदेश श्रवण करण्यास जाणार नाहीं अशी तुला शंका येण्याचा संभव आहे; पण तुझ्या मागें पूर्वींप्रमाणेंच बुद्धोपदेश ऐकण्याच्या कामीं माझा आदर राहील, अशी तुझी पक्की खात्री असूं दे; आणि ह्मणून तळमळीवांचून तुला मरण येऊं दे. हे गृहपति, तुझ्या पाठीमागें मी बुद्धोपदिष्ट शीलाचें यथासांग पालन करणार नाहीं, अशी तुला शंका येण्याचा संभव आहे. पण ज्या उत्तम शीलवती बुद्धोपासिका आहेत, त्यांपैकीं मीहि एक आहें, हें तूं खात्रीनें समज; आणि ह्मणून तळमळीवांचून तुला मरण येऊं दे. हे गृहपति, मला समाधिलाभ झाला नाहीं– अतएव तुझ्या मरणानें मी फार दुःखी होईन– असें तूं समजूं नकोस. ज्या कोणी बुद्धोपासिका समाधिलाभिनी असतील, त्यांपैकीं मी एक आहें असें तूं समज, आणि मनाची तळमळ सोडून दे. हे गृहपति, बौद्धधर्माचें तत्त्व मला अद्यापि समजलें नाहीं अशीहि तुला कदाचित् शंका येईल. परंतु ज्या कोणी तत्त्वज्ञ उपासिका असतील त्यांपैकींच मी एक आहें, हें तूं पक्कें ध्यानांत ठेव, आणि मनाची तळमळ टाक." या **नकुलमातेच्या** सांत्वनानें **नकुलपित्याच्या** मनाचें समाधान झालें आणि त्याचा तो आजार लवकरच शमला. आजारांतून बरा झाल्यावर तो बुद्धदर्शनास गेला. तेथें बुद्धानें त्याला ह्मटलें "हे गृहपति, तूं मोठा पुण्यवान् आहेस; नकुलमातेसारखी उपदेश करणारी आणि तुझ्यावर प्रेम करणारी पत्नी तुला मिळाली आहे. हे गृहपति, उत्तम शीलवती अशा ज्या कांहीं उपासिका आहेत, त्यांपैकीं ही एक आहे. अशी पत्नी तुला सांपडली हें तुझें भाग्य होय!"

या एका उदाहरणावरून बुद्धभगवंताला स्त्रियांची योग्यता किती वाटत होती हें आपणास समजून येणार आहे. आणखीहि कांहीं उदाहरणें त्रिपिटक ग्रंथांतून दाखवितां येण्यासारखीं आहेत; परंतु अवकाश नसल्यामुळें एवढ्यानेंच समाधान मानणें भाग आहे.

स्त्रीस्वातंत्र्य जर बुद्धाला पसंत होतें, तर भिक्षुणींसाठीं त्यानें कडक नियम केले हें कसें? याचें उत्तर थोडक्यांत द्यावयाचें ह्मटलें ह्मणजे, त्या कालच्या समाजपरिस्थित्यनुरूप हे नियम बुद्धाला करावे लागले हें होय. उदाहरणार्थ, भिक्षुणीनें एकटें राहूं नये असा बुद्धानें नियम केला. असा निर्बंध भिक्षूंस नव्हता. अर्थात् हा नियम स्त्रीस्वातंत्र्यविघातक आहे. असें सकृद्दर्शनीं कोणालाहि वाटण्याचा संभव आहे. पण त्या कालच्या समाजरचनेकडे लक्ष्य दिलें असतां हा नियम योग्य होता असेंच ह्मणावें लागेल. हें शुभा नांवाच्या भिक्षुणीच्या गोष्टीवरून स्पष्टपणें समजून येण्यासारखें आहे.

शुभा भिक्षुणी एके दिवशीं जीवक वैद्याच्या आम्रवनास एकटीच जात होती. वाटेंत तिला एका लबाड मनुष्यानें गांठलें. तिच्या सुंदर रूपाकडे पाहून तो भुलून गेला, आणि आपली दुष्ट वासना तृप्त करण्यासाठीं तिचें मन वळवूं लागला. तिनें त्याला अनेक प्रकारें उपदेश केला; परंतु त्या कामांध माणसावर त्याचा कांहींएक परिणाम झाला नाहीं. शेवटीं तो बलात्कार करण्यास सुद्धां तयार आहे असें जेव्हां शुभेला दिसून आलें, तेव्हां ती त्याला ह्मणाली "अरे, तूं मला कां अडवीत आहेस?" तो पुनः तिच्या नेत्रादि सुंदर अवयवांचें वर्णन करूं लागला, आणि ह्मणाला "हे सुंदरि, हें तुझें सुंदर नेत्रयुग्म पाहून मी कामविकारानें पीडित झालों आहें. सुंदरि, तुझ्यावांचून प्रियतर असें मला या जगामध्यें कांहीं नाहीं." शुभा ह्मणाली, "एवढेंच ना? या माझ्या डोळ्यांचीच तुला गरज. कांहीं हरकत नाहीं. घे हा डोळा." असें म्हणून बोटानें डोळा उपटून तो तिनें त्याच्या हातावर ठेवला. हें तिचें साहसी कृत्य पाहून तो मनुष्य घाबरून गेला, आणि त्यानें तिला साष्टांग प्रणिपात करून तिची क्षमा मागितली. भिक्षुणींवर अशा प्रकारचे प्रसंग येऊं नयेत एवढ्याचसाठीं त्यांनीं एकाकी राहूं नये, असा बुद्धानें नियम केला असला पाहिजे.

भिक्षुसंघात जसे सारिपुत्त, कात्यायनादिक थोर तत्त्वज्ञानी आणि धर्मोपदेशक होऊन गेले, तशाच भिक्षुणीसंघांत क्षेमा, उत्पलवर्णादिक भिक्षुणी होऊन गेल्या. कित्येक प्रसंगीं मोठमोठ्या विद्वान् पुरुषांनाहि त्यांनीं आपल्या अधिकारयुक्त वाणीनें उपदेश करून सन्मार्गाकडे वळविल्याच्या गोष्टी त्रिपिटकांत आढळतात. त्यांतील एक गमतीची गोष्ट कांही पालिगाथांसह येथें सांगून आजचा हा लांबलेला विषय आटोपतों.

पुण्णिका नांवाची भिक्षुणी पहाटेस उठून विहारांतील भिक्षुणींच्या उपयोगासाठीं पाणी आणण्यास नदीवर गेली होती. तेथें एक ब्राह्मण प्रात:स्नान करीत होता. त्याला पाहून ती म्हणाली:—

उदहारी अहं सीते सदा उदकमोतरिं।
अय्यानं दण्डभयं भीता वाचादोसभयट्टिता ॥
कस्स ब्राह्मण त्वं भीतो सदा उदकमोतरि ।
वेधमानेहि गत्तेहि सीतं वेधयसे भुसं ॥

या थंडीमध्यें भिक्षुणीसंघाच्या भयानें (मला दोष देतील या भयानें) पाणी नेण्यासाठीं मी या पाण्यांत सदोदित उतरतें. परंतु हे ब्राह्मणा, या तुझ्या थंडीनें आंखडून गेलेल्या गात्रांनीं तूं या पाण्यांत कोणाच्या भयानें सदोदित उतरतोस ? थंडीनें तूं आंखडलेला दिसतोस ?

ब्राह्मण म्हणाला:—

जानन्तीव तुवं भोति पुण्णिके परिपुच्छसि।
करोन्तं कुसलं कम्मं रुंधन्तं कम्मं पापकं ॥
यो च वुड्ढो दहरो वा पापं कम्मं पकुब्बति।
दकाभिसेचना सोपि पापकम्मा पमुच्चति ॥

मी पुण्यकर्म करीत आहें, आणि पापकर्माचा निरोध करतों आहें, हें जाणत असतां, भवति पुण्णिके, तूं हा प्रश्न कसा विचारतेस ? जो कोणी म्हातारा किंवा तरुण पाप करितो, तो प्रात:स्नानानें त्या पापापासून मुक्त होतो. (हें तुला ठाऊक नाहीं काय ?)

पुण्णिका म्हणाली:—

कोनु ते इदमक्खासि अजानन्तस्सजानको।
दकाभिसेचना नाम पापकम्मा पमुच्चति ॥ १ ॥

सग्गं नून गमिस्सन्ति सब्बे मंडूककच्छपा ।
नागा च सुंसुमारा च ये चञ्ञे उदके चरा ॥ २ ॥
ओरब्भिका सूकरिका मच्छिका मिगबंधका ।
चोरा च वज्झघाता च ये चञ्ञो पापकम्मिनो ॥
दूकाभिशेचना तेपि पापकम्मा पमुच्चरे ॥ ३ ॥

( १ ) हे ब्राह्मणा, स्नानानें पापापासून मुक्त होतो हें तुला अजाणाला कोणीं अजाणानें सांगितलें ? ( २ ) बेडुक, कांसव, सर्प, मगर इत्यादि पाण्यांत राहणारे सर्व प्राणी स्वर्गासच जाणार आहेत काय ? ( ३ ) बकरे मारणारे, डुकरें मारणारे, मासे मारणारे कोळी, पारधी, चोर, फांशीची शिक्षा झालेले मनुष्य हे आणि दुसरे पापी लोक स्नानानेंच पापकर्मांपासून मुक्त होतील काय ?

सचे इमा नदियो ते पापं पुब्बे कतं वहुं ।
पुञ्ञंपिमा वहेय्युं ते तेन त्वं परिबाहिरो ॥ ४ ॥
यस्स ब्राह्मण त्वं भीतो सदा उदकमोतरि ।
तमेव ब्रह्मे मा कासि मा ते सीतं छविं हने ॥ ५ ॥

( ४ ) हे ब्राह्मणा, या नद्या जर तुझें पाप वाहून नेतील, तर त्याबरोबर पुण्यहि वाहून नेतील. मग पुण्यालाहि तूं मुकशील ! (५) म्हणून हे ब्राह्मणा, ज्या पापाच्या भयानें तूं नित्य या पाण्यांत उतरतोस, तेंच तूं करूं नकोस; व्यर्थ थंडीनें तुझ्या अंगाला बाधा कां करून घेतोस ?

हा **पुण्णिकेचा** उपदेश ऐकून ब्राह्मण संतुष्ट होऊन एक वस्त्र घेऊन तिजपाशीं आला, आणि तिला म्हणाला– " भवति **पुण्णिके**, कुमार्गापासून सन्मार्गाकडे तूं मला वळविलेस; म्हणून हें वस्त्र मी तुला देतों. "

पुण्णिका म्हणाली:—

तय्हेव साटको होतु नाहमिच्छामि साटकं ।
सचे भायसि दुक्खस्स सचे ते दुक्खमप्पियं ॥
माकासि पापकं कम्मं आवि वा यदि वा रहो ॥ १ ॥
सचे च पापकं कम्मं करिस्ससि करोसि वा ।
न ते दुक्खा पमुत्यत्थि उपेच्चापि पलायतो ॥ २ ॥

**सचे भायसि दुक्खस्स सचे ते दुक्खमप्पियं ।**
**उपेहि बुद्धं सरणं धम्मं संघ च तादिनं ॥**
**समादियाहि सीलानि तं ते अत्थाय हेहिति ॥ ३ ॥**

( १ ) हे ब्राह्मणा, तुझें वस्त्र तुझ्याच जवळ ठेव. मी तें इच्छीत नाहीं. तूं जर दु:खास भितोस, तुला जर दु:ख अप्रिय आहे, तर एकांतीं किंवा लोकांतीं पापकर्म करूं नकोस. ( २) जर तूं पापकर्म करीत आहेस, किंवा करशील, तर कोठेंहि पळून गेलास तरी दु:खापासून तुझी मुक्तता होणार नाहीं ! ( ३ ) जर तूं दु:खाला भितोस, दु:ख जर तुला अप्रिय आहे, तर तूं बुद्धाला शरण जा, धर्माला शरण जा, आणि अर्हन्तांच्या संघाला शरण जा. शीलाचे नियम पाळ. यानेंच तुझें हित होईल."

या उपदेशानें तो ब्राह्मण बौद्धमतानुयायी झाला. पुढें तो मोठा साधु झाला. तेव्हां त्यानें हे उद्गार काढिले.

**ब्रह्मबंधु पुरे आसिं अज्जम्हि सच्चब्राह्मणो ।**
**तेविज्जो वेदसंपन्नो सोत्थियो चम्हि न्हातको ॥**

पूर्वीं मी केवळ नांवाचा ब्राह्मण होतो. परंतु आतां मी खरा ब्राह्मण झालों. कारण आतां त्रैविद्य ( बौद्धधर्मांत सांगितलेल्या तीन विद्या जाणणारा ) आहे, मी वेदसंपन्न ( ज्ञानसंपन्न ) आहें, मी पुरोहित ( स्वस्तिसुखाचा लाभी ) आहें, मी स्नातक ( मुक्त ) आहे !

## संघ

### ( भाग २ रा )

**बुद्ध भगवंताच्या** हयातींतच त्याचा धर्म मध्यदेशांत चोहोंकडे पसरला होता. बौद्ध भिक्षु विशेषतः संभाषणाच्या द्वारें धर्मप्रसार करीत असत. आजकालच्या प्रमाणें सभा भरवून तें व्याख्यानें देत नसत. जेथें

१ बुद्ध भगवंताच्या परिनिर्वाणानंतर अशोक राजाच्या कारकीर्दीपर्यंत संघाची संक्षिप्त माहिती वाचकांसमोर ठेवण्याच्या उद्देशाने हा भाग मूळ व्याख्यानास जोडला आहे.

२ पूर्वेस भागलपुर; पश्चिमेस गांधार, उत्तरेस हिमालय आणि दक्षिणेस विंध्यपर्वत, यांच्या मधील प्रदेशास मध्यदेश म्हणत असत.

जेथें धर्मश्रवण करणाऱ्या व्यक्ति– मग ती एक असो किंवा अनेक असोत– त्यांना भेटत, तेथें तेथें ते त्यांना उपदेश करीत. लोकांशीं त्यांची वर्तणूक कशा रीतीची होती, हें पूर्ण भिक्षूच्या पुढील गोष्टीवरून वाचकांच्या चांगलें लक्षांत येण्यासारखें आहे.

**पूर्ण** नांवाचा बुद्धाचा एक शिष्य होता. तो एके दिवशीं बुद्ध भगवंतापाशीं आला, आणि आपणास संक्षेपानें धर्मोपदेश करावा अशी त्यानें त्याला विनंती केली. उपदेश संपल्यावर बुद्ध-भगवान् म्हणाला:– पूर्णा, आतां तूं कोणत्या प्रदेशास जाणार आहेस ?

**पूर्ण**– भगवन्, या आपल्या उपदेशाचें ग्रहण करून मी आतां **सुनापरंत** नांवाच्या प्रदेशास जाणार आहें.

**बुद्ध**– पूर्णा, सुनापरंत प्रांतांतील लोक मोठे कठोर आहेत; मोठे क्रूर आहेत; ते जर तुला शिव्या देतील, तुझी निंदा करितील, तर तुला त्या वेळीं काय वाटेल ?

**पूर्ण**– त्या वेळीं, हे भगवन्, हे लोक फार चांगले आहेत; कारण यांनीं माझ्यावर हातानें प्रहार केले नाहींत, असें मला वाटेल.

**बुद्ध**– आणि जर त्यांनीं तुझ्यावर हातानें प्रहार केला तर ?

**पूर्ण**– मला त्यांनीं दगडांनीं मारलें नाहीं म्हणून ते लोक चांगलेच आहेत असें मी समजेन.

**बुद्ध**– आणि दगडांनीं मारलें तर ?

**पूर्ण**– माझ्यावर त्यांनीं दंडप्रहार केला नाहीं म्हणून ते फार चांगले लोक आहेत असें मी मानीन.

**बुद्ध**– आणि दंडप्रहार केला तर ?

**पूर्ण**– शस्त्रप्रहार केला नाहीं, हा त्यांचा चांगुलपणा आहे असें मी समजेन.

**बुद्ध**– आणि शस्त्रप्रहार केला तर ?

**पूर्ण**– मला ठार मारलें नाहीं, हा त्यांचा चांगुलपणा आहे, असें मी समजेन.

**बुद्ध**– आणि तुला ठार मारलें तर ?

**पूर्ण**– भगवन्, कित्येक भिक्षु या शरीराला कंटाळून आत्मघात करितात, अशा शरीराचा जर सुनापरंतच्या रहिवाशांनीं नाश केला, तर त्यांनीं माझ्यावर उपकार केला असें होईल, आणि म्हणून ते लोक फार चांगलेच, असें मी समजेन.

**बुद्ध**– साधु (शाबास), पूर्णा साधु! अशा प्रकारच्या शमदमानें युक्त होत्साता तूं सुनापरंत प्रदेशांत धर्मोपदेश करण्यास समर्थ होशील.

(**मज्झिमनिकाय.**)

बुद्ध भगवंताच्या परिनिर्वाणसमयीं त्याच्या सारिपुत्तमोग्गल्लानादि प्रमुख शिष्यांपैकीं **महाकाश्यप** हाच काय तो हयात राहिला होता. त्याच्या पूर्वाश्रमांतील चरित्रापासून बराच बोध घेण्यासारखा आहे, म्हणून त्याचें येथें दिग्दर्शन करणें अप्रशस्त होणार नाहीं. याचें पूर्वाश्रमांतील नांव **पिप्फलि.** त्याला गोत्रावरून **काश्यप** असें म्हणत. बुद्धाच्या शिष्यांपैकीं हा एक प्रमुख शिष्य होता, म्हणून त्याला **महाकाश्यप** असें म्हणत. **मगध** देशांतील **महातीर्थ** नांवाच्या ब्राह्मणग्रामांत एका श्रीमंत ब्राह्मण कुलांत त्याचा जन्म झाला. तो वीस वर्षांचा झाल्यावर त्याच्या आईबापांनीं त्याचें लग्न करण्याचा बेत केला. परंतु पिप्फलीच्या मनांतून विवाहपाशांत बद्ध व्हावयाचें नव्हतें. आपल्या आईला त्यानें जेव्हां हा आपला विचार कळविला, तेव्हां तिला अत्यंत खेद झाला. शेवटीं आईच्या आग्रहास्तव तो लग्नाला कबूल झाला.

त्या वेळीं मद्रदेशांत शागल नगरींत एका कौशिकगोत्री श्रीमंत ब्राह्मणाला **भद्रा कापिलानी** नांवाची सोळा वर्षांची सुंदर कन्या होती. पिप्फलीच्या आईबापांनीं तिच्याशीं पिप्फलीचा विवाह करावा, असें ठरविलें. हें वर्तमान पिप्फलीला समजल्याबरोबर त्यानें तिला लिहिलें कीं:– "भद्रे, तूं आपल्या जाति–गोत्र-संपत्ति यांस अनुरूप असा दुसरा कोणी तरी पति वर. मी कधींना कधीं गृहत्याग करून संन्यासी होईन. मागाहून तुझ्यावर पश्चात्ताप करण्याची पाळी येऊं नये, म्हणून हें लिहिलें आहे."

भद्रेच्याहि मनांत भिक्षुणी व्हावयाचें होतें, म्हणून तिनें वरील अर्थाचेंच पत्र पिप्फलीला लिहिलें. हीं दोन्ही पत्रें त्यांच्या आप्तांनीं त्यांनां मिळूं न देतां फाडून टाकिलीं, व दुसरीं बनावट पत्रें करून त्यांनां दिलीं. अर्थात्

लग्नाचा विचार नसतांच त्या दोघांवर लग्न करण्याची पाळी आली. परंतु लग्न झाल्यावरहि या दोघांनीं आपलें ब्रह्मचर्यव्रत कायम ठेवलें होतें. पिप्फलीचे आईबाप निवर्तल्यावर त्यानें गृहत्याग केला व तो बुद्धाचा शिष्य झाला. **भद्रा कापिलानीनें**हि त्याच्या मागोमाग भिक्षुणीसंघांत प्रवेश केला. पुढें अर्हत्पद प्राप्त झाल्यावर भद्रेनें म्हटलें आहे,

**दिस्वा आदीनवं लोके उभो पब्बजिता मयं ।**
**त्यम्हि खीणासवा दन्ता सीतीभूताम्ह निब्बुता ॥**

या प्रपंचांत दोष दिसून आल्यावरून आम्ही उभयतांनीं प्रव्रज्या घेतली. आतां आम्ही दान्त झालों आहों, शांत झालों आहों, आमच्या वासनेचा क्षय झाला आहे, आम्ही निर्वाणपदाला पोंहोंचलों आहों !

**( थेरीगाथा चतुक्कनिपात. )**

बुद्ध भगवंताच्या परिनिर्वाणाच्या ७ व्या दिवशीं **महाकाश्यप** पांचशें भिक्षूंसहवर्तमान पावाहून कुसिनाराला जाण्यास निघाला होता. वाटेंत एका **आजीवक** पंथाच्या परिव्राजकाकडून बुद्धनिधनाची वार्ता त्याला समजली. हें वर्तमान ऐकून ज्यांना अद्यापि अर्हत्पदाचा लाभ झाला नव्हता, ते भिक्षु अत्यंत शोकाकुल झाले. महाकाश्यप त्यांनां ह्मणाला:– "सखे हो, शोक करूं नका. 'सगळ्या प्रिय वस्तूंपासून आह्मांस कधीं ना कधीं पृथक् व्हावें लागणार' असें भगवंतानें सांगितलें नाहीं काय ? जें उत्पन्न झालें, तें नष्ट होणार नाहीं, असें कधींहि घडणार नाहीं "

त्या भिक्षुसंघांत वृद्धपणीं भिक्षु झालेला सुभद्र[२] नांवाचा एक भिक्षु होता, तो म्हणाला:– "सखे हो, शोक करूं नका त्या महाश्रमणाच्या ( बुद्धाच्या ) तडाक्यांतून आम्ही मुक्त झालों आहों. अमुक करावें, आणि अमुक करूं नये, अशा प्रकारें तो आम्हांला उपद्रव करी. परंतु आतां आम्ही आमच्या इच्छेप्रमाणें वागूं." हें त्या भिक्षूचें भाषण ऐकून महाकाश्यप

---

१. ही गोष्ट **बुद्धघोषाचार्यकृत मनोरथपूरणी ( अंगुत्तरनिकायट्ठकथा )** नामक ग्रंथांतून घेतली आहे. त्रिपिटकांत ही सांपडत नाहीं.

२. **बुद्धाचा शेवटचा शिष्य सुभद्र निराळा, आणि हा निराळा.**

भिक्षुसंघास म्हणाला:– "सखे हो, आतां आपण **धर्म**[1] आणि **विनय**[2] यांचा संग्रह करूं. कारण त्यांच्या अभावीं अधर्मवादी ( सुभद्रासारखे ) भिक्षु बलवान् होतील, आणि धर्मवादी भिक्षु दुर्बल होतील."

तेव्हां भिक्षूंनीं **धर्म** व **विनय** यांचा संग्रह करण्याला समर्थ असे भिक्षू निवडण्यास महाकाश्यपास विनंति केली. तिला अनुसरून महाकाश्यपानें ४९९ भिक्षु निवडले. ते सर्व अर्हत्पदाला पावलेले होते. त्या वेळीं आयुष्मान् आनंद अर्हत्पदाला पावला नव्हता. तथापि भिक्षु महाकाश्यपाला ह्मणाले:- "भदन्त हा आयुष्मान् आनंद जरी अर्हत् नाहीं तरी तो छंद, द्वेष, भय आणि मोह, यांच्या योगें कुमार्गानें कधींहि जाणार नाहीं. आणखी यानें भगवंतांपासून धर्मविनयाचें पुष्कळ अध्ययन केलें आहे. ह्मणून आपण यालाहि निवडावें अशी आमची विनंती आहे." महाकाश्यपानें भिक्षूंच्या विनंतीस मान देऊन आनंदालाहि निवडलें. या सर्व निवडक भिक्षूंनीं त्या चातुर्मास्यांत राजगृहांत राहण्याचा बेत केला, व त्याप्रमाणें सर्व राजगृहास गेले. तेथें त्यांनीं धर्मविनयाचा संग्रह केला. ज्या दिवशीं धर्मसंग्रहाला आरंभ झाला त्याच्या पूर्व रात्रींच आनदानें अर्हत्पद मिळविलें. या संघाचा महाकाश्यप अध्यक्ष होता. त्यानें **उपालीस** विनय विचारला, व **आनंदास** धर्म विचारला. त्या दोघांनीं आपल्या स्मरणांतील सर्व गोष्टी सांगितल्या. सर्वांच्या संमतीनें धर्म आणि विनय यांच्या रूपानें त्यांचा संग्रह करण्यांत आला. याप्रमाणें पहिल्या **संगीतीचें** ( परिषदेचें ) काम संपलें.

बुद्धपरिनिर्वाणाला १०० वर्षें झाल्यावर **वैशाली** नगरींतील **वालिकाराम** नांवाचा विहारांत दुसरी संगीति ( परिषद् ) झाली. वैशालींतील वज्जिपुत्तक भिक्षु विनयाविरुद्ध दहा गोष्टी प्रतिपादूं लागले. त्यांतील मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे भिक्षूंनीं सोनें रुपें घेणें योग्य आहे, ही होय. एका उपोसथाच्या दिवशीं त्या भिक्षूंनीं भिक्षुसंघाच्या बसण्याच्या जागीं एक पाण्यानें भरलेली कांशाची थाली ठेवली, आणि उपासकांना संघाला पैशाच्या रूपानें कांहींना कांहीं मदत करण्यास उपदेश केला. तेथें **काकंडकपुत्र यश** नांवाचा भिक्षु होता, त्याला हें त्या भिक्षुंचें कृत्य आवडलें नाहीं. त्यानें तेथल्या

१. धर्म = बुद्धोपदेश. २. विनय = भिक्षुसंघाचे नियम.

तेथेंच या कृत्याचा निषेध केला. परंतु त्याच्या निषेधाकडे लक्ष न देतां उपासकांनीं संघाला बरेच पैसे दिले. दुसऱ्या दिवशीं त्या भिक्षूंनीं त्या पैशांचे वांटे करून यशाचा वांटा यशास दिला. परंतु यशानें तो घेतला नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यानें वैशाली नगरींत जाऊन उपासकगणास एकत्र करून, बुद्धोपदिष्ट धर्माप्रमाणें भिक्षूंनीं पैसा घेणें गैरशिस्त, असें त्यांना समजावून सांगितलें. हें वर्तमान त्या भिक्षूंस समजल्यावर त्यांनीं यशास बहिष्कार घालण्याचा बेत केला. यशास वैशालींत बहुमत मिळण्याचा संभव नव्हता. म्हणून तो एकदम तेथून कौशांबी नगरीस गेला, व तेथून त्यानें **पावा** नगरींतील आणि अवंतीकडील भिक्षूंपाशीं मनुष्य पाठवून त्यांना हें वर्तमान कळविलें.

त्या वेळीं **संभूत** नांवाचा प्रसिद्ध भिक्षु अहोगंग पर्वतावर रहात होता. तेथें यशाच्या आमंत्रणावरून आलेले पावांतील ६० व अवंतीकडील ८८ भिक्षु जमा झाले. त्या सर्वांनीं सोरेय्य प्रदेशांत राहणाऱ्या **रेवत** भिक्षूला आपल्या पक्षाचा पुढारी करण्याचा विचार केला. हें वर्तमान रेवतास समजलें, तेव्हां त्यानें आपलें स्थान सोडून दुसरीकडे प्रयाण केलें; कारण त्याला पुढारीपणा नको होता. त्याच्या मागोमाग ते भिक्षु त्या ठिकाणीं गेले. अशा रीतीनें चार पांच ठिकाणीं फिरून त्यांनीं त्याला गांठलें, व आपला पुढारीपणा त्याला दिला. हें वर्तमान वज्जिपुत्तक भिक्षूंना समजलें. तेव्हां त्यांनीं उत्तर भिक्षूच्या मार्फत रेवताचें मन आपल्या पक्षाकडे वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु तो सिद्धीस गेला नाहीं.

नंतर हे सर्व भिक्षु, जेथें हा वाद उपस्थित झाला तेथेंच तो मिटवावा, या उद्देशानें वैशालीस आले. वैशाली नगरींत **सर्वकामी** नांवाचा एक अतिवृद्ध भिक्षु रहात होता. **आनंदाचा** ( ज्याला महाकाश्यपानें धर्मसंबंधीं प्रश्न विचारले त्याचा ) हा शिष्य. याचीहि वाद मिटविण्याच्या कामीं त्या भिक्षूंनीं मदत घेतली. ते सर्व भिक्षु एकत्र जमले. परंतु एका पक्षानें एक म्हणावें, तर दुसऱ्यानें दुसरें, अशी स्थिती झाली. वाद कांहीं मिटेना. तेव्हां त्यांनीं प्रत्येक पक्षाचे चार चार भिक्षु निवडले, व त्यांनीं बहुमतानें वाद मिटवावा, असें ठरविलें. वज्जिपुत्तकांच्या तर्फे **सर्वकामी, साळ्ह, खुज्जसोभित** आणि **वासभगामिक** या चारांची निवड झाली. पावांतील वगैरे भिक्षूंच्या तर्फे

रेवत, संभूत, यश आणि **सुमन** या चारांची निवड झाली. या आठांनीं **वालिकाराम** विहारांत एकत्र होऊन वादाचा निकाल यशाच्या तर्फे केला. याप्रमाणें दुसऱ्या संगीतीचें काम संपलें.

पहिल्या आणि दुसऱ्या संगीतीची हकीगत त्रिपिटकांतील **चुल्लवग्गांत** आली आहे. तिसऱ्या संगीतीची हकिगत त्रिपिटकांत सांपडत नाहीं. बुद्धघोषाचार्यांच्या **समन्तपासादिका** (विनयट्ठकथा) नामक ग्रंथाच्या आरंभीं ही हकीगत दिली आहे. तिच्या खरेपणाविषयीं पाश्चात्य पंडितांत बराच मतभेद आहे. तथापि अशोक राजा राज्य करीत असतां तिसरी संगीति झाली असावी, यांत शंका नाहीं.

**अशोकानें** दूरदूरच्या प्रदेशांत बौद्ध धर्मोपदेशकांला पाठविलें, याला आधार त्याच्या शिलालेखांतच सांपडतो. शिवाय दुराचारी भिक्षूंना सफेत वस्त्रें देऊन संघांतून घालवून दिलें जाईल, अशा अर्थाचा मजकूर सारनाथ (काशी) येथील शिलास्तंभावरील लेखांत आहे.[1] तेव्हां उपदेशक पाठविण्यासाठीं आणि दुराचारी भिक्षु कोणते हें ठरविण्यासाठीं अशोकानें एखादी परिषद् भरविली असल्यास, त्यांत कांहीं नवल नाहीं. या तिसऱ्या संगीतीचें अध्यक्षस्थान **मोग्गलिपुत्त तिस्स** याजकडे होतें असें **महावंसादि** ग्रंथांत सांगितलें आहे. **कथावत्थु** नांवाचें जें **अभिधर्म**पिटकांत एक प्रकरण आहे, तें यानेंच रचलें असें ह्मणतात. संगीतीचें काम संपल्यावर यानें निरनिराळ्या देशांत भिक्षु पाठविल्याचा उल्लेख **महावंसांत** आहे, तो असाः—

> **थेरो मोग्गलिपुत्तो सो जिनसासनजोतको ।**
> **निट्ठापेत्वान संगीतिं पेक्खमानो अनागतं ॥ १ ॥**
> **सासनस्स पतिट्ठानं पच्चन्तेसु अवेक्खिय ।**
> **पेसेसि कत्तिके मासे ते ते थेरे तहिं तहिं ॥ २ ॥**

बौद्ध धर्माचा प्रसार करणारा तो **मोग्गलिपुत्त (तिस्स)** स्थविरें,[2] संगीतीचें काम संपल्यावर भविष्यत्कालाचा विचार करून आणि मध्यप्रदेशाबाहेर

---

१ मासिक मनोरंजनाच्या सन १९०९ च्या दिवाळीच्या अंकांतील पृष्ठ १३२ वरील "अशोकाच्या शिलालेखांतील वेंचे" हा लेख पहावा.

२ स्थविर म्हणजे वृद्ध. संघांत प्रवेश करून दहा वर्षें झाल्यावर भिक्षूस स्थविर म्हणतात.

बौद्धधर्माची प्रतिष्ठा होणार आहे, हें लक्ष्यांत आणून, कार्तिक मासांत त्या त्या स्थविरांना त्या त्या ठिकाणीं पाठविता झाला.

थेरं कस्मीरगंधारं मज्झन्तिकमपेसयि ।
अपेसेसि महादेवत्थेरं महिसमंडलं ॥ ३ ॥

काश्मीर आणि गांधार ह्या देशांत ( त्यानें ) मज्झन्तिक नांवाच्या स्थविराला पाठविलें. महादेव स्थविराला महिषमंडळाला पाठविलें.

वनवासिं अपेसेसि थेरं रक्खितनामकं ।
तथापरन्तकं योनधम्मरक्खितनामकं ॥ ४ ॥

वनवासीला ( त्यानें ) रक्खित नांवाच्या स्थविरास पाठविलें. त्याचप्रमाणें अपरन्तकाला योनधम्मरक्खित नांवाच्या स्थविरास पाठविलें.

महारट्ठं महाधम्मरक्खितत्थेरनामकं ।
महारक्खितत्थेरं तु योनलोकमपेसयि ॥ ५ ॥

महाराष्ट्रदेशांत ( त्यानें ) महाधम्मरक्खित नांवाच्या स्थविरास पाठविलें, आणि महारक्खित स्थविराला योन (यवन) लोक प्रदेशास पाठविलें.

पेसेसि मज्झिमं थेरं हिमवंतपदेसकं ।
सुवण्णभूमिं थेरे द्वे सोणमुत्तरमेव च ॥ ६ ॥

मज्झिम स्थविराला त्यानें हिमवंत ( हिमालय ) प्रदेशाला पाठविलें. सुवर्णभूमीला ( ब्रह्मदेश ? ) सोण आणि उत्तर या दोन स्थविरांनां पाठविलें.

महामहिन्दथेरं तं थेरं इट्टियमुत्तियं ।
संबलं भद्दसालं च सके सद्धिविहारिके ॥ ७ ॥
लंकादीपे मनुञ्ञम्हि मनुञ्ञं जिनसासनं ।
पतिट्ठपेथ तुम्हेति पंच थेरे अपेसयि ॥ ८ ॥

( त्याने ) महामहिन्द[१], इट्टिय, उत्तिय, संबल आणि भद्दसाल या पांच आपल्या स्थविर शिष्यांनां 'तुम्ही सुंदर लंकाद्वीपामध्यें मनोरम बुद्धधर्माची स्थापना करा' असें सांगून ( त्या द्वीपाला ) पाठविलें.

---

१ महामहिन्द हा अशोक राजाचा पुत्र होता; तो व त्याची बहिण संघमित्रा यांनीं संघांत प्रवेश करून सिलोनांत बौद्धधर्माची स्थापना केली.

सुवर्णभूमि ब्रह्मदेशासच म्हणत असत किंवा नाहीं याबद्दल शंका आहे. अपरन्त वगैरे प्रदेश कोठें होते याचाहि अद्यापि नीट शोध लागला नाहीं. वर सांगितलेल्या स्थानांपैकीं लंकाद्वीप आणि हिमालय या दोन प्रदेशांत बौद्धधर्म आजला अस्तित्वांत आहे. परंतु नेपाळ, तिबेट इत्यादि देशांत अशोकाच्या वेळेपासून बौद्धधर्माची परंपरा कायम राहिली नाहीं. मध्यंतरीं बौद्ध धर्माचा या देशांत लोप झाला, व कांहीं कालानें पुनः महायान[1] पंथाचा प्रसार झाला. सांप्रत लंका (सिंहल), ब्रह्मदेश, सयाम व कांबोडिया या दक्षिणेकडील देशांतूनच अशोककालची परंपरा कायम राहिली आहे. एक तर या देशांतील सर्व धर्मग्रंथ पालिभाषेंत आहेत, व **वज्रपाणि[2] तारा** इ० देवतांचा समावेश या पंथांत झालेला नाहीं. तेव्हां आजकाल ज्याला प्राचीन बौद्ध धर्माची किंवा संघाची माहिती करून घ्यावयाची असेल त्यानें पालिभाषेंतील बौद्ध धर्मग्रंथांचें ज्ञान संपादावें, हें उत्तम.

---

१ उत्तरेकडील बौद्ध महायान पंथाचे आहेत. महायानाचा उदय इ० स० २ ऱ्या शतकांत झाला असावा.

२ वज्रपाणि, तारा, अविलोकितेश्वर इत्यादि देवतांचें महायानपंथामध्यें फारच प्रस्थ माजलें आहे. महायानाचे सगळे ग्रंथ संस्कृत भाषेंत लिहिले आहेत. कांहीं ग्रंथांची संस्कृत भाषाहि शुद्ध नाहीं.

# परिशिष्टें

## १.

## सिगालसुत्ताचें[1] मराठी रूपांतर

भगवान् बुद्ध राज्यगृहनगरांत वेणुवनांत रहात असतां सिगाल नांवाचा एक गृहस्थाचा मुलगा सकाळीं लवकर उठून स्नान करून ओल्यानेंच पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, वरची व खालची या सहा दिशांची पूजा करीत असे. दिवशीं त्या वेणुवनांतून राजगृहनगरांत भगवान् बुद्ध भिक्षेस जात असतां त्यानें सिगालाला पाहून प्रश्न केला, "हे गृहपतिपुत्र ! ओल्या वस्त्रांनीं व ओल्या केसांनीं तूं जो सहा दिशांना नमस्कार करतोस हें काय ?"

त्यावर सिगाल म्हणाला "भगवान् ! माझ्या बापानें अंतकाळीं 'बाळ, दिशांची पूजा करीत जा' असें सांगितलें आहे. त्याप्रमाणें त्याच्या वचनाला मान देऊन हा नमस्कारविधि मीं चालविला आहे."

तें ऐकून बुद्ध म्हणाला, "गृहपतिपुत्र ! आर्यधर्माप्रमाणें सहा दिशांचा नमस्कारविधि फार निराळा आहे."

यावर सिगालानें आर्यधर्मांत कोणता नमस्कारविधि सांगितला आहे हें सांगण्याची विनंती केल्यावर बुद्धानें त्याला पुढील उपदेश केला:-

"ज्याला सहा दिशांची पूजा करावयाची असेल त्यानें चार कर्म-क्लेशांचा त्याग केला पाहिजे. चार कारणांस्तव त्यानें पापकर्म करतां नये; आणि सहा संपत्तिनाशाच्या द्वारांचें त्यानें सेवन करतां नये. या चौदा गोष्टींचा त्याग करून जे सहा दिशांची पूजा करितात त्यांनांच इहपरलोक मिळतात.

---

१ 'दीघनिकाय' या पालिग्रंथांत जीं ३४ सूत्रें आहेत त्यांपैकीं सिगालसुत्त हें एक आहे.

"'प्राण्याचा वध, अदत्तादान (चोरी), परदारगमन (व्यभिचार), व असत्य भाषण या चार कर्मक्लेशांचा त्यानें त्याग केला पाहिजे.

"मला हें बरें वाटतें, असा भलताच छंद धरून त्यानें पापकर्म करतां नये; दुसऱ्याच्या द्वेषानें पापकर्म करतां नये; अज्ञानामुळें पापकर्म करतां नये; आणि दुसऱ्याच्या भयानें पापकर्म करतां नये. या चार कारणांस्तव त्यानें पापकर्म करतां नये.

**छंदा दोसा भया मोहा, यो धम्मं अतिवत्तति ।**
**निहीयति यसो तस्स काळपक्खेव चन्दिमा ॥**

छंदामुळें, द्वेषामुळें, मोहामुळें किंवा भयामुळें जो धर्माचें अतिक्रमण करतो, त्याचें यश कृष्णपक्षांतील चंद्राप्रमाणें नाश पावतें. परंतु

**छंदा दोसा भया मोहा, यो धम्मं नातिवत्तति ।**
**आपूरति यसो तस्स जुण्हपक्खेव चन्दिमा ॥**

जो छंद, द्वेष, मोह किंवा भय यामुळें धर्माचें अतिक्रमण करीत नाहीं त्याचें यश शुक्लपक्षांतील चन्द्राप्रमाणें वाढत जातें.

"आतां संपत्तिनाशाचीं सहा द्वारें कोणतीं तें सांगतों. (१) सुरादि मादक पदार्थांचें सेवन; (२) अवेळीं बाहेर भटकणें; (३) नाटक तमाशे पाहाण्याचें व्यसन; (४) जुगार खेळणें; (५) पापमित्रांचीं संगति, आणि (६) आळस. या सहा संपत्तिनाशाच्या द्वारांचें त्यानें सेवन करतां कामा नये.

"हे गृहपतिपुत्र! धनाचा नाश करणारी, कलह वाढविणारी, रोगाचें माहेरघर, अकीर्तीची आई, लज्जेचा विध्वंस करणारी आणि प्रज्ञेला दुर्बळ करणारी अशी ही सुरा आहे. या वारुणीच्या नादाला जो लागला तो लवकरच आपला नाश करून घेतो.

"अवेळीं बाहेर हिंडण्याची ज्याला संवय लागली त्याच्या हातानें स्वतःचें संरक्षण होत नाहीं; मुलांबाळांचेंहि संरक्षण होत नाहीं; संपत्तीचें रक्षण त्याजकडून होत नाहीं. तो रात्रंदिवस साशंक असतो; खोटें बोलण्याची त्याला संवय लागते, पुष्कळशीं संकटें तो आपल्यावर ओढून घेतो.

" नाटकतमाशांचें ज्याला व्यसन लागलें तो आज कोठें नाच, कोठें गायन, कोठें तमाशा आहे त्याच्या चौकशीला लागतो, आणि गृहकृत्यें करण्याला त्याला मुळींच सवड मिळत नाहीं.

" जुगाऱ्याला जुगारांत जर पैसा मिळाला तर त्या पैशाबरोबरच तो दुसऱ्याचें वैर संपादन करतो. त्यांत पैसा घालविला तर त्याचा तो शोक करीत बसतो. जुगाऱ्याच्या वचनावर कोणी विश्वास ठेवीत नाहीं. आप्तइष्ट त्याचा तिरस्कार करतात. जुगारी तरुणास ' हा काय जुगारडा बायकोला पोसणार ? ' असें म्हणून कोणी मुलगी देत नाहीं.

" पापमित्राची ज्याला संगत घडली त्याला जुगारी, मद्यपि, चोर, ठक या सर्वांची क्रमाक्रमानें संगत घडते आणि अशा प्रकारचे मित्र त्याच्या नाशास कारण होतात.

" आळशी मनुष्य ' आज फार थंडी आहे ' म्हणून काम करीत नाहीं; ' आज फार ऊन पडलें आहे ' म्हणून काम करीत नाहीं; ' आज सांज फार झाली आहे ' म्हणून काम करीत नाहीं; ' आज भूक लागली आहे ' म्हणून काम करीत नाहीं; ' आज फार थकवा आला आहे ' म्हणून काम करीत नाहीं. अशा प्रकारें आळस केल्यामुळें त्याला नवीन तर कांहीं प्राप्ति होत नाहींच, पण मिळालेलें धन मात्र नाश पावतें.

**अतिसीतं अतिउण्हं अतिसायमिदं अहु ।**
**इति विस्सट्ठकम्मंते अत्था अच्चेन्ति माणवे ॥**

फार थंडी, फार उन्हाळा, फार सांज झाली म्हणून जे तरुण काम करणें सोडून देतात त्यांना संपत्तिहि सोडून जातात. परंतु,

**योध सीतं च उण्हं च तिणा भीयो न मञ्ञति ।**
**करं पुरिसकिच्चानि सो सुखा न विहायति ॥**

जो थंडीची आणि उन्हाळ्याची गवतापेक्षां जास्त किंमत समजत नाहीं आणि उद्योग करीत राहतो तो सुखापासून दूर होत नाहीं.

" हे गृहपतिपुत्र ! ( १ ) घरीं आल्यावर कांहींना कांहीं घेऊन जाणारा, ( २ ) शब्दांनींच उपकार करूं पहाणारा, ( ३ ) हांजी हांजी करणारा व ( ४ ) पापकर्मांत साहाय्य करणारा, हे चार आपले हितशत्रु

आहेत असें समजावें व त्यांचा बिकट मार्गाप्रमाणें दुरूनच त्याग करावा. ( १ ) उपकार करणारा, ( २ ) दुःखानें दुःखी व सुखानें सुखी होणारा, ( ३ ) सदुपदेश करणारा, व ( ४ ) अनुकंपा करणारा, असे हे चार आपले खरे मित्र असें समजावें, व आई जशी आपल्या मुलाची जोपासना करते तशी या मित्रांची जोपासना करावी.

हे गृहपतिपुत्र ! हें पूर्वकृत्य झाल्यावर तरुण गृहस्थानें सहा दिशांच्या पूजेस लागावें. त्या सहा दिशा कोणत्या तें सांगतों. आईबापांनां पूर्वदिशा समजावें; गुरूला दक्षिणदिशा समजावें; पत्नीला पश्चिमदिशा समजावें; आप्तमित्रांस उत्तरदिशा समजावें; सेवकांनां खालची दिशा समजावें, आणि श्रमण ब्राह्मणांला म्हणजे साधुसंतांनां वरची दिशा समजावें.

" पूर्वदिशा जे आईबाप त्यांची पांच गोष्टींनीं पूजा करावी:–
( १ ) त्यांचें काम करावें; ( २ ) त्यांचें पोषण करावें; ( ३ ) कुलांत चालत आलेलीं सत्कार्यें चालू ठेवावीं; ( ४ ) त्यांच्या वचनांत वागून त्यांच्या संपत्तीचे वांटेकरी व्हावें, आणि ( ५ ) जर त्यांपैकीं कोणी जिवंत नसेल तर त्यांच्या नांवें दानधर्म करावा. या पांच गोष्टींनीं जर आईबापांची पूजा केली तर ते पांच प्रकारांनीं मुलांवर अनुग्रह करितातः– ( १ ) पापापासून निवारण करितात; ( २ ) कल्याणकारक मार्गास लावितात; ( ३ ) कला-कौशल्य शिकवितात; ( ४ ) योग्य स्त्रीशीं लग्न करून देतात, व ( ५ ) योग्य वेळीं आपली मिळकत स्वाधीन करितात. याप्रमाणें केलेली पूर्वदिशेची पूजा कल्याणकारक होते.

" दक्षिण दिशा जे गुरू त्यांची शिष्यानें पांच गोष्टीनीं पूजा करावी:–
( १ ) गुरु जवळ आले तर उठून उभें राहावें; ( २ ) ते आजारी असले तर त्यांची सेवा करावी; ( ३ ) श्रद्धापूर्वक ते शिकवितील तें समजावून घ्यावें; ( ४ ) त्यांचें कांहीं काम पडल्यास तें करावें; आणि ( ५ ) ते शिकवितील तें उत्तम रीतीनें शिकावें. या पांच गोष्टींनीं जर शिष्यानें गुरूंची पूजा केली, तर ते पांच प्रकारांनीं शिष्यावर अनुग्रह करितातः– ( १ ) चांगला आचार शिकवितात; ( २ ) चांगल्या रीतीनें कलाकौशल्य शिकवितात; ( ३ ) जें कांहीं त्यांनां येत असेल तेवढें सारें ते शिष्याला शिकवितात;

( ४ ) आपल्या आप्तमित्रांत त्याची स्तुति करितात; आणि ( ५ ) त्याला कोठें गेला तरी पोटापाण्याची अडचण पडूं नये अशी विद्या शिकवितात. याप्रमाणें पांच गोष्टींनीं शिष्यानें केलेली गुरूंची पूजा पांच प्रकारांनीं फलप्रद होते.

" हे गृहपतिपुत्र ! पांच गोष्टींनीं पतीनें पश्चिम दिशा जी पत्नी तिची पूजा करावी:– ( १ ) तिला मान द्यावा; ( २ ) कोणत्याहि तऱ्हेनें तिचा अपमान होऊं देऊं नये; ( ३ ) अन्य स्त्रीशीं संबंध ठेवूं नये (एकपत्नीव्रत आचरावें ); ( ४ ) घरचा कारभार तिच्यावर सोंपवावा; आणि ( ५ ) तिला वस्त्राच्छादनाची कमतरता पडूं देऊं नये. या पांच गोष्टींनीं जर पतीनें पत्नीची पूजा केली तर ती पतीस पांच प्रकारांनीं उपकारक होते:– (१) घरांत चांगली व्यवस्था ठेवते; (२) नोकरचाकरांला प्रेमानें संभाळते; ( ३ ) पतिव्रता होते; ( ४ ) पतीनें मिळविलेल्या संपत्तीचें रक्षण करिते ( उधळेपणा करीत नाहीं ); आणि ( ५ ) सगळ्या गृहकृत्यांत उद्योगी आणि दक्ष होते. याप्रमाणें जर पतीनें पश्चिमदिशा जी भार्या तिची पूजा केली तर ती त्याला सुखावह होते.

" हे गृहपतिपुत्र ! पांच गोष्टींनीं गृहस्थानें उत्तर दिशा जे आप्तमित्र त्यांची पूजा करावी:– ( १ ) त्यांनां देण्यासारख्या असतील त्या वस्तु द्याव्या; ( २ ) ते घरीं आले तर त्यांच्याशीं प्रियभाषण करावें; ( ३ ) त्यांचें काम पडल्यास तें करावें; ( ४ ) आपणासारखेंच त्यांनां लेखावें ( म्हणजे लग्नकार्यांत व इतर ठिकाणीं ते आपणापेक्षां मानानें कमी आहेत असें समजून त्यांचा अपमान करूं नये ); आणि ( ५ ) त्यांच्याशीं निष्कपट वर्तन ठेवावें. या पांच गोष्टींनीं जर गृहस्थानें उत्तर दिशा जे आप्तमित्र त्यांची पूजा केली तर ते त्या गृहस्थास पांच प्रकारांनीं उपकारक होतात:– ( १ ) हा बेसावध असतां एकाएकीं याच्यावर कांहीं संकट आलें तर त्या वेळीं त्याचें ते रक्षण करितात; ( २ ) अशा प्रसंगीं त्याच्या संपत्तीचेंहि ते रक्षण करितात; ( ३ ) संकटामुळें हा घाबरून जातो तेव्हां ते त्याला धीर देतात; ( ४ ) विपत्ति आली तरी ते त्याला सोडीत नाहींत; आणि ( ५ ) त्याच्या संततीवरसुद्धां ते उपकार करितात. या प्रकारें उत्तरदिशा त्या गृहस्थाला कल्याणकारक होते.

"हे गृहपतिपुत्र ! पांच गोष्टींनीं धन्यानें खालची दिशा जे सेवक त्यांची पूजा करावी:- ( १ ) त्यांच सामर्थ्य पाहून त्यांनां काम सांगावें; ( २ ) त्यांनां योग्य वेतन द्यावें; ( ३ ) आजारी पडले तर त्यांची शुश्रूषा करावी; ( ४ ) वारंवार त्यांना उत्तम भोजन द्यावें आणि ( ५ ) उत्तम कामाकरितां त्यांना बक्षिस द्यावें. या पांच गोष्टींनीं खालची दिशा जे सेवक त्यांची जर धन्यानें पूजा केली, तर ते पांच प्रकारांनीं त्याला उपकारक होतात:- ( १ ) धनी उठण्यापूर्वी ते उठतात; ( २ ) धनी निजल्यावर निजतात; ( ३ ) धन्याच्या मालाची चोरी करीत नाहींत; ( ४ ) उत्तम तऱ्हेनें काम करतात; आणि ( ५ ) सर्वत्र धन्याची कीर्ति पसरवितात. याप्रमाणें केलेली खालच्या दिशेची पूजा सुखावह होते.

"हे गृहपतिपुत्र ! पांच गोष्टींनीं गृहस्थानें वरची दिशा जे साधुसंत त्यांची पूजा करावी:- ( १ ) देहानें त्यांचा आदर करावा; ( २ ) वाचेनें आदर करावा; ( ३ ) मनानें आदर करावा; ( ४ ) त्यांना कांहीं लागल्यास द्यावें; आणि ( ५ ) भिक्षेला आले तर त्यांना आडकाठी आणूं नये. या पांच गोष्टींनीं जर वरची दिशा जे साधुसंत त्यांची गृहस्थानें पूजा केली तर ते त्याला पांच प्रकारांनीं उपकारक होतात:- ( १ ) पापापासून त्याचें निवारण करितात; ( २ ) कल्याणकारक मार्गाला लावतात; ( ३ ) प्रेमपुरस्सर अनुग्रह करितात; ( ४ ) उत्तम धर्म शिकवितात; आणि ( ५ ) शंका निवारण करून मनाचें समाधान करितात. याप्रमाणें केलेली वरच्या दिशेची पूजा गृहस्थास हितावह होते.

"हे गृहपतिपुत्र ! दान, प्रियवचन, अर्थचर्या म्हणजे उपयोगी पडणें, आणि समानात्मता ( दुसऱ्याला आपणासारखें लेखणें ) अशीं हीं चार लोकसंग्रहाचीं साधनें आहेत. हीं साधनें जर आईबापांपाशीं नसतीं तर केवळ जन्म दिलें म्हणून मुलानें आईचा किंवा बापाचा गौरव केला नसता. ज्याला हीं चार साधनें सांपडलीं तोच प्रपंचांत यशस्वी होतो."

हा बुद्धाचा उपदेश ऐकून सिगाल संतुष्ट झाला, आणि तेव्हांपासून तो बुद्धाचा उपासक बनला.

---

१ सिगालसुत्ताचें हें रूपांतर मासिक मनोरंजनाच्या एप्रिल १९०९ च्या अंकांत छापलें होतें. तें संपादकांच्या परवानगीनें येथें घेतलें आहे.

## २.

# पंचस्कंध, अर्हत्पद व निर्वाण

पंचस्कंध:- रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान या पांच पदार्थांना पंचस्कंध असें म्हणतात.

पृथ्वी, आप, तेज, आणि वायु या चार महाभूतांना आणि त्यांजपासून उत्पन्न झालेल्या पदार्थांना रूपस्कंध असें म्हणतात.

सुखकारक वेदना, दुःखकारक वेदना, आणि उपेक्षा वेदना या तीन प्रकारच्या वेदनांला वेदनास्कंध म्हणतात.

घर, झाड, गांव, स्त्री, पुरुष इत्यादिविषयक कल्पनांना संज्ञास्कंध म्हणतात. घर, झाड इत्यादि पदार्थ परमार्थतः वर सांगितलेल्या चार महाभूतांचेच बनलेले आहेत; म्हणून ते परस्परांपासून भिन्न नाहींत असें असतां संज्ञास्कंधाच्या योगें त्यांचा निराळेपणा आमच्या लक्ष्यांत येतो. ही जी पदार्थांना निरनिराळीं नांवें देण्याची मनाची शक्ति, तिलाच संज्ञास्कंध म्हणतात.

संस्कार म्हणजे मानसिक संस्कार. यांचे कुशल, अकुशल आणि अव्याकृत असे तीन प्रकार आहेत. दुसऱ्यास मदत करण्याची इच्छा, प्रेम, जागृति इत्यादि संस्कार कुशल जाणावे. लोभ, द्वेष, माया, मत्सर, आळस इत्यादि संस्कार अकुशल जाणावे. अकुशलहि नव्हेत आणि कुशलहि नव्हेत अशा संस्कारांना अव्याकृत म्हणतात. उदाहरणार्थ, कांहीं पदार्थांची आवड असणें, कांहींची नावड असणें इत्यादि संस्कार पूर्वकर्मांचे फलभूत असल्यामुळें अकुशल किंवा कुशल यांत त्यांची गणना होत नाहीं. त्यांना अव्याकृत असेंच म्हटलें पाहिजे.

विज्ञान म्हणजे जाणणें. संक्षेपानें सांगावयाचें म्हटलें म्हणजे विज्ञानें सहा आहेत. चक्षुर्विज्ञान, श्रोत्रविज्ञान, घ्राणविज्ञान, जिव्हाविज्ञान, कायविज्ञान व मनोविज्ञान. या सहा विज्ञानांच्या समुदायाला विज्ञानस्कंध असें म्हणतात. विज्ञानाला बौद्ध ग्रंथांत चित्त म्हणतात. चित्ताला कधीं कधीं मन हा शब्द लावितात. बौद्धाच्या मतें मन हें अमूर्त आहे. तें अणु प्रमाण

नाहीं. म्हणून तर्कसंग्रहादि न्यायग्रंथांत सांगितलेलें मन व बौद्ध ग्रंथांत सांगितलेलें मन हीं एक नव्हेत हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे.

हे पांच स्कंध वासनायुक्त असले म्हणजे त्यांनां **उपादानस्कंध** असें म्हणतात. यांच्या योगें पुनर्जन्म होतो. या जन्मीं कुशलाकुशल कर्म केलें म्हणजे त्याच्या जोरावर दुसऱ्या जन्मीं या पांच उपादानस्कंधांचा प्रादुर्भाव होतो. जेव्हां वासनेचा समूळ उच्छेद होतो, तेव्हां या स्कंधांनां उपादान-स्कंध न म्हणतां नुसते स्कंध म्हणतात. कारण त्यांच्या योगें पुनर्जन्म होण्याचा संभव नसतो. **अर्हत्पद** प्राप्त झाल्यावर वासनेचा समूळ उच्छेद होतो. अर्हत्पदाप्रत पावलेल्या व्यक्तींचे पंचस्कंध त्यांच्या मरणापर्यंत राहतात. अकुशल संस्कार मात्र अर्हत्पद मिळाल्याबरोबर सर्वथैव नष्ट होतात. मरण-समयीं अर्हतांच्या पंचस्कंधांचा निर्वाणांत लय होतो. अर्थात् त्यांजपासून नूतन पंचस्कंध उदय पावत नाहींत.

अर्हत्पद :— १ **सक्कायदिट्ठि** ( आत्मा हा भिन्न पदार्थ असून तो नित्य आहे अशी दृष्टि ), २ **विचिकिच्छा** ( बुद्ध, धर्म आणि संघ यांज-विषयीं शंका किंवा अविश्वास ), ३ **सीलब्बतपरामास** ( स्नानादिव्रतांनींच मुक्ति मिळेल असा विश्वास ), ४ **कामराग** ( कामवासना ), ५ **पटिघ** (क्रोध), ६ **रूपराग** (ब्रह्मलोकादि प्राप्तीची इच्छा ), ७ **अरूपराग** ( अरूप-देवलोकप्राप्तीची इच्छा ). ८ **मान** ( अहंकार ), ९ **उद्धच्चं** ( भ्रांतचित्तता ) आणि १० **अविज्जा** ( अविद्या ) या दहा पदार्थांनां **संयोजनें** ( बंधनें ) म्हणतात. आर्य अष्टांगिक मार्गाच्या अभ्यासानें या दहा संयोजनांचा नाश झाला म्हणजे अर्हत्पद प्राप्त होतें. अर्हत्पद प्राप्त झाले म्हणजे निर्वाणाचा पूर्णपणें साक्षात्कार होतो.

**सोतापन्न, सकदागामी, अनागामी** आणि **अरहा असे** निर्वाणमार्गांत समाविष्ट झालेल्या व्यक्तीचे चार भेद आहेत. पहिल्या तीन संयोजनांचा क्षय झाला म्हणजे मनुष्य सोतापन्न ( स्रोतआपन्न ) होतो. सोतापन्न असतांना जर त्याला मृत्यु आला, तर तो देवलोकीं आणि मनुष्यलोकीं फार झालें तर सात खेपा जन्म घेतो. सातव्या जन्मीं त्याला मोक्ष मिळालाच पाहिजे. पहिल्या तीन संयोजनांचा नाश करून काम, राग, द्वेष आणि मोह हे दुर्बळ झाले म्हणजे मनुष्य सकदागामी ( सकृदागामी ) होतो. अशा स्थितींत त्याचा

अंत झाला तर तो एक वेळच इहलोकीं जन्म घेतो व मोक्ष मिळवितो. पहिल्या पांच संयोजनांचा नाश झाला म्हणजे मनुष्य अनागामी होतो. अनागामीला मरण आलें असतां तो इहलोकीं जन्म घेत नाहीं. ब्रह्मलोकांत त्याचा जन्म होतो व तो तेथूनच मोक्ष मिळवितो. सर्व संयोजनांच्या नाशानें मनुष्य अरहा ( अर्हत् ) होतो. अरहाला पुनर्जन्म नाहीं. जीवन्मुक्त म्हणतात तो तोच. बुद्ध आणि अरहा यांमध्यें थोडासा फरक आहे. बुद्धाला निर्वाणाचा साक्षात्कार स्वप्रयत्नानें होतो; परंतु अर्हताला तो दुसऱ्याचा उपदेश श्रवण करून होतो. एवढाच काय तो फरक. बाकी दोघांनांहि निर्वाणाचा साक्षात्कार याच जन्मीं घडतो.

**निर्वाण:—** निर्वाणासंबंधानें पाश्चात्य पंडितांचे अनेक तर्क आहेत. कोणी म्हणतो निर्वाण म्हणजे अभावमात्र ( Annihilation ), दुसरें कांहीं नाहीं. दुसरा कोणी म्हणतो हें कांहीं ठीक नाहीं. बौद्धांची एवढी मोठी संख्या आहे; ते सारे अभावालाच भजतील हें संभवनीय नाहीं. बुद्ध भगवान् अक्रियावादी ( Annihilationist ) आहे असा आरोप त्याचे विरोधी त्याजवर त्याच्या हयातींतच आणीत असत. यासंबंधीं एकदां वज्जींचा सेनापति सिंह यानें त्यास प्रश्न विचारला असतां तो म्हणाला:— सिंहा, हा आरोप एका अर्थी खरा आहे. सर्व पापविचारांची ( अकुशल संस्कारांची ) अक्रिया मला पसंत आहे. त्यांची अक्रिया करण्याविषयीं मी उपदेश करितों. म्हणून मला अक्रियावादी म्हटलें असतां चालेल. उलटपक्षीं मी क्रियावादी ( Realist ) आहें असेंहि कोणी म्हणूं शकेल. कारण पुण्यविचारांची ( कुशल संस्कारांची ) क्रिया मला पसंत आहे. त्यांची क्रिया करावी, त्यांनां पूर्णत्वाला न्यावें, असा मी उपदेश करितों; म्हणून मला क्रियावादी म्हटलें तरी हरकत नाहीं.[1]" या संवादावरून बुद्धानें अभावमात्र प्राप्त करून घेण्याचा उपदेश केला नाहीं, हें स्पष्ट होत आहे.

**जम्बुखादक** नांवाच्या परिव्राजकानें **सारिपुत्राला**, निर्वाण हें काय आहे, असा प्रश्न केला, तेव्हां सारिपुत्र त्याला म्हणाला:— **यो खो आवुसो रागक्खयो दोसक्खयो मोहक्खयो इदं वुच्चति निब्बाणं.** लोभ, द्वेष आणि मोह यांचा जो क्षय त्याला निर्वाण म्हणतात.[2]

१. हा संवाद महावग्गांत आणि अंगुत्तर निकायांत आहे.
२. जम्बुखादक संयुत्त, संयुत्तनिकाय.

याचा अर्थ असा, कीं लोभ, द्वेष आणि मोह हे तीन मनाचे अकुशल धर्म (संस्कार) नष्ट झाले म्हणजे निर्वाणाचा साक्षात्कार होतो. लांकडाचा गाभा कोणता? असा जर प्रश्न केला तर त्याला 'वरची साल काढा, नंतर, मऊ भाग तासून टाका; म्हणजे जो बाकी राहील तोच गाभा, हेंच उत्तर देणें योग्य होईल. सारिपुत्तानें जम्बुखादकाला अशाच प्रकारचें उत्तर दिलें आहे. अनेक नांवांनीं निर्वाणाचा उल्लेख केला आहे. परंतु त्याचें विस्तृत वर्णन कोठेंच आढळत नाहीं. जसें एखाद्या गांवाचें वर्णन देतां येईल. तसें तें निर्वाणाचें देतां येणें शक्य नाहीं. ज्यांच्या अंतःकरणांतून लोभ, द्वेष, मोह समूळ नष्ट झाले, म्हणजे ज्यांच्या वासनेचा क्षय झाला, अशा महर्षीलाच निर्वाणाचा साक्षात्कार होतो. तें काय आहे हें तेच जाणं शकतात.

**पदमच्चुतमच्चन्तं असंखतमनुत्तरं ।**
**निब्बानमिति भासन्ति वानमुत्ता महेसयो ॥**

ज्यांच्या वासनेचा क्षय झाला आहे असे महर्षि निर्वाण हें अच्युतपद आहे, त्याला अंत नाहीं, तें अत्यंत परिशुद्ध (असंस्कृत) आहे आणि तें लोकोत्तर आहे, असें म्हणतात. (**अभिधम्मत्थसंगह.**)

अर्हत्पद प्राप्त झाल्याबरोबर निर्वाणाचा साक्षात्कार होतो. तथापि सर्व दुःखांचा निःशेषतः नाश होत नाहीं. लोभद्वेषमोहजन्य मानसिक पीडा तेव्हांच नाहींशी होते; परंतु शारीरिक दुःख आयुष्य संपेपर्यंत रहातें. बुद्धाला छत्तिसाव्या वर्षींच निर्वाणपदाचा साक्षात्कार झाला होता. त्या वेळीं त्याचें लोभद्वेषादिजन्य मानसिक दुःख नष्ट झाले. परंतु शीतोष्णरोगादिजन्य शारीरिक दुःख पूर्णपणें नष्ट झालें नाहीं. देहावसानीं तेंहि दुःख नष्ट झालें. अर्हतांच्या मरणाला **परिनिर्वाण** म्हणतात. कारण मरणानें त्यांच्या शारीरिक दुःखाचाहि अंत होतो. परिनिर्वाणानंतर अर्हत् कोणत्या स्थितींत असतो याचें वर्णन कोठें आढळत नाहीं. ती स्थिति अनिर्वचनीयच आहे. बुद्ध भगवंताच्या परिनिर्वाणाला **महापरिनिर्वाण** म्हणतात.

## ३.

# चार आर्य सत्यें आणि आर्य अष्टांगिक मार्ग

चतुन्नं अरियसच्चानं यथाभूतं अदस्सना ।
संसरितं दीघमद्धानं तासु तास्वेव जातिसु ॥
तानि एतानि दिट्ठानि भवनेत्ति समूहता ।
उच्छिन्नमूलं दुक्खस्स नत्थि दानि पुनब्भवो ॥

चार आर्य सत्यांचें यथाभूत ज्ञान न झाल्यामुळें दीर्घ काळपर्यंत त्या त्या योनींत जन्मलों. परंतु आतां या सत्यांचें ज्ञान झालें; व त्यामुळें तृष्णेचा नाश झाला. दुःखाचें मूळ समूळ नष्ट झालें. आतां आणखी पुनर्जन्म राहिला नाहीं. ( **महापरिनिब्बाणसुत्त** ).

त्रिपिटकांत चार आर्य सत्यांचा उल्लेख अनेक ठिकाणीं आलेला आहे. हीं चार आर्य सत्यें बौद्धधर्माचा पाया आहेत असें म्हटलें असतां चालेल. बुद्ध भगवंतानें प्रथमतः वाराणसींत पंचवर्गीय भिक्षूंनां या चार आर्य सत्यांचाच उपदेश केला. हा उपदेश पहिल्या व्याख्यानाच्या शेवटीं मीं दिलाच आहे. या उपदेशाची अनेक सुत्तांतून विस्तृत व्याख्या केली आहे. अट्ठकथाकारांनींहि यावर विस्तारानें टीका लिहिली आहे. पहिल्या व्याख्यानांतील चार आर्य सत्यांचें वर्णन धम्मचक्कपवत्तनसुत्तास अनुसरून केल्यामुळें अति संक्षिप्त झालें आहे. या आर्य सत्यांचा आमच्या वाचकवर्गास विशेष बोध व्हावा म्हणून त्या अति संक्षिप्त वर्णनाचा इतर सुत्तांतील वर्णनाच्या आधारें थोडा विस्तार करीत आहें.

दुःख—दुःख हें पहिलें आर्य सत्य. या जगांत दुःख आहे हें मनुष्यानें प्रथमतः जाणलें पाहिजे. ज्याला दुःख काय आहे हें ठाऊक नाहीं, त्याची बुद्धि धर्माकडे वळणें कठीण. या प्रपंचांत दुःख आहे, असें वाटल्यावरूनच सर्व पंथांच्या लोकांनां परमार्थाविषयीं प्रयत्न करण्याची बुद्धि होते. दुःख कोणतें ? जन्म दुःखकारक म्हणजे मूल जन्मतांच दुःख बरोबर घेऊन येतें. म्हातारपणहि दुःखकारक; मरतेवेळींहि प्राण्याला दुःख होतें. या आयुष्यामध्यें शोकाचे अनेक प्रसंग येतात, तेहि दुःखकारक; अप्रिय पदार्थांशीं किंवा प्राण्यांशीं संबंध आला म्हणजे तोहि दुःखकारक; प्रियपदार्थांचा किंवा

प्राण्यांचा वियोग झाला, तरी तो दुःखकारक होतो. एखाद्या वस्तूची इच्छा करून ती न मिळाली म्हणजे त्यापासूनहि दुःख होतें. संक्षेपानें सांगावयाचें म्हटलें म्हणजे पांच उपादानस्कंध ( वासनायुक्त स्कंध ) हे दुःखकारक आहेत. याप्रमाणें धार्मिक मनुष्यानें दुःखसत्याचें ज्ञान संपादिलें पाहिजे.

**दुःखसमुदय**– या सगळ्या दुःखाचें कारण काय ? कोणी म्हणतात, दुःख हा आत्म्याचा धर्म आहे; कोणी म्हणतात, दुःख जगताच्या कर्त्यानें किंवा आपणांहून भिन्न अशा कोणत्या तरी व्यक्तीनें उत्पन्न केलें असावें; परंतु बुद्ध भगवान् म्हणतो, दुःख हा आत्म्याचा धर्म नव्हे किंवा तें दुसऱ्या कोणीतरी उत्पन्न केलें आहे, असेंहि नव्हे, तर तें कार्यकारणनियमानें उत्पन्न झालें आहे. तृष्णा आहे, म्हणून दुःख आहे. तृष्णा नाहीं तर दुःखहि नाहीं. तृष्णा म्हणजे अतृप्ति. ती तीन प्रकारची. कामतृष्णा, भवतृष्णा आणि विभवतृष्णा. कामतृष्णा म्हणजे चैनीच्या पदार्थांची तृष्णा. या तृष्णेपासून जगाच्या दुःखांत मोठी भर पडली आहे. "कामतृष्णेनें क्षत्रिय क्षत्रियांबरोबर भांडतात, ब्राह्मण ब्राह्मणांबरोबर भांडतात, पिते पुत्रांबरोबर भांडतात, पुत्र पित्यांबरोबर भांडतात, आणि आप्त आप्तांबरोबर भांडतात. या चैनीसाठींच हीं सारीं भांडणें होतात.[1]" बरें भांडण करून एखाद्यानें चैनीच्या पदार्थांचा मोठा वांटा मिळविला, तरी त्यापासून त्याला सुख होत नाहीं.

**अबला नं बलीयन्ति मद्दन्ते नं परिस्सया ।**
**ततो नं दुःखमन्वेति भिन्नं नावमिवोदकं[2] ॥**

दुर्बळ लोक याचा मत्सर करितात; कामक्रोधादि अभ्यंतर, व अग्नि, चोर इत्यादि बाह्य शत्रु त्याला तुडवितात; आणि त्यामुळें फुटक्या होडींत पाणी शिरतें त्याप्रमाणें दुःख त्याच्या अंतःकरणांत शिरतें.

भवतृष्णा म्हणजे जीविततृष्णा, इजमुळेंहि जगाच्या दुःखांत मोठी भर पडली आहे. शंभर वर्षें आयुष्य प्राप्त झालें असतांहि मनुष्याची तृप्ति होत नाहीं. मेल्यावरहि सुख मिळावें, आत्मा अमर व्हावा अशी त्याची इच्छा असते. तीस अनुसरून तो व्रतांचें आणि उपवासांचें आचरण करतो,

१ महादुक्खक्खंधसुत्त, मज्झिमनिकाय.

२ सुत्तनिपात, कामसुत्त.

यज्ञयाग करून प्राण्याला दुःख देण्यास तयार होतो, व येणेंकरून आपल्या आणि इतर प्राण्यांच्या दुःखांत भर घालतो.

विभवतृष्णा म्हणजे विनाशतृष्णा, जगांतून नाहींसें होऊन जाण्याची तृष्णा. या तृष्णेला बळी पडलेले लोक आपल्याहि फायद्याकडे पाहत नाहींत, आणि दुसऱ्याच्याहि फायद्याकडे पाहत नाहीं. एवढ्या तेवढ्यासाठीं आत्महत्या करण्यास ते तयार असतात. आपण मेलों म्हणजे सारें जग संपलें असें त्यांचें म्हणणें असतें. ज्यांनां आपल्या जीविताची परवा नाहीं. त्यांनां दुसऱ्याच्या जीविताची कोठून असणार? दुसऱ्या प्राण्यांस कितीहि उपद्रव, झाला, तरी त्यापासून अशा लोकांच्या अंतःकरणांत दयेचा उदय होणें शक्य नाहीं. यांचें जीवित नीरस झालेलें असतें. यांना धार्मिक सुखाची गोडी मुळींच माहीत नसते. एकंदरींत अशा निर्दयपणानें आणि नीरसपणानें इतरांचें आणि आपलें दुःख ते वाढवीत असतात.

**दुःखनिरोध**– दुःखनिरोध म्हणजे दुःखाचें आकलन, दुःखाचा नाश. हा तृष्णानाशानेंच करतां येतो. वर सांगितलेल्या तिन्ही तृष्णांचा नाश केला, तरच दुःखाचा नाश होणार आहे. इतर उपाय निरुपयोगी आहेत. कामवासनेची तृप्ति करण्याच्या प्रयत्नानें दुःखाचा अंत होणार नाहीं; व्रत, उपवास, यज्ञ, याग, इत्यादिकांचें आचरण करून स्वर्गवासाची प्राप्ति करून घेतली, तरी दुःखाचा अंत होणार नाहीं; किंवा आपण जगांतून नाहींसे झालों तरी दुःखाचा अंत होणार नाहीं.

**दुःखनिरोधगामिनी प्रतिपत् ( मार्ग ):**– तृष्णानाशानें दुःखनाश होतो, हें समजलें. पण तृष्णानाशाला कांहीं उपाय आहे कीं नाहीं? अंगांत शिरलेल्या शल्यापासून वेदना होतात, हें समजलें, परंतु तें शल्य सुरक्षितपणें काढण्याला जर उपाय माहीत नाहीं, तर नुसतें एवढें समजण्यापासून काय फायदा? म्हणून दुःखाचा निरोध करण्याला उपाय या चवथ्या आर्य सत्यांत सांगितला आहे. हा उपाय म्हटला म्हणजे **आर्य अष्टांगिक** मार्ग होय.

**१ सम्यक् दृष्टिः**– दुःखाचें ज्ञान, दुःखसमुदायाचें ज्ञान, दुःखनिरोधाचें ज्ञान, आणि दुःखनिरोधगामी मार्गाचें ज्ञान, याला सम्यक् दृष्टि

असें म्हणतात. जग अनित्य म्हणजे बदलणारें आहे. प्रपंच दुःखमय आहे, आणि आत्मा म्हणून अविनाशी आणि अविकारी असा पदार्थ नसून कर्मानुसार बदलणारा आहे, अशा यथार्थ ज्ञानाला सम्यक् दृष्टि असें म्हटलें असतां चालेल. कारण अशा ज्ञानानेंच चार आर्य सत्यांचें ज्ञान होणें शक्य आहे.

२ **सम्यक् संकल्पः**— नैष्कर्म्यसंकल्प म्हणजे एकांतवाससुखाची आवड, अव्यापादसंकल्प म्हणजे प्राणिमात्रांवर शुद्ध प्रेम, आणि अविहिंसासंकल्प म्हणजे दुसऱ्यास किंवा आपणास त्रास होऊं नये अशी इच्छा. या तीन संकल्पांना सम्यक् संकल्प म्हणतात.

३ **सम्यक् वाचाः**— खोटें न बोलणें, चहाडी न करणें, कठोर शब्द न उच्चारणें, आणि वृथा भाषण न करणें यांना सम्यक् वाचा म्हणतात.

४ **सम्यक् कर्मान्त ( कर्म ):**— प्राणघात न करणें, चोरी न करणें व परदारागमन न करणें, यांना सम्यक् कर्मान्त म्हणतात.

५ **सम्यक् आजीवः**— वाईट मार्गानें आपली उपजीविका न करितां सन्मार्गानेंच ती करणें, याला सम्यक् आजीव म्हणतात.

६ **सम्यक् व्यायामः**— जे वाईट विचार मनांत आले नसतील त्यांना उत्पन्न होण्यास सवड न देण्याविषयीं प्रयत्न, जे वाईट विचार मनांत उद्भवले असतील, त्यांचा नाश करण्याचा प्रयत्न, जे सुविचार मनांत उद्भवले नसतील, ते उत्पन्न करण्याचा प्रयत्न, व जे सुविचार मनांत उद्भवले असतील, ते वाढवून त्यांना पूर्णतेला नेण्याचा प्रयत्न या चार मानसिक प्रयत्नांला सम्यक् व्यायाम म्हणतात.

७ **सम्यक् स्मृतिः**— शरीर अपवित्र पदार्थांचे बनलें आहे हा विवेक जागृत ठेवणें, शरीरांतील सुखदुःखादि वेदनांचें वारंवार अवलोकन करणें, स्वचित्ताचें अवलोकन करणें, आणि कार्यकारणपरंपरा इत्यादि तात्त्विक गोष्टींचें चिंतन करणें, या चार प्रकारांनीं चित्ताला जागृत ठेवणें, याला सम्यक् स्मृति म्हणतात.

८ **सम्यक् समाधिः**— सगळ्या कामवासनांचा निरोध करून व इतर दुष्ट मनोवृत्तींचा निरोध करून योगी वितर्क आणि विचार यांनीं युक्त

आणि विवेकापासून उत्पन्न झालेल्या प्रीतीनें आणि सुखानें युक्त असें प्रथम ध्यान संपादन करितो; वितर्क आणि विचार हे शांत झाल्यावर जी चित्ताची प्रसन्नता, जी चित्ताची एकाग्रता, तिनें युक्त, वितर्कविचारविरहित व समाधीपासून उत्पन्न झालेल्या प्रीतीनें आणि सुखानें युक्त असें द्वितीय ध्यान संपादन करितो; प्रीतीच्या त्यागानें तो उपेक्षायुक्त होतो, व जागृत ( स्मृतिमान् ) होत्साता समाधिसुखाचा अनुभव घेतो, त्याला आर्य जन उपेक्षायुक्त, स्मृतिमान् आणि सुखी असें म्हणतात, अशा प्रकारचें तो तृतीय ध्यान संपादन करितो; सौमनस्य आणि दौर्मनस्य यांचा पूर्वींच नाश झाल्यावर सुख आणि दुःख यांचा निरोध करून तो सुखदुःखविरहित व उपेक्षा आणि जागृति ( स्मृति ) यांनीं परिशुद्ध असें चतुर्थ ध्यान संपादन करतो. याप्रमाणें चार ध्यानें संपादन करणें याला सम्यक् समाधि असें म्हणतात[१].

बुद्ध भगवंतानें या आर्य अष्टांगिक मार्गाला मध्यम मार्ग असें म्हटलें आहे. त्याचें प्रत्येक अंग दोन अंतांच्या मध्यें आहे. उदाहरणार्थ, चैनी लोकांची दृष्टि म्हटली म्हणजे खावें प्यावें, मजा मारावी. हा दृष्टीचा एक अंत. तापसी लोकांची दृष्टि म्हटली म्हणजे व्रतांनीं शुद्धि, तपानें शुद्धि, देहदंडनानें शुद्धि हा दृष्टीचा दुसरा अंत, पहिला अंत चैनीचा आणि दुसरा अंत देहदंडनाचा. यांच्या मधला मार्ग म्हटला म्हणजे चार आर्यसत्यांचें यथार्थ ज्ञान. चैनी लोक म्हणतात वाटेल ते संकल्प संकल्पावे. तापसी म्हणतात संकल्पांचा समूळ नाश करावा. या दोन अंतांच्या मधला मार्ग म्हटला म्हणजे सम्यक् संकल्प. या प्रमाणें बाकी अंगांचीहि मध्यवर्तिता जाणावी.

---

## ४.

## त्रिपिटक ग्रंथ

**त्रिपिटक** हा पालिभाषेंतील मुख्य ग्रंथ होय. हा **महाभारत** ग्रंथाच्या तिप्पटीनें मोठा आहे. म्हणजे याची ग्रंथसंख्या सरासरी तीन लक्ष आहे.

---

१. हीं ध्यानें संपादण्याचा मार्ग दुसऱ्या व्याख्यानांत सांगितला आहे.

**सुत्तपिटक**, **विनयपिटक**, आणि **अभिधम्मपिटक** असे याचे मुख्य तीन भेद आहेत. त्यांचे पोटभेद खालीं दिल्याप्रमाणें :—

सुत्तपिटक

१ **दीघनिकाय**
२ **मज्झिमनिकाय**
३ **संयुत्तनिकाय**
४ **अंगुत्तरनिकाय**
५ **खुद्दकनिकाय**

**सुत्तपिटकाचे** हे पांच मुख्य भाग. यांपैकीं **खुद्दकनिकायाचे** पुनः १५ पोटविभाग आहेत. ते हे:—

१ खुद्दकपाठ
२ धम्मपद
३ उदान
४ इतिवुत्तक
५ सुत्तनिपात
६ विमानवत्थु
७ पेतवत्थु
८ थेरगाथा
९ थेरीगाथा
१० जातक
११ निद्देस
१२ पटिसंभिदामग्ग
१३ अपदान
१४ बुद्धवंश
१५ चरियापिटक

**विनयपिटकाचे** पांच भाग आहेत, ते हे:—

१ **पाराजिका**
२ **पाचित्तियादि**
३ **महावग्ग**

४ चुल्लवग्ग
५ परिवारपाठ

अभिधम्मपिटकांत सात प्रकरणें आहेत, तीं हीं:--

१ धम्मसंगणि
२ विभंग
३ धातुकथा
४ पुग्गलपञ्ञत्ति
५ कथावत्थु
६ यमक
७ पट्ठान

या त्रिपिटक ग्रंथावर सिंहल भाषेंत टीका लिहिल्या होत्या. त्यांनां **अट्ठकथा** ( अर्थकथा ) असें म्हणत. इ. स. च्या पांचव्या शतकाच्या आरंभीं बुद्धघोषाचार्यानें या अट्ठकथांचें पालिभाषेंत रूपांतर केलें. दीघनिकायादि चार निकायांच्या अट्ठकथांच्या आरंभीं प्रस्तावनेंत खालील गाथा आढळतात:--

**सीहळदीपं पन आभथाथ वसिना महामहिन्देन ।**
**ठपिता सीहळभासाय दीपवासिनमत्थाय ॥**
**अपनेत्वान ततोहं सीहळभासं नमोरमं भासं ॥**
**तन्तिनयानुच्छविकं आरोपेन्तो विगतदोसं ॥**

( ही अट्ठकथा ) महामहिन्दानें सिंहलद्वीपास आणली, आणि ( या ) द्वीपवासी जनांच्या हितासाठीं सिंहलभाषेंत लिहून ठेवली. ती सिंहलभाषेंतून काढून मनोरम आणि शास्त्रास अनुकूल अशा निर्दोष पालिभाषेंत ठेवतों ( ठेवणारा मी ).

ह्या अट्ठकथांचीं नांवें येणें प्रमाणें:-

१ दीघनिकाय अट्ठकथा — सुमंगलविलासिनी.
२ मज्झिमनिकाय ,, --पपंचसूदनी.
३ संयुत्तनिकाय अट्ठकथा — सारत्थप्पकासिनी.
४ अंगुत्तरनिकाय ,, --मनोरथपूरणी.

**५ विनय अट्ठकथा — समंतपासादिका.**

**६ धम्मसंगणि अट्ठकथा — अट्ठसालिनी.**

**७ विभंग अट्ठकथा — संमोहविनोदनी.**

८ **धातुकथा, पुग्गलपञ्ञत्ति, कथावत्थु, यमक व पट्ठाण** या पांच प्रकरणांची अट्ठकथा -- **पंचप्पकरणअट्ठकथा.** खुद्दकनिकायांतील प्रकरणांवर निरनिराळ्या आचार्यांनीं अट्ठकथा लिहिल्या आहेत.

**सुत्तपिटकांत** विशेषतः बुद्ध आणि बुद्धाचे प्रमुख शिष्य यांच्या उपदेशाचा संग्रह केला आहे; विनयपिटकांत भिक्षूंनीं पाळण्यांच्या नियमांचा संग्रह केला आहे; आणि अभिधम्मपिटकांत बौद्ध तत्त्वज्ञानाचा विस्तारानें विचार केला आहे.



# प्रस्तावना

माझे मित्र श्री० काका कालेलकर यांस नवजीवनात काही लेख लिहिल्याबद्दल व त्या प्रकरणी जामीन न दिल्याबद्दल ता. २० फेब्रुवारी १९२३ रोजी एका वर्षाच्या साध्या कैदेची शिक्षा झाली. साबरमतीच्या तुरुंगात जाण्यापूर्वी आपणासाठी कोठून तरी विनयग्रंथाचे इंग्रजी भाषान्तर मिळवून देण्यास त्यांनी मला सांगितले. Sacred Books of the East मध्ये छापलेले हे भाषान्तर सध्या उपलब्ध नाही, आणि सार्वजनिक लायब्ऱ्यां-खेरीज करून दुसऱ्या कोठेही मला ते मिळेना. तेव्हा केवळ श्री. काकांच-साठी नव्हे तर सर्वसामान्य वाचकांसाठी विनयग्रंथाचे सार तयार करावे ही कल्पना माझ्या मनात आली, व गुजराथ पुरातत्त्व मंदिराच्या प्रबंधक समि-तीला ती पसंत पडल्यामुळे हे काम मी ताबडतोब हाती घेतले. केवळ विनयाचे सार देण्यापेक्षा बुद्धसमकालीन श्रावकसंघातील व्यक्तींची संक्षिप्त चरित्रे दिल्यास हा ग्रंथ विशेष लोकप्रिय होईल असे वाटून त्यांचाही तिसऱ्या भागात संग्रह केला; व या ग्रंथाला 'विनय ग्रंथाचा परिचय' असे नांव न देता 'बौद्धसंघाचा परिचय' हे नाव दिले.

विनयग्रंथाचे, पाराजिका, पाचित्तियादि, महावग्ग, चुल्लवग्ग आणि परिवार असे पाच विभाग आहेत. त्यांपैकी पहिल्या दोन विभागांत या पुस्तकाच्या दुसऱ्या भागात दिलेले नियम, त्यांची पूर्वपीठिका, व त्यांवर टीका आहे. महावग्ग आणि चुल्लवग्ग यात उपसम्पदा कशी द्यावी, आचार्याची व शिष्याची कर्तव्ये इत्यादिक गोष्टींचे विस्तृत वर्णन असून प्रसंगोपात्त बारीकसारीक नियमही आले आहेत. परिवारांमध्ये पाराजिकादिक नियमांची संक्षेपाने यादी व विनयाची गुरुपरंपरा यांचे वर्णन आहे. या पाचांतही पहिल्या दोन विभागांत आलेले भिक्षूंचे आणि भिक्षुणींचे नियम फार प्राचीन असावे असे त्यांच्या भाषेवरून सिद्ध होते. त्या नियमांची आणि विनयग्रंथाची भाषा भिन्न आहे, किंबहुना विनयग्रंथ हा त्या नियमां-वर एक मोठी विस्तृत टीकाच म्हटली असता अतिशयोक्ति होणार नाही.

आता हे नियम कधी अस्तित्वात आले, व त्यांना सध्याचे स्वरूप कोणत्या काळी मिळाले याचा नीट उलगडा होणे कठीण आहे. यांपैकी काही महत्त्वाचे नियम स्वतः बुद्ध भगवंताने भिक्षुसंघासाठी घालून दिले असावेत; आणि मागाहून प्रसंगोपात्त भिक्षुसंघाने त्यात फरक केला असावा. उदाहरणार्थ, दुपारी बारा वाजल्यानंतर भिक्षूला अन्नग्रहण करण्याची मनाई हा नियम घ्या[१], याची पूर्वपीठिका मज्झिम निकायांतील कीटागिरिसुत्तांत [नं. ७० ] सापडते, ती अशीः–

एके वेळी भगवान काशिराष्ट्रात मोठ्या भिक्षुसंघासहवर्तमान उपदेश करीत फिरत होता. तेथे भगवान् भिक्षूंना उद्देशून म्हणाला, " भिक्षुहो, मी रात्रीचे जेवण सोडले आहे. यायोगे माझ्या शरीरात व्याधि कमी झाली आहे, जाड्य कमी झाले आहे, अंगी बळ आले आहे, आणि चित्ताला स्वास्थ्य मिळत आहे. भिक्षुहो, तुम्हीही याप्रमाणे वागा. तुम्ही जर रात्रीचे जेवण सोडले, तर तुमच्या शरीरात व्याधि कमी होईल, जाड्य कमी होईल, अंगी बळ येईल आणि तुमच्या चित्ताला स्वास्थ्य येईल." " ठीक भदन्त," असे त्या भिक्षूंनी भगवंताला उत्तर दिले.

त्यानंतर भगवान् प्रवास करीत करीत कीटागिरि नावाच्या शहराला आला. तेथे अस्सजि [ अश्वजित् ] आणि पुनब्बसुक [ पुनर्वसुक ] नावाचे दोन भिक्षू रहात होते. काही भिक्षू त्यांजपाशी जाऊन त्यांना म्हणाले, 'भगवान् रात्री जेवीत नाही व भिक्षुसंघानेही रात्रीचे जेवण सोडले आहे. तुम्ही याप्रमाणे रात्रीचे जेवण सोडले तर तुम्हालाही बरे वाटेल.' त्यावर अस्सजि आणि पुनब्बसुक म्हणाले, " बन्धुहो, आम्ही संध्याकाळी जेवतो, सकाळी जेवतो, दुपारी जेवतो आणि दोन प्रहर उलटून गेल्यावरही जेवतो. येणेकरून आमच्या शरीरात व्याधी कमी होते, जडता कमी होते, अंगी बळ येते आणि आमच्या चित्ताला स्वास्थ्य वाटते. तर मग हातचे सोडून पळत्याच्या पाठीमागे आम्ही का लागावे ?"

ही गोष्ट भगवंताला समजली, तेव्हा त्याने त्या दोघांला बोलावून आणून चौकशी केली इत्यादि.

---

१. भाग २, क० ८६. पाचित्तिय ३७.

यावरून असे दिसून येते की भगवंताने आरंभी रात्रिभोजनाचा तेवढा निषेध केला असावा. आणि संघातील बहुतेक भिक्षूंना ही गोष्ट पसंत पडल्यामुळे हा नियम सर्वसंमत झाला असावा. लटुकिकोपमसुत्तात [ मज्झिमनिकाय नं. ६६ ] उदायी भगवंताला म्हणतो, " भदंत, एकान्तात असताना माझ्या मनात असा विचार आला की, भगवंताने पुष्कळशा दुःखकारक गोष्टी आम्हापासून दूर केल्या, आणि पुष्कळशा सुखकारक गोष्टी आम्हाला प्राप्त करून दिल्या ... भदन्त, आम्ही पूर्वी संध्याकाळी, सकाळी, दुपारी आणि दुपार होऊन गेल्यावरही जेवीत होतो. अशी एक वेळ होती की भगवंताने भिक्षूंला दिवसा अवेळी जेवण्याची मनाई केली. त्यावेळी मला फार वाईट वाटले. श्रद्धाळु गृहस्थ दिवसा विकाळी आम्हांला खाण्यापिण्याचे जिन्नस देतात, त्यांचीही भगवान् मनाई करीत आहे हे मला आवडले नाही. परंतु भगवंतावर असलेल्या प्रेमामुळे, भगवंताच्या गौरवाने, लज्जा आणि लोकापवादभय जाणून दिवसा विकाळी खाणे आम्ही सोडून दिले. पण आम्ही सकाळी व संध्याकाळी जेवीत होतो. त्यानंतर भगवंताने रात्री भलत्याच वेळी खाण्याची मनाई केली. तेव्हाही मला वाईट वाटले. या दोन जेवणांत जे उत्तम जेवण तेही आम्हांस भगवान् सोडावयास सांगतो हे मला आवडले नाही ... परंतु भगवंतावर असलेल्या प्रेमाने, भगवंताच्या गौरवाने, आणि लज्जा व लोकापवादभय जाणून आम्ही रात्री अवेळी जेवण्याचेही सोडून दिले. हा नियम करण्यापूर्वी भिक्षू अंधेऱ्या रात्री भिक्षाटन करीत असता गटारांत किंवा घाणीच्या डबक्यांत पडत असत, काट्यांत शिरत, निजलेल्या गाईवर पडत, चोरी करून येणाऱ्या किंवा चोरी करण्यास जाणाऱ्या चोरांच्या तावडीत सापडत...मीही एके वेळी असाच भिक्षाटन करण्यास गेलो होतो. तेथे एक स्त्री आपल्या घराच्या बाहेरच्या बाजूस भांडी घाशीत होती. मला पाहून 'हे भूत आहे, हे पिशाच आहे,' असे ती मोठ्याने ओरडली. तेव्हा मी तिला म्हणालो, 'भगिनी, मी पिशाच नाही, मी भिक्षु आहे, व येथे भिक्षेसाठी उभा राहिलो आहे.' ती म्हणाली 'अरे भिक्षू, तुझी आत्या मरो, माता मरो, कसायाच्या तीक्ष्ण सुरीने तुझे पोट कापून काढलेले चांगले. पण अशा अंधेऱ्या रात्री तुला हे भिक्षाटन करणे चांगले नाही.' भदन्त, या

गोष्टीची जेव्हा मला आठवण होते, तेव्हा भगवंताने पुष्कळशा दुःखकारक गोष्टी आम्हांपासून दूर केल्या व पुष्कळशा सुखकारक गोष्टी आम्हांला प्राप्त करून दिल्या असे मला वाटते."

या गोष्टीवरून असे दिसून येते की, प्रथमतः भगवंताने भलत्याच वेळी खाण्याचा निषेध केला. तरी रात्रीच्या जेवणाचा निषेध केला नाही. नंतर सकाळी बारा वाजण्यापूर्वी एकदा व सायंकाळी सूर्यास्तापूर्वी एकदा अशी दोनच जेवणे जेवण्याचा नियम केला असावा. भगवान स्वतः सकाळचे एकच जेवण जेवीत होता, व भिक्षूंनाही तसे करण्यास उपदेश करीत असे, याचा उल्लेख ककचूपमसुत्तांत [ मज्झिम० नं. २१ ] आला आहे. परंतु सध्याचा प्रघात असा आहे की, अरुणोदयापासून मध्याह्नकाळापर्यंत भिक्षूने वाटेल तितक्या वेळा खावे. बारा वाजल्यापासून दुसऱ्या दिवशी अरुणोदयापर्यंत विकाल समजला जातो. सप्तदशवर्गीय भिक्षू बारा वाजल्यानंतर खाण्याचे पदार्थ खात त्यामुळे हा नियम करावा लागला असे विनयग्रंथात सांगितले आहे. परंतु विनयाचा आणि सुत्तपिटकांतील वर दिलेल्या उताऱ्यांचा स्पष्ट विरोध दिसून येतो. आणि विनयाच्या अशा प्रकारच्या कथा मागाहून रचल्या गेल्या असाव्या हे उघड होते.

वज्जिपुत्तक नांवाचा एक भिक्षु होता. तो भगवंतापाशी आला आणि म्हणाला :– " ही दीडशे शिक्षापदे [ नियम ] दर पंधरवड्याला म्हटली जातात. ती शिकणे मला शक्य नाही." भगवान् म्हणाला :– " तूं अधिशीलशिक्षा, अधिचित्तशिक्षा आणि अधिप्रज्ञाशिक्षा या तीन शिक्षा, [ नियम ] शिकशील काय ? " वज्जिपुत्तक म्हणाला :– " या तीन शिक्षा शिकणे मला शक्य आहे." भगवान् म्हणाला :– " जर तूं या तीन शिक्षा शिकशील तर तुझा राग, द्वेष आणि मोह नष्ट होईल, आणि तुझ्या हातून पापकर्म घडणार नाही.[१] "

---

१. या तीन शिक्षांची सविस्तर माहिती बुद्ध, धर्म आणि संघ या पुस्तकांतील दुसऱ्या व्याख्यानात धर्म या सदराखाली दिली आहे. वरील सुत्त अंगुत्तरनिकायाच्या तिकनिपाताच्या दुसऱ्या पण्णासकाच्या चवथ्या वग्गांतील चवथे आहे. Pali Text Society च्या एडिशनमध्ये या सुत्ताचा नंबर ८३ दिला आहे तो चुकीचा आहे. ८१ आणि ८२ या दोन सुत्तांचा समावेश एका ८१ व्या सुत्तांतच केला गेल्यामुळे असा घोटाळा झाला आहे.

या सुत्तांत दीडशे शिक्षापदांचाच उल्लेख आला आहे. त्यावर मनोरथ-पूरणीकाराचे—बुद्धघोषाचार्यांचे—म्हणणे असे की, त्या वेळी भगवंताने दीडशेच नियम केले होते; बाकी मागाहून केले. परंतु या स्पष्टीकरणाची काही जरूर दिसत नाही. दोन अनियत यांना स्वतंत्र नियम म्हणता येत नाही. व ७५ सेखिय पाळले नाहीत तर पाचित्तियासारखी आपत्ती होत नाही. तेव्हा ते वजा जाता बाकी दीडशेच नियम राहतात, व अंगुत्तर-निकाय लिहिला गेला त्या वेळी एवढ्याच नियमांस पातिमोक्ख म्हणत असत. त्या काळानंतर आणि बुद्धघोषाच्या काळापूर्वी मूळच्या पातिमोक्खांत ७५ सेखियांची भर पडली, एवढेच नव्हे तर त्या दीडशे नियमांच्या पायावर विनयग्रंथाची अवाढव्य इमारत उभारली गेली. अर्थात् या नियमाच्या पूर्व-पीठिका विनयग्रंथात वर्णिल्या आहेत त्या सर्वथैव ऐतिहासिक आहेत असे धरून चालता कामा नये. पाराजिकासारख्या नियमांच्या पूर्वपीठिका आचार्यपरंपरेने चालत आल्या असणे शक्य आहे, परंतु इतर नियमांच्या पूर्वपीठिका विनयग्रंथ लिहिला गेला त्या वेळी लेखकाला किंवा लेखकांना माहीत नसाव्या व त्यांनी त्या नवीनच रचल्या असाव्या.

सरासरी ख्रिस्ती शतकाच्या आरंभापासून बौद्धवाङ्मयाची विलक्षण क्रांति झाल्याचे दिसून येते. मूळच्या सुत्तांत पुष्कळशी सुत्ते आनंदाने, सारिपुत्ताने अथवा अशाच दुसऱ्या प्रसिद्ध महाश्रावकांनी उपदेशिलेली आढळतात. परंतु इ० सनानंतरच्या ग्रंथांतून सर्व प्रकरणांचा संबंध खुद्द बुद्धाशी लावण्याचा प्रयत्न दिसून येतो. उदाहरणार्थ जातकाच्या गोष्टी घ्या. प्रत्येक गोष्ट बुद्धानेच सांगितली व ती त्याच्या पूर्वजन्मीची होती असे वर्णन जातक अट्ठकथेत सापडते. अभिधर्माची सात प्रकरणेही बुद्ध भगवंतानेच उपदेशिली असे सिद्ध करण्याचा अट्ठकथाकाराने विलक्षण प्रयत्न केला आहे. या सर्व गोष्टींचा विचार केला असता विनयग्रंथ सर्व अट्ठकथांचा पूर्वगामी आहे अशी माझी समजूत झाली आहे, आणि त्यांतील गोष्टींचा इतिहासाच्या कामी उपयोग करताना मोठी सावधगिरी ठेविली पाहिजे, असे मला वाटते.

येथे असा प्रश्न उपस्थित होईल की, जर या गोष्टीचे ऐतिहासिक महत्त्व नाही तर त्यांचा या ग्रंथात संग्रह कशाला केला? याचे उत्तर हे की, पूर्वपीठिकांशिवाय पुष्कळशा नियमांचे स्पष्टीकरण होणे कठीण आहे. काही

नियमांच्या पूर्वपीठिका देऊन काहींच्या दिल्या नसत्या तर तेही योग्य झाले नसते. म्हणून सेखीय खेरीज करून बाकी सर्व नियमांच्या संक्षेपानें पूर्वपीठिका दिल्या आहेत. वाचकांनी त्या पूर्वपीठिकांना ऐतिहासिक महत्त्व न देता केवळ नियम समजावून घेण्याकडेच त्यांचा उपयोग करावा. सरासरी इ० सनाच्या आरंभाला बौद्धसंघाची घटना कशी होती, त्या संघात कोणत्या वस्तूला महत्त्व देण्यात येत होते व संघशक्ति वाढविण्याचा कसा प्रयत्न करण्यात येत होता हे समजण्यापुरताच पहिल्या दोन भागांचा उपयोग वाचकांस होणार आहे. तिसऱ्या भागात जी महाश्रावकांची चरित्रे दिली आहेत त्यात दंतकथांची बरीच भेसळ आहे, तथापि बुद्ध भगवंताच्या हयातीत भिक्षु आणि गृहस्थ कशा प्रकारे रहात असत याची चांगली कल्पना या चरित्रांवरून होईल. जेथे शक्य होते तेथे मूळ सुत्तांचा आधार घेऊन तद्द्वारा त्या त्या व्यक्तीचे चरित्र वर्णन करण्याचा प्रयत्न केला आहे. कार्ली, वेरुळ वगैरे लेण्यांत व सांची वगैरे स्तूपांच्या आसपास सापडणाऱ्या बौद्धसंघातील व्यक्तींची कोरीव चित्रे जाणण्याला व त्या चित्रकलेचा अर्थ समजण्याला, आणि फाह्यान, ह्युएन्त्सांग वगैरे चिनी प्रवाशांची प्रवासवर्णने वाचताना या भागाची वाचकाला चांगली मदत होईल अशी मी आशा बाळगतो.



# बौद्धसंघाचा परिचय

## भाग १ ला

## विधायक नियम

### शिष्याचीं कर्तव्यें

१. बुद्धगयेच्या आसपासच्या प्रदेशाला अडीच हजार वर्षांपूर्वी उरुवेला म्हणत असत, व सध्याच्या लीलंजन नदीला नेरंजरा नदी म्हणत असत. ह्या प्रदेशांत व ह्या नदीच्या कांठीं शाक्यमुनि गौतमानें सहा वर्षें खडतर तपश्चर्या करून आपला देह झिजविला; व शेवटीं बोधिवृक्षाखालीं बसून जगताचा उद्धार करणाऱ्या धर्ममार्गाचें ज्ञान मिळविलें. वैशाख शु ॥ पौर्णिमेच्या दिवशीं त्याला हा ज्ञानलाभ झाला; व त्यानंतर काशीला जाऊन आषाढ शु ॥ पौर्णिमेच्या दिवशीं आपल्या पूर्वीच्या पांच साथ्यांना त्यानें ह्या नवीन धर्ममार्गाचा उपदेश केला. म्हणजे प्रथमतः बौद्धसंघाची स्थापना ह्याच दिवशीं झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यावेळीं बुद्धभगवान् आपल्या शिष्याला, 'एहि भिक्खु' (भिक्षु, इकडे ये) असें म्हणे, व तोच त्याचा प्रव्रज्याविधि होत असे.

२. त्या चातुर्मास्यांत बुद्धाला आणखी ५५ शिष्य मिळाले व चातुर्मास्याच्या शेवटीं जेव्हां त्यांस निरनिराळ्या ठिकाणीं धर्मोपदेश करण्यास पाठविण्यांत आलें तेव्हां—

बुद्धं सरणं गच्छामि
धम्मं सरणं गच्छामि
संघं सरणं गच्छामि

ह्या तीन शरण—गमनानीं प्रव्रज्या देण्यास बुद्धानें भिक्षूंस परवानगी दिली. परंतु तो स्वतः 'एहि भिक्खु' ह्याच वाक्यानें प्रव्रज्या देत असे.

३. त्या चातुर्मास्यानंतर बुद्ध पुन्हां उरुवेलेला आला; व तेथें त्यानें उरुवेल काश्यपादिक तिघां बंधूंना व त्याच्या शिष्यांना आपले अनुयायी केलें. त्यांना घेऊन तो राजगृहाला आला. तेथें संजय परिव्राजकाचे अग्रशिष्य सारिपुत्त व मोग्गल्लान आपल्या २५० सहाध्यायांसह बुद्धाचे अनुयायी झाले. त्यायोगें संघाचा विस्तार बराच झाला; व तरुण भिक्षूंवर देखरेख नसल्यामुळें ते अव्यवस्थितपणें वागू लागले. म्हणजे सकाळीं गांवांत भिक्षेला जात असतां ते आपलीं चीवरें व्यवस्थितपणें वापरीत नसत; लोक जेवतखात वगैरे असतांना त्यांच्यापुढें आपलें पात्र करीत; लोकांना सांगून आपणासाठीं वरण भात वगैरे तयार करवीत; जेवतांना मोठ्यामोठ्यानें बोलत असत. हें पाहून लोकांत त्यांची निंदा होऊं लागली. ह्या श्रमण लोकांत अशी अव्यवस्था कां, व ब्राह्मणासारखे हे लोक जेवण्याचे वेळीं मोठमोठ्यानें बोलतात हें कसें, असें लोक म्हणत.

४. हें वर्तमान भिक्षूंनीं बुद्धाला कळविलें तेव्हां त्यानें त्या तरुण भिक्षूंचा निषेध केला. चैनीची, हांवरेपणाची, असंतोषाची, गप्पागोष्टींची व आळसाची निंदा करून अनेक रीतीनें साधेपणाची, निरपेक्षतेची, संतोषाची, उत्साहाची त्यानें स्तुती केली; व तो भिक्षूंना म्हणाला:– भिक्षुहो, आजपासून उपाध्याय स्वीकारण्याची मी परवानगी देतों. उपाध्यायानें आपल्या शिष्यांवर पुत्राप्रमाणें प्रेम करावें, व शिष्यानें उपाध्यायाला पित्याप्रमाणें समजावें. ह्याप्रमाणें परस्परांविषयीं आदर ठेवल्यानें माझ्या ह्या धर्मविनयांत या दोघांची उत्तम अभिवृद्धि होईल. उपाध्यायाचा स्वीकार ह्याप्रमाणें करावा:– उत्तरासंग[१] एका खांद्यावर करून त्याला नमस्कार करावा, व उकिडव्यानें बसून हात जोडून म्हणावें कीं, भन्ते, माझे उपाध्याय व्हा, भन्ते, माझे उपाध्याय व्हा, भन्ते, माझे उपाध्याय व्हा. “ ठीक आहे, बरें आहे ” किंवा अशाच दुसऱ्या कोणत्यातरी कायिक किंवा वाचसिक संज्ञेनें त्यानें आपल्या विनंतीचा स्वीकार केला म्हणजे तो आपला उपाध्याय झाला असें समजावें.

५. शिष्यानें उपाध्यायाबरोबर चांगल्या रितीनें वागावें. उपाध्यायाविषयीं त्याचीं कर्तव्यें आहेत तीं अशीं:—

---

१. नेसण्याच्या चीवराला अंतरवासक, पांघुरण्याच्या चीवराला उत्तरासंग व थंडीसाठी वापरण्याच्या चीवराला संघाटी म्हणतात.

सकाळीं लवकर उठून, वाहणा काढून [ उघड्या पायांनीं ] आपलें उत्तरासंग एका खांद्यावर करून उपाध्यायाला दंतकाष्ठ द्यावें; तोंड धुवावयाला पाणी द्यावें व त्याच्यासाठीं आसन मांडावें. जर पेज असेल तर त्याचें पात्र धुवून त्यांतून ती त्याच्यापुढें करावी. पेज पिऊन झाल्यावर आंचवण्यास पाणी द्यावें व पात्र धुवून व्यवस्थितपणें ठेवावें. उपाध्याय उठल्यावर आसन काढून ठेवावें. तो प्रदेश अस्वच्छ झाला असल्यास झाडून काढावा.

६. उपाध्यायाची [ भिक्षेसाठीं ] गांवांत जाण्याची इच्छा असल्यास गांवांत जाण्याच्या वेळीं नेसण्याचें चीवर द्यावें; व पूर्वीं नेसलेलें चीवर सोडून ठेवल्यावर तें घ्यावें. कमरपट्टा द्यावा. संघाटी आणि उत्तरासंग हीं दोन्हीं चीवरें एकमेकांशीं मिळवून द्यावीं; आणि पात्र धुवून द्यावें. उपाध्या-याला साथी पाहिजे असल्यास आपण व्यवस्थितपणें चीवर नेसून कायबंधन बांधून नीट रितीनें शरीर आच्छादन करून आपलें भिक्षापात्र धुवून घेऊन उपाध्यायाच्या मागोमाग जावें. उपाध्यायापासून फार दूर किंवा फार जवळ राहूं नये. आपल्या पात्रांत जें लोक घालतील तेवढ्याचा स्वीकार करावा. उपाध्याय बोलत असतां मध्येंच आपण बोलूं नये; परंतु नियमाचा भंग होण्यासारखें कांहीं बोलत असला, तर त्याचें नम्रपणें निवारण करावें.

७. गांवांतून परत येतांना आपण पूर्वीं येऊन उपाध्यायाचें आसन तयार करावें. पाय धुण्यासाठीं पाणी व पाट तयार ठेवावा. पुढें जाऊन त्याचें पात्र व संघाटी घ्यावी. विहारांत नेसण्याचें चीवर द्यावें; व नेसलेलें चीवर सोडून ठेवल्यावर घ्यावें. जर तें घामानें भिजलेलें असेल तर थोडा वेळ उन्हांत टाकावें. पण तें तेथेंच ठेवूं नये. तें गोळा करावें, व गोळा करतांना फाटूं नये अशा बेतानें करावें. कायबंधन [ कमरपट्टा ] चीवराच्या घडीवर ठेवावें. जर पात्रांत भिक्षा शिल्लक असेल व उपाध्यायाची जेवण्याची इच्छा असेल तर ती, पाणी देऊन, उपाध्यायासमोर ठेवावी. पिण्याचें पाणी पाहिजे असल्यास विचारावें. जेवल्यानंतर पाणी देऊन त्याच्याकडून पात्र घेऊन तें चांगलें धुवून कांहीं वेळ उन्हांत ठेवावें. पण तें तेथेंच राहूं देऊं नये. पात्र आणि चीवरें व्यवस्थितपणें ठेवण्यांत यावीं. मंचकाच्या खालीं किंवा चौरंगाच्या खालीं जागा साफ करून तेथें पात्र ठेवावें. परंतु तें नुस्त्या

जमिनीवर ठेवूं नये. चीवर ठेवण्याची दांडी किंवा दोरी साफ करून तिच्यावर चीवरांची घडी व्यवस्थितपणें ठेवावी. उपाध्याय उठल्यावर आसन, पाय धुण्याचें पाणी, पाट वगैरे सर्व पदार्थ जागच्याजागीं व्यवस्थितपणें ठेवावे. तो प्रदेश स्वच्छ नसल्यास झाडून काढावा.

८. जर उपाध्यायाला स्नान करावयाचें असेल, तर स्नानाची तजवीज करावी; थंड पाणी पाहिजे असल्यास थंड द्यावें, ऊन पाहिजे असल्यास ऊन द्यावें. उपाध्याय अग्निशाळेंत[1] जाऊं इच्छीत असल्यास उटणें तयार करून द्यावें; शक्य असल्यास आपणहि अग्निशाळेंत प्रवेश करावा. प्रवेश करतांना तोंडाला माती लावून व शरीर नीट आच्छादून प्रवेश करावा. वृद्ध भिक्षूंना चिकटून बसूं नये. नवीन भिक्षूंना आसनांवरून उठवूं नये. तेथून बाहेर निघतांना बसण्याचा पाट घेऊन व शरीर नीट आच्छादून निघावें. पाण्याच्या ठिकाणींहि उपाध्यायाचें काम करावें. प्रथमतः आपण वर निघून आंग पुसून व कोरडें चीवर नेसून उपाध्यायाचें आंग पुसावें. त्याला कोरडें चीवर द्यावें; संघाटी द्यावी. अग्निशाळेंतील पाट घेऊन प्रथमतः विहारांत यावें, व उपाध्यायाचें आसन मांडावें. पाय धुण्याचें पाणी व पाट ठेवावा. उपाध्यायाला पिण्याचें पाणी पाहिजे असल्यास विचारावें. जर उपाध्यायाकडून पाठ घ्यावयाचा असेल तर घ्यावा. त्याला प्रश्न विचारावयाचे असतील तर विचारावे.

९. ज्या विहारांत उपाध्याय रहात असेल तो मलीन झाला असल्यास, शक्य असेल तर, साफ करावा. विहार साफ करीत असतां प्रथम पात्रें आणि चीवरें बाहेर काढून एका बाजूला ठेवावीं. सतरंज्या, अंथरुणें वगैरे बाहेर काढावीं. तक्के व उशा बाहेर काढून एका बाजूस ठेवाव्या. खाट बाहेर काढतांना दरवाजाला आदळूं न देतां व्यवस्थितपणें बाहेर काढावी व एका बाजूला ठेवावी. त्याचप्रमाणें चौरंग बाहेर काढून एका बाजूला ठेवावा. खाटेचे प्रतिपादकें[2] बाहेर काढून ठेवावें. पिकदाणी व बसण्याचें आसन बाहेर काढून एका बाजूला ठेवावें. आस्तरण जसें

१ अग्निशाळा म्हणजे उष्णतेच्या योगें अंगांतून घाम काढण्यासाठीं तयार केलेली खोली. विशेष माहिती ह्याच भागाच्या ८२ व्या कलमांत पहावी.

२ खाटेचे खूर ठेवण्याचे ठोकळे किंवा दगड.

घातलें असेल तसें नीट पाहून मग बाहेर काढून ठेवावें. जर विहारांत कोळ्याचीं जाळीं झालीं असतील तर प्रथम छताची बाजू साफ करावी. मग खिडक्या, दरवाजे व कोंपरे झाडावे. गेरूनें रंगविलेल्या भिंती घाणेरड्या झाल्या असतील तर फडकें पाण्यांत भिजवून पिळावें व त्यानें त्या पुसून काढाव्या. काळ्या गिलाव्यानें तयार केलेली जमीन ह्याप्रमाणेंच ओल्या फडक्यानें पुसून काढावी. साधी जमीन असेल तर धूळ उडूं नये म्हणून पाणी शिंपून झाडून काढावी. कचरा काढून एका बाजूस टाकावा.

सतरंज्या, खाट, चौरंग, उशा, पिकदाणी वगैरे सर्व पदार्थ उन्हांत वाळवून साफसूफ करून यथायोग्य स्थानीं ठेवावे. त्याचप्रमाणें पात्रें व चीवरें यथायोग्य स्थानीं ठेवावीं.

१०. पूर्वेकडून हवेनें धूळ उडत असल्यास पूर्वेकडील खिडक्या बंद कराव्या. पश्चिमेकडून उडत असल्यास पश्चिमेकडील, उत्तरेकडून उडत असल्यास उत्तरेकडील, व दक्षिणेकडून धूळ उडत असल्यास दक्षिणेकडील खिडक्या बंद कराव्या. थंडीच्या दिवसांत खिडक्या दिवसा उघडाव्या व रात्रीं बंद कराव्या; आणि उन्हाळ्यांत दिवसा बंद कराव्या व रात्रीं उघडाव्या. राहण्याची खोली, बसण्याची कोठडी, एकत्र जमण्याचा दिवाणखाना, अग्निशाळा व पायखाना साफ नसतील तर ह्या सर्व जागा साफ कराव्या. पिण्याचें पाणी नसेल तर तें भरून ठेवावें. पाय धुण्याचें पाणी नसेल तर तेंहि आणून ठेवावें. पायखान्यांत ठेवलेल्या बरणींत पाणी नसेल तर तेंहि भरून ठेवावें.

११. उपाध्याला अनभिरति[1] उत्पन्न झाली असल्यास शिष्यानें दुसऱ्यांकडून ती शमविण्याचा प्रयत्न करावा; किंवा धर्मोपदेश करावा, उपाध्यायाला शंका उद्भवली असल्यास शिष्यानें ती दूर करावी. करवावी किंवा धर्मोपदेश करावा. उपाध्यायाला मिथ्यादृष्टि उद्भवली असल्यास शिष्यानें ती सोडवावी, दुसऱ्यांकडून सोडवावी किंवा धर्मोपदेश करावा.

१२. उपाध्यायाच्या हातून संघादिशेष[2] नांवाचा अपराध घडला असल्यास आणि परिवास[3] देण्यास योग्य असल्यास शिष्यानें संघाकडून उपा-

---

१ धर्माचरणांत असंतोष. २ भाग २ रा, कलम ५ ते १७ पहा.

३ भाग १ ला, कलम ७८ पहा.

घ्यायाला परिवास[1] मिळेल अशी खटपट करावी. उपाध्याय पूर्वस्थितींत येण्यास योग्य असल्यास संघ त्याला पूर्वस्थितींत आणील अशी खटपट करावी. मानत्त किंवा अब्भान[2] देण्यास योग्य असल्यास संघ मानत्त किंवा अब्भान देईल अशाविषयीं खटपट करावी.

१३. संघानें उपाध्यायाला तर्जनीय[3]कर्म, नियशःकर्म, प्रव्राजनीयकर्म, प्रतिस्मरणीयकर्म किंवा उत्क्षेपणीयकर्म करण्याचा विचार केला असल्यास तें होऊं न देण्याविषयीं, किंवा थोडक्या दंडानें उपाध्यायाला क्षमा करण्यांत येईल अशाविषयीं खटपट करावी. जर ह्यापैकीं एकादें कर्म केलें असेल तर उपाध्याय नम्रपणें वागेल व संघ त्याला क्षमा करील अशाविषयीं खटपट करावी.

१४. उपाध्यायाचें चीवर धुवावयाचें असल्यास शिष्यानें धुवावें किंवा दुसऱ्याकडून धुवून घेण्याचा प्रयत्न करावा. जर उपाध्यायाचें चीवर बनवावयाचें असेल तर शिष्यानें बनवावें किंवा दुसऱ्याकडून बनवून घेण्याचा प्रयत्न करावा. उपाध्यायासाठीं रजन तयार करावयाचें असेल तर तयार करावें किंवा दुसऱ्यांकडून तयार करवून घ्यावें; चीवर रंगवावयाचें असल्यास रंगवावें किंवा दुसऱ्यांकडून रंगवून घ्यावें. चीवर रंगवितांना व्यवस्थितपणें रंगवावें.

१५. उपाध्यायाला विचारल्यावांचून एकाद्याला पात्र देऊं नये, किंवा दुसऱ्याचें पात्र आपण घेऊं नये; दुसऱ्याला चीवर देऊं नये किंवा दुसऱ्याचें चीवर आपण घेऊं नये; दुसऱ्याला पदार्थ देऊं नये व दुसऱ्याचा पदार्थ आपण घेऊं नये; दुसऱ्याची हजामत[4] आपण करूं नये व दुसऱ्याकडून आपली हजामत करवून घेऊं नये; दुसऱ्याचें काम करूं नये व दुसऱ्याकडून आपलें काम करवून घेऊं नये; दुसऱ्याची व्यवस्था पाहूं नये व दुसऱ्यास आपली व्यवस्था पहाण्यास लावूं नये; दुसऱ्याचा साथीदार होऊं नये व दुसऱ्यास आपला साथीदार करूं नये; दुसऱ्याची भिक्षा घेऊं नये, व दुसऱ्यास आपली भिक्षा

---

१ भाग १ ला. कलम ७९ पहा.

२ भाग ४ था, कलम ८१ पहा.

३ भाग १ ला. कलम ७२, पासून ७६ पर्यंत पहा.

४ भिक्षु परस्परांची हजामत करतात.

देऊं नये. उपाध्यायाला विचारल्यावाचून गांवांत, स्मशानांत किंवा प्रवासाला जाऊं नये. उपाध्याय आजारी असल्यास मरेपर्यंत किंवा आजारांतून उठेपर्यंत त्याची सेवा करावी.

## उपाध्यायाचीं कर्तव्यें

१६. उपाध्यायानें शिष्याबरोबर नीट रितीनें वागावें. शिष्याविषयीं त्याचीं कर्तव्यें आहेत तीं अशीं:—

उपाध्यायानें शिष्याला पाठ पढवून, धार्मिक प्रश्नांचीं उत्तरें देऊन, उपदेश करून व रीतरिवाज शिकवून मदत करावी, व त्याच्यावर अनुग्रह करावा. उपाध्यायाजवळ जर पात्र असेल व शिष्याजवळ तें नसेल तर त्यानें तें शिष्याला द्यावें, किंवा त्याला दुसरीकडून पात्र मिळवून देण्याची खटपट करावी. शिष्याजवळ चीवर व भिक्षूंना लागणाऱ्या इतर वस्तू नसतील, तर उपाध्यायानें ह्याचप्रमाणें वागावें. शिष्य जर आजारी असेल तर, शिष्याचीं कलम ५ पासून १० पर्यंत जीं कर्तव्यें सांगितलीं तीच उपाध्यायांचीं आहेत असें समजून त्याप्रमाणें वागावें. ११, १२ व १३ ह्या कलमांत जीं शिष्याचीं कर्तव्यें सांगितलीं तीं तशा तशा प्रसंगीं शिष्याविषयीं गुरूनें पाळावीं.

१७. शिष्याचें चीवर धुवावयाचें असल्यास तें कसें धुवावें हें उपाध्यायानें त्याला दाखवावें, किंवा दुसरें कोणीतरी त्याला मदत करतील अशी खटपट करावी. चीवर बनवावयाचें असल्यास, रजन तयार करावयाचें असल्यास आणि चीवर रंगवावयाचें असल्यास, उपाध्यायानें त्याचप्रमाणें वागावें. शिष्य जर आजारी असेल तर तो मरेपर्यंत किंवा बरा होईपर्यंत उपाध्यायानें त्याची शुश्रूषा करावी.

### आचार्यांची व अन्तेवासिकांची कर्तव्यें

१८. त्याकाळीं उपाध्याय प्रवासास गेले असतां, भिक्षुभाव सोडून गृहस्थ झाले असतां किंवा मरण पावले असतां तरुण भिक्षु अव्यवस्थितपणें वागूं लागले. तेव्हां ह्याविषयीं चौकशी करून भिक्षूंना उद्देशून बुद्ध ह्मणाला, “ भिक्षुहो, आचार्य करण्यास मी तुम्हांस परवानगी देतों. आचार्य अन्तेवासिकावर पुत्रप्रेम ठेवील, व अन्तेवासिक आचार्याला पित्याप्रमाणें मान

देईल. ह्याप्रमाणें परस्परांविषयीं आदरानें वागून ह्या धर्मविनयांत त्यांची अभिवृद्धि होईल." आचार्य ग्रहण करण्याचा विधि चौथ्या कलमांत सांगितल्याप्रमाणें समजावा. आचार्याची व अन्तेवासिकाचीं कर्तव्यें अनुक्रमें उपाध्यायाच्या व शिष्याच्या कर्तव्याप्रमाणेंच आहेत असें समजावें.

१९. पुढें निरनिराळ्या प्रसंगीं बुद्धानें असे नियम केले कीं, उपाध्याय व आचार्य निदान दहा वर्षें तरी संघांत भिक्षु होऊन राहिले असले पाहिजेत, व शिष्यांना व अन्तेवासिकांना संभाळण्याचें त्यांस सामर्थ्य असावयास पाहिजे.

## भिक्षुप्रव्रज्या

२०. त्याकाळीं एक ब्राह्मण भिक्षूंजवळ जाऊन प्रव्रज्या मागूं लागला. पण भिक्षूंनीं त्याला ती दिली नाहीं. त्या योगें तो अत्यंत दुर्बल झाला. बुद्ध भगवंतानें तें पाहून भिक्षूंस त्याचें कारण विचारिलें व त्यांनीं तें सांगितलें. तेव्हां भगवान् म्हणाला, "ह्याचा अधिकार कोणाला आठवतो काय ?" त्यावर सारिपुत्त म्हणाला, "भन्ते, याचा अधिकार मला आठवतो, एकदां मी राजगृह नगरांत भिक्षेला गेलों असतां ह्यानें मला एक पळीभर भिक्षा दिली होती." ह्या कृतज्ञतेबद्दल बुद्धानें सारिपुत्ताची स्तुती केली, व सारिपुत्तालाच त्या ब्राह्मणाला प्रव्रज्या द्यावयाला सांगितलें.

२१. पण जेव्हां ब्राह्मणाला कोणत्या प्रकारची प्रव्रज्या द्यावी असा सारिपुत्तानें प्रश्न केला तेव्हां ह्या प्रकरणीं भिक्षूंना बोलावून बुद्ध म्हणाला:— जी तीन शरणगमनानीं उपसंपदा देण्याची परवानगी दिली ती मी आजपासून रद्द करतों, व विज्ञप्ति आणि त्रिवार उल्लेख करून उपसंपदा देण्याची परवानगी देतों. ती अशी:—

जो हुशार आणि योग्य भिक्षु असेल त्यानें संघाला विज्ञप्ति करावी 'भदंत संघ, मी काय बोलतों त्याजकडे लक्ष द्या. हा अमुक नांवाचा मनुष्य अमुक नांवाच्या उपाध्यायाकडून उपसंपदेसाठीं पुढें करण्यांत येत आहे. जर संघाला योग्य वाटत असेल तर अमुक नांवाच्या उपाध्यायाच्या हाताखालीं त्याला उपसंपदा द्यावी.' ही विज्ञप्ति झाली. पुन्हा त्यानें म्हणावें कीं, 'भदन्त संघ, मी काय बोलतों तें ऐका, हा अमुक मनुष्य अमुका-

कडून उपसंपदेसाठीं पुढें करण्यांत येत आहे. त्याला त्या उपाध्यायाच्या हाताखालीं संघ उपसंपदा देत आहे. ज्या आमच्या बांधवाला ही गोष्ट पसंत असेल त्यानें मुकाट्यानें रहावें, व ज्याला पसंत नसेल त्यानें तसें बोलावें.' दुसऱ्यांदा व तिसऱ्यांदा हाच मजकूर त्या भिक्षूनें पुन्हा उच्चारावा, व कोणी हरकत घेत नसल्यास म्हणावें कीं, 'ह्या अमुक मनुष्याला अमुक उपाध्यायाच्या हाताखालीं संघानें उपसंपदा दिली आहे. संघाला ही गोष्ट पसंत आहे म्हणून संघ उगा आहे. तेव्हां ही गोष्ट ठरली असें मी गृहीत धरून चालतों.'

२२. त्या काळीं कोणी एक भिक्षु उपसंपदेचा विधि झाल्यावर शिस्तीविरुद्ध वागूं लागला. तेव्हां 'तसें वागणें योग्य नाहीं' असें भिक्षूंनीं त्याला सांगितलें. तो म्हणाला, "मला उपसंपदा द्या असें मी तुम्हाला कधीं सांगितलें होतें?" ही गोष्ट बुद्ध भगवंताला समजली. तेव्हां तो भिक्षूंना म्हणाला, "मागणी केल्याशिवाय कोणत्याहि माणसाला उपसंपदा देऊं नये." मागणी करण्याचा विधि असाः—

त्या उमेदवारानें संघापाशीं येऊन, उत्तरासंग एका खांद्यावर करून उकिडव्यानें बसून हात जोडून म्हणावें, 'भदंत संघाजवळ उपसंपदेची मी याचना करतों. अनुकंपा करून संघानें माझा उद्धार करावा.' दुसऱ्यांदा व तिसऱ्यांदा त्यानें असेंच बोलावें. मग हुशार आणि समर्थ भिक्षूनें संघाला विज्ञप्ति करावी, 'भदंत संघ, मी काय बोलतों ह्याजकडे लक्ष द्या. भंदत संघ, हा अमुक मनुष्य अमुक उपाध्यायाकडून उपसंपदेसाठीं पुढें करण्यांत येत आहे. तो त्या उपाध्यायाच्या हाताखालीं उपसंपदेची याचना करीत आहे. संघाला जर योग्य वाटत असेल तर त्याला संघानें त्या उपाध्यायाच्या हाताखालीं उपसंपदा द्यावी.' मग वर सांगितल्याप्रमाणें त्रिवार उपसंपदेचा मायना म्हणून, कोणी हरकत घेतली नाहीं म्हणजे तो गृहस्थ भिक्षु झाला असें समजावें.

२३. त्याकाळीं राजगृहांत भिक्षूंना आमंत्रणपरंपरा होती. तेव्हां एका ब्राह्मणाच्या मनांत असा विचार आला कीं, हे शाक्यपुत्रीय श्रमण मोठ्या चैनीनें राहतात; चांगलें जेवण जेवून चांगल्या विहारांत राहतात; ह्यांच्या

संघांत मला प्रव्रज्या मिळाली तर बरें. त्यानें भिक्षूंजवळ प्रव्रज्येची याचना केली, व भिक्षूंनीं त्याला प्रव्रज्या दिली. तो भिक्षु झाल्यावर आमंत्रण-परंपरा संपली. भिक्षूंनीं त्याला आपल्याबरोबर भिक्षाचर्येसाठीं बोलाविलें. तेव्हां तो म्हणाला, "मी भिक्षाचर्येसाठीं भिक्षु झालों नाहीं. मला जर जेवायला द्याल तर राहीन, न द्याल तर चालता होईन." "तूं केवळ पोटासाठीं भिक्षु झालास काय ?" असें भिक्षूंनीं विचारल्यावर त्यानें होय असें उत्तर दिलें. ही गोष्ट भगवंताला समजली तेव्हां त्या ब्राह्मणाची निंदा करून तो म्हणाला, "हे मोघपुरुषा, अशा ह्या उत्तम धर्मविनयांत केवळ पोटासाठीं प्रव्रज्या घेतोस हें कसें ?" नंतर भगवान् भिक्षूंना म्हणाला, "प्रव्रज्या दिल्यावर भिक्षूंचे चार आश्रय सांगावे. ( १ ) भिक्षाचर्येवर अवलंबून तुझी प्रव्रज्या, त्यासाठीं जन्मभर तूं उत्साह करावा. संघामंत्रणादिक आमंत्रणें मिळालीं तर तो विशेष लाभ आहे असें समज. ( २ ) रस्त्यांतील चिंध्या गोळा करून केलेल्या चीवरावर तुझी प्रव्रज्या, त्यासाठीं जन्मभर उत्साह बाळग. कार्पासादिकांचीं चीवरें मिळालीं तर तो विशेष लाभ समज. ( ३ ) झाडाखालच्या शयनासनावर अवलंबून तुझी प्रव्रज्या, तेथें राहण्यासाठीं जन्मभर तूं उत्साह करावा. विहारादिक मिळालें तर तो विशेष लाभ समज. (४) गोमूत्राच्या औषधावर तुझी प्रव्रजा, त्याविषयीं जन्मभर तूं उत्साह बाळगावा. तूप, लोणी इत्यादी पदार्थ औषधासाठीं मिळाले तर तो विशेष लाभ समज."

२४. नंतर उपसंपदेसंबंधानें कांहीं नियम करण्यांत आले ते असे:- हे चार आश्रय प्रव्रज्येपूर्वीं न सांगतां, प्रव्रज्या दिल्याबरोबर सांगण्यांत यावे. उपसंपदेच्या वेळीं कमींत कमीं दहा भिक्षु हजर असले पाहिजेत. उपाध्याय कमींत कमी दहा वर्षें संघांत भिक्षु होऊन राहिला असला पाहिजे व समर्थ असला पाहिजे.

२५. त्या काळीं दुसऱ्या पंथाचा एक परिव्राजक संघात आला व आपल्या उपाध्यायाला वादांत हरवून पुन्हां पूर्वीच्या पंथांत गेला; व कांहीं कालानें परत येऊन उपसंपदा मागूं लागला. अशा प्रकारच्या माणसाला उपसंपदा देण्याची भगवंतानें मनाई केली; व भगवान् भिक्षूंनां म्हणाला, "दुसरा कोणी इतर पंथांतून ह्या संघांत येण्याची इच्छा करीत असेल तर त्याला चार महिने परिवास द्यावा [ उमेदवार म्हणून ठेवावें. ]" तो परिवास

असा:— प्रथम त्याचें क्षौर करावें व काषाय वस्त्रें नेसावयास द्यावीं. एका खांद्यावर उत्तरासंग करावयास लावून, भिक्षूंना नमस्कार करण्यास लावावा; व हात जोडवून, उकिडव्यानें बसावयास लावून खालील वचनें त्रिवार उच्चारावयास सांगावीं:—

**बुद्धं सरणं गच्छामि । धम्मं सरणं गच्छामि । संघं सरणं गच्छामि ।**

नंतर त्यानें असें म्हणावें, 'भदंत, मी अमुक नांवाचा दुसऱ्या पंथांतून आलेला ह्या संघांत उपसंपदेची इच्छा करीत आहें. त्या मला भदन्त संघानें चार महिने परिवास द्यावा.' अशी त्रिवार याचना करावी. मग हुशार आणि समर्थ भिक्षूनें संघाला विज्ञप्ति करावी, 'भदंत संघानें माझ्या बोलण्याकडे लक्ष द्यावें, हा अमुक दुसऱ्या पंथांतून आलेला, ह्या संघांत उपसंपदेची इच्छा करीत आहे. तो चार महिने परिवास मागत आहे. जर संघाला योग्य वाटत असेल तर संघानें त्याला चार महिने परिवास द्यावा.' ही विज्ञप्ति झाली. नंतर त्याला परिवास दिल्याबद्दल त्या भिक्षूनें त्रिवार जाहीर करावें, व कोणीं हरकत घेतली नाहीं म्हणजे त्याला परिवास दिला असें समजावें.

२६. चार महिने तो नीट रितीनें वागला तर संघानें त्याला पूर्वीं सांगितल्याप्रमाणें उपसंपदा द्यावी. जर त्याच्याजवळ चीवर नसेल तर तें उपाध्यायानें द्यावें. जटिल श्रावक हे कर्मवादी[1] आहेत. तेव्हां त्यांस परिवास न देतां उपसंपदा द्यावी. शाक्य कुळांत जन्मलेला मनुष्य दुसऱ्या पंथांतून संघांत येण्याची इच्छा करीत असला तर त्यालाहि परिवास न देतां उपसंपदा द्यावी.

२७. त्या काळीं मगध देशांत कुष्ठ, गंड, किलास, क्षय आणि अपस्मार हे पांच रोग फैलावले. लोक जीवक कौमारभृत्याकडे जाऊन औषध मागत असत. परंतु त्याला सवड नसे. तो म्हणे, "मला बिंबिसार राजाच्या प्रकृतीची काळजी घ्यावी लागते, त्याच्या अंत:पुरांतील स्त्रियांना औषध द्यावें लागतें, व बुद्धाच्या भिक्षुसंघाचीहि काळजी घ्यावी लागते. तेव्हां इतरांची चिकित्सा करण्यास मला सवड नाहीं." तेव्हां आपणाला औषध मिळावें ह्या उद्देशानें रोगी लोक बौद्धसंघात शिरूं लागले. त्यामुळें भिक्षूंना

१. कर्माप्रमाणें फळ मिळतें असें समजणारे, म्हणजे नास्तिक नव्हत.

अत्यंत मेहनत पडत असे; व जीवक कौमारभृत्यालाहि ह्या नवीन रोगी भिक्षूंची काळजी घेतां घेतां आपलीं कामें करण्यास वेळ मिळत नसे. तसाच एक रोगी मनुष्य संघांत शिरला; व जीवकानें त्याला पूर्वस्थितीवर आणल्यानंतर तो संघ सोडून चालता झाला. एके दिवशीं जीवकानें 'पूर्वीं तू संघांत होतास कीं नाहीं' असा प्रश्न त्या मनुष्याला केला. तेव्हां त्यानें होय असें उत्तर दिलें. 'संघ सोडण्याचें कारण काय?' असें विचारलें असतां तो म्हणाला, "मला तुमच्याकडून औषध मिळावें व माझा रोग बरा व्हावा ह्याच हेतूनें मी संघांत प्रवेश केला; व रोग बरा झाल्याबरोबर संघाला सोडून निघालों." हें त्या मनुष्याचें कृत्य जीवकाला आवडलें नाहीं. बुद्धाजवळ जाऊन 'अशा रोग्यांना संघांत घेण्यांत येऊं नये' अशी त्यानें विनंती केली. बुद्धानें त्याला धर्मोपदेश केल्यावर तो बुद्धाला वंदन करून निघून गेला. तेव्हां बुद्ध भिक्षूंना म्हणाला, "आजपासून अशा रोग्यांना संघांत घेण्याची मी मनाई करतों."

२८. त्या काळीं बिंबिसार राजाच्या राज्याच्या सरहद्दीवर बंड चाललें होतें. तेव्हां बिंबिसार राजानें तें मोडण्यास आपल्या सेनानायक महामात्रांना आज्ञा केली. त्यांनीं लढाईची तयारी चालविली; परंतु कित्येक प्रसिद्ध शिपायांच्या मनांत असा विचार आला कीं, ह्या लढाईच्या नादीं लागून आम्ही पुष्कळ पाप पैदा करतों; ह्यांतून मुक्त होऊन कल्याणाचा मार्ग आम्हांस कसा मिळेल? शाक्यपुत्रीय[1] श्रमण पंथांत शिरल्यानें आपण युद्धांतून सुटूं असें वाटून त्यानीं संघांत प्रवेश केला. इकडे महामात्रांनीं त्यांचा शोध चालविला असतां ते बौद्ध भिक्षु झाले आहेत असें आढळून आलें; व त्यांनीं ती तक्रार बिंबिसार राजाजवळ नेली. बिंबिसार राजा न्यायाधिशांना (वोहारिकांना) बोलावून म्हणाला, "सैन्यांतील योद्ध्याला जो प्रव्रज्या देईल त्याला कोणता दंड करावयास पाहिजे?" न्यायाधिश म्हणाले, "राजयोद्ध्याचा जो उपाध्याय होईल त्याचें डोकें कापावें; संघांत जाहीर करणाऱ्याची जीभ तोडावी; व हजर असलेल्या भिक्षूंच्या अर्ध्या बरगड्या मोडाव्या. तेव्हां बिंबिसार भगवान् बुद्धाकडे जाऊन त्याला वंदन करून म्हणाला, "भदंत असें पुष्कळ राजे आहेत कीं, ज्यांची भगवंतावर श्रद्धा नाहीं; व ते थोडक्या-

१. बौद्ध.

साठी भिक्षूंना त्रास देण्यास तयार असतात. तेव्हां भिक्षूंनीं राजयोद्धयाला प्रव्रज्या देऊं नये हें बरें." बुद्धानें बिंबिसार राजाला धर्मोपदेश केल्यावर बुद्धाला नमस्कार करून तो निघून गेला. नंतर बुद्ध भिक्षूंना म्हणाला, "आजपासून राजयोद्धयाला प्रव्रज्या देऊं नये."

२९. आणखीहि निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या तऱ्हेच्या माणसांना संघांत येण्याची बुद्धानें मनाई केली. त्याचा सारांश असाः— कोणत्याहि प्रकारच्या चोराला संघांत घेतां कामा नये. कर्जदाराला संघांत घेतां कामा नये. दासाला जोपर्यंत तो दास्यांत आहे तोपर्यंत संघांत घेतां कामा नये. ज्याच्या वयाला वीस वर्षे पुरीं झालीं नाहींत अशा तरुणाला संघांत घेतां कामा नये. जो संघाच्या परवानगीवांचून आपण होऊनच संघांत शिरला असेल त्याला संघांतून हाकून द्यावें व पुन्हां संघांत घेऊं नये. जो भिक्षु झाला असतां भिक्षुवेषानेंच इतर परिव्राजक पंथांत जाईल त्याला पुन्हां संघांत घेऊं नये. आई, बाप, आणि अर्हन्त ह्यांचा वध करणारा, भिक्षुणींवर जुलूम करणारा, संघभेदासाठीं प्रयत्न करणारा व बुद्धाला जखम करणारा, ह्यांना संघांत घेऊं नये, व चुकून घेण्यांत आलें असल्यास त्यांना संघाबाहेर घालवून द्यावें. नपुंसकाला संघांत घेऊं नये, व घेतलें असल्यास संघाबाहेर घालवून द्यावें. उपाध्याय असल्यावांचून उपसंपदा देऊं नये. तो उपाध्याय योग्य असावा.

३०. उपसंपदा देण्यापूर्वी उमेदवाराला एका बाजूला नेऊन संघानें परवानगी दिलेल्या भिक्षूनें संघापुढें त्याला कोणकोणत्या गोष्टी विचारण्यांत येणार आहेत हें समजावून सांगावें. नंतर त्या उमेदवाराला संघासमोर आणून हे प्रश्न विचारण्यांत यावेः—

कुष्ठ, गंड, किलास, क्षय व अपस्मार हे रोग, तुला नाहींत ना? तूं मनुष्य आहेस ना? तूं पुरुष आहेस ना? स्वतंत्र आहेस ना? (दास नाहींस ना?) ऋणमुक्त आहेस ना? आईबापांनीं तुला परवानगी दिली आहे ना? तुला वीस वर्षें पुरीं झालीं आहेत ना? तुझें नांव काय? तुझ्या उपाध्यायाचें नांव काय? ह्या प्रश्नांचीं त्यानें यथायोग्य उत्तरें दिल्यावर पद्धतीप्रमाणें विज्ञप्ति करून व त्रिवार संघांत जाहीर करून, कोणी हरकत घेतली नाहीं तर त्याला संघांत उपसंपदा मिळाली असें समजावें.

३१. नंतर पावलें घालून सावली मोजावी[1]. कोणता ऋतु व दिवसाचा कोणता भाग हें त्यास सांगावें. २३ व्या कलमांत सांगितलेले चार आश्रय त्यास सांगावे. तदनंतर त्याला चार अकार्य गोष्टी सांगाव्या:– ( १ ) संघांत प्रवेश केलेल्या भिक्षूनें पशूशीं देखील मैथुन-व्यवहार करतां कामा नये. जो भिक्षु मैथुन-व्यवहार करील तो अश्रमण होईल. अशाक्यपुत्रीय होईल. जसा डोकें कापलेला मनुष्य नुसत्या धडानें जगू शकत नाहीं. तसा मैथुन-व्यवहार केलेला भिक्षु श्रमण राहूं शकत नाहीं. शाक्यपुत्रीय होऊं शकत नाहीं. म्हणून ही गोष्ट तूं आमरण करतां कामा नये. ( २ ) संघांत प्रवेश केलेल्या भिक्षूनें गवताच्या काडीचीहि चोरी करतां कामा नये. जो भिक्षु पावलीच्या किंवा त्यापेक्षां जास्त किंमतीचा पदार्थ चोरतो तो अश्रमण होतो. अशाक्यपुत्रीय होतो. पिकलेलें पान खालीं पडलें असतां पुन्हां जसें हिरवें होणें शक्य नाहीं तसा हा भिक्षु श्रमण राहणें शक्य नाहीं. शाक्यपुत्रीय राहणें शक्य नाहीं. म्हणून ही गोष्ट तूं आमरण करतां कामा नये, ( ३ ) संघांत प्रवेश केलेल्या भिक्षूनें जाणूनबुजून किड्यामुंगीसारख्या प्राण्यालाहि मारतां कामा नये. जो भिक्षु जाणूनबूजून–गर्भावस्थेंतील देखील–मनुष्यप्राण्याला ठार मारील तो अश्रमण होईल, अशाक्यपुत्रीय होईल. द्विधा झालेली शिला जशी पुन्हां सांधतां येत नाहीं तसा हा भिक्षु श्रमण राहूं शकत नाहीं. शाक्यपुत्रीय राहूं शकत नाहीं. म्हणून ही गोष्ट तूं आमरण करतां कामा नये. ( ४ ) संघांत प्रवेश केलेल्या भिक्षूनें आपणांस एकांत आवडतो एवढी देखील बढाई मारूं नये. जो भिक्षू असदिच्छेनें आपणांस प्राप्त झाली नसलेली समाधि प्राप्त झाली आहे असें लोकांस सांगतो, आपणास प्राप्त झाला नसलेला मार्ग किंवा फळ प्राप्त झालें आहे असें सांगतो, तो अश्रमण होतो, अशाक्यपुत्रीय होतो. डोकें कापलेला ताडवृक्ष जसा पुनरपि वाढू शकत नाहीं तसा हा भिक्षु श्रमण राहूं शकत नाहीं, शाक्यपुत्रीय राहूं शकत नाहीं. म्हणून ही गोष्ट तूं आमरण करतां कामा नये.

## श्रामणेरप्रव्रज्या

३२. भगवान् बराच काळ राजगृहांत राहून कपिलवस्तूला आला, तेथें तो निग्रोधारामांत रहात असे. एके दिवशीं भगवान् शुद्धोदनाच्या

---

१. पावलांनीं सावली मोजून वेळ समजण्याची पद्धति होती.

घराच्या बाजूनें भिक्षेला गेला. राहुलाची आई त्याला पाहून राहुल कुमाराला म्हणाली, " बा राहुला, हा तुझा पिता आहे. त्याजवळ जाऊन आपलें दायाद्य माग. " तेव्हां राहुल बुद्धापुढें जाऊन उभा राहिला आणि म्हणाला, " हे श्रमणा, तुझी सावली सुखकर आहे." भगवान् आसनावरून उठून चालता झाला, व राहुल " मला दायाद्य द्या. दायाद्य द्या. " असें म्हणून मागोमाग गेलों. विहारांत गेल्यावर राहुलाला दायाद्य द्यावयाच्या उद्देशानें सारिपुत्राला बोलावून भगवन्तानें त्याला प्रव्रज्या देण्यास सांगितलें.

३३. राहुलकुमाराला आपण कशाप्रकारें प्रव्रज्या द्यावी अशी सारिपुत्रानें पृच्छा केली, तेव्हां भगवान ह्या प्रकरणीं भिक्षुंना गोळा करून म्हणाला, " भिक्षुहो, तीन शरणगमनांनीं श्रामणेरप्रव्रज्या देण्यांत यावी. ती अशी:— प्रथम त्या मुलाचें क्षौर करावें. त्याला काषायवस्त्रें नेसवावीं, व भिक्षूंच्या पायां पडावयास लावून उकिडव्यानें हात जोडून बसवावें व हीं वचनें त्रिवार उच्चारावयास लावावीं—

बुद्धं सरणं गच्छामि
धम्मं सरणं गच्छामि
संघं सरणं गच्छामि

ह्या तीन वचनांनीं श्रामणेराला प्रव्रज्या द्यावी." ह्याप्रमाणें सारिपुत्रानें राहुलकुमाराला प्रव्रज्या दिली.

३४. तेव्हां शुद्धोदन शाक्य भगवंताजवळ येऊन म्हणाला, " मी भगवंताजवळ एक वर मागतों." बुद्ध म्हणाला, " तथागत वर देत नसतात." शु०— " जो वर योग्य असून अनवद्य आहे तो भगवान् देईल कीं नाहीं ?" भ०—" असें असेल तर बोला." शु०— " भगवंतानें प्रव्रज्या घेतली तेव्हां मला अत्यंत दुःख झालें. त्यानंतर नंद भिक्षु झाला. त्या वेळीं झालें व आतां राहुल श्रामणेर झाला तेव्हां तर विचारूं नये. पुत्रप्रेम असें आहे कीं, तें कातडी, मांस, स्नायु व हाडें ह्यांनाहि भेदून जातें. तेव्हां आजपासून आईबापांनीं परवानगी दिल्याशिवाय कोणालाहि श्रामणेर किंवा भिक्षु करण्यांत येऊं नये." शुद्धोदन शाक्य निघून गेल्यावर बुद्ध म्हणाला, " आजपासून आईबापांनीं परवानगी दिल्यावांचून मुलाला प्रव्रज्या देऊं नये."

३५. कपिलवस्तूहून बुद्ध श्रावस्तीला आला. तेथें बरेच श्रामणेर गोळा झाले होते. आपणास पाळावयाचे नियम कोणते अशी त्यांस शंका आली; तेव्हां खालील दहा नियम पाळण्यास शिकावें अशी भगवंतानें त्यांस परवानगी दिली (१) प्राणघातापासून विरति. (२) अदत्तादानापासून विरति. (३) अब्रह्मचर्यापासून विरति. (४) असत्य भाषणापासून विरति. (५) सुरापानादिक मादक पदार्थांपासून विरति (६) विकालभोजनापासून विरति. (७) ग्राम्य नृत्य गीत वाद्यांपासून विरति. (८) पुष्पमाला गंधविलेपन भूषणें इत्यादिकांपासून विरति. (९) उंच आणि उंची शय्येपासून विरति. (१०) सोनें आणि रुपें ग्रहण करण्यापासून विरति. हे श्रामणेरांनीं पाळण्यायोग्य दहा नियम आहेत. ते पाळण्यास त्यांनीं शिकावें.

३६. त्या काळीं कांहीं श्रामणेर भिक्षूंचा आदर ठेवीत नसत. तेव्हां त्यांना दंड करण्याची बुद्धानें परवानगी दिली. तो दंड असा:— त्यांना आपल्या उठण्याबसण्याच्या खोलींतून बाहेर जाण्यास सांगावें. परंतु विहाराच्या आवाराबाहेर घालवून देऊं नये. त्यांना जेवणाखाणाची मनाई करूं नये. जो श्रामणेर प्राणघात, चोरी, अब्रह्मचर्य, असत्य भाषण किंवा मद्यपान करील, अथवा बुद्धाची, धर्माची किंवा संघाची निंदा करील, मिथ्यादृष्टि घेऊन बसेल, किंवा भिक्षुणीशीं असभ्य व्यवहार करील, त्याला श्रामणेर ठेवूं नये; संघांतून बाहेर करावें.

## उपोसथ

३७. त्या काळीं बुद्ध भगवान् राजगृह येथें गृध्रकूट पर्वतावर राहत होता. तेव्हां बिंबिसार राजा त्याजपाशीं येऊन वंदन करून एका बाजूला बसला आणि म्हणाला, “ भदंत, मी एकटाच असतांना माझ्या मनांत असा विचार आला कीं, दुसऱ्या पंथांतील परिव्राजक चतुर्दशी, पंचदशी ( पौर्णिमा किंवा अमावास्या ) आणि अष्टमी ह्या तीन दिवशीं एकत्र जमून धर्मोपदेश करीत असतात. लोक धर्मोपदेश ऐकण्यासाठीं त्यांजकडे येतात व त्यांच्यावर प्रसन्न होतात. तेव्हां आपलेहि भिक्षू दर पंधरवड्याला एकत्र जमले असते तर बरें झालें असतें. ” बुद्धानें बिंबिसाराला धर्मोपदेश केल्यावर, बुद्धाला नमस्कार करून तो निघून गेला. तेव्हां भिक्षूंना बोलावून बुद्ध म्हणाला, “ भिक्षुहो,

दर पंधरवड्यास चतुर्दशी, पंचदशी आणि अष्टमी ह्या तीन दिवशीं एकत्र जमण्यास मी तुम्हांस परवानगी देतों."

३८. त्या काळीं बुद्धानें परवानगी दिली आहे असें म्हणून भिक्षु ह्या तीन दिवशीं एकत्र जमून मुकाट्यानें बसत असत. लोक धर्मोपदेश ऐकण्याच्या उद्देशानें त्यांजकडे येत. परंतु ते मुकाटयानें बसलेले पाहून लोकांना आश्चर्य वाटे, व ते त्यांस दोष लावीत. ही गोष्ट बुद्धाला समजली, तेव्हां तो भिक्षूंना म्हणाला "भिक्षुहो, दर पंधरवड्यांत चतुर्दशी, पंचदशी आणि अष्टमी ह्या तीन दिवशीं एकत्र जमून लोकांना धर्मोपदेश करण्यास मी परवानगी देतों."

३९. त्यानंतर बुद्धाच्या मनांत असा विचार आला कीं, जे मी भिक्षूंना नियम घालून दिले आहेत ते प्रातिमोक्षाच्या[१] रूपानें त्यांनीं उपोसथाच्या दिवशीं म्हणावे. म्हणजे हेंच त्यांचें उपोसथकर्म होईल. तेव्हां ह्या प्रकरणीं भिक्षूंना बोलावून त्यानें आपला विचार कळविला; व तो म्हणाला, "भिक्षुहो, आजपासून प्रातिमोक्ष म्हणण्याची मी तुम्हांला परवानगी देतों." तो म्हणण्याचा विधि असाः—

समर्थ भिक्षूनें संघास विज्ञप्ति करावी. "भदंत संघ, माझ्या बोलण्याकडे लक्ष द्या. आज पंचदशीचा उपोसथ आहे. जर संघाला योग्य वाटत असेल तर संघानें उपोसथ करावा, प्रातिमोक्ष म्हणावा. संघाचें पूर्वकृत्य कोणतें? बंधुहो, तुम्हीं आपत्तींपासून परिशुद्ध आहांत कीं काय तें सांगा; म्हणजे मी प्रातिमोक्ष म्हणतों. तो आम्हीं सर्वांनीं लक्ष देऊन चांगल्या रितीनें ऐकावा. (प्रातिमोक्षापैकीं) ज्याच्या हातून जी आपत्ति (दोष) घडली असेल ती त्यानें सांगावी; आपत्ति नसेल तर मुकाट्यानें राहावें. मुकाटयानें राहिल्यानें, बांधवहो, तुम्ही परिशुद्ध आहांत असें मी समजेन. अशा सभेंत तीनदा जाहीर करणें म्हणजे प्रत्येकाला अलग अलग विचारून खुलासा करून घेण्यासारखें आहे. तीनदां जाहीर केलें असतां जो भिक्षु आठवण असलेली आपत्ति उघडपणें सांगणार नाहीं, त्याजवर जाणूनबुजून खोटें बोलण्याचा आरोप येईल. जाणूनबुजून खोटें बोलणें (धर्म मार्गांत) अंतरायकारक

---

१. दुसऱ्या भागात सांगितलेल्या प्रतिबंधक नियमांच्या संग्रहाला प्रातिमोक्ष म्हणतात.

आहे असें भगवंतानें सांगितलें आहे. म्हणून जो भिक्षु परिशुद्ध होण्याची इच्छा करतो, त्यानें आठवत असलेली आपत्ति संघांत उघड करून सांगावी. कारण असें केलें तर त्याला सुख होईल. " असें बोलून त्या भिक्षूनें प्रातिमोक्ष म्हणावा.

४०. भगवंतानें प्रातिमोक्ष ह्मणण्यास परवानगी दिली आहे असें म्हणून भिक्षु दररोज प्रातिमोक्ष म्हणूं लागले. तसें करण्याची भगवंतानें मनाई केली; व पंधरवड्याला, चतुर्दशी किंवा पंचदशी ह्या दोहोंपैकीं कोणत्यातरी दिवशीं एकदां प्रातिमोक्ष म्हणण्याची परवानगी दिली. कांहीं भिक्षु आपापल्या मंडळांत प्रातिमोक्ष म्हणूं लागले. पण तसें न करतां सर्वांनीं एकत्र जमून उपोसथ करावा असा बुद्धानें नियम केला. पण 'सर्वांनीं' ह्याचा अर्थ काय हें भिक्षूंना समजेना. तेव्हां बुद्धानें 'एका ठिकाणीं राहणारे सर्व भिक्षु' असा त्याचा अर्थ केला. पुढें एका ठिकाणीं राहणारे कोण ह्याविषयींहि शंका येऊं लागली. म्हणजे एका गांवांत कांहीं भिक्षु असत तर त्याच्या जवळच्या गांवांतहि कांहीं असत. तेव्हां एका ठिकाणीं याची मर्यादा कोठपर्यंत न्यावी हें समजेना. भगवंताला ही गोष्ट सांगण्यांत आली तेव्हां तो म्हणाला, " भिक्षुहो, सीमा ठरविण्याची मी परवानगी देतों. ती अशी:—

पर्वत, पाषाण, अरण्य, वृक्ष, रस्ता, वारूळ, नदी आणि उदक ह्यांच्या योगानें एका ठिकाणच्या सीमा ठरवाव्या. नंतर समर्थ भिक्षूनें संघाला विज्ञप्ति करावी. 'अशा अशा चिन्हानें सीमा ठरविण्यांत आली आहे. जर संघास योग्य वाटत असेल तर ह्या सीमेच्या आंत राहणाऱ्या भिक्षूंनीं एकत्र उपोसथ करावा असें संघानें ठरवावें.' ही विज्ञप्ति झाली. नंतर ही गोष्ट त्यानें त्रिवार संघांत जाहीर करावी; व कोणी हरकत घेतली नाहीं म्हणजे ती सीमा संघास पसंत पडली असें समजावें. सीमा तीन योजनांपेक्षां विस्तीर्ण असतां कामा नये; व ती नदीच्या पारहि असूं नये. "

४१. त्या काळीं भिक्षु एका सीमेंत आळीपाळीनें निरनिराळ्या विहारांत प्रातिमोक्ष म्हणत असत. पण जे इतर ठिकाणाहून भिक्षु येत त्यांना उपोसथ कोठें होणार आहे हें समजण्यास मारामार पडे. म्हणून संघाच्या अनुमतीनें कोणती तरी एक जागा मुक्रर करून तेथें प्रातिमोक्ष म्हणावा असा भगवंतानें नियम केला. उपोसथाची जागा आकुंचित असल्यास तिच्या-

बाहेर बसून जरी प्रातिमोक्ष ऐकला तरी त्यांत दोष नाहीं. उपोसथाचा दिवस कोणता हें भिक्षूंनीं आगाऊ समजावून घ्यावें. जो वृद्ध पुढारी भिक्षु असेल त्यानें आगाऊ दिवस सांगावा. त्या स्थविरानें तरुण भिक्षूंकडून उपोसथागार साफ करून घ्यावें; आसनें मांडावयास लावावीं; दिवा लावण्यास सांगावें; पिण्याचें पाणी व पाय धुण्याचें पाणी तयार ठेववावें. जेथें भिक्षुणी बसली असेल तेथें प्रातिमोक्ष म्हणण्यात येऊं नये.

## वर्षावास ( चातुर्मास्य )

४२. बुद्ध भगवान् राजगृह येथील वेळुवनांत रहात होता. त्या काळीं भगवंतानें वर्षाकाळांत भिक्षूंनीं एका ठिकाणीं रहावें असा नियम केला नव्हता. भिक्षु हिंवाळ्यांतहि, उन्हाळ्यांतहि आणि पावसाळ्यांतहि धर्मोपदेश करीत फिरत असत. पण त्यांच्या त्या कृत्यांवर लोक टीका करूं लागले. पावसाळ्यांत इकडे तिकडे हिंडून हे भिक्षु ओलें गवत तुडवतात, व त्यायोगें पुष्कळ बारीकसारीक प्राण्यांचा नाश होतो असें ते म्हणूं लागले. ही गोष्ट भगवंताला समजली तेव्हां भिक्षूंनीं वर्षाकाळीं एकाच ठिकाणीं रहावें असा त्यानें नियम केला. कोणत्या दिवशीं वर्षावासाला सुरवात व्हावी अशी भिक्षूंना शंका आली. तेव्हां भगवंतानें, आषाढी पौर्णिमेच्या दिवशीं पहिल्या वर्षावासाला व आषाढी पौर्णिमेनंतर एका महिन्यानें दुसऱ्या वर्षावासाला सुरवात व्हावी असा नियम केला. वर्षावासाला सुरवात झाल्यानंतर भिक्षूनें तीन महिने एका ठिकाणीं राहिलें पाहिजे. पण त्याला कांहीं अपवाद आहेत ते असेः— एखादा श्रद्धापूर्ण उपासक किंवा उपासिका कांहीं दान-धर्म करीत असली तर सात दिवसांच्या मुदतीनें त्याच्या किंवा तिच्या आमंत्रणावरून तिकडे जावें. भिक्षु, भिक्षुणी, आईबाप वगैरे आजारी असतील तर सात दिवसांच्या मुदतीनें त्यांस भेटावयास जावें.

## प्रवारणा

४३. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथ पिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्याकाळीं कांहीं भिक्षु कोसल राष्ट्रांत एका आवासांत वर्षावासासाठीं राहिले. आपण वादविवाद उपस्थित झाल्यावांचून एकमतानें वर्षावास कसा घालवूं व आपणांस भिक्षेची पंचाईत कशी पडणार नाहीं ह्यासंबंधानें ते विचार करूं लागले. शेवटीं त्यांनीं असा नियम केला कीं,

ह्या वर्षाकाळांत कोणी कोणाशीं संभाषण करूं नये. जो भिक्षाटण करून प्रथम विहारांत येईल त्यानें आसनें मांडावीं; पाय धुण्याचें पाणी व पाट ठेवावा; उरलेलें अन्न काढून ठेवण्याचें ताट धुवून ठेवावें; पिण्याचे आंचवण्याचें पाणी तयार ठेवावें. जो सर्वांच्या शेवटीं भिक्षाटन करून येईल त्यानें शिल्लक राहिलेल्या अन्नापैकीं अन्न पाहिजे तर घ्यावें, नको असल्यास जेथें हिरवें गवत नसेल तेथें किंवा पाण्याच्या प्रवाहांत तें टाकावें. त्यानें आसनें गोळा करावीं, पाय धुण्याचें पाणी, पाट वगैरे काढून बाजूस ठेवावे; शिल्लक राहिलेलें अन्न ठेवण्याचें ताट धुवून ठेवावें; पिण्याचें पाणी व आंचवण्याचें पाणी पूर्वीच्या जागीं ठेवावें; व जेवण्याची जागा झाडून साफ करावी. जो पिण्याच्या पाण्याचा, वापरण्याच्या पाण्याचा किंवा पायखान्यांतील पाण्याचा घडा रिकामा पाहील, त्यानें तो भरून ठेवावा. तो एकट्याला उचलतां येणें शक्य नसल्यास दुसऱ्याला खुणेनें बोलावून मदत करावयास लावावी; परंतु शब्द उच्चारूं नये. ह्याप्रमाणें आपण वादविवाद केल्यावांचून एकीनें राहूं व आपणांस भिक्षेची कमतरता पडणार नाहीं, असें त्यांस वाटलें.

४४. वर्षाकाल संपल्यावर बुद्ध भगवंताच्या दर्शनास जाण्याची भिक्षूंची वहिवाट असे. त्याप्रमाणें हे भिक्षुहि श्रावस्ती येथें भगवंताच्या दर्शनाला आले. आपल्या भेटीला आलेल्या भिक्षूंना कुशलसमाचार विचारावा असा बुद्ध भगवंताचा परिपाठ होता. म्हणून तो भिक्षूंना म्हणाला, “भिक्षुहो, तुमचें कसें काय चाललें आहे ? तुम्ही सामग्रीनें, प्रेमानें व विवाद केल्या-वांचून वर्षाकाल सुखानें घालविला ना ? जेवणाखाणाचा तुम्हांला त्रास पडला नाहीं ना ?” त्या भिक्षूंनीं, ‘आपण मोठ्या आनंदानें वर्षाकाल घालविला’ असें उत्तर दिलें. पण तथागतांची चाल अशी आहे कीं, जाणत असतांहि ते प्रश्न विचारितात, जाणत असतांहि विचारीत नाहींत, काळवेळ पाहून विचारतात, काळवेळ पाहून विचारीत नाहींत, लाभदायक प्रश्न विचारतात, हानिकारक प्रश्न विचारीत नाहींत; कांकीं, हानिकारक गोष्टींपासून तथागत फार दूर रहातात. ते दोन कारणासाठीं प्रश्न विचारतात. धर्मोपदेश करण्याच्या उद्देशानें किंवा श्रावकांना नवीन नियम घालून देण्याच्या उद्देशानें. म्हणून भगवान् त्या भिक्षूंना म्हणाला, “तुम्हीं सामग्रीनें आणि आनंदानें वर्षाकाल कसा घालविला तें सांगा.”

४५. त्या भिक्षूंनीं, आपण परस्पराशीं न बोलण्याचा नियम करून कसे वागलों हें सर्व भगवंताला सांगितलें. तेव्हां भगवान् सर्व भिक्षूंना उद्देशून म्हणाला, " हे निरुपयोगी मनुष्य मोठ्या दु:खानें वर्षाकाल घालवून, आपण सुखानें वर्षाकाल घालविला असें सांगत आहेत. पशूंसारखें राहून, आपण सुखानें राहिलों असें सांगत आहेत. मेंढरांसारखें राहून, आपण सुखानें राहिलों असें सांगत आहेत. प्रमत्तभावानें राहून आपण सुखानें राहिलों असें सांगत आहेत. ह्या निरुपयोगी मनुष्यांनीं इतर पंथांच्या परिव्राजकांप्रमाणें मूकव्रत धारण करावें हें कसें ? भिक्षूहो, अन्य परिव्राजकांप्रमाणें मूकव्रत धारण करण्यांत येऊं नये. वर्षकाल संपल्यावर पाहिलेल्या, ऐकलेल्या किंवा परिशङ्कित दोषांची प्रवारणा करावी. तीच तुम्हांला योग्य होईल; व ती येणेंप्रमाणें:—समर्थ भिक्षूनें संघाला विज्ञप्ति करावी, 'भदंत संघानें माझ्या बोलण्याकडे लक्ष द्यावें; आज प्रवारणेचा दिवस आहे; जर संघाला योग्य वाटेल तर संघानें आज प्रवारणा करावी.' नंतर सर्वांत जो वृद्ध भिक्षु असेल त्यानें उत्तरासंग एका खांद्यावर करून उकिडव्यानें वसून म्हणावें कीं, 'आयुष्मान् संघाला माझे जे दोष दिसले असतील. ऐकूं आले असतील किंवा त्यांची शंका आली असेल तर ते दाखवून देण्याची मी विनंती ( प्रवारणा ) करतों; माझ्यावर अनुकंपा करून संघानें ते दोष मला दाखवावे; मला ते पटल्यास त्यांचें यथायोग्य प्रायश्चित्त करीन.' असें त्यानें त्रिवार म्हणावें. जे भिक्षु तरुण असतील त्यांनीं 'आयुष्मान् संघ' असें म्हणण्याऐवजीं 'भदंत संघ' असें म्हणावें. त्या वेळीं कोणी कोणाचे दोष दाखवून दिल्यास, ते त्यानें सरळपणें स्वीकारावे, व संघाची माफी मागावी. ह्याप्रमाणें वर्षाकाळाअखेर संघांत ऐक्य स्थापन करण्यांत यावें."

## वहाणा

४६. बुद्ध भगवान् राजगृह येथें गृध्रकूट पर्वतावर रहात होता. त्या काळीं बिंबिसार राजा ८०००० गांवांवर आपली सत्ता चालवीत असे. कांहीं राजकीय कामासाठीं बिंबिसार राजानें त्या सर्व गांवांच्या ८०००० पुढाऱ्यांना राजगृहाला बोलावून मोठी सभा भरविली होती. सोण कोळिविस नांवाचा एक तरुण श्रेष्ठी त्या काळीं चंपानगरींत रहात होता. तो इतका

सुकुमार होता कीं, त्याच्या पायाच्या तळव्याला केस आले होते. राजगृहांत ही मोठी सभा भरली असतां सोणाला पाहण्याची बिंबिसार राजाला इच्छा झाली; व त्यानें त्याला चंपेहून बोलावून आणिलें. आपल्या राज्याच्या उन्नतीला काय केलें पाहिजे तें सगळें ८०००० पुढाऱ्यांना समजावून देऊन बिंबिसार राजा म्हणाला, "ऐहिक संपत्ति कशी मिळवावी त्याचा मार्ग मी तुम्हांस दाखविला आहे. आतां तुम्ही बुद्ध भगवंतापाशीं जा. तो तुम्हांस पारमार्थिक संपत्तीचा उपदेश करील." त्या वेळीं सागत नांवाचा भिक्षु बुद्धाचा 'उपस्थायक'[1] होता. जेव्हां हे ८०००० गांवांचे पुढारी गृध्रकूट पर्वतावर बुद्धदर्शनाला आले, तेव्हां सागत भिक्षूनें बुद्धाच्या सांगण्याप्रमाणें विहाराच्या सावलींत मोकळ्या जागीं त्यांना बसविण्याची सोय केली; व तेथें बुद्धानें त्यांना उपदेश केला; आणि ते सर्व बुद्धाचे उपासक झाले.

४७. त्या सभेंत सोण कोळिविसहि होता. त्याला असें वाटलें कीं, भगवंताच्या उपदेशाप्रमाणें गृहस्थाला अत्यंत परिशुद्ध ब्रह्मचर्य पाळणें शक्य नाहीं, तेव्हां आपण भिक्षु व्हावें हें बरें. ते ८०००० गांवांचे पुढारी भगवंताला वंदन करून गेल्यावर सोण भगवंतापाशीं आला, व वंदन करून एका बाजूला बसला, आणि म्हणाला, "हे भगवान्, आपल्या धर्मोपदेशाप्रमाणें मला असें वाटतें कीं, गृहस्थाश्रमांत राहून अत्यंत परिशुद्ध ब्रह्मचर्य पाळणें शक्य नाहीं; तेव्हां आपण मला प्रव्रज्या द्या." भगवंतानें त्याला प्रव्रज्या दिली, व तो शीत वनांत राहूं लागला. तेथें रात्रीं चंक्रमण करीत असतां त्याच्या पायांतून रक्त निघून सर्व जागा रक्तानें माखली जात असे. तेव्हां त्याच्या मनांत असा विचार आला कीं, भगवंताच्या श्रावकांत जे कोणी अत्यंत उत्साही असतील त्यांपैकीं मी एक आहें; आणि असें असतां माझें चित्त आश्रवांपासून[2] विमुक्त होत नाहीं. माझ्या कुळांत पुष्कळ संपत्ति आहे. मला तिचा उपभोग घेतां येईल, व पुष्कळ दानधर्म करतां येईल. तेव्हां पुन्हां गृहस्थाश्रम स्वीकारून संपत्तीचा उपभोग घ्यावा व दानधर्म करावा हें बरें.

---

१ जवळ राहून यथायोग्य सेवा करणारा.

२. चित्ताच्या दोषांपासून.

४८. सोणाचा हा विचार भगवंतानें जाणला व गृध्रकूट पर्वतावरून एकदम शीतवनांत येऊन, कांहीं भिक्षूंना बरोबर घेऊन, भिक्षूंचीं वासस्थानें पहात पहात भगवान् सोणाच्या चंक्रमाकडे गेला, व तो चंक्रम रक्तानें माखलेला पाहून भिक्षूंना म्हणाला, 'असा हा चंक्रम रक्तानें भरलेला कां दिसतो?' 'सोण अत्यंत उत्साहानें रात्रीं ह्या चंक्रमावर फिरतो, व त्यामुळें त्याच्या पायांस जखमा होऊन रक्त निघतें व त्यामुळें हा चंक्रम असा दिसतो' असें भिक्षूंनीं भगवंताला सांगितलें. तेव्हां भगवान् सोणाच्या विहारांत जाऊन तेथें मांडलेल्या आसनावर बसला. सोणहि भगवंताला नमस्कार करून एका बाजूला बसला. तेव्हां भगवान् त्याला म्हणाला, "सोणा, पुन्हां गृहस्थाश्रम स्वीकारून संपत्तीचा उपभोग घ्यावा, व पुण्य-कर्में करावीं असा विचार तुझ्या मनांत आला नाहीं काय?" सोणः— होय भदंत. "सोणा, पूर्वीं तूं गृहस्थ असतां वीणा वाजविण्यांत कुशल होतास नव्हे काय?" सोणः— होय भदंत. "पण जेव्हां तूं तारा अतिशय ताणीत होतास तेव्हां तुझ्या वीण्यांतून स्वर बरोबर निघत असे काय? व तुला तो नीट वाजवितां येत असे काय?" सोणः— नाहीं भदंत. "पण सोणा, जेव्हां तुझ्या वीण्याच्या तारा अत्यंत शिथिल होत असत तेव्हां त्यांतून स्वर बरोबर निघत असे काय? व तो तुला नीट वाजवितां येत असे काय?" सोणः— नाहीं भदंत. "पण सोणा, जेव्हां वीण्याच्या तारा अत्यंत ताणल्या जात नसत किंवा अतिशिथिल होत नसत, व समप्रमाणांत असत, तेव्हां तुझ्या वीण्यांतून स्वर बरोबर निघत असत कीं नाहीं, व तुला तो नीट वाजवितां येत असे कीं नाहीं?" सोणः— होय भदंत. "ह्याचप्रमाणें सोणा, अत्यंत उत्साहानें चित्त भ्रान्त होतें, व उत्साह शिथिल झाला असतां आळसाला कारणीभूत होतो. म्हणून सोणा, तूं वीर्यसमता संपादन कर, इंद्रियेंसमत्व[1] कसें मिळवावें हें शीक." असा उपदेश करून भगवान् गृध्रकूट पर्वतावर गेला.

४९. तदनंतर सोणानें वीर्यसमता संपादन केली; व इंद्रियसमत्व मिळविलें; आणि एकान्तांत राहून अल्पावधींतच तो अर्हन्तपदाला पावला;

---

१. इंद्रियसमत्वाविषयीं विशेष माहितीसाठीं बुद्धलीलासारसंग्रह पृ. १३० पहा.

तेव्हां भगवंताजवळ येऊन नमस्कार करून एका बाजूला बसला व म्हणाला, " भदंत, जो भिक्षु अर्हन्त झाला असेल त्याला नैष्कर्म्य, एकान्त, मैत्री, बंधनाचा क्षय, तृष्णेचा क्षय व ज्ञान ह्या सहा गोष्टी आवडतात. कोणाचीहि अशी समजूत होणें शक्य आहे कीं, केवळ श्रद्धेमुळें त्याला नैष्कर्म्य आवडतें. पण असें समजतां कामा नये. राग, द्वेष आणि मोह ह्यांचा क्षय करून वीतराग, वीतद्वेष व वीतमोह झाल्यामुळेंच त्याला नैष्कर्म्य आवडतें. दुसऱ्या एकाद्याची अशी समजूत होणें शक्य आहे कीं, लाभ, सत्कार व कीर्ति ह्याच्या आशेनें ह्याला एकान्त आवडतो. पण हें असें नव्हे. तो वीतराग, वीतद्वेष व वीतमोह असल्यामुळेंच त्याला एकान्त आवडतो. दुसऱ्या एकाद्याची समजूत अशी होणें शक्य आहे कीं, व्रतोपवासांवर विश्वास बसल्यानें त्याला मैत्रीभावना आवडते. पण हें असें समजतां कामा नये. तो वीतराग, वीतद्वेष व वीतमोह असल्यामुळेंच त्याला मैत्रीभावना आवडते. बंधनाचा क्षय, तृष्णेचा क्षय व ज्ञानप्राप्ति ह्यांचीहि आवड वीतराग, वीतद्वेष व वीतमोह झाल्यामुळेंच त्याला उत्पन्न होते. ह्याप्रमाणें जो चांगल्या रीतीनें मुक्त होतो त्याच्या मनाला रूपशब्दादि पंचेंद्रियांचे विषय व मनोवृत्ति बाधूं शकत नाहींत. त्याचें चित्त स्थिर आणि अप्रकंप्य होतें; आणि अनित्यता त्याला समजते. एखाद्या पर्वतावर चारी दिशांनीं वारा आणि पाऊस येऊन आदळले तर तो जसा कंप पावत नाहीं, त्याप्रमाणें पंचेंद्रियांच्या विषयांपासून किंवा मनोवृत्तींपासून अर्हन्ताचें चित्त प्रकंपित होत नाहीं."

५०. हें सोणाचें भाषण ऐकून भगवान् भिक्षूंना म्हणाला, " कुलपुत्र अशा रितीनें निर्वाणप्राप्ति प्रकट करीत असतात. मीपणा न दाखवितां सोणानें तात्पर्य सांगितलें. पण दुसरे कांहीं निरुपयोगी मनुष्य जणूं काय थट्टामस्करीच करीत आहेत अशा रितीनें निर्वाणप्राप्ति प्रकट करतात. पुढें त्यांना पश्चात्ताप करावा लागतो." तदनंतर भगवान् सोणाला उद्देशून म्हणाला, 'सोणा, तूं सुकुमार आहेस. एका पट्ट्याच्या वाहणा घालण्याची मी तुला परवानगी देतों.' सोण म्हणाला, " भदंत, ऐंशीं गाडेभर द्रव्य व ज्यांत बेचाळीस हत्तिणी व सात हत्ती आहेत एवढा मोठा लवाजमा सोडून मी भिक्षु झालों. असें असतां लोक मला म्हणतील कीं, एवढी मोठी धनदौलत

सोडून ह्याला आतां एका पट्याच्या वाहणांचा लोभ झाला आहे. पण जर भगवान् सर्व भिक्षुसंघाला वाहणा वापरण्याची परवानगी देईल तर मीहि वापरीन." तेव्हां ह्या प्रकरणीं भगवंतानें भिक्षूंना बोलावून वाहणा वापरण्याची परवानगी दिली. परंतु त्या वाहणा एका पट्याच्याच असल्या पाहिंजेत; व साध्या चामड्याच्या असल्या पाहिजेत. ताडपत्रादिकांच्या वाहणा निषिद्ध होत. आचार्य, उपाध्याय वगैरे उघड्या पायांनीं चंक्रमण करीत असतां, अन्तेवासिकांनीं आणि शिष्यांनीं वाहाणा घालून चंक्रमण करूं नये. ज्याच्या पायाला जखम झाली असेल त्याला हा नियम लागू नाहीं. कांहीं भिक्षु सकाळीं खडावा घालून फिरत होते. ह्यामुळें इतर भिक्षूंच्या समाधीचा भंग होत असे; म्हणून भगवंतानें खडावा वापरण्याची मनाई केली. भिक्षेला जातांना वहाणा घालून जातां कामा नये; पण आजारी भिक्षुला हा नियम लागू नाहीं.

५१. त्या काळीं आयुष्मान महाकात्यायन अवंतीं राष्ट्रांत कुररघर येथें प्रपात पर्वतावर रहात होता. त्याचा सोण कुटिकर्ण नांवाचा उपासक उपस्थायक होता. तो महाकात्यायनाला म्हणाला, "भदंत, आपल्या धर्मोपदेशानें मला असें वाटतें कीं, गृहस्थाश्रमांत राहून अत्यंत परिशुद्ध ब्रह्मचर्य पालन करणें शक्य नाहीं. म्हणून आपण मला प्रव्रज्या द्यावी." महाकात्यायन म्हणाला, "आमरण एकटा निजणें व दिवसांतून एकदां खाणें असें हें ब्रह्मचर्य पाळणें फार कठीण आहे. तूं गृहस्थाश्रमांत राहूनच बुद्धधर्माचें पालन कर. उपोसथाच्या दिवशीं एकटा निजणें व एकदां जेवणें हें व्रत पाळ." सोणानें दोनतीनदां अशीच याचना केली. तेव्हां महाकात्यायनानें त्याला श्रामणेरप्रव्रज्या दिली. परंतु अवंती राष्ट्रांत भिक्षु फार थोडे असल्यामुळें सोणाला उपसंपदा देण्यास दहा भिक्षु मिळेनात. तीन वर्षांनंतर इकडून तिकडून मोठ्या कष्टानें दहा भिक्षु गोळा करून महाकात्यायनानें सोणाला उपसंपदा दिली.

५२. तो वर्षाकाल संपल्यावर सोण महाकात्यायनाला म्हणाला, "भगवंताची मीं कीर्ति ऐकली आहे खरी, पण त्याला मीं पाहिलें नाहीं. त्याच्या भेटीला जाण्याची मला परवानगी द्या." तेव्हां महाकात्यायन म्हणाला, "फार चांगलें. तूं भगवंतांच्या दर्शनाला जा; व माझ्या तर्फेनेंहि

भगवंताला नमस्कार करून सांगः– ( १ ) भदंत अवंतीदक्षिणापथांत भिक्षु फार थोडे. तीन वर्षानंतर मोठ्या कष्टानें दहा भिक्षु गोळा करून मला उपसंपदा देण्यांत आली. तेव्हां ह्या प्रदेशांत ह्याहीपेक्षां कमी भिक्षूंनीं उपसंपदा देण्याची परवानगी द्यावी. ( २ ) अवंतीदक्षिणापथांतील जमीन प्रखर व कांटे फार. तेव्हां ह्या प्रदेशांत चार किंवा जास्ती पट्टयांच्या वाहणा वापरण्यास परवानगी द्यावी. ( ३ ) ह्या प्रदेशांतील लोक स्नानप्रिय आहेत. तेव्हां नित्यस्नान करण्याची परवानगी द्यावी. ( ४ ) येथील लोक बसण्या-उठण्यास निरनिराळ्या प्रकारचीं चामडीं फार वापरीत असतात. मध्यदेशांत जशा चटया तशीं इकडे चामडीं. तेंव्हां एडकचर्म, अजचर्म व मृगचर्म वापरण्यास परवानगी द्यावी."

५३. सोण कुटिकर्ण महाकात्यायनाला वंदन करून आपलें पात्र चीवर घेऊन क्रमशः प्रवास करीत श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत आला, व तेथें भगवंताला नमस्कार करून एका बाजूला बसला. भगवंतानें त्याच्या निजण्याची सोय आपल्याच विहारांत करविली; व बरीच रात्रपर्यंत मोकळ्या हवेंत चंक्रमण करून विहारांत प्रवेश केला. बराच वेळ चंक्रमण करून सोणहि निजावयास गेला. पहांटेला उठून भगवान् सोणाला म्हणाला, "कांही तरी धर्म बोल." सोणानें सुत्त-निपातांतील अट्ठक वर्गांतील सूत्रें सुरांत म्हटलीं. भगवंतानें त्याचें अभिनंदन केलें. भगवान् त्याला म्हणाला, "संघांत येऊन तुला किती वर्षें झालीं ? "एकच वर्ष भदंत," असें सोणानें उत्तर दिलें. "इतक्या उशिरां तूं संघांत प्रवेश केलास हें कसें" असें भगवंतानें विचारिलें असतां तो म्हणाला, "भदंत कामोपभोगांत मला दोष दिसून आल्यास पुष्कळ काळ झाला. परंतु गृहस्थाश्रमांत अशा कांहीं अडचणी आणि अशीं कांहीं कामें असतात कीं, मनुष्य बद्ध होऊन राहतो." तें ऐकून भगवंतानें उद्गार काढिले ते असेः– "जगांत दोष पाहून आणि निष्प्रपंच धर्म जाणून पवित्र आर्य पापांत रमत नाहीं; बुद्धशासनांत रमतो."

५४. बुद्ध भगवान् आपणाला उत्तेजन देत आहे, व महाकात्यायनानें मागितलेल्या मागण्या सांगण्याची हीच वेळ आहे, असें जाणून सोणानें नमस्कार करून त्या मागण्या बुद्धासमोर ठेविल्या. ह्या प्रकरणीं भिक्षूंला

गोळा करून भगवान् म्हणाला, "आजपासून सर्व प्रत्यंतजनपदांत पांच भिक्षूंच्या समुदायाला (त्यांतील एक विनयधर असावा) उपसंपदा देण्याची मी परवानगी देतों. प्रत्यंतजनपद येणेंप्रमाणें:— पूर्वेला कजंगल नांवाचें शहर; त्यानंतर महाशाल आणि त्यानंतर प्रत्यंतजनपद. दक्षिण दिशेला श्वेतकर्णिक नांवाचें शहर. त्यानंतर प्रत्यंतजनपद. पश्चिमेला स्थूण (थूण) नांवाचा ब्राह्मण-ग्राम; नंतर प्रत्यंतजनपद. उत्तरेला उशीरध्वज नांवाचा पर्वत; नंतर प्रत्यंतजनपद." त्याचप्रमाणें भगवंतानें महाकात्यायनाच्या इतर मागण्या सर्व प्रत्यंतजनपदांतील भिक्षूंसाठीं मान्य केल्या.[१]

## औषध

५५. भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथ पिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं भिक्षूंनां शरदऋतूंत प्रकृति नीट न राहिल्यामुळें अजीर्ण होत असे. म्हणून बुद्धानें तूप, लोणी, तेल, मध, व काकवी हीं पांच औषधें घेण्यास परवानगी दिली. त्यानंतर वेळोवेळीं निरनिराळीं मुळें, पानें व फळें ह्यांचाहि औषधासाठीं उपयोग करण्यास परवानगी दिली. परंतु तूप, तेल वगैरे पदार्थ सात दिवसांपलिकडे जास्त दिवस संग्रहाला ठेवूं नये, असा बुद्धानें नियम केला.

५६. एकदां बुद्ध भगवान् मगध देशांतील अंधकविंद नांवाच्या गांवीं असतां एका ब्राह्मणाच्या मनांतून त्याला व भिक्षुसंघाला दान देण्याची फार हौस होती. परंतु लोकांच्या पाळ्या इतक्या लागल्या होत्या कीं, दोन महिनेपर्यंत त्याला सवडच मिळेना. शेवटीं, यवागू (तांदुळांची पेज) व मधुगोळक नांवाचा पदार्थ तयार करून दिला असतां बुद्ध तो स्वीकारील कीं काय असें त्यानें आनंदाला विचारलें. तेव्हां आनंदानें बुद्धाच्या परवानगीनें ब्राह्मणाला यवागू तयार करण्यास लाविलें. त्या प्रसंगीं बुद्धानें भिक्षूंना सकाळीं यवागू पिण्याची परवानगी दिली; व संघाला यवागू दिल्या-बद्दल त्या ब्राह्मणाची फार स्तुति केली. तेव्हांपासून सकाळीं यवागू पिण्याचा परिपाठ पडला.

---

१. ह्या चार मागण्यांपैकीं दुसरीचा आणि चवथीचाच ह्या प्रकरणाशीं संबंध आहे. तरी मूळ ग्रंथांतील पांचांपैकीं चार विशेष महत्वाच्या वाटल्यावरून त्या चार येथें दिल्या आहेत.

५७. एका काळीं बुद्ध भगवान् भद्दिय नगरांतून निघून अंगुत्तराप प्रदेशांत प्रवास करीत होता. त्याच्या बरोबर १२५० भिक्षू होते. हें वर्तमान भद्दिय येथील मेंडक नांवाच्या सावकाराला समजलें; व त्यानें संघाला लागणारी अन्नसामग्री आपल्या नोकरांकडून गाड्यांवर लादली, व तो भिक्षुसंघामागोमाग चालला. एका जंगली प्रदेशांत त्यानें बुद्धाला गांठलें, व त्याला संघासह भिक्षा ग्रहण करण्याला आमंत्रण केलें. बुद्धाचें आणि भिक्षूंचें भोजन झाल्यावर मेंडक भगवंताला म्हणाला, "भदंत पुष्कळ ठिकाणीं रस्ता जंगली प्रदेशांतून जात असतो. तेथें अन्नपाण्याची मोठी पंचाईत पडते. अशा ठिकाणीं अन्नसामग्री बरोबर घेण्यास आपण भिक्षूंला परवानगी द्यावी." तेव्हां बुद्धानें तांदूळ, मूग, उडीद, मीठ, गूळ, तेल, तूप वगैरे पदार्थ पाथेयासाठीं बरोबर घेण्यास भिक्षूंला परवानगी दिली.

५८. क्रमशः प्रवास करीत भगवान् 'आपण' नांवाच्या शहरीं आला. तेथें केणिय नांवाचा जटिल रहात होता. त्यानें उत्तम पानक तयार करविलें, व तो बुद्धाच्या दर्शनाला आला, आणि म्हणाला, 'भो गोतम, ह्या पानकाचा आपण स्वीकार करावा, बुद्धानें तें भिक्षुसंघास देण्यास सांगितलें, व जेव्हां भिक्षू तें घेण्यास संकोच करूं लागले, तेव्हां त्यानें तें पिण्याची त्यांना परवानगी दिली, व धान्याच्या रसाशिवाय इतर कोणत्याहि फळाचा रस, तसाच फुलांचा, पानांचा आणि उसाचा रस दुपारीं बारा वाजल्यानंतर पिण्यास हरकत नाहीं असा नियम केला.

## कठिन

५९. बुद्ध भगवान श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं पावा येथील तीस भिक्षु–सर्वच अरण्यवासी, सर्व भिक्षाचर्येवरच निर्वाह करणारे, सर्व चिंध्यांचींच वस्त्रें धारण करणारे, सर्व तीनच चीवरें ठेवणारे––श्रावस्ती येथें भगवंताच्या दर्शनाला येण्यास निघाले. परंतु वर्षाकाल जवळ आल्यामुळें त्यांना वाटेंत साकेत नगराजवळ रहावें लागलें. भगवंताच्या दर्शनाला उत्कंठित होऊन त्यांनीं तो वर्षाकाल घालविला; व आश्विन पौर्णिमेला प्रवारणा करून ते भगवंताच्या दर्शनाला आले. वाटेंत त्यांना पाऊस फार लागला; आणि त्यांचीं चीवरें खराब झालीं. जेव्हां ते भगवंताला भेटले तेव्हां त्याच्या विचारण्यावरून घडलेली सर्व हकीगत

त्यांनीं सांगितली. तेव्हां ह्या प्रकरणीं भिक्षूंला बोलावून कठिन अंथरण्याची बुद्धानें परवानगी दिली. कठिन म्हणजे एक चीवर. हें संघाच्या अनुमतीनें विहारांत मांडण्यांत आलें तर तें तेथून काढीपर्यंत भिक्षूंला तिनांपेक्षां जास्त चीवरें बाळगतां येतात; चिंध्या मिळाल्या नाहींत तर आपल्या दायकांकडून वस्त्रें गोळा करून त्यांचीं चीवरें बनवितां येतात. हें कठिण आश्विनी पौर्णिमेला मांडून कार्तिकी पौर्णिमेला उठविलें पाहिजे.

## चीवर

६०. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या काळीं वैशाली राजधानी अत्यंत समृद्ध होती. तेथें आम्रपालिका नांवाची सुस्वरूप गणिका रहात होती. ती नृत्यगीतवाद्यादिकांत कुशल असे. राजगृहांतील नागरिक कांहीं कारणास्तव वैशालीला आले, व तेथें त्यांनीं त्या गणिकेला पाहिलें; आणि तेथून परत गेल्यावर आपल्याहि राजधानींत अशी गणिका असावी अशी त्यांनीं बिंबिसार राजाला विनंती केली. राजानें अशी कुमारी निवडून तिला गणिका करण्यास नागरिकांना परवानगी दिली, व त्याप्रमाणें त्यांनीं शालवती नांवाच्या कुमारीला गणिका केलें. ती लौकरच नृत्यगीतवाद्यादिकांत अत्यंत कुशल झाली. पुढें कांहीं काळानें गरोदर होऊन तिला मुलगा झाला. पण ही गोष्ट प्रकट न व्हावी ह्या हेतूनें त्या मुलाला तिनें एका सुपांत घालून आपल्या दासीकडून उकिरड्यावर ठेवविलें. तो अभय नांवाच्या राजकुमाराला सांपडला. उकिरड्यावर फेंकून दिला असतांहि जिवंत राहिला म्हणून त्याचें जीवक असें नांव ठेविलें; व राजकुमारानें पाळल्यामुळें त्याला कौमारभृत्य असें म्हणत असत.

६१. कौमारभृत्य वयांत आल्यावर अभय राजकुमाराच्या परवानगीनें तक्षशिलेला जाऊन गुरुगृहीं राहून आयुर्वेदांत अत्यंत प्रवीण झाला. त्याच्या परिक्षेच्या वेळीं आचार्यानें ‘ तक्षशिलेच्या आसपास तीन योजनें हिंडून जी मुळी औषधी नसेल ती घेऊन ये ’ असें सांगितलें. जीवक सर्व प्रदेश फिरून रिकाम्या हातानेंच परत आला; व आचार्याला म्हणाला, “ औषधी नव्हे अशी एकहि वनस्पती मला आढळली नाहीं.” त्यावरून तो आयुर्वेदांत पारंगत झाला असें पाहून आचार्यानें अल्प वाटखर्ची देऊन त्याला रवाना

केलें. वाटेंत जीवकानें औषधानें व शस्त्रक्रियेनें अनेक रोगी बरे केले; व मोठा लौकिक संपादन केला. त्यायोगें राजगृहाला आल्यावर बिंबिसार राजाच्या मुख्य वैद्याचें स्थान त्याला मिळालें.

६२. त्या काळीं अवंती राष्ट्रांत प्रद्योत नांवाचा राजा राज्य करीत होता. तो अत्यंत तापट असल्यामुळें त्याला चंडप्रद्योत म्हणत असत. एकदां त्याला पंडुरोग झाला; व जीवकाची कीर्ति ऐकून त्यानें बिंबिसार राजापाशीं कांहीं दिवसांकरितां त्याला उज्जयनीस पाठविण्यास मागणी केली. त्याप्रमाणें जीवक उज्जयनीस गेला; व प्रद्योताची प्रकृति तपासून तीं अत्यंत प्रखर औषधांवांचून बरी होणार नाहीं असें त्यानें जाणलें. प्रद्योताची भद्रवतिका नांवाची एक फार जलद चालणारी हत्तीण होती. आपणाला जंगलांतून कांहीं औषधी आणावयाच्या आहेत असें सांगून ती हत्तीण जीवकानें आपल्या ताब्यांत घेतली, आणि नंतर प्रद्योताला तयार केलेलें प्रखर औषध पाजिलें; व आपण त्या हत्तिणीवर बसून पळ काढला. चंडप्रद्योताला औषध लागू पडल्याबरोबर जीवकाचा अत्यंत संताप आला. पण जीवक आगाऊच पळाला होता. पुढें राजा चंडप्रद्योत त्या औषधाच्या योगें साफ बरा झाला; व त्यानें जीवकाला मोठ्या आदरानें आपल्या भेटीला बोलाविलें. परंतु जीवक तिकडे गेला नाहीं; तेव्हां प्रद्योतानें त्याला शिवेयक नांवाच्या वस्त्राची एक जोडी पाठविली.

६३. त्या काळीं भगवंताचें शरीर रोगातुर झालें होतें. जीवकाला हें समजलें, तेव्हां त्यानें विरेचन देऊन भगवंताला साफ बरें केलें; व प्रद्योतानें पाठविलेली वस्त्रांची जोडी घेऊन ती भगवंताला अर्पण केली. ह्या काळपर्यंत भिक्षु चिंध्या गोळा करून त्याचीं चीवरें करीत असत. परंतु ह्या प्रसंगीं जीवकाच्या विनंतीवरून भगवंतानें भिक्षुसंघाला गृहस्थानें दिलेलें वस्त्र घेऊन चीवर करण्यास परवानगी दिली; व पुढें क्षौम, कार्पास, कौशेय, कंबल, शाण व भंग ह्या जातीचीं वस्त्रें घेऊनहि त्यांचीं चीवरें करण्यास परवानगी दिली. भिक्षूंचीं चीवरें मलीन होत असत. तेव्हां तीं रंगविण्यासाठीं मूळ, सोट, साल, पानें, फुलें व फळें ह्यांजपासून रंग तयार करण्यास बुद्धानें परवानगी दिली; आणि ते पदार्थ शिजविण्यास भांडें व चीवर रंगविण्यास लांकडाची द्रोणी ठेवण्यास परवानगी दिली. सबंध वस्त्र मिळालें तरी तें कापून व पुन्हां

एकत्र जोडून चीवर केलें पाहिजे; भिक्षूनें अखंड वस्त्र वापरतां कामा नये, असाहि बुद्धानें नियम केला.

६४. भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या वेळीं विशाखा मिगारमाता ह्या प्रसिद्ध उपासिकेनें आपल्या घरीं बुद्धाला व भिक्षुसंघाला आमंत्रण केलें. दुसऱ्या दिवशीं जेवण्याच्या वेळीं भिक्षुसंघ तयार आहे कीं काय हें पाहण्यासाठीं आपल्या दासीला तिनें विहारांत पाठविलें. त्यावेळीं भयंकर जोराची पावसाची सर आली होती; व भिक्षु चीवरें विहारांत ठेवून पर्जन्यस्नानासाठीं आवारांत उभे होते. त्यांना पाहून दासी परत आली, व विशाखेला म्हणाली, "आर्ये, विहारांत भिक्षु नसून सर्व आजीवक[1] आहेत." पण त्या शाहण्या उपासिकेनें भिक्षु पर्जन्यस्नान करीत आहेत हें तेव्हांच ताडलें. बुद्ध भगवान् भिक्षुसंघासह आपल्या घरीं आल्यावर सर्वांचा योग्य आदरसत्कार करून तिनें त्यांना जेऊं घातलें. सर्वांचें जेवण झाल्यावर ती भगवंताला म्हणाली, "मी आपणांपाशीं आठ वर मागतें." भगवान् म्हणाला, "तथागत कोणाला वर देत नसतात." विशाखा म्हणाली, "पण भदंत, मी जे वर मागणार आहें ते योग्य असून अनवद्य आहेत." बुद्धानें तिला बोलण्यास सांगितलें. तेव्हां ती म्हणाली, "(१) मी यावज्जीव संघाला वर्षाकाळांत लागणाऱ्या पंचांचा पुरवठा करूं इच्छितें. (२) आगंतुक भिक्षूला भिक्षा देऊं इच्छितें. (३) प्रवासास जाणाऱ्या भिक्षूला भिक्षा देऊं इच्छितें. (४) रोगी भिक्षूला भिक्षा देऊं इच्छितें. (५) रोग्यांच्या उपस्थायकाला[2] भिक्षा देऊं इच्छितें. (६) रोग्यांना औषधाचा पुरवठा करूं इच्छितें. (७) संघाला रोज यवागू देऊं इच्छितें. (८) भिक्षुणीसंघाला स्नानाच्या वेळीं वापरण्यासाठीं वस्त्रें देऊं इच्छितें." बुद्ध म्हणाला, "विशाखे, हे वर मागण्याचीं कारणें कोणतीं?" विशाखा म्हणाली, "(१) आज भिक्षु तयार आहेत कीं नाहींत हें पाहण्यासाठीं मी दासीला पाठविलें. ती आरामांत भिक्षु नसून आजीवक आहेत, असें समजून परत आली. भदंत, नागवेपणा शिष्टाचाराला अनुसरून नाहीं, म्हणून संघाला मी वर्षाकाळांत नेसण्यासाठीं पंचांचा पुरवठा करूं इच्छितें. (२) आगंतुक भिक्षूला शहरां-

१. आजीवपंथाचे श्रमण नग्न राहत असत.

२. शुश्रूषकाला.

तील रस्त्यांची माहिती नसते व भिक्षाटनाचा त्याला त्रास पडतो. ह्या कारणास्तव मी यावज्जीव आगंतुकाला भिक्षा देऊं इच्छितें. (३) प्रवासास जाणारा भिक्षु भिक्षाटनाला गेला तर बरोबरीच्या मंडळीपासून मागें राहतो. त्यामुळें त्याला त्रास होतो; म्हणून अशा भिक्षूला मी यावज्जीव भिक्षा देऊं इच्छितें. (४) आजारी भिक्षूला जर पथ्यकारक अन्न मिळालें नाहीं तर त्याचा आजार वाढतो, किंवा तो मरतो. म्हणून अशा भिक्षूला आजार बरा होईपर्यंत मी अन्न देऊं इच्छितें. (५) आजारी भिक्षूचा जो उपस्थायक असतो त्याला जर भिक्षाटन करावें लागलें तर त्याच्याकडून आजाऱ्याचें उपस्थान नीट होत नाहीं. म्हणून तो जोंपर्यंत आजाऱ्याचा उपस्थायक असेल तोंपर्यंत त्याला मी भिक्षा देऊं इच्छितें. (६) जर आजारी भिक्षूला योग्य औषध मिळालें नाहीं, तर त्याचा रोग वाढतो व तो मरतो. म्हणून अशा भिक्षूला मी औषधांचा पुरवठा करूं इच्छितें. (७) अंधकविंद येथें ब्राह्मणानें यवागू दिल्यावर आपण त्याची स्तुती केली होती. म्हणून भिक्षुसंघाला रोज यवागू देऊं इच्छितें. (८) एकदां अचिरवती नदींत भिक्षुणी बायकांच्या न्हावयाच्या जागीं नग्नस्नान करीत होत्या, तेथेंच स्नानास आलेल्या वेश्या त्यांची थट्टा करूं लागल्या. स्त्रियांचें नग्नत्व शिष्टाचाराला धरून नाहीं. या कारणास्तव मी भिक्षुणीला स्नानाच्या वेळीं वापरण्यासाठीं वस्त्रें देऊं इच्छितें." भगवंतानें विशाखेच्या ह्या आठ मागण्या मान्य केल्या, व त्याप्रमाणें भिक्षुसंघाला व भिक्षुणीसंघाला परवानगी दिली.[१]

६५. त्या काळीं कोसल देशांत दोन भिक्षु प्रवास करीत होते. ते एका विहारांत आले. तेथे एक भिक्षु आजारी होता. भगवंतानें आजाऱ्याचें उपस्थान करणें चांगलें, असें म्हटलें आहे म्हणून त्या दोन भिक्षूंनीं त्या आजारी भिक्षूचें उपस्थान केलें. पण तो बरा न होतां मरण पावला. तेव्हां त्याचें शरीरकृत्य करून व त्याचें पात्र व चीवरें घेऊन ते दोघे भिक्षु श्रावस्तीला आले; व भगवंताला त्यांनीं झालेलें वर्तमान सांगितलें. तेव्हां भगवान् भिक्षूंला म्हणाला, "मरण पावलेल्या भिक्षूच्या पात्राचा व चीवरांचा मालक

१ ह्या प्रकरणांत ह्या मागण्यांपैकीं पहिल्या मागणीचा तेवढा संबंध येतो. परंतु त्या जशा मूळग्रंथात आहेत तशाच येथें दिल्या आहेत.

संघ होय. तथापि आजाऱ्याला उपस्थायक भिक्षु फार उपयोगी पडतात. म्हणून मृताचे जे उपस्थायक असतील त्यांना मृताच्या मालकीचीं तीन चीवरें व पात्र देण्यास मी संघाला अनुमती देतों. ती देण्याची पद्धती अशी:– आजाऱ्याचा उपस्थायक भिक्षु असेल त्यानें संघाला म्हणावें, 'भदंत संघ, अमुक नांवाचा भिक्षु मरण पावला. त्याचीं हीं तीन चीवरें व पात्र.' तेव्हां समर्थ भिक्षूनें संघाला विज्ञप्ति करावी, 'भदंत संघ माझ्या बोलण्याकडे लक्ष देवो. अमुक नांवाचा भिक्षु मरण पावला. त्याचीं हीं तीन चीवरें व पात्र. जर संघाला योग्य वाटत असेल तर संघ तीं त्याच्या उपस्थायकाला देवो.' ही विज्ञप्ति झाली. ह्याप्रमाणें त्रिवार जाहीर करून कोणीं हरकत घेतली नाहीं म्हणजे तीं पात्रचीवरें उपस्थायकांना देण्यांत आलीं असें समजावें. श्रामणेर मरण पावला तर ह्याचप्रमाणें त्याच्या उपस्थायकांना त्याचीं पात्रचीवरें देण्यांत यावीं."

## संघसामग्री

६६. बुद्ध भगवान् कौशांबी येथें रहात होता. तेथें एका पंडित भिक्षूच्या हातून एक दोष घडला; व त्यानें ती गोष्ट इतर भिक्षूंला सांगितली. तो दोष नव्हे असें त्यांचें मत पडलें. तेव्हां आपला कांहीं दोष नव्हता अशी त्या भिक्षूचीहि खात्री झाली. परंतु दुसऱ्या कांहीं भिक्षूंना तो दोष आहे व त्याबद्दल प्रायश्चित्त करणें योग्य आहे असें वाटलें, व त्यांनीं बहुमतानें त्या भिक्षूला बहिष्कृत केलें. ह्याप्रमाणें संघांत दोन तट पडले व भांडणें सुरू झालीं. तेव्हां भगवान् त्या भिक्षूंना म्हणाला, "भिक्षुहो, अशा रितीनें भांडणें करूं नका." त्यावर एक अन्यायवादी भिक्षु म्हणाला, "भदंत, आपण स्वस्थ रहा. आम्ही आमच्या भांडणाचा विचार करूं."

भगवान् म्हणाला, "भिक्षुहो, वाराणसींत ब्रह्मदत्त नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यानें [1]दीघीति कोसल राजावर हल्ला करून त्याचा देश पादाक्रांत केला. तेव्हां दीघीति कोसल राजा आपल्या राणीला घेऊन गुप्तवेशानें पळाला, व वाराणसीला येऊन राहिला. तेथें त्याची राणी गरोदर झाली. तेव्हां तिला चतुरंगिनी सेना पहाण्याचे डोहाळे झाले. ब्रह्मदत्ताचा पुरोहित दीघीतीचा मित्र होता. त्यानें, एका शुभमुहूर्तावर चतुरंगिनी सेना

१. संस्कृत, दीर्घेति=दीर्घकाळ दुःख भोगणारा.

सज्ज केली, तर वाराणशीराजाला फायदा होईल, असें सांगून सेना सज्ज करविली, व कोसल राजाच्या राणीला दाखविली. पुढें त्या राणीला दीर्घायु नांवाचा सुस्वरूप मुलगा झाला. तो वयांत येऊं लागल्यावर कोसल राजाला, आपण कोण आहोंत, हें ब्रम्हदत्ताला समजेल अशी भीति पडली व त्यानें दीर्घायु कुमाराला नगराबाहेर पाठवून दिलें. कोसल राजाच्या न्हाव्यानें ब्रम्हदत्ताची नोकरी पत्करली होती; व त्यानें आपला पूर्वीचा मालक राणीसह वाराणसींत गुप्तवेशानें रहात असल्याची बातमी नव्या मालकाला दिली. ब्रम्हदत्तानें दीघीतीला व त्याच्या राणीला पकडलें, व त्यांची धिंड काढून नगराच्या दक्षिणद्वाराबाहेर त्यांचा शिरच्छेद करावा असा हुकूम केला.

"रस्त्यानें त्यांची धिंड चालली असतां दीर्घायु कुमार मागोमाग चालला होता. त्याला पाहून दीघीति म्हणाला, 'बा दीर्घायु, तूं फार लांब किंवा फार जवळ पाहूं नकोस. वैरानें वैर शमत नाहीं. प्रेमानेंच वैर शमतें.' लोकांना वाटलें कीं, दीघीति वेडा झाला असून कांहींतरी बरळत आहे. नंतर दक्षिणद्वारावर नेऊन त्याचा व त्याच्या राणीचा वध करण्यांत आला; व त्यांच्या शवांचे तुकडे करून चारी दिशांना फेकण्यांत आले, व त्यांच्यावर पहारा ठेवण्यांत आला. तें पाहून दीर्घायु कुमारानें वाराणसींतून दारू नेऊन पहारेकऱ्यांना पाजली, व ते निश्चेष्टित झाल्यावर आईबापांचे शरीरावशेष गोळा करून त्यांना अग्नि दिला. आणि चिता पेटत असतां तिला त्यानें त्रिवार प्रदक्षिणा केली. त्याला ब्रह्मदत्त राजानें आपल्या प्रासादाच्या गच्चीवरून पाहिलें; व कौसल राजाचा हा मनुष्य कोणीतरी नातलग असला पाहिजे अशी त्याची खात्री झाली.

"दीर्घायु कुमार अरण्यांत जाऊन यथास्थित रडला; व आपलीं आसवें पुसून राजवाड्याजवळ असलेल्या हस्तिशाळेंत आला. तेथील मुख्य माहुताच्या अनुमतीनें रात्रीं राहून पहांटेला त्यानें अत्यंत सुस्वर गायन आरंभिलें. ब्रह्मदत्त तें ऐकून फार प्रसन्न झाला; व त्यानें दीर्घायूला बोलावून आणून त्याला आपल्या तैनातीला ठेविलें. थोड्याच अवधींत दीर्घायूवांचून ब्रह्मदत्ताला करमत नाहीं असें झालें. एके दिवशीं ब्रह्मदत्त दीर्घायूबरोबर शिकारीला गेला. दूर अंतरावर गेल्यावर काशीराजा फार थकला, व रथांतून खालीं उतरून दीर्घायूच्या मांडीवर डोकें ठेवून निजला. त्याला ठार

मारण्याचा विचार दीर्घायूच्या मनांत आला; पण आपल्या बापाचे शब्द आठवून त्यानें आपलें मन आवरलें. इतक्यांत काशीराजा खडबडून जागा झाला व ह्मणाला, " मुला, मला असें दुष्ट स्वप्न पडलें कीं, कोसल राजाच्या मुलानें माझ्यावर तरवारीचा प्रहार करून मला खालीं पाडलें. त्यामुळें मी खडबडून जागा झालों." तत्क्षणीं काशीराजाचे केंस पकडून म्यानांतून तलवार बाहेर काढून दीर्घायु म्हणाला, "महाराज, तोच मी कोसलराजाचा मुलगा दीर्घायु आहें. तुम्हीं आमचें फार फार अकल्याण केलें आहे. आमचें राज्य हरण करून माझ्या आईबापांलाहि तुम्हीं ठार मारलें. तुमचा सूड उगवण्याची ही वेळ आहे." ब्रम्हदत्त दीर्घायूच्या पायांवर डोकें ठेवून म्हणाला, " बा दीर्घायू, मला जीवदान दे, मला जीवदान दे." दीर्घायु म्हणाला, " मी तुम्हाला जीवदान देणारा कोण? तुम्हींच मला जीवदान द्या." ब्रम्हदत्त म्हणाला, " तर मग आपण परस्परांला जीवदान देऊं." ते दोघे परस्परांवर प्रेम करण्याची शपथ वाहून वाराणसीला परत आले.

" तेथें काशीराजानें सभा भरवून अमात्यांला विचारलें कीं, कोसल राजाचा मुलगा दीर्घायु जर आमच्या हातीं आला तर त्याला कोणती शिक्षा करावी? निरनिराळ्या तऱ्हेनें त्याचा वध करावा असें सर्वांचें मत पडलें. पण ब्रह्मदत्त म्हणाला, "हा तो दीर्घायु कुमार आहे. आम्हीं परस्परांला जीवदान दिलें असल्यामुळें ह्याला कोणतीहि शिक्षा करतां येणें शक्य नाहीं." तो दीर्घायुला म्हणाला, " तुझ्या बापानें, 'तूं फार लांब किंवा फार जवळ पाहूं नकोस, वैरानें वैर शमत नाहीं, प्रेमानेंच वैर शमतें,' असें सांगितलें त्याचा अर्थ काय?" दीर्घायु म्हणाला, " दूर पाहूं नकोस म्हणजे दुसऱ्यांचें वैर चिरकाळ चित्तांत बाळगूं नकोस. जवळ पाहूं नकोस म्हणजे मैत्री एकदम तोडूं नकोस. बाकी वाक्याचा अर्थ स्पष्टच आहे. मी जर तुम्हांस मारलें असतें तर तुमच्या पक्षाच्या लोकांनीं मला मारलें असतें. ह्याप्रमाणें वैरानें वैर शमन न होतां वाढलें असतें. पण तें आम्हीं आज प्रेमानें शमविलें आहे." हें ऐकून ब्रह्मदत्त राजा संतुष्ट झाला. व आपल्या कन्येचा दीर्घायु-बरोबर विवाह करून कोसल देशाचें राज्य त्याला परत दिलें. त्याचप्रमाणें त्याच्या बापाची लुटून आणलेली संपत्ति त्याला परत देण्यांत आली."

ही गोष्ट सांगून बुद्धानें भांडण न करण्याविषयीं भिक्षूंना उपदेश केला. परंतु तो अन्यायवादी भिक्षु पुन्हां म्हणाला, "भदंत, आपण स्वस्थ राहा. आम्ही या भांडणाचें काय होतें तें पाहून घेऊं." ह्या लोकांचीं मनें कलुषित झालीं असून यांची समजूत करणें कठीण आहे, असें जाणून बुद्ध भगवान् त्या सभेंतून उठून गेला.

६७. कौशाम्बींत भिक्षाटन करून भोजनानंतर पात्र-चीवर घेऊन संघामध्यें राहून बुद्धानें,

( १ ) सगळेच मोठमोठ्यानें बोलणारे आहेत. ह्यांत आपणाला मूर्ख कोणच समजत नाहीं. संघांत तट पडत चालले असतां इतरांविषयीं आदर कोणालाच वाटत नाहीं.

( २ ) हे निष्काळजी पंडितंमानी भिक्षु तोंड उघडून वाटेल तें बोलतात. परंतु आपण वहात चाललों आहों हें ह्यांना समजत नाहीं.

( ३ ) मला शिव्या दिल्या, मला मारलें, मला जिंकलें, माझी वस्तू हरण केली ह्याचा जे सूड उगवूं पहातात त्यांचें वैर शमन पावत नाहीं.

( ४ ) मला शिव्या दिल्या, मला मारलें, मला जिंकलें, माझी वस्तू हरण केली ह्याचा जे सूड उगवूं पहात नाहींत त्यांचें वैर शमन पावतें.

( ५ ) वैरानें वैर कधींहि शमत नाहीं; प्रेमानेंच वैर शमतें, हा सनातन धर्म होय.

( ६ ) दुसरे जाणत नाहींत पण आम्ही तरी ह्या भांडणापासून विरत होऊं असें जे जाणतात त्यांचीं भांडणें मिटतात.

( ७ ) हाडें मोडणारे, ठार मारणारे, गाई घोडे व पैसा हरण करणारे आणि राष्ट्रें लुटणारे अशा लोकांचाहि संघ बनतो मग तुमचा कां बनूं नये ?

( ८ ) जर आपल्याबरोबर राहणारा शहाणा आणि सुशील सहाय मिळाला तर विघ्नांची पर्वा न करतां विवेकी मनुष्यानें त्याबरोबर रहावें.

( ९ ) जर आपणाबरोबर रहाणारा शहाणा आणि सुशील सहाय मिळत नसला तर राजा जसा जिंकलेलें राज्य सोडून जातो, व जसा नागहत्ती मातंगारण्यांत एकटा रहातो, तसें एकाकी रहावें.

(१०) एकटें रहाणें चांगलें. मूर्खाशीं सहवास चांगला नाहीं. मातंगारण्यांत जसा नागहत्ती एकटा रहातो तसें एकटें रहावें व पापाचरण करूं नये.

ह्या अर्थाच्या गाथा म्हटल्या, व तो बालकलोणकारग्रामाकडे गेला. तेथें भृगु भिक्षूनें त्याचें स्वागत केलें. नंतर भगवान् प्राचीन वंशदाव नांवाच्या उपवनाकडे गेला.

६८. त्याकाळीं प्राचीन वंशदाव उपवनांत अनुरुद्ध, नन्दिय, व किम्बिल हे भिक्षु रहात असत. वनपाळानें भगवंताला तिकडे येतांना पाहिलें, व तो म्हणाला, "हे श्रमण, ह्या उपवनांत परमार्थ चिंतन करणारे तिघे भिक्षु रहात आहेत. तेथें जाऊन त्यांना तूं उपद्रव करूं नकोस." हें वनपाळाचें भाषण ऐकून अनुरुद्ध त्वरेनें तेथें आला, व त्याला म्हणाला, "बा वनपाळा, भगवंताला प्रतिबंध करूं नकोस. हा आमचा शास्ता येथें आला आहे." नंतर अनुरुद्धानें आपल्या इतर साथ्यांस घेऊन भगवंताचें स्वागत केलें. तेव्हां भगवान् अनुरुद्धाला म्हणाला, "अनुरुद्धा, तुमचें ठीक चाललें आहे ना? तुम्हांला भिक्षेचा त्रास पडत नाहींना?" आपलें सर्व ठीक चाललें आहे असें अनुरुद्धानें उत्तर दिल्यावर 'तुम्ही एकीनें, आनंदानें, पाण्याच्या आणि दुधाच्या मैत्रीप्रमाणें परस्परांवर प्रेम करून रहातां कीं काय?' असा बुद्धानें प्रश्न केला. त्यालाहि अनुरुद्धानें 'होय' असें उत्तर दिलें; व 'हें कसें' असा बुद्धानें प्रश्न केला, तेव्हां अनुरुद्ध म्हणाला, "भदंत, मला असें वाटतें कीं, असे सब्रह्मचारी मला मिळाले आहेत हें माझें मोठें भाग्य होय. त्यांच्याबरोबर कायावाचामनेंकरून मी प्रेमानें वागतों; आणि असा विचार करतों कीं, स्वतःचें मन बाजूस ठेवून ह्यांच्याच मनाच्या अनुरोधानें मीं वागावें. आमचे देह जरी भिन्न आहेत तरी चित्त जणूं काय एकच आहे." नन्दियानें व किम्बिलानेंहि आपला अनुभव अनुरुद्धाप्रमाणेंच सांगितला. तेव्हां बुद्ध म्हणाला, "अनुरुद्धा, तुम्ही मोठ्या जागृतीनें वागतां ना?" अनुरुद्ध म्हणाला, "होय भदंत, जो आमच्यापैकीं भिक्षाटन करून प्रथम इकडे येतो तो आसनें मांडतो; पाय धुण्याचें पाणी व पाट तयार ठेवतो; जास्त अन्न काढून ठेवण्यासाठीं असलेलें ताट धुवून ठेवतो; पिण्याचें व आंचवण्याचें पाणी तयार ठेवतो. जो सर्वांच्या शेवटीं येतो तो इच्छा असल्यास शिल्लक

असलेलें जेवण जेवतो; इच्छा नसल्यास तें गवत नसलेल्या जागीं किंवा पाण्याच्या प्रवाहांत टाकतो; आसनें काढतो; पाय धुण्याचें पाणी व पाट काढून जागच्या जागीं ठेवतो; जास्त अन्न काढून ठेवण्यासाठीं असलेलें ताट धुवून जागच्याजागीं ठेवतो; पिण्याचें पाणी व आंचवण्याचें पाणी काढून ठेवतो, व जेवण्याची जागा साफ करतो. जो पिण्याच्या किंवा वापरण्याच्या पाण्याचा घडा किंवा पायखान्यांतील पाण्याचा घडा रिकामा पहातो तो तो भरून ठेवतो. जर एकाला तो घडा उचलणें शक्य नसेल, तर दुसऱ्याला खुणेनें बोलावून आणून तो आम्ही उचलून नेतों. पण त्यासाठीं हांका मारीत नसतो. पांच पांच दिवसांनीं आम्हीं रात्रीं धर्मचर्चा करीत असतों. ह्याप्रमाणें आम्हीं मोठ्या जागृतीनें व उत्साहानें वागतों."

६९. भगवंतानें ह्या तिघां भिक्षूंला धर्मोपदेश करून उत्साहित केलें, आनंदित केलें व तो क्रमशः पारिलेय्यक वनांत आला. तेथें तो भद्रशाल-वृक्षाखालीं रहात असतां त्याच्या मनांत असा विचार आला कीं, कौशाम्बीच्या कलहविवाद करणाऱ्या भिक्षूंच्या सहवासांत राहून मला बराच त्रास सोसावा लागला; पण आतां येथें एकाकी असल्यामुळें मी सुखानें रहातों. त्या वेळीं कोणीएक हस्तिनाग आपल्या यूथाला कंटाळून एकटाच त्या अरण्यांत येऊन राहिला; व तेथें त्यानें आपल्या सोंडेनें बुद्धाचें स्वागत केलें. तेव्हां बुद्धानें हे उद्गार काढिले:— "नांगराच्या इसाडासारखे ज्याचें दांत आहेत अशा हस्तिनागाचें चित्त नागाच्या (पापरहित बुद्धाच्या) चित्ताशीं जुळतें. कांकीं, तोहि वनांत एकाकी रमतो[1]!"

७०. यथाभिरुचि पारिलेय्यक वनांत राहून, भगवान् श्रावस्तीला आला. तेथें तो जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. इकडे कौशाम्बी येथील उपासकांनीं असा विचार केला कीं, हे भांडण करणारे भिक्षु आमच्या नुकसानाला कारण झाले; ह्यांच्या भांडणामुळें भगवान् येथून निघून गेला; तेव्हां नमस्कारादिक करून त्यांचा आम्हीं आदर करतां कामा नये, व घरीं आल्यास ह्यांना भिक्षा देतां कामा नये; असें केलें असतां

---

१ मूळ गाथा अशी आहे :—

**एवं नागस्स नागेन ईसादन्तस्स हत्थिनो**
**समेति चित्तं चित्तेन यदेको रमति वने ति ॥**

हे येथून निघून जातील, गृहस्थ होऊन पोट भरतील किंवा माफी मागून भगवंताचें समाधान करतील. ह्यामुळें कौशाम्बी येथील भिक्षूंला अन्नाची मारामार पडली. तेव्हां ते ताळ्यावर आले, व भगवंताजवळ जाऊन आपला खटला मिटविण्याचा त्यांनीं विचार केला. भिक्षुणीसंघाची प्रमुख महाप्रजापती गौतमी हिला, हे भांडण करणारे भिक्षु श्रावस्तीला येत आहेत, हें वर्तमान समजलें; व आपण त्यांच्याशीं कसें वागावें असा भगवंताला तिनें प्रश्न केला. भगवान् म्हणाला, " तूं दोन्हीं पक्षांच्या भिक्षूंकडून धर्म श्रवण कर. पण जे धर्मवादी असतील त्यांचेंच म्हणणें ऐक." अनाथपिंडिक गृहपति व विशाखा उपासिका ह्यांनींहि त्या भिक्षूंशीं कसें वागावें असा भगवंताला प्रश्न केला. तो म्हणाला, " तुम्हीं दोन्ही बाजूंच्या भिक्षूंला दान द्या. सर्वांकडूनच धर्मोपदेश ऐका. पण जे धर्मवादी असतील त्यांचेंच मत ग्रहण करा. "

ते भिक्षु अनाथपिंडिकाच्या आरामांत आले; तेव्हां सारिपुत्र भगवंताला म्हणाला, " हे कौशाम्बी येथील भिक्षु येथें आले आहेत. त्यांच्याशीं आम्हीं कसें वर्तावें ? " भगवान् म्हणाला, " त्यांना रहाण्यास निराळी जागा तयार करून दे, व सर्वांना समानत्वानें खाण्यापिण्याला मिळेल अशी व्यवस्था कर. "

७१. ज्या भिक्षूला बहिष्कार घालण्यांत आला होता त्याला आपला दोष दिसून आला, व आपल्याला केलेला दंड योग्य होता असें दिसून आलें. त्याच्या पक्षाच्या भिक्षूंनीं हें वर्तमान भगवंताला कळविलें. तेव्हां त्यानें त्या भिक्षूला आपल्या दोषाचें प्रायश्चित्त करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्यानें तें केलें. नंतर त्याच्या पक्षाचे भिक्षु बहिष्कार घालणाऱ्या भिक्षूंना म्हणाले, " ज्या दोषासाठीं तुम्हीं ह्या भिक्षूला बहिष्कार घातला त्याचें त्यानें प्रायश्चित्त केलें आहे. तेव्हां आतां आपण संघसामग्री करूं." बुद्धाला ही गोष्ट कळविली तेव्हां तो म्हणाला, " अशा प्रसंगीं संघसामग्री करावी ती अशी :— सर्वांनीं एकत्र जमावें. आजारी भिक्षु असला तरी त्यानें देखील यावें. नंतर समर्थ भिक्षूनें संघाला विज्ञप्ति करावी, ' भदंत संघ माझ्या बोलण्याकडे लक्ष देवो. ज्या गोष्टीसाठीं संघांत तंटा उपस्थित झाला, ती गोष्ट हा भिक्षु कबूल करतो; व आपल्या दोषाचें त्यानें प्रायश्चित्त केलें आहे. जर संघाला योग्य

वाटत असेल तर हें प्रकरण मिटवून संघानें संघसामग्री करावी.' ही विज्ञप्ति झाली. त्यानंतर त्रिवार जाहीर करून कोणी हरकत घेतली नाहीं म्हणजे संघसामग्री झाली असें समजावें."

उपालीनें 'संघसामग्री किती प्रकारची असते' असा प्रश्न केला असतां भगवान् म्हणाला, "संघसामग्री अर्थवियुक्त व अर्थयुक्त अशी दोन प्रकारची असते. ज्या गोष्टीसाठीं तंटा झालेला असतो त्या गोष्टीचें मूळ कारण शोधून न काढतां जी सामग्री करण्यांत येते ती अर्थवियुक्त होय, पण ज्या गोष्टीसाठीं तंटा झालेला असतो त्या गोष्टीचें मूळ कारण शोधून काढून जी सामग्री करण्यांत येते ती अर्थयुक्त समजावी."

## तर्जनीय कर्म ( धाक घालणें )

७२. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं पण्डुक व लोहितक हे दोघे भिक्षु स्वत: संघांत तंटा उपस्थित करीत असत; व दुसऱ्या भिक्षूंनाहि तंटा उपस्थित करण्यास मदत करीत. भगवंताला हें वर्तमान समजलें; तेव्हां ह्या प्रकरणीं भिक्षूंला बोलावून तो म्हणाला, "भिक्षुहो, पण्डुक आणि लोहितक भिक्षूंला संघानें तर्जनीय कर्म करावें; तें असें:– त्या दोघांलाहि बोलावून आणून त्यांच्या आपत्तींची ( दोषांची ) त्यांना आठवण द्यावी; आणि आपत्ति लागू करून समर्थ भिक्षून संघाला विज्ञप्ति करावी, 'भदंत संघ, माझ्या बोलण्याकडे लक्ष देवो. पण्डुक व लोहितक हे भिक्षु स्वत: तंटा उपस्थित करणारे असून दुसऱ्याला तंटा उपस्थित करण्यास मदत करतात. जर संघाला योग्य वाटत असेल तर संघानें त्यांना तर्जनीय कर्म करावें' ही विज्ञप्ति झाली. नंतर त्रिवार जाहीर करून कोणीं हरकत घेतली नाहीं म्हणजे संघाकडून तर्जनीय कर्म करण्यांत आलें असें समजावें.

"तर्जनीय कर्म करण्यांत आलेले भिक्षू जर नीट रितीनें वागूं लागले तर संघानें त्या भिक्षूंला माफी करावी; तीहि पद्धतीप्रमाणें पहिल्यानें विज्ञप्ति करून व नंतर त्रिवार जाहीर करून कोणी हरकत घेतली नाहीं म्हणजे करावी."

## नियशःकर्म[1] ( वेडगळपणा जाहीर करणें )

७३. त्या काळीं आयुष्मान् सेय्यसक भिक्षु पुष्कळच आपत्ति करीत असे; गृहस्थाबरोबर फार संघटन ठेवीत असे; त्याला परिवास देण्यांत, पूर्वस्थितीवर आणण्यांत, मानत्त देण्यांत व अब्भान कर्म करण्यांत भिक्षूंचा फार काळ जात असे. हें वर्तमान भगवंताला समजलें. तेव्हां तो म्हणाला, "संघानें अशा भिक्षूला नियशःकर्म करावें, म्हणजे दुसऱ्या कोणत्याहि भिक्षूच्या आश्रयावांचून त्यानें एकाकी राहूं नये. येथेंहि विज्ञप्ति करणें व त्रिवार जाहीर करणें पूर्वींप्रमाणेंच समजावें.

"तो भिक्षु चांगल्या रितीनें वागूं लागला व चांगल्या भिक्षूंच्या सहवासांत राहूं लागला म्हणजे संघानें त्याला माफी करावी ( विज्ञप्ति व जाहीर करणें पूर्वींप्रमाणेंच )."

## प्रव्राजनीय कर्म ( हांकून लावणें )

७४. त्या काळीं अस्सजि ( अश्वजित् ) व पुनब्बसुक ( पुनर्वसुक ) हे दोघे भिक्षु कीटागिरि येथें रहात होते. ते आरामांत फुलझाडें लावून त्यांच्या माला वगैरे करून स्त्रियांना किंवा कुमारींना देत असत. आपण नृत्य करीत, गात व वाजवीत असत. व इतरांना नाचावयास, गावयास व वाजवावयास लावीत; नाना तऱ्हेचे खेळ खेळत असत; व दुसरेंहि पुष्कळ असभ्य प्रकार करीत. एक भिक्षु वर्षाकाळानंतर काशी देशांतून श्रावस्तीला येत असतां कीटागिरि येथें येऊन गांवांत भिक्षेला गेला. त्याची शांत चर्या पाहून तेथील लोक म्हणाले, "हा असला बावळट, मंद, दांभिक कुठला भिक्षु ? असल्या भिक्षूला भिक्षा कोण देतो ? आमचे अस्सजि आणि पुनब्बसुक कसे सुस्वभावी, सरळ, मोकळ्या मनानें चालणारे व बोलणारे,— त्यांनाच भिक्षा देणें योग्य होय." त्या गांवांत एक उपासक असे. त्यानें ह्या नवीन आलेल्या भिक्षूला, कांहीं भिक्षा मिळाली कीं काय असा प्रश्न केला, व त्याला भिक्षा मुळींच मिळाली नाहीं असें समजल्यावर आपल्या घरीं नेऊन

१ मूळ पाली शब्द 'नियसकम्म' असा आहे. पण ओल्डेनबर्ग ( Oldenberg ) ह्यांनीं 'निस्सयकम्म' असा पाठ सर्वत्र स्वीकारला आहे. ही त्यांची चूक असावी असें मला वाटतें.

जेऊं घातलें. तो भिक्षु श्रावस्तीस जात आहे हें वर्तमान ऐकून तो उपासक त्याला म्हणाला, "भदंत, भगवंताला माझा शिरसाष्टांग नमस्कार सांगा आणि म्हणा कीं, अस्सजि आणि पुनब्बसुक ह्यांनीं असभ्याचार करून आमच्या गांवाची पुष्कळ हानि केली आहे. तेव्हां भगवंतानें येथें चांगले भिक्षु पाठवावे." त्या भिक्षूनें ही गोष्ट कबूल केली; व श्रावस्तीला जाऊन भगवंताला हें सर्व वर्तमान सांगितलें. तेव्हां भगवान् सारिपुत्त आणि मोग्गल्लान ह्यांना म्हणाला, "तुम्हीं दोघेहि जाऊन त्या दोघां भिक्षूंना कीटागिरीहून हांकून लावा." सारिपुत्त आणि मोग्गल्लान म्हणाले, "पण भदंत, ते दोघे भिक्षु मोठे तापट आणि कर्कश आहेत." भगवान् म्हणाला, "तर तुम्हीं पुष्कळ भिक्षु बरोबर घेऊन जा, व ह्याप्रमाणें प्रव्राजनीय कर्म करा:– अस्सजि व पुनब्बसुक ह्या दोघांनाहि त्यांच्या आपत्तींची आठवण द्यावी; व समर्थ भिक्षूनें संघाला विज्ञप्ति करावी; हे भिक्षु पापाचारी आहेत व उपासकांची बेअब्रू करणारे आहेत, जर संघाला योग्य वाटत असेल तर संघानें ह्यांना प्रव्राजनीय कर्म करावें. ह्या भिक्षूंनीं कीटागिरि येथें राहतां कामा नये. ही विज्ञप्ति झाली. नंतर कोणी हरकत घेतली नाहीं म्हणजे प्रव्राजनीय कर्म केलें असें समजावें."

"जो भिक्षु प्रव्राजनीय कर्म केलें असतां त्या ठिकाणाहून निघून जाऊन नीट रितीनें वागेल त्याला संघानें योग्य वाटल्यास माफी करावी (विज्ञप्ति वगैरे पूर्वीप्रमाणें)."

## प्रतिस्मारणीय कर्म (क्षमा मागावयास लावणें)

७५. त्या काळीं सुधर्म नांवाचा भिक्षु मक्षिकाषंड येथें रहात होता. चित्रगृहपति त्याच्याच मार्फत इतर भिक्षूंना आमंत्रण करीत असे. एके वेळीं सारिपुत्त महामोग्गल्लान वगैरे प्रसिद्ध भिक्षु मक्षिकाषंडाला आले. चित्रगृहपतीनें सुधर्म भिक्षूला विचारल्यावांचून त्यांना आपल्या घरीं भिक्षा ग्रहण करण्यास आमंत्रण केलें; व नंतर सुधर्म भिक्षूलाहि आमंत्रण दिलें. पण आपणास कळविल्यावांचून इतरांस आमंत्रण दिल्याबद्दल रागावून त्यानें तें स्वीकारलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं जेवण्याचे वेळीं सुधर्म भिक्षु चित्रगृहपतीच्या घरीं गेला; व त्याच्या पूर्वजांवरून त्याला लागू पडेल असें वर्मीं बोलला.

बुद्धोपदेश सांगण्याचें सोडून वर्मी शब्द बोलल्याबद्दल चित्रगृहपतीनें सुधर्म भिक्षूला दोष दिला. पुढें सुधर्म भिक्षु श्रावस्तीला आला, व त्यानें घडलेली गोष्ट भगवंताला सांगितली. भगवंतानें वर्मी शब्द बोलल्याबद्दल सुधर्माला दोषी ठरविलें; व चित्राची त्याला माफी मागावयास सांगितली. ह्या प्रकरणीं भगवान् भिक्षूंला म्हणाला, "जो भिक्षु गृहस्थांच्या हानीसाठीं खटपट करतो, विघ्न उत्पन्न होण्यासाठीं खटपट करतो, त्या गांवांतून त्यांनीं निघून जावें अशी खटपट करतो, गृहस्थांना शिवीगाळ देतो व त्यांच्यामध्यें भांडणें लावतो अशा भिक्षूला संघानें त्या गृहस्थांची माफी मागावयास लावावें."

त्याप्रमाणें संघानें विज्ञप्ति करून व त्रिवार जाहीर करून सुधर्म भिक्षूनें चित्राची माफी मागावी असा ठराव केला. पण सुधर्म चित्राकडे जाण्यास लाजूं लागला. तेव्हां अशा प्रसंगीं संघानें दुसरा एक भिक्षु साथीदार द्यावा अशी भगवंतानें अनुज्ञा दिली. "ज्या गृहस्थाचा अपराध केला असेल त्याची क्षमा मागितली म्हणजे व हा भिक्षु नीट रितीनें वागूं लागला म्हणजे संघानें त्याला माफी करावी."

## उत्क्षेपनीय कर्म ( बहिष्कार )

७६. बुद्ध भगवान् कौशाम्बी येथें घोषितारामांत रहात होता. त्या काळीं छन्न भिक्षु आपत्ति करून प्रायश्चित्त करूं इच्छीत नव्हता. अशा प्रकरणीं भिक्षूला बहिष्कार घालण्यांत यावा अशी भगवंतानें संघाला अनुज्ञा केली. "जर तो भिक्षु व्यवस्थितपणें वागत असला, आपले दोष कबूल करून त्यांचें प्रायश्चित्त करीत असला, तर संघानें त्याच्यावरचा बहिष्कार काढून घ्यावा."

७७. भगवान् बुद्ध श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं अरिष्ट नांवाच्या भिक्षूला अशी दृष्टि उद्भवली होती कीं, बुद्धाच्या उपदेशाप्रमाणें विचार केला असतां जे अंतरायकर धर्म सांगितले ते अंतरायाला कारण होत नाहींत. ही गोष्ट भिक्षूंना समजली तेव्हां ते त्याला म्हणाले, "हे अरिष्ट, तूं भगवंताच्या उपदेशाचा उलटा अर्थ करूं नकोस. विषयसुखांत दुःख फार व दोष मोठा

असें भगवंतानें वारंवार सांगितलें आहे. असें असतां विषयोपभोग धर्ममार्गांत अंतरायकर नाहींत असें तूं कसें म्हणतोस ?" भिक्षूंनीं पुष्कळ प्रयत्न केला, पण अरिष्ट आपली दृष्टि सोडण्यास तयार नव्हता. तेव्हां भगवंतानें त्याला बोलावून ही खोटी दृष्टि सोडण्यास सांगितलें, तरी तो ऐकेना. नंतर भगवंतानें अशा प्रकरणीं जो भिक्षु खोटी दृष्टि स्वीकारून उपदेश केला असतांहि ती सोडणार नाहीं त्याला बहिष्कार घालण्याची संघाला अनुज्ञा दिली. "तो भिक्षु नीट रितीनें वागून ती दृष्टि सोडीत असला तर त्याजवरचा बहिष्कार संघानें काढून घ्यावा."

## परिवास कर्म

७८. "ज्या भिक्षूच्या हातून संघादिशेष नांवाची आपत्ति घडली असेल त्याला संघानें परिवास द्यावा. ही आपत्ति एकच असून एक दिवस लपवून ठेविली असेल तर एकच दिवसाचा परिवास द्यावा; दोन दिवस लपवून ठेवली असेल तर दोन दिवसांचा; व पुष्कळ दिवस लपवून ठेवली असेल तर संघानें परिवासाची मर्यादा ठरवावी. पुष्कळ संघादिशेष आपत्ति घडल्या असतील व पुष्कळ दिवस लपवून ठेवल्या असतील तर परिवासाची मर्यादा संघानेंच ठरवावी. ज्याला परिवास दिला असेल त्या भिक्षूनें तितके दिवस निदान अरुणोदयाच्या वेळीं विहारांत रहातां कामा नये. अरुणोदयापूर्वीं उठून विहारापासून दूर अंतरावर जाऊन राहिलें पाहिजे, व सकाळीं परत येऊन, आपण परिवासाची एक रात्र घालविल्याची बातमी भिक्षूंना दिली पाहिजे."

## मानत्त (संघाचा संतोष)

७९. अशा रितीनें परिवास संपल्यानंतर त्या भिक्षूनें आपण परिवास पूर्ण केल्याची बातमी संघाला दिली पाहिजे. मग संघ त्याला सह रात्रींचें मानत्त देतो. म्हणजे त्या भिक्षूनें संघाला संतुष्ट करण्यासाठीं परिवासाच्या रात्रींप्रमाणें आणखी सहा रात्री (निदान अरुणोदयाच्या वेळीं) विहाराबाहेर काढल्या पाहिजेत.

## मूलायपटिकस्सना ( पूर्वस्थितीवर आणणें )

८०. ज्या भिक्षूला परिवास किंवा मानत्त दिलें असेल त्याकडून त्या स्थितींत असतांना जर संघादिशेष आपत्ति घडली तर संघानें त्याला पूर्वस्थितीवर आणावें. म्हणजे परिवासाच्या आणि मानत्ताच्या ज्या रात्री त्यानें विहाराबाहेर घालविल्या त्या सर्व फुकट जातात, व पुन्हां त्याला परिवास सुरू करावा लागतो, व तो संपल्यावर पुन्हां संघाकडून मानत्त घ्यावें लागतें.

## अब्भान ( संघांत परत घेणें )

८१. त्या भिक्षूनें परिवास आणि मानत्त पूर्ण केल्यावर जेथ वीस भिक्षूंचा संघ असेल तेथें जाऊन त्या संघासमोर आपण परिवास आणि मानत्त पूर्ण केल्याचें संघाला सांगावें; व संघानें नियमाप्रमाणें विज्ञप्ति करून त्रिवार जाहीर करून त्याला पुन्हां संघांत घ्यावें. ह्याला अब्भान कर्म म्हणतात.

## अग्निशाला आणि चंक्रम

८२. त्याकाळीं वैशाली येथें भिक्षूंला उत्तम अन्नाची आमंत्रणपरंपरा होती. चांगलीं जेवणें जेवल्यानें भिक्षूंला शरीरबाधा होत असे. जीवक कौमारभृत्य कांहीं कारणास्तव वैशालीला गेला होता. तेथें त्यानें भिक्षूंची ही दशा पाहिली, व भिक्षूंला अग्निशाळा आणि चंक्रम करण्याची परवानगी द्यावी अशी भगवंताला विनंती केली. त्याप्रमाणें भगवंतानें चंक्रम व अग्निशाळा करण्याची अनुज्ञा दिली.

" चंक्रम जमिनीपेक्षां थोडा उंच असावा. त्याच्यांत विषमता नसावी. पाहिजे असल्यास चंक्रमावर छप्पर घालावें, जेणेंकरून उन्हांत किंवा पावसांत चंक्रमण करण्यास सुलभ पडेल. "

" अग्निशाळेचा चौथरा जमिनीपेक्षां उंच असावा. जमिनीला लाकडांची तक्तपोशी किंवा दगडांची किंवा विटांची फरसबंदी करावी. जर अग्निशाळा लहान असेल तर अग्निकुंड एका बाजूला करावें, व मोठी असेल तर मध्यभागीं करावें. धूर जाण्यास वर धुराडें बांधावें. आंत एक पाण्याची कुंडी व कालवून तयार केलेल्या मातीचें भांडें ठेवावें. माती स्वच्छ

नसेल तर सुवासिक पदार्थांनी ती सुगंधित करावी. भिक्षूनें आपला पाट घेऊन अग्निशाळेंत जावें, व तोंडाला आगीचा त्रास होऊं नये म्हणून त्या मातीनें आपलें तोंड चोपडावें; व वाडग्यांत पाणी घेऊन वारंवार अंगास लावावें. अग्निशाळेंतून बाहेर आल्यावर स्नान करून अंग स्वच्छ करावें."

## बुद्धोपदेश चालू भाषेंत लिहावा

८३. यमेळु व तेकुल ह्या नांवाचे ब्राह्मण जातीचे विद्वान् भाऊ भिक्षु झाले होते. ते एकदा भगवंताला वंदन करून म्हणाले, "सध्यां निरनिराळे भिक्षु आपापल्या भाषेंतून बुद्धोपदेश लोकांना सांगतात. तेव्हां आम्हांला तो वैदिक भाषेंत तयार करण्यास परवानगी द्या." त्याबद्दल भगवंतानें त्यांना दोष दिला; व तो भिक्षूंना म्हणाला, "बुद्धोपदेशाचें वैदिक भाषेंत भाषांतर करूं नये, पण आपापल्या भाषेंतून बुद्धोपदेश शिकण्यास मी परवानगी देतों."

## विहारांत येणाऱ्या, राहणाऱ्या व विहारांतून जाणाऱ्या भिक्षूचें कर्तव्य

८४. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं आरामांत येणारे भिक्षु (आगंतुक) अव्यवस्थितपणें वागत असत. तेव्हां त्यांना भगवंतानें नियम घालून दिले ते असे :—

आगंतुक भिक्षूनें आरामांत शिरतेवेळीं वहाणा काढून त्या हातांत घ्याव्या. छत्री खालीं करावी. डोक्यावरून चीवर असल्यास खांद्यावर आणावें. आणि सावकाशपणें आरामांत प्रवेश करावा. आंत गेल्यावर भिक्षूंची एकत्र जमण्याची जागा कोठें आहे तें पहावें. तेथें जाऊन आपलें भिक्षापात्र व चीवर एका बाजूला ठेवावे व योग्य आसन पाहून त्यावर बसावें. पिण्याचें व वापरण्याचें पाणी कोठें असतें हें त्या भिक्षूंस विचारावें. पाणी प्यावयाचें असल्यास प्यावें व वापरण्याच्या पाण्यानें पाय धुवावे. पाय धूत असतां एका हातानें पाणी घेऊन दुसऱ्या हातानें पाय चोळावे. वहाणा पुसण्याचें फडकें कोठें आहे हें विचारून घेऊन त्यानें वहाणा पुसाव्या. पहिल्यानें कोरड्या फडक्यानें

पुसून मग त्या ओल्या फडक्यानें पुसाव्या. तेथला रहिवासी भिक्षु आपणाहून वडील असेल तर त्याला नमस्कार करावा; कमी वयाचा असेल तर त्याचा नमस्कार घ्यावा. आपली रहाण्याची जागा कोणती व तेथें कोणी रहात होता किंवा नाहीं हें विचारावें. भिक्षेला जाण्याची जागा कोणती व न जाण्याची कोणती, संघाला मदत करणारीं घरें कोणतीं हें समजावून घ्यावें. पायखाना व लघवीची जागा कोणती, व हातांत घेण्याची काठी कोणती हें विचारावें. आरामांत येण्याजाण्याच्या व संघकृत्यें करण्याच्या वेळा कोणत्या हें विचारून घ्यावें.

विहारांत भिक्षु नसतील तर दार ठोठावून थोडा वेळ बाहेर उभें रहावें. मग कडी काढून आंत जावें. तो विहार अस्वच्छ असेल तर शक्य असल्यास साफ करावा. कलम ९ ते ११ पर्यंत सांगितलेले नियम पाळण्यांत यावे.

८५. त्या काळीं आरामांत रहाणारे भिक्षु आगंतुक भिक्षूंशीं नीट रीतीनें वागत नसत. तेव्हां त्यांना भगवंतानें नियम घालून दिले ते असेः—

आगंतुक भिक्षु वडील असेल तर त्याला पाहिल्याबरोबर आवासिक भिक्षूनें आसन तयार करावें. पाय धुण्याचें पाणी व पाट ठेवावा. पुढें जाऊन त्याचें पात्र व चीवर घ्यावें. पिण्याचें पाणी पाहिजे असल्यास विचारावें. शक्य असल्यास (वर सांगितल्याप्रमाणें) त्याच्या वहाणा पुसाव्या; व पुसण्याचें फडकें धुवून घालावें. आगंतुक भिक्षूला नमस्कार करावा. रहाण्याची जागा दाखवावी. तेथें कोणी रहात होता कीं नाहीं तें सांगावें. भिक्षेला कोठें जावयाचें व कोठें जावयाचें नाहीं, व संघाला मदत करणारीं घरें कोणतीं हें सांगावें. शौचकूप, लघवीची जागा, वापरण्याची काठी वगैरे दाखवावी. येण्याजाण्याच्या वगैरे संघानें नियमित केलेल्या वेळा सांगाव्या. जर आगंतुक भिक्षु कमी वर्षांचा असेल तर आवासिकानें आसनावर बसूनच 'अमूक ठिकाणीं पात्र ठेव, अमूक ठिकाणीं चीवर ठेव, ह्या आसनावर बस' वगैरे सर्व सांगावें. आगंतुक भिक्षूनें त्याला नमस्कार करावा.

८६. त्या काळीं आरामांतून जाणारे भिक्षु (गमिक) नीट रीतीनें वागत नसत. त्यांना भगवंतानें नियम घालून दिले ते असे :—

गमिक भिक्षूनें आपल्या रहाण्याच्या जागीं लाकडी आणि मातीचीं भांडीं जागच्या जागीं व्यवस्थितपणें ठेवावीं; व दारें आणि खिडक्या बंद करून इतर भिक्षूंला सांगून जावें. जर कोणी भिक्षू नसेल तर श्रामणेराला सांगावें. श्रामणेरहि नसेल तर आरामाची काळजी घेण्यासाठीं ठेवलेल्या मनुष्यास सांगावें. कोणीच नसेल तर चार दगडांवर खाट ठेवून व त्यावर चौरंग वगैरे ठेवून लांकडाचीं व मातीचीं भांडीं जागच्याजागीं ठेवावीं, व खिडक्या आणि दारें बंद करून निघून जावें. विहारांत पावसाचें पाणी गळत असल्यास, तें स्थान शक्य असल्यास शाकारावें, किंवा दुसऱ्याकडून शाकारून घेण्याचा प्रयत्न करावा. परंतु शाकारणें शक्य नसल्यास जेथें गळत नसेल तेथें खाट, चौरंग वगैरे ठेवावीं. पण जर सर्वच विहारांत गळत असेल, तर शक्य असल्यास खाट वगैरे गांवांत न्यावी, किंवा इतरांकडून पोहोंचविण्याचा प्रयत्न करावा. तसें करणें शक्य नसल्यास मोकळ्या जागीं खाट वगैरे खालीं दगड ठेवून वर मांडावी. कां कीं, तेवढ्यानें निदान त्यांचे खूर वगैरे भाग शाबूत रहातील.

## भिक्षुणी-प्रव्रज्या

८७. बुद्ध भगवान् कपिलवस्तु येथें निग्रोधारामांत रहात होता. तेथें महाप्रजापती गौतमी भगवंताजवळ येऊन म्हणाली, "भदंत, बायकांना आपल्या धर्मपंथांत प्रव्रज्या घेण्यास परवानगी द्या." बुद्धानें ती गोष्ट तीनदां नाकारली, व तो तेथून वैशाली येथें आला. मागाहून महाप्रजापती गौतमी आपलें केशवपन करून व आणखी बऱ्याच शाक्य स्त्रियांना बरोबर घेऊन वैशालीला आली. प्रवासानें तिचे पाय सुजले होते व अंग धुळीनें माखलें होतें; ती उदासीन दिसत होती. अशा स्थितींत आनंदानें तिला पाहिलें, व उदासीनतेचें कारण विचारलें. स्त्रियांना प्रव्रज्या घेण्याची भगवान् परवानगी देत नाहीं म्हणून मी उदासीन आहें, असें गौतमीनें सांगितलें. तेव्हां तिला तेथेंच रहाण्यास सांगून, स्त्रियांस प्रव्रज्या घेण्यास परवानगी द्यावी अशी विनंती करण्यासाठीं आनंद भगवंताजवळ गेला, पण भगवंतानें ही गोष्ट नाकारली. तेव्हां आनंद म्हणाला, "भदंत, तथागतानें निवेदिलेल्या धर्मपंथांत प्रव्रज्या घेऊन एखाद्या स्त्रीला स्रोतआपत्तिफल, सकृदागामिफल, अनागामिफल किंवा अर्हत्फल प्राप्त करून घेणें शक्य आहे कीं नाहीं?"

भगवंतानें, "होय" असें उत्तर दिलें. आनंद म्हणाला, "असें जर आहे तर ज्या मावशीनें भगवंताला आईच्या अभावीं दूध पाजून लहानाचें मोठें केलें तिच्या विनंतीवरून भगवंतानें स्त्रियांना प्रव्रज्या द्यावी."

भगवान् म्हणाला, "जर महाप्रजापती गौतमी आठ जबाबदारीच्या गोष्टी (अट्ठ गरुधम्मा) पत्करण्यास कबूल असेल तर स्त्रियांना प्रव्रज्या घेण्यास मी परवानगी देतों. (१) भिक्षुणी संघांत कितीहि वर्षें राहिलेली असो; तिनें लहान मोठ्या सर्व भिक्षूंना नमस्कार केला पाहिजे. (२) ज्या गांवीं भिक्षु नसतील त्या गांवीं भिक्षुणीनें रहातां कामा नये. (३) दर पंधरवड्यास उपोसथ कोणत्या दिवशीं व उपदेश ऐकण्यास कधीं यावें, ह्या दोन गोष्टी भिक्षुणीनें भिक्षुसंघाला विचाराव्या. (४) वर्षाकाळानंतर भिक्षुणीनें दोन्ही संघांची (भिक्षुसंघाची व भिक्षुणी संघाची) प्रवारणा केली पाहिजे. (५) जिच्याकडून संघादिशेष आपत्ति घडली असेल त्या भिक्षुणीनें दोन्ही संघांकडून पंधरा दिवसांचें मानत्त घेतलें पाहिजे. (६) दोन वर्षें जी शिकली असेल अशा श्रामणेरीला दोन्ही संघांकडून उपसंपदा मिळाली पाहिजे. (७) कोणत्याहि कारणास्तव भिक्षुणीनें भिक्षूला शिवीगाळ देतां कामा नये. (८) आजपासून भिक्षुणीनें भिक्षूला उपदेश करतां कामा नये. भिक्षूनें भिक्षुणीला करावा."

आनंदानें त्या आठ गोष्टी महाप्रजापती गौतमीला कळविल्या, व तिला त्या पसंत पडल्या. तीच तिची उपसंपदा झाली असें भगवंतानें सांगितलें. तेव्हांपासून भिक्षुणीसंघाची स्थापना झाली. भिक्षुणीसंघांत प्रवेश करण्याचे नियम बहुतेक भिक्षुसंघाच्या नियमांप्रमाणेंच आहेत. उपसंपदेच्या वेळीं भिक्षूला 'तूं पुरुष आहेस ना?' असें विचारण्यांत येतें, तेथें भिक्षूणीला, 'तूं स्त्री आहेस ना?' असें विचारण्यांत येतें; व जेथें भिक्षूला 'तुझा उपाध्याय कोण?' असें विचारण्यांत येतें तेथें भिक्षूणीला 'तुझी प्रवर्तिनी कोण?' असें विचारण्यांत येतें. एखाद्या स्त्रीला मार्गांत अडथळे असल्या-कारणानें संघापाशीं येऊन उपसंपदा घेतां येत नसली, तर तिला एखाद्या भिक्षूणीमार्फत उपसंपदा देण्याचा संघाला अधिकार आहे. भिक्षुणीनें अरण्यांत राहातां कामा नये, वगैरे भिक्षूंना लागू न पडणारे कांहीं नियम पाळले पाहिजेत.

# भाग दुसरा

# प्रतिबंधक नियम

## चार पाराजिका

१. बुद्ध भगवान् वैरंजा येथें पांचशें भिक्षूंच्या मोठ्या संघासह नळेरुपिचुमंद वृक्षाखालीं रहात होता. त्याची कीर्ति ऐकून वेरंज ब्राह्मण तेथें आला, व कुशल प्रश्नादिक विचारून त्याला म्हणाला, "भो गौतम, तुम्ही वृद्ध ब्राह्मणांना नमस्कार वगैरे करून मान देत नसतां असें मी ऐकतों. हें तुमचें वर्तन मला योग्य वाटत नाहीं." बुद्ध म्हणाला, "इहलोकीं ज्याला नमस्कार करून तथागतानें मान द्यावा असा मनुष्य मला आढळत नाहीं." थोडा संवाद झाल्यावर आपल्या वडीलपणाबद्दल बुद्धानें एक उपमा सांगितली, ती अशी– "एकाद्या कोंबडीनें दहा बारा अंडीं घातलीं असलीं व त्यांतून पिलें निघालीं; त्यांत जें प्रथमतः आपल्या प्रयत्नानें अंड्यांतून बाहेर निघेल त्याला ज्येष्ठ म्हणतां येईल कीं नाहीं?" ब्राह्मणानें 'होय' असें उत्तर दिल्यावर बुद्ध म्हणाला, "अविद्येच्या अंडकोशांत गुरफटून गेलेल्या लोकांतून मी प्रथमतः बाहेर निघालों आहें. आणि म्हणूनच मी ज्येष्ठ आहें." बुद्धाच्या ह्या संवादानें वेरंज ब्राह्मण प्रसन्न झाला व वर्षाकाळ वैरंजा येथें घालविण्यास त्यानें बुद्धाला विनंति केली.

त्या काळीं वैरजा येथें दुष्काळ पडला होता. उत्तर देशांतून घोड्यांचा व्यापार करणारे पांचशें घोडे घेऊन वर्षाकाळासाठीं वैरंजा येथें राहिले होते. त्यांनीं आपल्या कंपूंत भिक्षूंना प्रत्येकीं अर्धाशेर उकडून सडलेले जवस देण्याचा नियम केला होता. भिक्षु ते जवस आणून उखळांत कुटून खात असत. भगवंतासाठीं जे जवस मिळत ते पाट्यावर वाटून आनंद भगवंताला देत असे. भगवंतानें मुसळाचा शब्द ऐकून आनंदाला विचारलें कीं, हें काय आहे? आनंदानें भिक्षु जवस कुटून खात असतात असें सांगितलें. तेव्हां

भगवान् म्हणाला, " आनंद, शाबास ! तुम्ही सत्पुरुष आहां; पण पुढें असे भिक्षु होणार आहेत कीं, ते उत्तम अन्नाचीहि पर्वा करणार नाहींत. "

एके दिवशीं आयुष्मान् सारिपुत्त बुद्धाजवळ आला आणि हात जोडून म्हणाला, " भदन्त आतां भिक्षूंना प्रतिबंधक नियम घालून देण्याची वेळ आली आहे. त्यायोगें ब्रह्मचर्य चिरस्थायी होईल. " बुद्ध म्हणाला, " सारिपुत्रा, तूं दम धर. प्रतिबंधक नियम करण्याचा समय कोणता हें तथागतालाच माहीत आहे. संघांत पापधर्म जोंपर्यंत शिरले नाहींत तोंपर्यंत तथागत तन्निवारक नियम करीत नाहीं. संघस्थापनेला बराच काळ लोटल्यावांचून, संघाचा विस्तार मोठा झाल्यावांचून, संघाचा लाभ मोठा झाल्यावांचून, संघांत पांडित्याचा प्रसार झाल्यावांचून, त्यांत पापधर्माचा प्रवेश होत नसतो. सध्यां संघ पापधर्मापासून मुक्त आहे, व शुद्ध आहे. "

तो वर्षाकाळ संपल्यावर भगवान् आनंदाला म्हणाला, " हे आनंद, तथागतांची अशी वहिवाट आहे कीं, वर्षाकाळासाठीं ज्यानें आमंत्रण दिलें त्यांना भेटल्यावांचून दुसरीकडे जावयाचें नाहीं. तेव्हां चल, आपण वेरंज ब्राह्मणाला भेटावयाला जाऊं. " ते दोघे वेरंज ब्राह्मणाच्या घरीं गेले. भगवंताला आमंत्रण करून सर्व वर्षाकाळभर त्याची चौकशी केली नाहीं ह्याबद्दल वेरंज ब्राह्मणाला पश्चात्ताप झाला. त्यानें भगवंताला भिक्षुसंघासह निमंत्रण करून उत्तम भोजन दिलें. तेथून भगवान् अनुक्रमें सोरेय्य, संकस्स, कण्णकुज्ज येथून पयागपतिट्ठान येथें गंगानदी उतरून वाराणसीला आला; व तेथें कांहीं काळ राहून वैशालीला आला.

वैशाली जवळच कलंदक नांवाचा गांव होता. तेथें सुदिन्न नांवाचा श्रेष्टि[illegible] रहात असे. कांहीं कारणास्तव आपल्या मित्रांबरोबर तो वैशालीला आला; व तेथें एका सभेंत बुद्धाचा धर्म ऐकून त्याला प्रपंचाविषयीं विरक्ति उत्पन्न झाली. पण आईबापांच्या परवानगीशिवाय त्याला भिक्षु होतां येत नाहीं असें बुद्धानें सांगितलें तेव्हां घरीं जाऊन सुदिन्नानें आईबापांची परवानगी मागितली. पण त्यांनीं ती दिली नाहीं. सुदिन्न उघड्या जमिनीवर उपाशीं पडून राहिला. जर आपणाला परवानगी मिळाली तरच येथून उठेन, नाहींतर येथेंच मरेन असें तो म्हणाला. अशा रीतीनें त्यानें सात जेवणें टाळलीं. तेव्हां निरुपाय होऊन आईबापांनीं भिक्षु होण्याची त्याला परवानगी

दिली, व तो वैशालीला येऊन भिक्षु झाला, आणि मोठ्या उत्साहानें वागूं लागला.

एकदां वज्जिदेशांत दुष्काळ पडला होता. त्या वेळीं सुदिन्न आपल्या गांवीं परत आला. तेथें आपल्या घरीं एक दासी शिळें अन्न बाहेर टाकीत असतां पाहून तो तिला म्हणाला, " जर तें बाहेर टाकावयाचें असेल तर ह्या माझ्या पात्रांतच टाक." त्या दासीनें त्याला ओळखून त्याच्या आईला हें वर्तमान सांगितलें. इकडे सुदिन्न एका भिंतीआड बसून तें शिळें अन्न खात होता. तें त्याच्या बापानें पाहिलें, व घरीं न जातां हें शिळें अन्न कां खातोस, असें त्याला विचारलें. सुदिन्नानें त्याच्या घरींच हें अन्न मिळालें असें सांगितलें. तेव्हां बाप त्याला हातीं धरून घरीं घेऊन गेला, व आणखी जेवावयास आग्रह करूं लागला. परंतु जेवण झालें असल्याकारणानें सुदिन्नानें पुन्हा जेवण्याचें नाकारलें. तेव्हां बापानें त्याला दुसऱ्या दिवशीं जेवावयास बोलाविलें.

दुसऱ्या दिवशीं तो घरीं गेला. तेथें त्याच्या आईबापांनीं द्रव्याच्या दोन मोठ्या राशी केल्या होत्या, व त्याच्या बायकोला नटवून सजवून तयार केलें होतें. सुदिन्न तेथें पोहोंचल्यावर त्या राशी उघड्या करून बाप त्याला म्हणाला, " हें सर्व तुझ्या पूर्वजांचें द्रव्य आहे, त्याचा उपभोग घेऊन तूं येथें सुखानें रहा." सुदिन्न म्हणाला, " तुम्हांला वाईट वाटत नसेल तर एक गोष्ट सांगतों." " सांग काय तें, " असें पित्यानें उत्तर दिलें. सुदिन्न म्हणाला, " मोठमोठे गोण तयार करून त्यांत हें द्रव्य भरा, व गंगेच्या मध्यभागीं तें नेऊन पाण्यांत टाका. कां कीं, ह्या द्रव्यापासून तुम्हांला जें भय व जो रक्षण करण्याचा त्रास पडत आहे, तें भय व तो त्रास पडणार नाहीं." त्याच्या बापाला अर्थातच हें बोलणें आवडलें नाहीं. त्यानें आपल्या सुनेकडूनहि सुदिन्नाचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. तेव्हां सुदिन्न म्हणाला, " मला जर जेवावयास घालावयाचें असेल तर घाला. हा उगाच त्रास कशाला देतां?" त्याला चांगलें जेऊं घातल्यानंतर आई म्हणाली, " बाळ सुदिन्न हें आमचें घराणें फार मोठें आहे. आमच्या कुळांत पुष्कळ धनद्रव्य आहे. तेव्हां निदान आम्हांला एक बीजक (कूळ चालविणारा मुलगा) तरी दे. जर आमच्या कुळांत मुलगा नसला तर सर्व

संपत्ति लिच्छवी राजे घेऊन जातील." सुदिन्नाला ही गोष्ट पसंत पडली; व त्यानें त्रिवार स्त्रीसंग केला. त्यायोगें त्याच्या बायकोला मुलगा झाला. याचें नांव बीजक असेंच ठेवण्यांत आलें; व सुदिन्नाला बीजकपिता असें म्हणूं लागले. त्यामुळें सुदिन्नाला फार मनस्ताप झाला. ही गोष्ट भिक्षूंना समजली, तेव्हां त्यांनीं त्याची फार निंदा केली. बुद्ध भगवंताला ही गोष्ट समजली, तेव्हां त्यानेंहि त्याची निंदा केली, व भिक्षूंला नियम घालून दिला तो असा:— "जो भिक्षु मैथुन करील तो पाराजिक समजावा. तो भिक्षु-सहवासाला योग्य नाहीं." हा नियम केल्यानंतर एका भिक्षूनें एका मर्कटीशीं संग केला त्यावरून त्या नियमांत आणखी भर घालावी लागली. शेवटीं पूर्ण नियम करण्यांत आला तो असा:—

**जो भिक्षु भिक्षूंचे नियम न सोडतां व आपलें दौर्बल्य आगाऊ कबूल न करतां मनुष्याशीं किंवा पशूशीं मैथुन-व्यवहार करील तो पाराजिक व सहवासाला अयोग्य जाणावा ॥ १ ॥**

२. बुद्ध भगवान् राजगृह येथें गृध्रकूट पर्वतावर रहात होता. त्या काळीं कांहीं प्रसिद्ध भिक्षु इसिगिली पर्वताच्या पायथ्याशीं गवताच्या झोंपड्यांत वर्षाकाळासाठीं राहिले. धनिय कुंभकारपुत्रहि एक गवताची झोंपडी बांधून तींत वर्षाकाळासाठीं राहिला. वर्षाकाळ संपल्यावर गवताच्या झोंपड्या मोडून गवत व लांकडें जागच्याजागीं ठेवून ते भिक्षु प्रवासाला गेले. पण धनिय वर्षभर तेथेंच राहिला. तो जेव्हां गांवांत भिक्षेसाठीं जात असे तेव्हां लांकडें नेणाऱ्या बायका त्याची झोंपडी मोडून लांकडें व गवत घेऊन जात असत. धनिय पुन्हां आपली झोंपडी बांधी व त्या बायका पुन्हां ती मोडून नेत असत. असा प्रकार तीनदां घडला. धनियाला कुंभाराचें काम येतच असे. तेव्हां लांकडाच्या झोंपडीला कंटाळून त्यानें मातीची झोंपडी बनविली, व लाकडें व गवत भरून ती भाजून तयार केली. ती कुटिका फारच सुंदर झाली. इंद्रधनुष्यासारखा तिचा रंग होता, व किंकिणी-शब्दासारखा तिच्यांतून शब्द निघत असे. भगवंताला ही गोष्ट समजली तेव्हां, भिक्षूला अशा रितीनें सर्व मृत्तिकामय झोंपडी बनविणें योग्य नाहीं असें म्हणून त्यानें भिक्षूंकडून ती मोडविली. त्यानंतर धनियाच्या मनांत असा विचार आला कीं, आतां आपण सरकारी वखारींतील अधिकारी मित्राकडे जाऊन लांकडें मागून

घ्यावीं, व लांकडांची कुटिका करावी. त्याप्रमाणें त्या अधिकाऱ्याकडे जाऊन त्याला सर्व वृत्त निवेदन करून त्यानें लांकडें मागितलीं; पण तो अधिकारी म्हणाला, "हीं सरकारी लांकडें तशाच जरुरीच्या प्रसंगीं उपयोगासाठीं ठेवलेलीं आहेत. जर राजाकडून देवविण्यांत येतील तर खुशाल घेऊन चला." धनिय म्हणाला, "राजानें तीं दिलींच आहेत." त्या अधिकाऱ्यानें असा विचार केला कीं, हे शाक्यपुत्रीय श्रमण धर्मचारी, समचारी, ब्रह्मचारी, सत्यवादी, शीलवंत आणि कल्याणधर्म आहेत; आणि राजाचीहि ह्यांच्यावर मर्जी आहे. तेव्हां राजानें न देतां दिलेलीं आहेत असें हा म्हणणार नाहीं. तो धनियाला म्हणाला, "असें असेल तर घेऊन जा." धनियानें त्या लांकडांचे कुटीला लागणारे तुकडे कापून तयार करवून त्यांची कुटिका बनविली.

मगधमहामात्र वस्सकार ब्राह्मण राजगृहांतील निरनिराळ्या कामाची देखरेख पहाण्यासाठीं फिरत असतां सरकारी वखारींत आला. तेथील सरकारी लांकडें राजाकडून धनियाला देण्यांत आलीं हें वर्तमान त्याला समजलें; आणि राजानें असें भलतेंच आचरण केल्याबद्दल त्याला वाईट वाटलें. बिंबिसार राजाजवळ जाऊन ह्या गोष्टीची त्यानें चौकशी केली. राजानें वखारीवरील अधिकाऱ्याला बांधून आणण्याचा हुकूम फर्माविला. त्याला बांधून नेत असतां वाटेंत धनिय भेटला; आणि म्हणाला, "तुला बांधून नेत आहेत तें कां?" "भदंत, त्या लांकडासाठीं मला बांधून नेत आहेत" असें त्यानें उत्तर दिलें. धनिय म्हणाला, "तूं पुढें हो; मीहि तुझ्या मागोमाग येतो." अधिकारी म्हणाला, "राजानें मला ठार करण्यापूर्वी या म्हणजे झालें!"

धनिय बिंबिसार राजाच्या वाड्यांत गेला आणि तेथें त्याच्यासाठीं मांडलेल्या आसनावर बसला. बिंबिसार राजा त्याला नमस्कार करून एका बाजूला बसला आणि म्हणाला, "भदंत, मी तुम्हाला सरकारी लांकडें दिलीं ही खरी गोष्ट आहे का?" "होय, महाराज" धनियानें उत्तर दिलें. राजा म्हणाला, "आम्ही राजेलोक म्हणजे अनेक कामांत गुंतलेले असावयाचे. दिलें असतांहि विसर पडणें शक्य आहे. तेव्हां मीं लांकडें कधीं दिलीं ह्याची मला नीट आठवण द्या." धनिय म्हणाला, "जेव्हां तुमचा राज्याभिषेक

झाला तेव्हां श्रमणब्राह्मणाला तृणकाष्ठोदकहि दिलें आहे, असें म्हटल्याचें तुम्हांस स्मरतें ना ?" राजा म्हणाला, "होय, मला आठवतें. साधुवृत्ति आणि सज्जन श्रमणब्राह्मण पुष्कळ आहेत. लहान सहान गोष्टींतहि त्यांना शंका उत्पन्न होते. म्हणून त्यांना उद्देशून मी असें बोललों, तें अरण्यांत ज्याला कोणी मालक नाहीं अशा तृणकाष्ठासंबंधानें. पण तुम्हीं एवढ्या वाक्यावर अवलंबून न दिलेलीं लांकडें घेऊन जातां हें कसें ? माझ्यासारख्या राजाला राष्ट्रांत रहाणाऱ्या श्रमणाला किंवा ब्राह्मणाला ठार मारणें, कारागृहांत टाकणें किंवा हद्दपार करणें उचित नाहीं. तुम्ही आतां येथून जा. केशाच्या अंतरानें तुम्ही सुटलां असें समजा, व पुन्हां असें काम करूं नका."

ही गोष्ट लोकांना समजली, तेव्हां ते भिक्षूंची निंदा करूं लागले. भिक्षूंना ही गोष्ट समजली तेव्हां ते धनियाला दोष देऊं लागले, व त्यांनीं ती भगवंताला कळविली. भगवंतानेंहि धनियाला दोष दिला व ह्या प्रकरणीं नियम केला तो असाः—

"जो भिक्षु न दिलेली चोरीची वस्तु—जिच्यासाठीं राजेलोक चोराला पकडून तूं चोर आहेस, मूर्ख आहेस, मूढ आहेस, स्तेन आहेस असें म्हणून मारतील, तुरुंगांत टाकतील किंवा हद्दपार करतील—घेईल तो देखील पाराजिक होतो, सहवासाला अयोग्य होतो."

हा नियम केल्यानंतर षड्वर्गीय भिक्षूंनीं अरण्यांत एका धोब्याच्या वस्त्रांचें गाठोडें चोरलें; व इतर भिक्षूंनीं तुम्हीं असें कां केलें असें विचारलें असतां, भगवंतानें केलेला नियम गांवापुरता आहे, अरण्याला लागू पडत नाहीं, असें ते म्हणूं लागले. तेव्हां पूर्वीच्या नियमांत भगवंतानें फेरफार केला तो असा :—

**जो भिक्षु गांवांतून किंवा अरण्यांतून न दिलेली चोरीची वस्तु—जिच्यासाठीं राजेलोक चोराला पकडून, तूं चोर आहेस, मूर्ख आहेस, मूढ आहेस, स्तेन आहेस असें म्हणून मारतील, तुरुंगांत टाकतील किंवा हद्दपार करतील—घेईल तो देखील पाराजिक होतो, सहवासाला अयोग्य होतो. ॥ २ ॥**

३. बुद्ध भगवान् वैशाली येथें महावनांत कूटागार शाळेंत रहात होता. त्या काळीं तो शरीराच्या अशुभतेची भावना करण्याविषयीं भिक्षूंला उपदेश करीत असे; शरीराच्या अशुभतेच्या ध्यानाची स्तुति करीत असे. एकदां तो भिक्षूंला म्हणाला, ' एक पंधरवडाभर मी एकान्तांत राहूं इच्छितों. ह्या अवधींत भिक्षा घेऊन येणाऱ्या भिक्षूशिवाय दुसऱ्या कोणीहि माझ्याजवळ येतां कामा नये. त्याप्रमाणें भगवान् एकान्तांत राहिला. इकडे भिक्षु भगवंतानें सांगितल्याप्रमाणें अशुभ भावना करूं लागले, व त्यामुळें शरीराचा त्यांना कंटाळा येऊं लागला. त्यांपैकीं कांहींनीं आत्मघात केला; कांहींनीं परस्परांला ठार केलें; कांहीं मिगलंडिक नांवाचा एक श्रमणवेषधारी होता त्याजपाशीं जाऊन म्हणाले " तूं जर आम्हांला ठार मारशील तर आमचीं पात्रचीवरें तुला देऊं " मिगलंडिकानें पात्रचीवरांचें वेतन घेऊन त्यांना ठार मारलें; व रक्तानें माखलेली तलवार घेऊन तो वग्गुमुदा नदीवर गेला. तेथें तलवार धूत असतां त्याला मनस्ताप उत्पन्न झाला. मीं हें किती वाईट कृत्य केलें असें त्याला वाटूं लागलें. इतक्यांत एक मारलोकींची देवता तेथें उदकावर प्रगट झाली, व म्हणाली, " हे सत्पुरुषा, तूं फार चांगलें कृत्य केलेंस. ज्यांना मोक्ष मिळाला नाहीं त्यांना मोक्षाला पाठवून तूं पुष्कळ पुण्य जोडलेंस. " तें त्या देवतेचें भाषण ऐकून मिगलंडिकाला फार आनंद झाला; व तीक्ष्ण तलवार घेऊन प्रत्येक विहारांत जाऊन तो म्हणूं लागला कीं, ' मोक्ष मिळाला नाहीं असा कोण आहे ? मी कोणाला मोक्षाला पाठवूं ?' हें त्याचें भाषण ऐकून जे भिक्षु अवीतराग असत त्यांना भय वाटत असे. पण जे वीतराग असत त्यांना त्याचें कांहींच वाटत नसे. मिगलंडिक दररोज एकपासून साठपर्यंत भिक्षु ठार मारूं लागला.

तो पंधरवडा संपल्यावर भगवान् एकान्तांतून बाहेर आला आणि आनंदाला म्हणाला, " भिक्षुसंघ असा कमी कां दिसतो ? " आनंदानें तें वर्तमान सांगितलें; तेव्हां आनंदाला पाठवून वैशालीच्या आसपास रहाणाऱ्या भिक्षूंना भगवंतानें कूटागार शाळेंत एकत्र केलें आणि तो म्हणाला, " भिक्षुहो, ह्या प्राणायामस्मृतिसमाधीची जर भावना केली तर सुंदर मधुर सुख मिळतें; व उत्पन्न झालेले पापविचार ताबडतोब नष्ट होतात. उन्हाळ्याच्या शेवटीं वाऱ्यानें उडालेली धूळ अकालिक महामेघानें जशी

जागच्याजागीं शांत करावी, तशी ही समाधि उत्पन्न झालेल्या पापविचारांना जागच्याजागीं शांत करते. भिक्षुहो, ह्या समाधीच्या भावनेचा प्रकार कसा? एकादा भिक्षु अरण्यांत झाडाखालीं किंवा एकांतस्थळीं जाऊन देह सरळ ठेवून मोठ्या सावधगिरीनें बसतो, तो सावधानपणें आश्वास घेतो व सावधानपणें प्रश्वास सोडतो. दीर्घ आश्वास घेत असला तर दीर्घ आश्वास घेत आहे असें जाणतो. दीर्घ प्रश्वास सोडीत असला तर दीर्घ प्रश्वास सोडीत आहे असें जाणतो. ऱ्हस्व आश्वास घेत असला तर ऱ्हस्व आश्वास घेत आहे असें जाणतो. ऱ्हस्व प्रश्वास सोडीत असला तर ऱ्हस्व प्रश्वास सोडीत आहे असें जाणतो. सर्व देहाची स्मृति ठेवून आश्वास करण्याचा व प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. कायसंस्कार शांत करून आश्वास करण्याचा व प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. प्रीतीचा अनुभव घेऊन आश्वास करण्याचा व प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. सुखाचा अनुभव घेऊन आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. चित्तसंस्कार जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. चित्तसंस्कार शांत करून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. चित्त जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. चित्ताला प्रमुदित करून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. चित्ताचें समाधान करून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. चित्ताला विमुक्त करून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. अनित्यता जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. वैराग्य जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. निरोध जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. त्याग जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. अशा रीतीनें प्राणायामस्मृतिसमाधीची भावना केली असतां, ती उत्पन्न झालेले पापविचार ताबडतोब शमन करिते."

नंतर भगवंतांनीं ह्या प्रकरणीं भिक्षूंना बोलावून, ते आत्महत्या करतात किंवा मिगलंडिकाशीं जाऊन आपला वध करण्यास सांगतात ह्याची चौकशी केली; व ह्या गोष्टीचा निषेध करून भिक्षूंला नियम घालून दिला तो असा :—

"जो भिक्षु जाणूनबुजून मनुष्याला ठार मारील किंवा त्यासाठीं शस्त्र शोधील तोही पाराजिक होतो; सहवासाला अयोग्य होतो."

त्या काळीं एक उपासक आजारी होता. त्याची बायको अत्यंत देखणी होती. षड्वर्गीय भिक्षूंची तिच्यावर पापदृष्टि पडली. त्यांना असें वाटलें कीं हा उपासक मेला तर ही स्त्री आपल्या हस्तगत होईल. ते त्या उपासका-जवळ जाऊन म्हणाले, "हे उपासका, तूं सज्जन आहेस. तूं पुष्कळ कुशल कर्म केलें आहेस. भयभीतांचें रक्षण केलें आहेस. दुष्ट पापकृत्य केलें नाहींस. आतां तुला ह्या दुःखित जगण्यानें काय करावयाचें ! जगण्यापेक्षां तुला मरणेंच चांगलें. अशा स्थितींत जर तूं मेलास तर स्वर्गांत जन्म पावून खूप चैन भोगशील." त्या उपासकाला हें षड्वर्गीयांचें बोलणें पटलें; व अपथ्य-कारक अन्नपाण्याचें सेवन करून त्यानें प्राणत्याग केला. तेव्हां त्याच्या बायकोनें षड्वर्गीयांना फार दोष दिला. ह्यांनीं मरणाची स्तुति करून माझ्या पतीला मारिलें असें ती म्हणूं लागली. तिनें केलेला आरोप ऐकून दुसरे लोकहि भिक्षूंला दोष देऊं लागले. भगवंताच्या कानीं जेव्हां ही गोष्ट आली, तेव्हां त्यानें वरील नियमांत फेरफार केला तो असाः—

**जो भिक्षु जाणूनबुजून मनुष्याला ठार मारील किंवा त्यासाठीं शस्त्र शोधील किंवा मरणाची स्तुति करील, मरणाला उत्तेजित करील— हे मनुष्या, तुला ह्या दुःखद जगण्यानें काय करावयाचें, तुला जगण्या-पेक्षां मरणें चांगलें, अशा रितीनें अनेक बाजूंनीं मरणाची स्तुति करील, मरणाला उत्तेजित करील—तोहि पाराजिक होतो, सहवासाला अयोग्य होतो ॥ ३ ॥**

४. बुद्ध भगवान् वैशाली येथें महावनांत कूटागार शाळेंत रहात होता. त्या काळीं कांहीं नामांकित भिक्षू वग्गुमुदा नदीच्या कांठीं वर्षा-काळासाठीं रहात असत. त्या वर्षी वज्जिराष्ट्रांत दुष्काळ पडला होता. त्यामुळें त्या भिक्षूंला आपला निर्वाह कसा करावा ह्याची काळजी पडली. कांहीं म्हणाले, "आपण गृहस्थांच्या कामावर देखरेख करून आपला निर्वाह करूं." दुसरे म्हणाले, "आपण गृहस्थांचें दूतकर्म करूं; व आपला निर्वाह करूं." पण तिसरे म्हणाले, "ह्यांत कांहीं फायदा नाहीं. आपण गृहस्थांपाशीं, अमुक तमुक भिक्षूंला प्रथम ध्यान प्राप्त झालें आहे, द्वितीय ध्यान, तृतीय ध्यान, चतुर्थ ध्यान प्राप्त झालें आहे, अमका स्रोतआपन्न आहे, सकृदागामी, अनागामी, अर्हत्, त्रैविद्य, षडभिज्ञ आहे अशी परस्परांची स्तुति

करूं. त्यायोगें ते आम्हांस भिक्षा देतील, व आम्हीं सुखानें आणि सामग्रीनें वर्षाकाळ घालवूं." ही गोष्ट सर्वांनाच पसंत पडली. त्यांनीं गृहस्थांपाशीं परस्परांची स्तुति चालविली; व गृहस्थांचा त्यांच्यावर विश्वास बसून स्वतः हाल कष्ट सोसूनहि ते त्यांना यथास्थित भिक्षा देऊं लागले. अन्नपानाची ददात नसल्यामुळें ते भिक्षु चांगले लठ्ठ झाले.

देशांत सर्वत्र दुष्काळ असल्यामुळें बहुधा भिक्षु कृश आणि दुर्बळ दिसत असत. पण वग्गुमुदा नदीच्या तीरावर रहाणारे भिक्षु जेव्हां भगवंताच्या दर्शनाला आले तेव्हां ते त्याला चांगले लठ्ठ दिसले. वर्षाकाळ कसा काय घालविला ह्याची भगवंतानें त्यांच्याशीं चौकशी केली. आपण परस्परांची गृहस्थांपाशीं स्तुति करून यथास्थित भिक्षा मिळण्याची सोय कशी केली, हें वर्तमान त्यांनीं भगवंताला सांगितलें. तेव्हां त्यांची निंदा करून सर्व भिक्षूंला उद्देशून भगवान् म्हणाला, "भिक्षूहो, हे पांच चोर इहलोकीं आढळतात:—(१) एखाद्या महाचोराला असें वाटतें कीं, शंभर, हजार लोकांना बरोबर घेऊन ठार मारीत आणि लुटालूट करीत, गांवांतून, शहरांतून आणि राजधानींतून मी कधीं फिरत राहीन ? कांहीं काळानें आपल्या विचाराप्रमाणें शंभर किंवा हजार लोक बरोबर घेऊन गांवांतून, शहरांतून आणि राजधानींतून तो घातपात आणि लुटालूट करीत फिरत असतो. त्याचप्रमाणें एखाद्या पाप-भिक्षूला असें वाटतें कीं मी शंभर किंवा हजार भिक्षूंला बरोबर घेऊन लोकांकडून सत्कार आणि पूजा घेत घेत गांवांतून, शहरांतून आणि राज-धानींतून कधीं प्रवास करीत राहीन ? कांहीं काळानें तो शंभर किंवा हजार भिक्षूंला घेऊन अशा रीतीनें गांवांतून, शहरांतून आणि राजधानींतून प्रवास करीत जातो. हा पहिला महाचोर समजला पाहिजे. (२) दुसरा एक पापभिक्षु तथागतानें उपदेशिलेला धर्म शिकतो, व तो आपणच स्वतः जाणला असें सांगतो. हा दुसरा महाचोर. (३) तिसरा एकादा पापभिक्षु श्रद्धावान् सब्रह्मचारी परिशुद्ध ब्रह्मचर्य पाळीत असतां त्यांच्यावर खोटा आळ आणून त्याला ब्रह्मचर्यापासून भ्रष्ट करूं पहातो. हा तिसरा महाचोर. (४) चवथा एकादा पापभिक्षु, आराम, आरामाची जागा, विहार, विहाराची जागा, मंचक, आसन, उशी, लोखंडाचीकढई व इतर भांडीं, कुऱ्हाड, कुदळ वगैरे आउतें, बांबू, गवत, माती, लांकडी किंवा मातीचीं भांडीं इत्यादि सांघिक

वस्तु गृहस्थांना देऊन त्यांना लोभवितो. हा चवथा महाचोर. ( ५ ) पण जो आपल्या अंगीं नसलेला लोकोत्तर धर्म ( ध्यानसमाधि वगैरे ) प्रकाशित करतो तो सर्व जगांत अत्यंत मोठा चोर समजला पाहिजे."

ह्याप्रमाणें भगवंतानें अनेक रीतीनें वग्गुमुदा नदीच्या तीरावरून आलेल्या भिक्षूंची निंदा करून भिक्षूंला नियम घालून दिला तो असाः— "जो भिक्षु न जाणतां आर्यज्ञानदर्शनाला उपयोगी पडणारा लोकोत्तर धर्म आपणाला प्राप्त झाल्याचें भासवील व पुढें चौकशी केली असतां किंवा केली नसतां दोषी होऊन शुद्ध होण्याच्या इच्छेनें म्हणेल कीं, मी न जाणतांच न पाहतांच खोटें बोललों— तोहि पाराजिक होतो, सहवासाला अयोग्य होतो."

त्या काळीं कांहीं भिक्षूंला आपणाला अर्हत्त्व प्राप्त झाल्याचा भ्रम झाला होता. ती गोष्ट त्यांनीं प्रकाशित केली. परंतु पुढें तो भ्रम होता असें त्यांस आढळून आलें. हें वर्तमान भगवंताला समजलें. तेव्हां त्यानें वरील नियमांत फेरफार केला तो असाः—

**जो भिक्षु न जाणतां आर्यज्ञानदर्शनाला उपयोगी पडणारा लोकोत्तर धर्म आपणाला प्राप्त झाल्याचें भासवील, व पुढें चौकशी केली असतां किंवा केली नसतां दोषी होऊन शुद्ध होण्याच्या इच्छेनें म्हणेल कीं, मी न जाणतांच न पहातांच खोटें बोललों—जर भ्रम झाला नसेल तर—तोहि पाराजिक होतो, सहवासाला अयोग्य होतो ॥ ४ ॥**

## तेरा संघादिशेष

५. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं आयुष्मान् सेय्यसक ब्रह्मचर्य आचरण्यांत असंतुष्ट होता; व त्यायोगें अत्यंत कृश आणि कुरूप दिसत होता. त्याला पाहून उदायी म्हणाला, "तूं असा कृश व दुर्वर्ण कां दिसतोस ? तूं ब्रह्मचर्य आचरण्यांस असंतुष्ट आहेस काय ?" सेय्यसकानें होय असें उत्तर दिलें. तेव्हां उदायी म्हणाला, "असें जर आहे तर तूं यथेच्छ भोजन कर, यथेच्छ नीज व यथेच्छ स्नान कर; आणि जेव्हां तुझ्या मनांत कामविकार

उत्पन्न होईल तेव्हां हातानें वीर्यपात कर." सेय्यसक म्हणाला, "पण असें करणें योग्य आहे काय?" उदायी म्हणाला, "होय, मी देखील असेंच करतों." तेव्हांपासून सेय्यसक यथेच्छ जेवूं लागला, यथेच्छ निजूं लागला, यथेच्छ स्नान करूं लागला; व जेव्हां जेव्हां कामविकारानें पीडित होत असे तेव्हां हातानें वीर्यपात करूं लागला. त्यायोगें पुन्हां तो धष्टपुष्ट दिसूं लागला. भिक्षूंनीं, तो कोणत्या औषधानें बरा झाला व पूर्वस्थितीवर आला असें त्यास विचारलें. तेव्हां त्यानें आपण औषधानें बरा झालों नसून 'अशा अशा उपायानें बरा झालों' हें वर्तमान त्यास सांगितलें. ते म्हणाले, "हे सेय्यसका, ज्या हातानें श्रद्धापूर्वक दिलेलें अन्न तूं जेवतोस, त्याच हातानें वीर्यपात करतोस काय?" ह्या बाबतींत त्यांनीं सेय्यसकाची फार निंदा केली. भगवंतानेंहि त्याची निंदा केली; व भिक्षूंला नियम घालून दिला तो असाः—— "चेतनायुक्त वीर्यपात संघादिशेष होतो."

त्या काळीं भिक्षु उत्तम जेवणें जेवून निष्काळजीपणें निजत असत; व त्यायोगें स्वप्नांत वीर्यपात होत असे. तेव्हां संघादिशेष आपत्ति हातून घडली अशी त्यांस शंका आली. पण स्वप्नांत घडलेलें कर्म पूर्णपणें चेतनायुक्त म्हणतां येत नाहीं, असें म्हणून भगवंतानें वरील नियमांत फेरफार केला तो असाः——

**स्वप्नावस्थेंत झालेल्या वीर्यपातावांचून चेतनायुक्त वीर्यपात संघादिशेष होतो ॥ १ ॥**

६. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं उदायी अरण्यांत रहात असे. त्याचा विहार दर्शनीय व सुंदर होता. मध्यें बैठकीची जागा व चारी बाजूला पडवी, आसनें वगैरे व्यवस्थितपणें मांडलेलीं, पिण्याचें पाणी व उपयोगाचें पाणी योग्य ठिकाणीं ठेवलेलें, व जागा साफसुफ, अशी तेथें व्यवस्था असे. उदायीचा विहार पहाण्यासाठीं पुष्कळ लोक येत असत. एक ब्राह्मणहि आपल्या बायकोला बरोबर घेऊन उदायीचा विहार पहाण्यासाठीं आला. ब्राह्मण इकडे तिकडे विहार पहाण्यांत गुंतला असतां त्याची बायको मागें राहिली होती. तिला उदायीनें पकडलें. विहार पाहून झाल्यावर ब्राह्मण आनंदीत होऊन म्हणाला, "खरोखर शाक्यपुत्रीय श्रमण धन्य आहेत, जे

अशा सुंदर अरण्यांत रहातात. भवान् उदायीहि धन्य आहे, जो अशा ठिकाणीं रहातो.'' तेव्हां ती ब्राह्मणी म्हणाली "हा धन्य कसला? ह्यानें मला [ तुमचा डोळा चुकवून ] पकडलें." तेव्हां त्या ब्राह्मणानें भिक्षूंची फार निंदा चालविली. होतां होतां जेव्हां ही गोष्ट भगवंताला समजली, तेव्हां उदायीची निंदा करून त्यानें भिक्षूंला नियम घालून दिला तो असा:—

**जो कामासक्त भिक्षु विकृतचित्तानें स्त्रीचा हात, वेणी किंवा दुसरा कोणताहि अवयव पकडील, त्याला संघादिशेष होतो ॥ २ ॥**

७. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं उदायी अरण्यांत रहात असे. त्याचा सुंदर विहार पहाण्यासाठीं पुष्कळ बायका तेथें आल्या. त्यांना आपला विहार दाखवून उदायी त्यांच्याशीं अश्लील भाषण करूं लागला. त्यांत ज्या निर्लज्ज बायका होत्या, त्या उलट उदायीची थट्टा करूं लागल्या. पण ज्या सभ्य होत्या त्या निंदा करूं लागल्या. ही गोष्ट भिक्षूंला समजली; व त्यांनीं ती भगवंताला सांगितली. भगवंतानें उदायीची निंदा करून भिक्षूंला नियम घालून दिला तो असा:—

**जसा एखादा तरुण तरुणीशीं मैथुनविषयक भाषण करतो, तसा एखादा भिक्षु कामासक्त होऊन विकृत चित्तानें स्त्रीशीं अश्लील भाषण करील, त्याला संघादिशेष होतो ॥ ३ ॥**

८. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं उदायी श्रावस्तींतील पुष्कळ गृहस्थांच्या घरीं जात असे. तेथें एक विधवा स्त्री अत्यंत सुरूप होती. उदायी तिच्या घरीं गेला, व तिला त्यानें चांगला धर्मोपदेश केला. तेव्हां ती म्हणाली, "भदंत, तुम्हांला जें काय लागेल तें मला सांगा. चीवर, भिक्षा वगैरे पदार्थांचा आम्ही तुम्हांस पुरवठा करूं." उदायी म्हणाला, "भगिनी, हे पदार्थ आम्हांला दुर्मिळ नाहींत. आम्हांला जें दुर्मिळ तें तूं दे." ती:— "तें कोणतें!" उदायी:– "मैथुन." ती:– "तुम्हांला जरूर आहे काय?" उदायी:– "होय, भगिनी." तर मग या असें म्हणून खोलीचें दार उघडून

ती आंत शिरली, व साडी खालीं टाकून मंचकावर निजली. उदायीहि तिच्या मागोमाग आंत गेला, व असल्या ह्या दुर्गंधी पदार्थाला कोण स्पर्श करतो असें म्हणून जमिनीवर थुंकला व तेथून निघून गेला. त्यायोगें त्या स्त्रीनें शाक्यपुत्रीयांची फार निंदा चालविली. होतां होतां ही गोष्ट भगवंताला समजली तेव्हां त्यानें उदायीचा निषेध करून भिक्षूंला नियम घालून दिला तो असाः–

**जो कामासक्त भिक्षु विकृत चित्तानें स्त्रीपाशीं आपली सेवा करण्याची स्तुति करील, माझ्यासारख्या शीलवान्, साधु ब्रह्मचाऱ्याची मैथुनविषयानें केलेली सेवा सर्वश्रेष्ठ सेवा म्हणेल, त्याला संघादिशेष होतो ॥ ४ ॥**

९. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं उदायी श्रावस्तींत पुष्कळ लोकांच्या घरीं जात असे. अविवाहित स्त्री आणि पुरुष त्याला आढळले म्हणजे तो त्यांचीं लग्नें जुळवण्याची खटपट करी. पूर्वी जिचा नवरा गणक ( कारकून ) होता अशा एका बाईला एक फार सुंदर मुलगी होती. दुसऱ्या गांवांतून आजीवकांचे श्रावक श्रावस्तीला येऊन त्या गणकीपाशीं आपल्या ( घराण्यांतील एका ) मुलासाठीं ती मुलगी मागूं लागले. पण त्यांची ओळख नसल्यामुळें गणकीनें मुलगी देण्याचें नाकारलें. श्रावस्ती येथील कांहीं लोकांना ती गोष्ट समजली. तेव्हां ते त्या आजीवक श्रावकांना म्हणाले, "तुम्हीं पूर्वीच जाऊन त्या गणकीपाशीं मुलगी कां मागितलीत ? आय उदायीला सांगितलें असतें, तर त्यानें ती मुलगी तुमच्या मुलाला केव्हांच देवविली असती." हें ऐकून त्या आजीवक श्रावकांनीं उदायीच्या मार्फत त्या गणकीशीं बोलणें सुरू केलें व त्या मुलीचें लग्न आपल्या मुलाशीं जुळवून आणलें. त्यांनीं त्या मुलीला महिनाभर चांगल्या रितीनें वागविलें, व पुढें दासीप्रमाणें वागवूं लागले. तिनें आपणाला घेऊन जाण्यासाठीं निरोप पाठविला. आईनें तेथें येऊन आपल्या मुलीला नीट रितीनें वागविण्याविषयीं त्यांना विनंति केली, तव्हां ते म्हणाले, "तूं विचारणारी कोण ? आमचा सगळा ठराव उदायीच्या मार्फत झाला आहे." हें वर्तमान त्या गणकीनें उदायीला सांगितलें. जेव्हां तो तिकडे येऊन मुलीला नीट वागण्याविषयीं त्यांना उपदेश करू लागला,

तेव्हां ते म्हणाले, "तूं विचारणारा कोण ? आमचा सर्व करारमदार गणकीशीं झाला आहे." पुन्हां गणकीनें तिकडे जाण्यास उदायीला विनविलें; तेव्हां त्यानें जाण्याचें नाकबूल केलें. अर्थात ती उदायीची निंदा करूं लागली व शिव्याशाप देऊं लागली. दुसऱ्याहि स्त्रिया–ज्या उदायीनें जमवून आणलेल्या लग्नसंबंधामुळें दुःख भोगीत होत्या त्या–उदायीला शिव्याशाप देऊं लागल्या. हें वर्तमान भिक्षूंला व भिक्षूंकडून भगवंताला समजलें. तेव्हां त्यानें उदायीचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः– "जो भिक्षु स्त्रीपुरुषांमध्यें मध्यस्थी करील, लग्नसंबंधांत किंवा जारसंबंधांत स्त्रीला पुरुषाची किंवा पुरुषाला स्त्रीची आवड उत्पन्न करील, त्याला संघादिशेष होतो."

त्या काळीं कांहीं धूर्त उद्यानांत चैनीसाठीं गेले होते. त्यांनीं एका वेश्येला तेथें बोलाविलें. पण ती तिकडे जाण्यास कबूल होईना. तेव्हां त्यापैकीं एकजण म्हणाला "हें काम उदायी करील." एक बुद्धोपासक तेथें होता; तो म्हणाला, "शाक्यपुत्रीय श्रमण असलीं कामें कधींहि करणार नाहींत. उदायीहि हें काम करावयाचा नाहीं." भवति न भवति होऊन पैज लावली, व एकाला उदायीजवळ पाठविलें. उदायीनें त्या वेश्येचें मन वळवून तिला तेथें पाठविलें. तेव्हां त्या उपासकानें त्याची फार निंदा केली. त्याच्याकडून भिक्षूंला, व भिक्षूंकडून भगवंताला ही गोष्ट समजली, तेव्हां उदायीचा निषेध करून त्यानें वरील नियमांत फेरफार केला तो असाः–

**जो भिक्षु स्त्रीपुरुषांमध्यें मध्यस्थी करील, लग्नसंबंधांत किंवा जारसंबंधांत स्त्रीला पुरुषाची किंवा पुरुषाला स्त्रीची आवड उत्पन्न करील, केवळ तावत्कालिक वेश्येशींहि मध्यस्थी करील, त्याला संघादिशेष होतो ॥ ५ ॥**

१०. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेणुवनांत रहात होता. त्या काळीं आळवी येथील भिक्षु गृहस्थांशीं याचना करून कोणाच्या मालकीच्या नव्हत अशा आपणांसाठीं प्रमाणाबाहेर मोठ्या झोंपड्या बांधीत असत, व त्या पुऱ्या होत नसत. त्यामुळें त्यांना पुष्कळ याचना करावी लागत असे. माणूस द्या, बैल द्या, गाडा द्या, कुऱ्हाड द्या, कुदळ द्या, वेळू द्या, गवत द्या, असें ते लोकांना म्हणत. त्या योगें त्रास पावून भिक्षूंना पाहिलें कीं गृहस्थ इकडे तिकडे पळ काढीत; तोंड दुसऱ्या बाजूला फिरवीत किंवा दार लावून आंत

वसत. दुरून गाईला पाहून देखील भिक्षु समजून लोक पळत असत. आयुष्मान् महाकाश्यप राजगृह येथें वर्षाकाळ घालवून प्रवास करीत आळवी येथें आला. तेथें भिक्षाटनासाठीं आळवींत गेला असतां लोक त्याला पाहून तोंड फिरवूं लागले, किंवा पळं काढूं लागले. पूर्वीं आळवी सुभिक्ष असे, पण आतां हें कसें झालें, ह्याची जेव्हां महाकाश्यपानें चौकशी केली, तेव्हां त्याला वरील कारण समजून आलें.

वर्षाकाळ संपल्यावर बुद्धभगवान्हि राजगृहाहून आळवीला आला. तेव्हां महाकाश्यपानें घडलेली गोष्ट भगवंताला सांगितली. त्यानें त्या भिक्षूंचा निषेध करून संघाला नियम घालून दिला तो असा:–

**गृहस्थापाशीं याचना करून आपणासाठीं कोणाच्या मालकीची नव्हे अशी कुटी करवूं इच्छिणाऱ्या भिक्षूनें ती प्रमाणांत करवावी. तिचें प्रमाण येणेंप्रमाणें:— लांबी १२ सुगतवितस्ति[1], व रुंदी सात सुगतवितस्ति. जागा दाखविण्यासाठीं भिक्षूंला न्यावें. त्यांनीं अनारंभ आणि सपरिक्रमण अशी जागा दाखवावी. सारंभ आणि अपरिक्रमण जागेंत गृहस्थाची याचना करून कुटी करविली तर, किंवा जागा दाखविण्यासाठीं भिक्षूंना नेलें नाहीं तर, किंवा प्रमाणाबाहेर कुटी बांधली तर संघादिशेष होतो ॥ ६ ॥**

जागा दाखविण्यासाठीं भिक्षु न्यावे ते असे:– कुटी करविणाऱ्या भिक्षूनें जागा साफ करून संघापाशीं येऊन भिक्षूंला तिकडे पाठविण्यास याचना करावी. सर्व संघाला जागा पाहणें शक्य असल्यास संघानें जागा पहावी. शक्य नसल्यास जागा पहाण्यासाठीं योग्य भिक्षूंची निवड करावी. संघाच्या ठरावाप्रमाणें त्या भिक्षूंनीं ती जागा अनारंभ आणि सपरिक्रमण असेल तर पहावी. नसल्यास, तिकडे कुटी बांधूं नकोस असें त्या भिक्षूला सांगावें. जागा योग्य ठरल्यास संघाच्या परवानगीनें तेथें कुटी बांधावी.

सारंभ म्हणजे जेथें मुंग्यांचें किंवा वाळवीचें वारूळ असतें; उंदरांचीं, सर्पांचीं, विंचवांचीं आणि घोणींचीं बिळें असतात; जेथें हत्ती, घोडे, सिंह,

---

१. एक सुगतवितस्ति म्हणजे दीड हात असें टीकाकाराचें म्हणणें आहे.

वाघ, अस्वल, तरस ह्यांची किंवा इतर प्राण्यांची रहाण्याची जागा असते; जें स्थान शेताजवळ, अपराध्यांला दंड देण्याच्या जागेजवळ, स्मशानाजवळ, उद्यानाजवळ, राजाची जागा, हस्तिशाला, अश्वशाला, कारागार, दारूचें दुकान, कसाईखाना, गल्ली, सभास्थान, घांट ह्यांच्या जवळ असतें तें सारंभ जाणावें.

अपरिक्रमण म्हणजे जेथें गाडा जाऊं शकत नाहीं व जेथें झोंपडी-भोंवतीं शाकारणारा मनुष्य शिडी घेऊन जाऊं शकत नाहीं तें.

११. बुद्ध भगवान् कौशाम्बी येथें घोषितारामांत रहात होता. त्या काळीं छन्न भिक्षूच्या उपस्थायक गृहस्थानें त्याच्यासाठीं एक विहार बांधण्याचें ठरविलें. छन्नानें विहाराची जागा साफ करवीत असतां तेथें सर्व लोकांना पूज्य असा एक वृक्ष होता तो तोडविला. त्यायोगें लोक त्याची निंदा करूं लागले. भगवंताला हें वर्तमान समजलें. तेव्हां त्यानें छन्न भिक्षूचा निषेध करून भिक्षूंला खालील नियम घालून दिलाः–

**आपणासाठीं गृहस्थाच्या मालकीचा मोठा विहार बांधविणाऱ्या भिक्षूनें जागा दाखविण्यासाठीं भिक्षु न्यावे. त्यानें अनारम्भ व सपरि-क्रमण अशी जागा दाखवावी. सारंभ व अपरिक्रमण अशा जागेंत जो भिक्षु मोठा विहार करवील, किंवा जागा दाखविण्यासाठीं भिक्षु नेणार नाहीं त्याला संघादिशेष होतो ॥ ७ ॥**

१२. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या काळीं दब्ब मल्लपुत्र भिक्षूनें सात वर्षांचा असतांना अर्हत् पद मिळविलें होतें. पुढें वयांत आल्यावर त्याच्या मनांत संघाच्या शयनासनाची व भोजनाची व्यवस्था आपल्या हातीं घेण्याचा विचार आला, तो त्यानें भगवंताला कळविला. भगवंतानें संघाला सांगून ह्या कामीं त्याची नेमणूक करविली. तो त्या त्या भिक्षूच्या योग्यतेप्रमाणें तेथें तेथें त्यांची निजण्याची सोय करीत असे; व गृहस्थांनीं नियमित भिक्षूंना आमंत्रण केलें असतां अनुक्रमें भिक्षूंना तेथें पाठवीत असे.

त्या काळीं कल्याणभक्तिक नांवाचा गृहस्थ संघाला नित्यदान देत असे. एकेदिवशीं विहारांत येऊन, उद्यां आपल्या घरीं कोणते भिक्षु येणार

असें त्यानें विचारलें. मेत्तिय व भुम्मजक ह्या दोन भिक्षूंची त्या दिवशीं पाळी होती. त्याप्रमाणें ते येणार आहेत असें दब्बानें उत्तर दिलें. पण हे भिक्षु सज्जन नव्हते. त्यामुळें त्या उपासकाला अत्यंत वाईट वाटलें, व घरीं जाऊन त्यानें आपल्या दासीला सांगितलें कीं, जर ते भिक्षु आले तर त्यांना कोठडींत आसनें मांडून कण्यांचा भात व आंबील वाढ. त्याप्रमाणें दासीनें सर्व केलें. त्यामुळें त्या दोन भिक्षूंना फार राग आला. दब्ब मल्लपुत्रानेंच त्या उपासकाला असें करण्यास सांगितलें असावें अशी त्यांची समजूत झाली. आणि मेत्तिया नांवाच्या भिक्षुणीला त्यांनीं दब्ब मल्लपुत्रावर तिच्यावर जुलूम केल्याचा आळ आणण्यास शिकविलें. तिनें भगवंताजवळ जाऊन, दब्बानें आपणावर जुलूम केला अशी तक्रार केली. पण पुढें चौकशीअंतीं हा आळ खोटा होता असें दिसून आलें. तेव्हां त्या भिक्षुणीला संघांतून काढून टाकून भगवंतानें भिक्षुला नियम घालून दिला तो असाः--

**जो भिक्षु द्वेषबुद्धीनें ब्रह्मचर्यापासून ( संघांतून ) भ्रष्ट करण्याच्या हेतूनें भिक्षूला पाराजिका आपत्ति लागू करील--पण पुढें चौकशी केली असतां किंवा चौकशी केली नसतां ती गोष्ट निराधार ठरेल व हा दोषी ठरेल—त्याला संघादिशेष होतो ॥ ८ ॥**

१३. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्याकाळीं मेत्तिय व भुम्मजक ह्या भिक्षूंनीं गृध्रकूट पर्वतावरून खालीं येतांना एका बकऱ्याचा बकरीशीं झालेला संग पाहिला. त्यांनीं त्या बकऱ्याचें नांव दब्ब मल्लपुत्र असें ठेवलें; व बकरीचें मेत्तिया भिक्षुणी ठेवलें; आणि दब्बानें पाराजिक आपत्ति केल्याचें आपण स्वतः पाहिलें असें ते म्हणू लागले. पुढें चौकशीअंतीं हा सर्व प्रकार उघडकीस आला. तेव्हां भगवंतानें त्यांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा :—

**जो भिक्षु द्वेषबुद्धीनें दुसऱ्या एकाद्या गोष्टीचा लेशमात्र घेऊन ह्या ब्रह्मचर्यापासून ( संघांतून ) भ्रष्ट करण्याच्या हेतूनें भिक्षूला पाराजिका आपत्ति लागू करील—पुढें चौकशी केली असतां किंवा चौकशी केली नसतां तें प्रकरण दुसरेंच ठरतें, व त्याचा लेश मात्र येथें लागू केला असें दिसून येतें, आणि भिक्षु दोषी ठरतो— त्याला संघादिशेष होतो ॥ ९ ॥**

१४. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या काळीं देवदत्त, कोकालिक[1] आणि समुद्रदत्त ह्या भिक्षूंपाशीं जाऊन त्यांना म्हणाला, " चला आपण श्रमण गोतमाच्या संघात भेद पाडूं."

कोकालिक म्हणाला, " पण श्रमण गोतम महानुभाव आहे. त्याच्या संघात भेद कसा पाडतां येईल ?" देवदत्त म्हणाला, " आपण त्याजपाशीं जाऊन ह्या पांच गोष्टींची याचना करूं. म्हणूं कीं, भदंत, आपण अनेक रितीनें संतुष्टीची आणि साधेपणाची स्तुती करीत असतां, आणि ह्या पांच गोष्टी संतुष्टीला आणि साधेपणाला कारणीभूत आहेत. (१) भिक्षूंनीं आजीवन अरण्यांत रहावें. जो गांवाजवळ राहील त्याला दोषी समजावें (२) आजीवन भिक्षेवर निर्वाह करावा. आमंत्रण स्वीकारील त्याला दोषी ठरवावें. (३) आजीवन चिंध्यांचींच चीवरें पांघरावीं. जो गृहस्थानें दिलेलें चीवर ग्रहण करील त्याला दोषी समजावें. (४) आजीवन झाडाखालीं रहावें. जो छताखालीं राहील त्याला दोषी ठरवावें. (५) आजीवन मत्स्यमांसाचें ग्रहण करूं नये. जो ग्रहण करील त्याला दोषी समजावें. ह्या पांच गोष्टी श्रमण गोतम कबूल करणार नाहीं;

---

१ मूळ वाक्य 'कोकालिको कोटमारकतिस्सको खण्डदेविया पुत्तो समुद्दत्तो' असें आहे. २९ व्या पाचित्तियांत 'अय्यो कोकालिको, अय्यो-कोटमारकतिस्सको, अय्यो खंडदेविया पुत्तो, अय्यो समुद्दत्तो' असें वाक्य आढळतें, व त्यावरून हे चार निरनिराळे भिक्षु असावे असा सकृद्दर्शनीं ग्रह होतो. परंतु विचार केला असतां ह्या दुसऱ्या वाक्यांत कांहींतरी घोटाळा झाला असावा असें वाटतें. कारण पुढल्या (११ व्या) संघादिशेषांत 'तस्सेव खो पन भिक्खुस्स भिक्खू होन्ति अनुवत्तका वग्गवादका, एको वा द्वे वा तयो वा' हें वाक्य आहे. देवदत्ताचे दोस्त भिक्षु चार असते, तर येथें 'चत्तारो वा' असें असावयास पाहिजे. येवढेंच नव्हे साथी चार असले म्हणजे त्यांचा संघ होतो, व मोठ्या संघाला त्या चारांच्या संघाला बहिष्कार घालण्याचा अधिकार रहात नाहीं. बुद्ध घोषाचार्य म्हणतात :—

" यस्मा पन तिण्णं उपरि कम्मारहा न होन्ति, न हि संघो संघस्स कम्मं करोति, तस्मा एको वा द्वे वा तयो वा ति वुत्तं." तात्पर्य येथें कोकालिक कोटमारकतिस्सक हा एक, व खंडदेवीचा पुत्र समुद्रदत्त हा दुसरा असे दोनच देवदत्ताचे साथी होते असें समजणें इष्ट आहे.

व आम्ही त्यांच्यायोगें लोकांना आमच्या बाजूकडे वळवूं; व श्रमण गोतमाच्या संघांत फूट पाडूं. कारण लोकांची भक्ति रुक्ष आचरणावर जडते." त्याप्रमाणें बुद्धाजवळ जाऊन त्यानें ह्या पांच गोष्टी अमलांत आणण्यास परवानगी मागितली. अर्थातच बुद्धानें ती दिली नाहीं; व त्यामुळें देवदत्तानें संघांत फूट पाडली. तेव्हां बुद्धानें त्याचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

**जो भिक्षु एकीनें वागणाऱ्या संघांत फूट पाडण्याचा प्रयत्न करील, किंवा फूट पडेल अशा रीतीचें प्रकरण उपस्थित करून हट्ट धरून बसेल, त्याला भिक्षूंनीं म्हणावें कीं, आयुष्मान्, एकीनें वागणाऱ्या संघांत फूट पाडण्याचा प्रयत्न करूं नकोस, किंवा फूट पाडण्याजोगें प्रकरण उपस्थित करून हट्ट धरून बसूं नकोस. संघाशीं तुझें ऐक्य असूं दे. कारण एकीनें वागणारा संघ आनंदानें भांडणावांचून एक ध्येय पुढें ठेवून सुखानें रहातो. असें भिक्षु सांगत असतां जर तो भिक्षु तसाच हट्ट धरील, तर भिक्षूंनीं हट्ट सोडण्यासाठीं त्याची त्रिवार समजूत पाडावी. त्रिवार समजूत पाडली असतां जर हट्ट सोडला तर ठीक आहे, जर सोडला नाहीं तर त्याला संघादिशेष होतो ॥ १० ॥**

१५. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या काळीं देवदत्त संघांत फूट पाडण्याचा प्रयत्न करीत होता. भिक्षु म्हणाले कीं, देवदत्त अधर्मवादी आहे, अविनयवादी आहे, तो संघांत भेद पाडण्याचा प्रयत्न करतो हें कसें ? हें ऐकून कोकालिक आणि समुद्रदत्त भिक्षु त्यांना म्हणाले, " तुम्ही असें म्हणूं नका. देवदत्त धर्मवादी आणि विनयवादी आहे. तो आमच्या विचाराप्रमाणें वागतो. आमचें मत त्याला माहीत आहे, व त्याप्रमाणें तो बोलतो. आम्हाला तें पसंत आहे." हें जेव्हां भगवंताला समजलें तेव्हां त्यानें त्यांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

**त्याच ( संघांत फूट पाडूं पहाणाऱ्या ) भिक्षूच्या मताप्रमाणें वागणारे, तंटा उपस्थित करणारे एक, दोन किंवा तीन भिक्षु म्हणतील कीं, आयुष्मन्त, तुम्ही त्या भिक्षूला कांहीं बोलूं नका. तो धर्मवादी आणि विनयवादी आहे. तो आमच्या विचारानें वागतो. आमचें**

मत तो जाणतो, व त्याप्रमाणें तो बोलतो. आम्हांला तें पसंत आहे. त्या भिक्षूंला इतर भिक्षूंनीं म्हणावें कीं, आयुष्मन्त, तुम्ही असें म्हणूं नका. हा भिक्षु धर्मवादी नाहीं, विनयवादी नाहीं. तुम्हांलाहि संघभेदाची आवड होऊं देऊं नका. संघाशीं तुमचें ऐक्य असूं द्या. कारण एकीनें वागणारा संघ आनंदानें भांडणावांचून एक ध्येय पुढें ठेवून सुखानें राहतो. ह्याप्रमाणें म्हटलें असतां ते भिक्षु तसाच हट्ट धरतील तर इतर भिक्षूंनीं हट्ट सोडण्यासाठीं त्यांची त्रिवार समजूत पाडावी. त्रिवार समजूत पाडली असतां हट्ट सोडला तर ठीक आहे; सोडला नाहीं तर त्यांना संघादिशेष होतो ॥ ११ ॥

१६. बुद्ध भगवान् कौशांबी येथें घोषितारामांत रहात होता. त्या काळीं छन्न भिक्षु नीट वागत नसे. भिक्षु त्याला म्हणत कीं, आयुष्मान् छन्न, तूं अशा रीतीनें वागूं नकोस; असें वागणें योग्य नाहीं. तो म्हणे, "तुम्ही मला उपदेश करतां हें कसें ? मीच तुम्हांला उपदेश करणें योग्य आहे. बुद्ध आमचा आहे आणि धर्म आमचा आहे. आमच्या मालकानें धर्म शोधून काढला आहे. जसा सोसाट्याचा वारा गवत, काठ्या, पानें, कचरा एकत्र आणतो, किंवा जशी एखादी डोंगरांतून वाहणारी नदी शिंपल्या, शेवाळ वगैरे एकत्र करते, त्याप्रमाणें तुम्ही अनेक नांवांचे, अनेक गोत्रांचे, अनेक ज्ञातींचे, अनेक कुळांचे प्रव्रज्या घेऊन एकत्र झालां आहां, तुम्हीं आम्हांला बोलावें हें कसें ? मीच तुम्हांला बोलणें योग्य आहे." ह्यासाठीं भिक्षूंनीं छन्नाचीं निंदा केली; व हें वर्तमान भगवंताला सांगितलें. भगवंतानें त्याचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा :—

भिक्षु स्वाभाविकपणें वाईट बोलणारा असतो. भिक्षूंच्या नियमांसंबंधानें जेव्हां इतर भिक्षु त्याला वहिवाटीस अनुसरून बोलतात तेव्हां तो आपणाला अवचनीय (बोलण्याला अयोग्य) करतो; म्हणतो कीं, मला तुम्ही चांगलें किंवा वाईट असें कांहींच बोलूं नका; माझ्याशीं बोलणें सोडून द्या. त्याला भिक्षूंनीं म्हणावें कीं, आयुष्मान्, तूं आपणाला अवचनीय करूं नकोस. आपणाला वचनीयच कर. तूंहि भिक्षूंला नियमानुसार बोलत जा, व भिक्षुहि तुला नियमानुसार बोलतील. कारण परस्परांना बोलून आणि परस्परांच्या चुकीची दुरुस्ती

करून त्या भगवंताच्या संघाची अभिवृद्धि झाली आहे. ह्याप्रमाणें म्हटलें असतां जर तो भिक्षु तसाच हट्ट धरील तर त्याची भिक्षूंनीं त्रिवार हट्ट सोडण्यासाठीं समजूत पाडावी. त्रिवार समजूत पाडली असतां हट्ट सोडला तर ठीक आहे, न सोडला तर त्याला संघादिशेष होतो ॥ १२ ॥

१७. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्याकाळीं अस्सजि आणि पुनब्बसुक हे दोघे भिक्षु कीटागिरी येथें रहात होते. ते पहिल्या भागाच्या ७४ व्या कलमांत सांगितल्याप्रमाणें नानाप्रकारचा अनाचार आचरीत असत. त्याच कलमांत सांगितल्याप्रमाणें त्यांना सारिपुत्त आणि मोग्गल्लान ह्यांजकडून तेथून हांकून लावण्यांत आलें. अशा रितीनें प्रव्राजनीय कर्म केलें असतां ते नीट रितीनें वागत नसत; भिक्षुंची क्षमा न मागतां त्यांना शिवीगाळ देत असत; म्हणत असत कीं, भिक्षु छंदगामी, द्वेषगामी, मोहगामी आणि भयगामी आहेत. हें ऐकून भिक्षूंनीं त्यांचा निषेध केला, व हें वर्तमान त्यांनीं भगवंताला सांगितलें. तेव्हां भगवंतानें नियम घालून दिला तो असा:—

एकादा भिक्षु एकाद्या गांवाजवळ अगर शहराजवळ रहातो. तो कुटुंबांची श्रद्धा बिघडवितो, व वाईट आचरण करतो. त्याचीं पापाचरणें दिसून येतात व ऐकूं येतात. कुटुंबांची श्रद्धा बिघडविल्याचें दिसूं येतें व ऐकूं येतें. त्याला भिक्षूंनीं म्हणावें कीं आयुष्मान्, तूं कुलांची श्रद्धा बिघडविणारा व पापाचारी आहेस. तुझीं पापाचरणें दिसतात व ऐकूं येतात. तूं कुटुंबांची श्रद्धा बिघडविल्याचें दिसतें व ऐकूं येतें. तेव्हां तूं येथून निघून जा. येथें तुला रहातां येत नाहीं. असें भिक्षूंनीं म्हटलें असतां तो म्हणेल कीं, भिक्षु छंदगामी, द्वेषगामी, मोहगामी व भयगामी आहेत. अशा आपत्तीसाठीं एकाद्याला हांकून लावतात व एकाद्याला हांकून लावीत नाहींत. त्याला भिक्षूंनीं म्हणावें कीं, आयुष्मान्, तूं असें बोलूं नकोस. भिक्षु छंदगामी, द्वेषगामी, मोहगामी व भयगामी नाहींत. तूं कुलांची श्रद्धा बिघडविणारा व पापाचारी आहेस. तुझीं पापाचरणें दिसण्यांत येतात व ऐकण्यांत येतात. तूं कुटुंबांची श्रद्धा बिघडविल्याचें दिसतें व ऐकूं येतें. तेव्हां तूं येथून

निघून जा. तुला येथें रहातां येत नाहीं. असें म्हटलें असतां तो जर असाच हट्ट धरील, तर हट्ट सोडण्यासाठीं भिक्षूंनीं त्याची त्रिवार समजूत पाडावी. त्रिवार समजूत पाडली असतां जर हट्ट सोडला तर ठीक आहे; सोडला नाहीं तर संघादिशेष होतो ॥ १३ ॥

## दोन अनियत आपत्ति

१८. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं आयुष्मान् उदायी श्रावस्तींतील पुष्कळ कुटुंबांत जात येत असे; त्याच्या ओळखीची एक तरुण कुमारिका दुसऱ्या एका घरीं विवाह करून दिली होती. एके दिवशीं उदायी तिच्या सासऱ्याच्या घरीं जाऊन एका एकान्त जागीं तिच्याशीं गोष्टी करीत बसला. त्या काळीं विशाखेला निरोगी पुत्र आणि निरोगी नातू पुष्कळ होते. लोक तिला यज्ञांत, मंगलकार्यांत आणि उत्सवांत आमंत्रण करून अग्र भोजनाचा मान देत असत. ती निमंत्रणावरून त्या कुटुंबांत गेली होती. उदायीला एकांतांत त्या तरुण स्त्रीशीं बोलतांना पाहून ती म्हणाली, "भदंत, अशा रितीनें एकान्तांत स्त्रीबरोबर बसणें बरोबर नाहीं. तुम्ही जरी कामविकारापासून मुक्त असलां, तरी पुष्कळ लोकांना तुमची खात्री वाटणार नाहीं." असें सांगितलें तरी उदायीनें तें ऐकलें नाहीं. तेव्हां विशाखेनें तें वर्तमान भिक्षूंना कळविलें. भिक्षूंनीं त्याची निंदा केली, व तें वर्तमान भगवंताला सांगितलें. त्यानें उदायीचा निषेध करून भिक्षूंला नियम घालून दिला तो असा:—

**जो भिक्षु स्त्रीबरोबर एकटा स्त्रीसंगाला योग्य अशा प्रतिच्छन्न जागेंत बसेल, व विश्वासू उपासिका त्याला पाहून पाराजिका, संघादिशेष किंवा पाचित्तिय ह्या तिन्हींपैकीं एक आपत्ति लागू करील; जर तो भिक्षु तेथें बसल्याचें कबूल करीत असेल, तर ती विश्वासू उपासिका बोलेल त्याप्रमाणें त्याला पाराजिका, संघादिशेष किंवा पाचित्तिय आपत्ति लागू करावी. ही आपत्ति अनियत (अनिश्चित) आहे ॥ १ ॥**

१९. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं भगवंतानें, स्त्रीबरोबर एकान्तांत प्रच्छन्न

जागीं बसण्याची मनाई केल्यामुळें उदायी त्याच तरुण स्त्रीबरोबर मोकळ्या जागीं एकटा बसून संभाषण करीत होता. तेथें विशाखेनें त्याला पाहिलें, व तसें बसणें योग्य नाहीं असें म्हटलें. पण उदायीनें तिच्या म्हणण्याकडे लक्ष्य दिलें नाहीं. तेव्हां तिनें ती गोष्ट भिक्षूंना, व त्यांनीं भगवंताला कळविली. तेव्हां त्यानें त्याचा निषेध करून भिक्षूंला नियम घालून दिला तो असाः—

**स्त्रीसंगाला योग्य अशी प्रच्छन्न जागा नसते; परंतु स्त्रीबरोबर ग्राम्य भाषण करण्याइतका एकान्त असतो. जो भिक्षु अशा ठिकाणीं स्त्रीबरोबर एकटा बसेल, व विश्वासू उपासिका त्याला पाहून संघादिशेष किंवा पाचित्तिय ह्या दोहोंपैकीं एक आपत्ति लागू करील. जर तो भिक्षु तेथें बसल्याचें कबूल करीत असेल, तर ती विश्वासू उपासिका बोलेल त्याप्रमाणें त्याला संघादिशेष किंवा पाचित्तिय आपत्ति लागू करावी. ही सुद्धां आपत्ति अनियत ( अनिश्चित ) आहे ॥ २ ॥**

## निस्सग्गिय पाचित्तिय

२०. बुद्ध भगवान् वैशाली येथें गोतमक चेतियांत रहात होता. त्या काळीं भगवंतानें भिक्षूंला तीन चीवरें वापरण्याची परवानगी दिली होती. षड्वर्गीय भिक्षु तीन चीवरें वापरण्याची परवानगी मिळाली आहे असें म्हणून गांवांत जातांना निराळीं तीन चीवरें, आणि आरामांत निराळीं तीन चीवरें वापरीत; व स्नानाच्या वेळीं निराळींच चीवरें वापरीत. जे भिक्षु साधेपणानें वागणारे होते त्यांनीं त्यांचा निषेध केला; व ही गोष्ट भगवंताला कळविली. त्यानेंहि त्यांचा निषेध करून भिक्षूंला नियम घालून दिला तो असाः—

"जो भिक्षु अतिरेक (तीन चीवरांपेक्षां अधिक) चीवर ठेवील, त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें."

त्या काळीं आयुष्मान् आनंदाला एक अतिरेक चीवर मिळालें होतें, व त्याच्या मनांतून तें सारिपुत्ताला द्यावयाचें होतें. पण सारिपुत्त त्यावेळीं साकेत येथें रहात होता. तेव्हां कसें करावें असा आनंदाला प्रश्न पडला; व त्यानें भगवंताला त्याचा खुलासा विचारला. भगवंतानें सारिपुत्त किती

दिवसांनीं येणार, हें विचारलें; व आनंदानें, नवव्या किंवा दहाव्या दिवशीं येथें पोहोंचणार असें उत्तर दिलें. तेव्हां भगवंतानें दहा दिवसपर्यंत अतिरेक चीवर ठेवण्याची परवानगी दिली; व वरील नियमांत फेरफार केला तो असाः—

**चीवर करून संपल्यावर व कठिन[1] उठवल्यावर भिक्षूनें अतिरेक चीवर दहा दिवसपर्यंत ठेवावें. त्यापेक्षा जास्त ठेवील, तर त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ १ ॥**

निस्सग्गिय पाचित्तिय म्हणजे त्या भिक्षूनें तें चीवर (किंवा ती वस्तू) संघाच्या, भिक्षूच्या किंवा भिक्षूंच्या हवालीं केलें पाहिजे, व त्यांच्या समोर पाचित्तिय आपत्ति आपल्या हातून झाल्याचें कबूल केलें पाहिजे. ती वस्तू जोंपर्यंत तो आपणाशीं ठेवील तोंपर्यंत केवळ आपत्ति कबूल केल्यानें त्या आपत्तींतून मोकळा होत नाहीं.

२१. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथ पिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं कांहीं भिक्षु इतर भिक्षूंच्या हवालीं आपली संघाटी करून अंतरवासक व उत्तरासंग ह्या दोनच चीवरांनीं प्रवासाला जात असत. त्यांनीं ठेवून दिलेल्या चीवरांना बुरशी येत असे, व भिक्षु तीं उन्हांत वाळवीत असत. आनंदानें तें पाहिलें व, हीं चीवरें कोणाचीं असा त्यानें त्या भिक्षूंना प्रश्न केला. त्यांनीं आनंदाला ती गोष्ट सांगितली. आनंदानें तिचा निषेध केला, व ती भगवंताला कळविली. ह्या प्रकरणीं भगवंतानेंहि ह्या गोष्टीचा निषेध करून भिक्षूंला नियम घालून दिला तो असाः—

"चीवर करून संपल्यावर व कठिन उठवल्यावर जर भिक्षु चीवर ठेवून दुसरीकडे जाईल, तर त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें."

त्या काळीं कौशांबी येथें एक भिक्षु आजारी होता. त्याच्या नातेवाईकांनीं त्याला आपणांकडे बोलाविलें. परंतु तीन चीवरें घेऊन चालत जाण्याची त्याच्यामध्यें ताकद नव्हती. तेव्हां भगवंतानें आजारी भिक्षूला दोनच चीवरें घेऊन संघाच्या अनुमतीनें दुसरीकडे जाण्याची परवानगी दिली; व वरील नियमांत फेरफार केला तो असाः—

---

[1] भाग १ क. ५९

**चीवर तयार करून संपल्यावर, व कठिन उठवल्यावर, जर भिक्षु संघाच्या संमतीशिवाय चीवर ठेवून दुसरीकडे जाईल, तर त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें. ॥ २ ॥**

२२. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथ पिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं एका भिक्षूला अकाल[१] चीवरवस्त्र मिळालें होतें. त्याचें चीवर बनवीत असतां तें त्याला पुरेना. म्हणून तो त्याच्या सुरकुत्या काढून लांबरुंद करण्यासाठीं तें पाण्यांत भिजवून हातानें दाबीत असे. तें पाहून भगवंतानें त्याला प्रश्न केला कीं, तूं हें चीवर पुन्हां पुन्हां कां दाबतोस ? तो म्हणाला, "भदंत, मला अकाल चीवरवस्त्र मिळालें. त्याचें मी चीवर बनविलें असतां तें मला पुरत नाहीं; म्हणून मी असें करतों." भगवान् म्हणाला, "तुला चीवरवस्त्र मिळण्याची आशा आहे काय ?" त्यानें होय असें उत्तर दिलें. तेव्हां ह्या प्रकरणीं भिक्षूंला बोलावून भगवान् म्हणाला, "अकाल चीवरवस्त्र मिळालें असतां व दुसरें वस्त्र मिळण्याची आशा असतां तें ठेवण्याची मी परवानगी देतों."

भगवंताची अशी अनुज्ञा मिळाली आहे म्हणून भिक्षु अकाल चीवरवस्त्रें घेऊन त्यांचीं गाठोडीं एक महिन्यापेक्षां जास्त दिवस दांडीला टांगून ठेवीत असत. तें पाहून आनंदानें त्यांचा निषेध केला; व ही गोष्ट भगवंताला कळविली. भगवंतानेंहि त्यांचा निषेध केला, व भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

**चीवर तयार करून संपल्यावर, व कठिन उठवल्यावर जर भिक्षूला अकाल चीवरवस्त्र मिळालें तर त्यानें तें घ्यावें, व लवकर चीवर करावें. जर पुरेसा कपडा नसेल तर दुसरें मिळण्याची आशा असल्यास त्यानें तें वस्त्र एक महिन्यापर्यंत ठेवून घ्यावें. दुसरें मिळण्याची आशा असून देखील जर त्यापेक्षां जास्त दिवस ठेवील, तर त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ ३ ॥**

२३. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं उदायीची पूर्वीची बायको भिक्षुणी झाली

१. अकाल चीवर म्हणजे कठिनाच्या महिन्याशिवाय इतर महिन्यांत मिळालेलें वस्त्र.

होती... तिला त्यानें आपलें अंतरवासक चीवर धुवावयास दिलें ........ भगवंतानें त्याचा निषेध करून भिक्षूंला नियम घालून दिला तो असा :—

**जो भिक्षु आपली आप्त नव्हे अशा भिक्षुणीला धुण्यासाठीं, रंगविण्यासाठीं किंवा बडविण्यासाठीं जुनें चीवर देईल, तर त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ ४ ॥**

२४. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या काळीं उत्पलवर्णा भिक्षुणी श्रावस्ती येथें रहात असे. सकाळच्या वेळीं श्रावस्तींत भिक्षाटन करून भोजन संपल्यावर ती अंधवनांत जाऊन एका झाडाखालीं विश्रांतीसाठीं बसली. त्या काळीं चोरांनीं एका गाईला मारून मांस घेऊन अंधवनांत प्रवेश केला. त्यांच्या पुढाऱ्यानें उत्पलवर्णेला पाहिलें, आणि असा विचार केला कीं, आपल्या भाऊबंदांनीं हिला पाहिलें असतां, ह्या भिक्षुणीला ते विनाकारण त्रास देतील. म्हणून तो दुसऱ्याच मार्गानें वनांत शिरला. तेथें त्या चोरांनीं तें मांस भाजून तयार केलें; व त्यापैकीं उत्तम मांस त्या पुढाऱ्यानें घेऊन एका द्रोणांत भरून उत्पलवर्णेच्या शेजारीं एका झाडाला टांगलें; व 'जो श्रमण किंवा ब्राह्मण हें मांस पाहील त्यालाच तें दिलें आहे असें समजून त्यानें तें न्यावें,' असें म्हणून तो तेथून निघून गेला. उत्पलवर्णेनें समाधींतून उठत असतां ह्या चोरनायकाचे शब्द ऐकले, व तें मांस घेऊन ती आपल्या उपाश्रयांत गेली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तें तयार करून उत्तरासंगांत गाठोडें बांधून ती अंतरिक्षांतून वेळुवनांत उतरली. त्या समयीं बुद्ध भगवान् भिक्षाचर्येसाठीं गेला होता; व उदायी विहाररक्षक होता. भगवंताला देण्यासाठीं तें मांस तिनें त्याच्या स्वाधीन केलें. तेव्हां उदायी तिला म्हणाला, "भगिनी, भगवंताला तूं मांस दिलेंस. मग मला तेवढें चीवर देना!" उत्पलवर्णेजवळ भिक्षुणीला लागणारीं अवघीं पांचच चीवरें होतीं. ती म्हणाली, "स्त्रियांना विशेष दान मिळत नसतें; व हें माझें पांचवें चीवर आहे. तें मी तुम्हांला कसें देऊं?" उदायी म्हणाला, "जसा एकादा मनुष्य हत्ती देऊन त्याच्या पट्टयाचा लोभ धरतो त्याप्रमाणें भगवंताला मांस देऊन तूं मला अंतरवासक देत नाहींस." अशा रितीनें तिला त्रस्त करून उदायीनें तिच्याकडून अंतरवासक घेतला. जेव्हां उत्पलवर्णा उपाश्रयांत आली तेव्हां भिक्षुणींना ती गोष्ट समजली; व उदायीवर त्यांनीं

टीका केली. त्यांनीं ती गोष्ट भिक्षूंना व भिक्षूंनीं ती भगवंताला सांगितली. भगवंतानें उदायीचा निषेध करून नियम घालून दिला तो असा :—

"जो भिक्षु अज्ञाति भिक्षुणीच्या हातून चीवर घेईल त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें."

त्या काळीं भिक्षु भिक्षुणीकडून दुसऱ्या वस्तूबद्दल चीवर घेऊं इच्छीत नसत. भिक्षुणींना तें आवडलें नाहीं; व ती गोष्ट भिक्षूंनीं भगवंताला सांगितली. तेव्हां ह्या प्रकरणीं भगवान् भिक्षूंना म्हणाला, "भिक्षु, भिक्षुणी, शिकणारी स्त्री, श्रामणेर आणि श्रामणेरी ह्या पांचांकडून दुसऱ्या वस्तूबद्दल चीवर घेण्यास मी अनुज्ञा देतों." आणि त्यानें वरील नियमांत फेरफार केला तो असाः–

**जो भिक्षु दुसऱ्या वस्तूची बदली केल्यावांचून अज्ञाति भिक्षुणीच्या हातून चीवर घेतो. त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ ५ ॥**

२५. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथ पिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं उपनंद शाक्यपुत्र धर्मोपदेश करण्यांत प्रसिद्ध असे. एक श्रेष्ठिपुत्र त्याजपाशीं येऊन नमस्कार करून एका बाजूला बसला. त्याला उपनंदानें धर्मोपदेश केला. तेव्हां तो म्हणाला, "तुम्हांला चीवर, पिंडपात, शयनासन किंवा औषध ह्यांपैकीं जें पाहिजे असेल त आम्हाला सांगत चला. तें देण्याजोगें सामर्थ्य आम्हांला आहे." उपनंदानें त्याचें उपवस्त्र मागितलें. श्रेष्ठिपुत्रानें एक दिवस दम धरण्यास विनविलें, तरी उपनंद हट्टच धरून बसला. तेव्हां श्रेष्ठिपुत्रानें आपलें उपरणें त्याला दिलें. वाटेंत लोकांनीं त्याला विचारलें कीं, तूं आज एकच वस्त्र नेसून कां चालला आहेस ? त्यानें घडलेलें वर्तमान त्यांस सांगितलें. तेव्हां ते शाक्यपुत्रियांवर टीका करूं लागले. अनुक्रमें ही गोष्ट भगवंताला समजली. त्यानें उपनंदाचा निषेध करून नियम घालून दिला तो असाः—

"जो भिक्षु अज्ञाति गृहपतीकडे किंवा गृहपत्नीकडे चीवर मागून घेईल त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें."

त्या काळीं कांहीं भिक्षु साकेत नगराहून श्रावस्तीला जात होते. वाटेंत चोरांनीं त्यांचीं चीवरें हिरावून घेतलीं तेव्हां ते भिक्षु अज्ञाति गृहपतीकडे किंवा गृहपत्नीकडे चीवर मागणें योग्य नाहीं म्हणून नागवेच

श्रावस्तीला आले; व वृद्ध भिक्षूंना नमस्कार करूं लागले. भिक्षु म्हणाले, "भिक्षूंला नमस्कार करणारे हे आजीवक फार चांगले दिसतात." ते म्हणाले, "आम्ही आजीवक नसून भिक्षु आहोंत." भिक्षूंनीं उपालीला ह्या प्रकरणीं चौकशी करण्यास सांगितलें. उपालीनें, ते भिक्षु आहेत अशी खात्री करून घेऊन त्यांना चीवरें द्यावयास लावलीं. ते नागवेच आले हें सज्जन भिक्षूंला आवडलें नाहीं. ते म्हणाले, "हे नागवे येतात हें कसें? ह्यांनीं तृणपर्णानें तरी आपली लज्जा झांकावी कीं नाहीं!" ही गोष्ट भगवंताला कळविली, तेव्हां तो म्हणाला, "भिक्षुहो, ज्याचें चीवर हिरावून घेतलें असेल किंवा नष्ट झालें असेल, त्यानें अज्ञाति गृहपतीकडून किंवा गृहपत्नीकडून चीवर घ्यावें. ज्या आवासांत तो प्रथम येईल तेथें संघाचें, विहाराचें, बिछान्यावर आंथरण्याचें, जमिनीवर आंथरण्याचें चीवर किंवा बिछान्याची पिशवी घेऊन पुन्हां परत करीन अशा हेतूनें वापरावी. ह्यांपैकीं कांहीं मिळत नसल्यास गवत किंवा पानें नेसून यावें. परंतु नागवें कधींच येऊं नये." आणि त्यानें वरील नियमांत फेरफार केला तो असा:—

**जो भिक्षु प्रसंगावांचून अज्ञाति गृहपतीकडे किंवा गृहपत्नीकडे चीवर मागून घेईल त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें. तो प्रसंग असा:— भिक्षूचें चीवर हिरावून घेण्यांत येतें किंवा नष्ट होतें, हा प्रसंग ॥ ६ ॥**

२६. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथ पिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं कांहीं भिक्षूंचीं चीवरें हिरावून घेण्यांत आलीं होतीं. त्यांजपाशीं जाऊन षड्वर्गीय भिक्षु म्हणाले, "भगवंतानें चीवरें हिरावून घेतलीं असतां अज्ञाति गृहपति किंवा गृहपत्नी यांजकडून चीवर मागून घेण्यास परवानगी दिली आहे. तेव्हां तुम्हीं चीवरें मागून घ्या." ते म्हणाले, "आम्हांला चीवरें मिळालीं आहेत." षड्वर्गीय म्हणाले, "तुम्हांला जर मागावयाचीं नसलीं तर आम्ही तुमच्या करितां मागतों." ते म्हणाले, "ठीक आहे." तेव्हां षड्वर्गीय भिक्षूंनीं लोकांकडून पुष्कळ चीवरें घेतलीं. एका सभेंत एक मनुष्य दुसऱ्याला म्हणाला, "ज्यांचीं चीवरें हिरावून घेण्यांत आलीं होतीं असे भिक्षु मजकडे आले होते; त्यांना मीं चीवरें दिलीं." दुसराहि तसेंच म्हणाला. तिसराहि तसेंच म्हणाला. आणि

ते सर्व म्हणाले कीं, हे शाक्यपुत्रीय श्रमण प्रमाण न जाणतां पुष्कळ चीवरें घेतात हें कसें ? हे काय कापडाचें दुकान मांडणार आहेत कीं काय ? अशा रितीनें झालेली टीका भिक्षूंच्या कानीं आली. भगवंतानें हें वर्तमान ऐकून षड्वर्गीयांचा निषेध केला, व भिक्षूंला नियम घालून दिला तो असा:—

**तशा भिक्षूला अज्ञाति गृहपति किंवा गृहपत्नी पुष्कळ चीवरें आणून तीं घेण्याची विनंति करील; पण त्यानें अंतरवासक आणि उत्तरासंग एवढीं दोनच चीवरें घ्यावीं; त्यापेक्षां जास्त घेईल तर त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ ७ ॥**

२७. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथ पिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं एक पुरुष आपल्या बायकोला म्हणाला, "मी आर्य उपनंदाला चीवरानें आच्छादणार आहें." त्याचें बोलणें एका पिंडचारिक भिक्षूनें ऐकलें; व तो उपनंदाला म्हणाला, "आयुष्मान्, तूं धन्य आहेस. अमक्या घरांत रहाणारा पुरुष आपल्या बायकोला म्हणतो कीं, मी आर्य उपनंदाला चीवरानें आच्छादणार आहें." उपनंद म्हणाला, "आयुष्मान्, तो माझा उपस्थायक आहे." तो त्या पुरुषापाशीं जाऊन त्याला म्हणाला, "मला तूं चीवरानें आच्छादणार आहेस हें खरें काय?" त्यानें 'होय' असें उत्तर दिलें. तेव्हां उपनंदानें अशा अशा प्रकारचें चीवरवस्त्र तयार करून दे असें सांगितलें. तेव्हां त्यानें उपनंदावर टीका केली. हें वर्तमान समजलें, तेव्हां भगवंतानें उपनंदाचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:—

**ह्या चीवरद्रव्याने चीवर तयार करून, अमूक भिक्षूला त्यानें मी आच्छादीन अशा उद्देशानें अज्ञाति गृहपतीनें किंवा गृहपत्नीनें चीवरद्रव्य गोळा केलेलें असतें. अनधीष्ट भिक्षु तेथें जाऊन, आयुष्मान्, पुण्यबुद्धि धरून ह्या चीवरद्रव्यानें अशा अशा प्रकारचें चीवरवस्त्र तयार करून मला आच्छादन कर, असें म्हणून विशिष्ट वस्त्राची आवड दर्शवील, तर त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ ८ ॥**

२८. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथ पिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या समयीं एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याला म्हणाला, "मी आर्य उपनंदाला चीवरानें आच्छादणार आहे." दुसराहि तसेंच म्हणाला. पूर्वी-

प्रमाणें पिंडचारिक भिक्षूनें हें वर्तमान उपनंदाला सांगितलें. उपनंद त्यांज-पाशीं येऊन त्यांना म्हणाला, " मला अशा प्रकारचें चीवरवस्त्र तयार करून द्या. " तेव्हां त्यांनीं उपनंदावर टीका केली. अनुक्रमें हें वर्तमान भगवंताला समजलें. त्यानें भिक्षूंला नियम घालून दिला तो असा:—

**ह्या चीवरद्रव्यानें चीवर तयार करून अमूक भिक्षूला आम्ही आच्छादूं, अशा उद्देशानें दोन अज्ञाति गृहपतींनीं किंवा गृहपत्नींनीं अलग करून चीवरद्रव्य गोळा केलेलें असतें. अनधीष्ट भिक्षु तेथें जाऊन, आयुष्मन्त, तुम्ही पुण्यबुद्धि धरून ह्या अलग अलग चीवर-द्रव्यानें अशा अशा प्रकारचें चीवर तयार करून दोघे एकाच चीव-रानें मला आच्छादन करा, असें म्हणून विशिष्ट वस्त्राची आवड दर्शवील, त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ ९ ॥**

२९. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं उपनंदाच्या उपस्थायक महामात्रानें ह्या चीवरद्रव्यानें चीवर तयार करून उपनंदाला आच्छादन कर असें म्हणून दूताकडून चीवरद्रव्य पाठविलें. त्या दूतानें तें द्रव्य घेण्यास उपनंदाला विनंति केली. तेव्हां तो म्हणाला, " आम्ही चीवरद्रव्य घेत नसतों. आम्ही योग्य काळीं नियमाला अनुसरून चीवर घेत असतों. " दूत म्हणाला, " तुमचें कामकाज पहाणारा कोणी आहे काय ? "

त्या समयीं एक उपासक कांहीं कामासाठीं आरामांत आला होता. उपनंद त्या दूताला म्हणाला, " हा भिक्षूंचें कामकाज पहाणारा उपासक आहे." त्या दूतानें त्या उपासकाला सर्व सांगितलें, व तो उपनंदाला म्हणाला, " त्या उपासकाला मीं सर्व सांगितलें आहे. योग्य समयीं आपण त्याजकडे जावें. म्हणजे तो तुम्हांला चीवरानें आच्छादील. " नंतर त्या महामात्रानें तें चीवर घ्यावें, असा दूताकडून उपनंदाला निरोप पाठविला. पण उप-नंदानें त्या उपासकाला कांहींच विचारलें नाहीं. दुसऱ्यांदा व तिसऱ्यां-दाहि त्या महामात्रानें दूत पाठविला. पणं उपनंद उगाच राहिला. त्याकाळीं नागरिकांची सभा होती. त्यांनीं असा नियम केला होता कीं, जो वेळेवर हजर रहाणार नाहीं त्यास पन्नास कार्षापण दंड करावा. उपनंद त्या उपासका-जवळ जाऊन चीवर मागूं लागला. पण तो म्हणाला, " आपण आजचा

दिवस दम धरा; कारण मला सभेंत हजर राहिलें पाहिजे. आणि जो वेळेवर हजर रहाणार नाहीं त्याला पन्नास कार्षापण दंड द्यावा लागतो." मला आजच चीवर दिलें पाहिजे असें म्हणून उपनंदानें त्याचें धोतर पकडलें. अशा रीतीनें उपनंदानें आग्रह धरल्यावरून त्या उपासकानें त्याच दिवशीं त्याला चीवरवस्त्र घेऊन दिलें; व तो सभेला उशीरां गेला. त्याला इतर सभासद म्हणाले, "तूं उशीरां येऊन पन्नास कार्षापण कां घालविलेस ?" त्यानें घडलेली गोष्ट सांगितली. तेव्हां ते लोक शाक्यपुत्रीय श्रमणांवर टीका करूं लागले. अनुक्रमें हें वर्तमान भगवंताला समजलें. त्यानें उपनंदाचा निषेध करून भिक्षूंला निमम घालून दिला तो असा:—

राजा किंवा राजाचा अंमलदार, ब्राह्मण किंवा गृहपति, ह्या चीवरद्रव्यानें चीवरवस्त्र घेऊन अमुक भिक्षूला चीवरानें आच्छादन कर असें म्हणून दूताकडून चीवरद्रव्य पाठवील, व तो दूत येऊन जर त्या भिक्षूला म्हणेल, "हें आपणासाठीं चीवरद्रव्य आणिलें आहे, तें आपण ग्रहण करावें," तर त्या भिक्षूनें त्या दूताला म्हणावें, "आम्ही चीवरद्रव्य घेत नसतों; योग्य वेळीं नियमाला अनुसरून चीवर घेत असतों." जर तो दूत त्या भिक्षूला म्हणेल कीं, आपला कोणी कामकाज पहाणारा आहे काय ? तर ज्या भिक्षूला चीवराची गरज असेल त्यानें 'हा भिक्षूंचा कामकाज पहाणारा आहे' असें म्हणून कामकाज पहाणारा आरामिक किंवा उपासक दाखवून द्यावा. त्या कामकाज पहाणाऱ्याला सर्व व्यवस्था सांगून जर तो दूत भिक्षूला म्हणेल, "ज्या कामकाज पहाणाऱ्याला आपण दाखवून दिलें त्याजपाशीं मीं सर्व व्यवस्था केली आहे; आपण तिकडे वेळेवर जावें; तो तुम्हांला चीवरानें आच्छादील," तर ज्या भिक्षूला चीवराची गरज असेल त्यानें कामकाज पहाणाऱ्याकडे जाऊन मला चीवराची गरज आहे असें दोन तीनदां सांगावें, व आठवण द्यावी. दोनतीनदा सांगितलें असतां व आठवण दिली असतां, तें चीवरवस्त्र मिळालें तर चांगलें; नाहीं मिळालें तर चारदां, पांचदां, कमाल सहादां जाऊन तिकडे मुकाट्यानें उभें रहावें. चारदां, पांचदां, कमाल सहादां चीवराच्या उद्देशानें तेथें उभा राहिला असतां तें चीवर मिळालें

तर चांगलें. त्यापेक्षां जास्त प्रयत्न करून तें चीवरवस्त्र मिळवील, तर त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें. जर मिळविलें नाहीं तर ज्यांच्याकडून चीवरद्रव्य मिळालें त्यांना स्वतः जाऊन किंवा दूत पाठवून म्हणावें, " जें तुम्ही भिक्षूला उद्देशून चीवरद्रव्य पाठविलें त्याचा त्या भिक्षूला कांहीं उपयोग नाहीं. तुमच्या द्रव्याची चौकशी करा. त्याचा नाश होऊं देऊं नका. " हा ह्या प्रसंगीं शिष्टाचार समजावा ॥ १० ॥

३०. बुद्ध भगवान् आळवी येथें अग्गाळव चैत्यांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु रेशीमवाल्यांजवळ जाऊन म्हणत असत कीं, तुम्ही पुष्कळ कोसले उकळतां. तेव्हां आम्हांलाहि त्यापैकीं थोडे द्या. आम्ही ते आमच्या आंथरुणासाठीं उपयोगांत आणूं. ते रेशीमवाले भिक्षूंवर टीका करूं लागले; व हें वर्तमान भगवन्ताला समजलें. तेव्हां त्यानें नियम घालून दिला तो असाः—

**जो भिक्षु रेशीम मिसळलेलें आंथरूण बनवील त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ ११ ॥**

३१. बुद्ध भगवान् वैशाली येथें महावनांत कूटागारशाळेंत राहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु शुद्ध काळ्या लोंकरीचें आंथरूण करवीत असत. लोकांत त्यांच्यावर टीका होऊं लागली. हे शाक्यपुत्रीय श्रमण चैनी गृहस्थांप्रमाणें शुद्ध काळ्या लोंकरीचें आंथरूण बनवितात हें कसें ? हें वर्तमान भगवन्ताला समजलें तेव्हां त्यानें त्यांचा निषेध करून भिक्षूंला नियम घालून दिला तो असाः—

**जो भिक्षु शुद्ध काळ्या लोंकरीचें आंथरूण बनवील त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ १२ ॥**

३२. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्या काळीं भगवंतानें शुद्ध काळ्या लोंकरीचें आंथरूण बनविण्यास मनाई केली आहे म्हणून षड्वर्गीय भिक्षु थोडीशी पांढरी लोंकर मिसळून शुद्ध काळ्या लोंकरीचें हांथरूण बनवीत असत. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं; व त्यांनीं ती भगवंताला कळविली. तेव्हां षड्वर्गीयांचा निषेध करून भगवंतानें भिक्षूंला नियम घालून दिला तो असाः—

**नवीन आंथरूण करविणाऱ्या भिक्षूनें शुद्ध काळ्या लोंकरीचे दोन भाग घ्यावे. तिसरा भाग पांढऱ्या लोंकरीचा व चौथा भाग पिंगट लोंकरीचा घ्यावा. जो भिक्षु दोन भाग शुद्ध काळ्या लोंकरीचे न घेतां, तिसरा भाग पांढऱ्या लोंकरीचा व चौथा भाग पिंगट लोंकरीचा न घेतां आंथरूण बनवील त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें. ॥ १३ ॥**

३३. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकांच्या आरामांत रहात होता. त्या काळीं भिक्षु दरवर्षी नवीन आंथरूण करीत असत; व त्यामुळें लोंकर मागत फिरण्याचा त्यांजवर प्रसंग येत असे. लोक त्यांच्यावर टीका करूं लागले, व हें वर्तमान समजल्यावर भगवंतानें त्यांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:-- "भिक्षूनें नवीन आंथरूण सहा वर्षें वापरावें. सहा वर्षांपूर्वी तें आंथरूण टाकून किंवा न टाकतां दुसरें नवीन आंथरूण बनवील तर त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें."

त्या काळीं कौशांबी येथें एक भिक्षु आजारी होता. त्याचा आम्ही सांभाळ करूं, असें म्हणून त्याच्या ज्ञातिबांधवांनीं त्याजकडे माणूस पाठविला. भिक्षुहि त्याला म्हणाले कीं, तूं आपल्या ज्ञातिबांधवांकडे जा; ते तुझी सेवा करतील. तो म्हणाला, "नवीन आंथरूण सहा वर्षें वापरावें असा भगवंतानें नियम घालून दिला आहे. परंतु मी आजारी असल्यामुळें आंथरूण बरोबर घेऊन जातां येत नाहीं; व आंथरुणावांचून मला बरें वाटत नाहीं. म्हणून मी जात नाहीं." भगवंताला हें वर्तमान समजलें. तेव्हां संघाच्या संमतीनें आजारी भिक्षूस नवीन आंथरूण वापरण्यास त्यानें परवानगी दिली; व वरील नियमांत फेरफार केला तो असा:-

**भिक्षूनें नवीन आंथरूण सहा वर्षें वापरावें. संघाच्या संमतीवांचून सहा वर्षांपूर्वी तें आंथरूण टाकून किंवा न टाकतां दुसरें नवीन आंथरूण बनवील, तर त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ १४ ॥**

३४. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. तेथें भगवान् भिक्षूंस म्हणाला, "मी तीन महिनेपर्यंत एकांतांत राहूं इच्छितों. भिक्षा घेऊन येणाऱ्या भिक्षूशिवाय दुसऱ्या कोणीहि मजपाशीं येऊं नये. त्याप्रमाणें भिक्षूंनीं नियम केला कीं, भिक्षा

घेऊन जाणाऱ्या भिक्षूशिवाय दुसऱ्या कोणीहि भगवंतापाशीं जाऊं नये; जो जाईल त्यानें पाचित्तिय आपत्ति कबूल करावी.

आयुष्मान् उपसेन वंगंतपुत्त आपल्या साथ्यांसहवर्तमान भगवंताजवळ आला, आणि नमस्कार करून एका बाजूला बसला. आगंतुक भिक्षूंबरोबर संभाषण करण्याची बुद्ध भगवंताची वहिवाट असे. तिला अनुसरून भगवान् उपसेनाला म्हणाला, "उपसेन, तुमचें ठीक चाललें आहे ना ? तुमचा प्रवास त्रासदायक झाला नाहीं ना ?" "होय. भगवान्, आमचे ठीक चाललें आहे. आमचा प्रवास त्रासदायक झाला नाहीं," असें उपसेनानें उत्तर दिलें. त्याचा एक शिष्य भगवंतापासून कांहीं अंतरावर बसला होता. त्याला भगवान् म्हणाला, "तुझीं हीं पांसुकूल[1] चीवरें तुला आवडतात काय ?" तो म्हणाला, "नाहीं भदंत, मला तीं आवडत नाहींत." भ०— "तर मग तूं पांसुकूल चीवरें कां वापरतोस ?" तो— "माझा उपाध्याय पांसुकूलिक आहे म्हणून मीहि पांसुकूलिक आहें."

तेव्हां भगवान् उपसेनाला म्हणाला, "ही तुझी मंडळी फार चांगली दिसते. ह्यांना तूं कसें काय शिकवितोस ?" उपसेन म्हणाला, "भदंत, जो माझ्याजवळ येऊन उपसंपदा मागतो त्याला मी म्हणतों कीं, मी आरण्यक, पिंडपातिक आणि पांसुकूलिक आहें; जर तूंहि आरण्यक, पिंडपातिक आणि पांसुकूलिक होशील तर तुला मी उपसंपदा देईन. जर त्यानें ही गोष्ट कबूल केली तर त्याला उपसंपदा देतों; नाहीं तर देत नाहीं. त्याचप्रमाणें जो निश्रय मागतो त्यालाहि ही गोष्ट पसंत पडल्यास निश्रय देतों, नाहीं तर देत नाहीं. ह्याप्रमाणें माझ्या मंडळीला मी शिकवितों." भगवान् म्हणाला, "फार चांगलें. पण उपसेन श्रावस्ती येथील संघानें केलेला नियम तुला माहीत आहे काय ?" त्यानें, नाहीं असें उत्तर दिल्यावर भगवंतानें तो नियम त्याला सांगितला. त्यावर उपसेन म्हणाला, "आम्ही बुद्धाचे श्रावक भलताच नियम करीत नसतों; व केलेला मोडीत नसतों; आणि नियमानुसार वागत असतों. तेव्हां श्रावस्तींतील संघ आपला नियम पाळीलच. त्यावर त्याची स्तुति करून भगवान् म्हणाला, "उपसेन, जे

---

१. पांसुकूल चीवरें म्हणजे धुळींत, स्मशानांत वगैरे ठिकाणीं पडलेल्या चिंध्या गोळा करून त्यांचीं बनविलेलीं भिक्षुवस्त्रें.

भिक्षु आरण्यक, पिंडपातिक आणि पांसुकूलिक व्रत पालन करतात त्यांना वाटेल तेव्हां माझ्या भेटीस येण्याला मी परवानगी देतों." त्या काळीं उपसेनाला पाचित्तिय आपत्ति लागू करण्याच्या उद्देशानें कांहीं भिक्षु दरवाजा-बाहेर उभे होते. जेव्हां आपल्या मंडळीसह उपसेन बाहेर आला तेव्हां त्या भिक्षूंनीं श्रावस्ती येथील संघानें केलेला नियम त्याला कळविला. त्यावर आरण्यक, पिंडपातिक आणि पांसुकूलिक भिक्षूंना वाटेल तेव्हां भेटीस येण्यास भगवंतानें परवानगी दिली आहे, असें त्यानें त्यांस सांगितलें.

ही गोष्ट जेव्हां प्रसिद्ध झाली तेव्हां भिक्षु भगवंताच्या भेटीच्या इच्छेनें आपलीं आंथरुणें टाकून देऊन आरण्यक व्रत, पिंडपातिक व्रत व पांसुकूलिक व्रत अंगीकारूं लागले. तीन महिन्यांनंतर भगवान् भिक्षूंचीं निवासस्थानें पहात असतां त्याला ती आंथरुणें दिसून आलीं; व हीं आंथरुणें कोणी टाकून दिलीं आहेत असा त्यानें भिक्षूंना प्रश्न केला. भिक्षूंनी त्याला सर्व वर्तमान सांगितलें. ह्या प्रकरणीं भिक्षूंना बोलावून भगवंतानें नियम घालून दिला तो असाः-

**बसण्याचें आसन करविणाऱ्या भिक्षूनें जुन्या आसनांपैकीं रंग बदलण्यासाठीं एक चौफेर सुगतवितस्ति भाग घ्यावा. जर असा भाग न घेतां बसावयाचें आसन बनवील त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ १५ ॥**

३५. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं कोसल देशांत प्रवास करीत श्रावस्तीला येत असतां वाटेंत एका भिक्षूला लोंकर मिळाली. तिचें उत्तरासंगांत गाठोडें बांधून तो चालला. त्याला पाहून, किती पैसे देऊन तूं ही लोंकर घेतलीस, व तिच्यावर फायदा काय होईल, अशा रितीनें लोक त्याची थट्टा करूं लागले. त्यामुळें तो लाजला, आणि श्रावस्तीला आरामांत आल्यावर त्यानें ती लोंकर फेंकून दिली. असें कां केलेंस, असा भिक्षूंनीं प्रश्न केला. तेव्हां तो म्हणाला, "ह्या लोंकरीसाठीं मला लोकांनीं केलेली थट्टा सहन करावी लागली." भिक्षु म्हणाले, "ही लोंकर तूं किती दुरून आणलीस?" तो म्हणाला, "मी ती तीन योजनां-पेक्षां जास्त अंतरावरून आणली." हें त्याचें कर्म सज्जन भिक्षूंला आवडलें नाहीं. त्यांनीं तें भगवंताला सांगितलें, व भगवंतानें त्या भिक्षूचा निषेध करून भिक्षूंला नियम घालून दिला तो असाः-

वाटेंत भिक्षूला लोंकर मिळाली तर गरज असल्यास त्यानें ती घ्यावी, व दुसरा नेणारा नसेल तर तीन योजनांपर्यंत स्वत: न्यावी. त्यापेक्षां जास्त अंतरावर–दुसरा नेणारा नसतांहि–घेऊन जाईल, तर त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ १६ ॥

३६. बुद्ध भगवान् शाक्य देशांत कपिलवस्तु येथें निग्रोधारामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु भिक्षुणींला लोंकर धुवावयास लावीत, रंगवावयास लावीत व मोकळी करावयास लावीत. त्यामुळें त्यांना अधिशील, अधिचित्त व अधिप्रज्ञा ह्यासंबंधानें शिकण्यास व विचारण्यास अवकाश मिळत नसे. महाप्रजापति गोतमी भगवंताच्या दर्शनाला गेली असतां, भिक्षुणी मोठ्या दक्षतेनें वागतात कीं नाहीं, असा भगवंतानें तिला प्रश्न केला. ती म्हणाली, "भिक्षुणीला सध्या दक्षता कुठली ? षड्वर्गीय भिक्षु त्यांना लोंकर धुवावयास लावतात, रंगवावयास लावतात व मोकळी करावयास लावतात. त्यामुळें त्यांना सवडच मिळत नाहीं." तिला भगवंतानें धर्मोपदेश केला, व ती तेथून निघून गेली. त्यानंतर भगवंतानें भिक्षूंना बोलावून ह्या प्रकरणीं चौकशी केली. तेंव्हां त्या भिक्षुणी षड्वर्गीय भिक्षूंच्या अज्ञाती आहेत असें त्यास आढळून आलें, व षड्वर्गीयांचा निषेध करून त्यानें नियम घालून दिला तो असा :–

**जो भिक्षु अज्ञाति भिक्षुणीला लोंकर धुवावयास लावील, रंगवावयास लावील किंवा मोकळी करावयास लावील, त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ १७ ॥**

३७. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या वेळीं उपनंद शाक्यपुत्र राजगृह येथील एका कुटुंबांत जात येत असे. तेथें त्याला नित्य भिक्षा मिळत असे; व त्या घरांत कांहीं खाण्यापिण्याचा जिन्नस नवीन करण्यांत आला, तर त्याचा हिस्सा उपनंदासाठीं ठेवण्यांत येत असे. एके दिवशीं त्या कुटुंबांत मांस तयार केलें होतें, व त्यापैकीं कांहीं भाग उपनंदासाठीं राखून ठेवण्यांत आला होता. पण मुलगा सकाळींच उठून रडूं लागल्याकारणानें त्याला तें मांस द्यावें लागलें. जेव्हां उपनंद आला तेव्हां त्याला ही गोष्ट सांगून तो गृहस्थ म्हणाला, "त्या मांसाबद्दल आम्हीं तुम्हांला एक कार्षापण ठेवला आहे. त्याचें तुम्हांला मी काय घेऊन द्यावें ?"

उपनंद म्हणाला, “जर मला कार्षापण दिला आहे तर तोच माझ्या हातीं ठेव म्हणजे झालें.” त्या गृहस्थानें तो कार्षापण उपनंदाला दिला खरा; पण उपनंदाचें कृत्य त्याला आवडलें नाहीं. तो त्यावर टीका करूं लागला. शेवटीं हें वर्तमान भगवंताला समजलें. भगवंतानें उपनंदाचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा :-

**जो भिक्षु सोन्यारुप्याचें द्रव्य घेईल किंवा घेववील, किंवा खालीं ठेवलेलें स्वीकारील, त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ १८ ॥**

३८. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्यावेळीं षड्वर्गीय भिक्षु नाना प्रकारचा रुप्याचा व्यवहार (सराफी) करीत असत. गृहस्थांप्रमाणें हे शाक्यपुत्रीय श्रमण रुप्याचा व्यवहार करतात हें कसें? अशी त्यांजवर लोकांची टीका होऊं लागली. ही गोष्ट भगवंताला समजली तेव्हां त्यानें षड्वर्गीयांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा :-

**जो भिक्षु नानाप्रकारचा रुप्याचा व्यवहार करील त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ १९ ॥**

३९. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं उपनंद शाक्यपुत्र चीवर शिवण्यांत प्रख्यात होता. त्यानें वस्त्राच्या तुकड्यांची एक संघाटी बनविली, व चांगली रंगवून व इस्तरी करून तो ती वापरूं लागला. दुसऱ्या एका परिव्राजकानें ती पाहिली, व आपलें बहुमोल वस्त्र देऊन त्यानें ती मागितली. उपनंदानें संघाटी देऊन वस्त्र घेतलें. परिव्राजकाच्या आरामांत गेल्यावर इतर परिव्राजकांच्या सांगण्यावरून त्या परिव्राजकाला आपली चूक दिसून आली, व तो उपनंदापाशीं येऊन आपलें वस्त्र परत मागूं लागला; व उपनंदानें तें न दिल्यामुळें त्यावर टीका करूं लागला. हें वर्तमान भगवंताला समजलें तेव्हां त्यानें उपनंदाचा निषेध करून भिक्षूंला नियम घालून दिला तो असा :-

**जो भिक्षू नानाप्रकारें क्रयविक्रय करील त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ २० ॥**

४०. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु पुष्कळ भिक्षापात्रें सांठवून ठेवीत असत. विहार

पहाण्यासाठीं आलेले लोक तीं पाहून टीका करूं लागले कीं, ह्या भिक्षूंनीं जणूं काय मातीच्या भांड्याचें दुकानच लावलें आहे. हें वर्तमान भगवंताला समजलें तेव्हां त्यानें षड्वर्गीयांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

" जो भिक्षु ( एकाहून ) जास्त पात्र ठेवील त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें. "

त्या काळीं आयुष्मान् आनंदाला एक अतिरेक ( जास्त ) पात्र मिळालें होतें, व तें सारिपुत्ताला देण्याची त्याची इच्छा होती. आणि सारिपुत्त त्या वेळीं साकेताला रहात होता. तो दहा दिवसांच्या आंत श्रावस्तीला येणार होता. हें वर्तमान आनंदानें भगवंताला सांगितलें; तेव्हां त्यानें दहा दिवसपर्यंत अतिरेक पात्र ठेवण्यास परवानगी देऊन वरील नियमांत फेरफार केला तो असाः—

**अतिरेक पात्र दहा दिवसपर्यंत ठेवावें; त्याहून अधिक ठेवील त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ २१ ॥**

४१. बुद्ध भगवान् शाक्यदेशांत कपिलवस्तु येथें निग्रोधारामांत रहात होता. त्या काळीं एका कुंभारानें, भिक्षूंला पात्रें पाहिजे असल्यास आपणांस सांगावें अशी विनंती केली होती. भिक्षु प्रमाणाबाहेर पुष्कळ पात्रें त्याजकडून घेऊं लागले. ज्यांचीं पात्रें लहान होतीं ते मोठीं घेऊं लागले; ज्यांची मोठीं होतीं ते लहान घेऊं लागले. त्यायोगें त्या कुंभाराला दुसरीं मातीचीं भांडीं करण्यास सवड मिळेना, व त्याची व त्याच्या मुलांबाळांची उपासमार होऊं लागली. हें पाहून लोक भिक्षूंवर टीका करूं लागले. ही गोष्ट भगवंताला समजली; तेव्हां त्यानें पात्र तयार करवून घेण्याची मनाई केली. तदनंतर एका भिक्षूचें पात्र फुटलें. भगवन्तानें पात्र तयार करवून घेण्याची मनाई केली आहे म्हणून तो भिक्षु आपल्या ओंजळींतच भिक्षा ग्रहण करूं लागला. लोक म्हणूं लागले कीं, हे शाक्यपुत्रीय श्रमण, इतर परिव्राजकांप्रमाणें ( तित्थियांप्रमाणें ) ओंजळींतच भिक्षा घेतात हें कसें ? ही गोष्ट भगवंताला समजली; तेव्हां तो म्हणाला, " भिक्षुहो, ज्याचें पात्र फुटलें असेल त्याला नवीन पात्र तयार करवून घेण्यास मी परवानगी देतों. " त्याकाळीं भगवंतानें पात्र फुटलें

असतां दुसरें तयार करवून घेण्यास परवानगी दिली आहे म्हणून षड्वर्गीय भिक्षु पात्राला थोडासा धक्का लागला तरी त्या कुंभाराकडून नवीन पात्र तयार करवून घेत असत. त्यामुळें पूर्वीप्रमाणेंच त्याला त्रास होऊं लागला. हें वर्तमान भगवंताला समजलें तेव्हां त्यानें षड्वर्गीयांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:--

**जो भिक्षु पांच ठिकाणीं पात्र सांधण्याचा प्रसंग आल्यावांचून दुसरें पात्र तयार करून घेईल त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ २२ ॥**

त्या भिक्षूनें तें पात्र भिक्षुसंघाला द्यावें; व त्या भिक्षुसंघांत जें श्रेष्टच्या दर्जाचें पात्र असेल तें त्याला देण्यांत येऊन, 'भिक्षु, हें पात्र तूं फुटेपर्यंत धारण करावें' असें त्यास सांगण्यांत यावें. हा ह्या बाबतींत शिष्टाचार समजावा.

४२. बुद्धभगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्याकाळीं आयुष्मान् पिलिंदवच्छ राजगृह येथें लेण करविण्याच्या उद्देशानें एक कंदरा साफ करवीत होता. बिंबिसार राजानें तें पाहून, तेथें कोणत्या हेतूनें साफसूफ करण्यांत येत आहे, असा पिलिंदवच्छाला प्रश्न केला. तेव्हां पिलिंदवच्छानें लेण करविण्याचा आपला उद्देश त्याला कळविला. बिंबिसार म्हणाला, "तुम्हांला एकादा आरामिक[1] पाहिजे काय?" पिलिंदवच्छ म्हणाला, "भगवंतानें आरामिक ठेवण्याची परवानगी दिली नाहीं." बिंबिसार म्हणाला, "असें आहे तर भगवंताला विचारून मला कळवा." पिलिंदवच्छानें हें वर्तमान एका माणसाकडून भगवंताला कळविलें. तेव्हां त्यानें आरामिक ठेवण्याची भिक्षूंला परवानगी दिली. दुसऱ्या वेळीं जेव्हां बिंबिसार पिलिंदवच्छाजवळ आला तेव्हां हें वर्तमान त्यानें त्याला सांगितलें. बिंबिसारानें त्याला एक आरामिक देण्याचें वचन दिलें. परंतु अनेक कार्यांत व्यग्र असल्यामुळें आरामिक पाठविण्याचा त्याला विसर पडला. कांही काळानें त्याला ह्या गोष्टीची आठवण झाली व आरामिक देण्याचें वचन देऊन किती दिवस झाले ह्याची त्यानें चौकशी

१. आरामांत काम करणारा मजूर.

केली. महामात्रानें गणना करून पांचशें रात्री झाल्याचें राजाला सांगितलें; व राजानें इतके आरामिक पिलिंदवच्छाला एकदम दिले. त्यांचा एक मोठा गांवच वसला. त्याला आरामिकग्राम किंवा पिलिंदग्राम असें म्हणत असत.

त्या काळी पिलिंदवच्छ त्या गांवांतील कुटुंबांत भिक्षेसाठीं जात असे. एके दिवशीं तेथें उत्सव होता. लहान मुलीं अलंकार आणि पुष्पमाला धारण करून क्रीडा करीत होत्या. पिलिंदवच्छ अनुक्रमें भिक्षा ग्रहण करीत एका आरामिकाच्या घरीं गेला; व तेथें त्याच्यासाठीं मांडलेल्या आसनावर बसला. त्या आरामिकाची मुलगी, 'मला अलंकार द्या, मला माळा द्या,' म्हणून रडत होती. पिलिंदवच्छानें, ती कां रडते, याची चौकशी केली, तेव्हां आरामिक त्याला म्हणाला, "हीं माला अलंकार मागत आहे. आम्हां गरिबांच्या घरीं अलंकार कोठून असणार?" पिलिंदवच्छानें एक गवताची चुंबळ घेऊन आरामिकाला ती त्या मुलीच्या डोक्यावर ठेवावयास सांगितली. ती तिच्या डोक्यावर ठेवल्याबरोबर अत्यंत सुंदर सुवर्णमाला बनली. तशा प्रकारची सुवर्णमाला राजाच्या अंतःपुरांतहि नव्हती. ती त्या आरामिकानें चोरून आणली असावी अशा संशयावरून त्या आरामिक कुटुंबाला पकडून कैद करण्यात आलें. तेव्हां खुद्द पिलिंदवच्छानें राजवाड्यांत जाऊन, त्या आरामिक कुटुंबाला कां कैद केलें, असा बिंबिसार राजाला प्रश्न केला. राजा म्हणाला, "अशा प्रकारची सुवर्णमाला त्या आरामिकाच्या घरीं कोठून असणार! त्यानें ती चोरूनच घेतली असली पाहिजे; म्हणून त्या कुटुंबाला कैद करण्यात आलें आहे." तें राजाचें भाषण ऐकून, राजवाडा सुवर्णमय होवो, असा पिलिंदवच्छानें संकल्प केला. त्यामुळें राजवाडा सोन्याचा दिसूं लागला. आणि पिलिंदवच्छ राजाला म्हणाला, "इतकें सोनें आपणापाशीं कसें आलें!" त्याची सिद्धि जाणून राजानें त्या आरामिक कुटुंबाला सोडून दिलें. राजमहालांत आपल्या सिद्धीचा प्रभाव दाखविल्यानें पिलिंदवच्छाची लोकांत फार कीर्ति पसरली; व लोक त्याला तूप, लोणी, तेल, मध आणि काकवी हीं पांच औषधें देऊं लागले. त्याचे जे साथी होते, ते घडे भरून भरून हीं औषधें सांठवून ठेवीत असत. त्यामुळें विहारांत उंदीर फार होऊं लागले. लोक ते पाहून म्हणत कीं, हे शाक्यपुत्रीय श्रमण बिंबिसार राजाप्रमाणें विहारांत कोठारें करूं लागले आहेत. हें वर्तमान

भगवंताला समजलें तेव्हां त्यानें त्या भिक्षूंचा निषेध करून सर्व भिक्षूंसाठीं नियम केला तो असा :--

**तूप, लोणी, तेल, मध आणि काकवी हीं पांच औषधें अशक्त भिक्षूंना उपयोगी पडणारीं आहेत. तीं घेऊन सात दिवसपर्यंत सांठवून उपयोगांत आणावीं. त्यापेक्षां जास्त दिवस सांठवून ठेवील त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ २३ ॥**

४३. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं वर्षाकालिक पंचा वापरण्यास भगवंतानें भिक्षूंना परवानगी दिली होती. षड्वर्गीय भिक्षू भगवंतानें परवानगी दिली आहे म्हणून वर्षाकाळ येण्यापूर्वीच पंचा घेत असत व वापरीत असत, व तो जीर्ण झाल्यावर नागवेच[1] पावसांत उभे रहात असत. तें त्यांचें कर्म सज्जन भिक्षूंला आवडलें नाहीं; व भगवंताला हें वर्तमान समजलें तेव्हां त्यानें त्यांचा निषेध करून नियम घालून दिला तो असा:--

**उन्हाळ्याच्या शेवटच्या महिन्यांत वर्षाकालिक छाटी ( पंचा ) मिळवावी, व उन्हाळ्याच्या शेवटच्या पंधरवड्यांत ती वापरावी, त्या महिन्यापूर्वीं जो छाटी मिळवील, व त्या शेवटल्या पंधरवड्यापूर्वीं वापरील, त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ २४ ॥**

४४. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या समयीं उपनंद शाक्य पुत्र आपल्या भिक्षु भावाला म्हणाला, "चल, आपण प्रवासाला जाऊं." त्याचें चीवर जुनें झालें असल्यामुळें तो प्रवासाला जाण्यास राजी नव्हता. तेव्हां उपनंदानें त्याला नवीन चीवर दिलें. पुढें त्याला भगवान् प्रवासाला जाणार आहे असें वर्तमान समजलें; व उपनंदा-बरोबर प्रवासाला न जातां भगवंताबरोबरच जाण्याचा त्यानें बेत ठरविला. तो बेत त्यानें उपनंदाला कळविला. उपनंदानें तो आपल्याबरोबर येण्यास कबूल नाहीं म्हणून त्याला दिलेलें चीवर हिरावून घेतलें. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं; व ती भगवंताला कळली तेव्हां त्यानें उपनंदाचा निषेध करून नियम घालून दिला तो असा:--

---

१. भिक्षूंपाशीं तीन चीवरें असत. परंतु तीं त्यांना रोज वापरावीं लागत, व ह्यासाठीं पावसाळ्यांत निराळा पंचा ठेवावा लागे.

**जो भिक्षु स्वतः दुसऱ्या भिक्षूला चीवर देऊन व नंतर रागावून हिरावून घेईल, किंवा हिरावून घेण्यास लावील. त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ २५ ॥**

४५. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या समयीं षड्वर्गीय भिक्षूंनीं चीवर करण्याच्या अवधींत पुष्कळ सूत मागून घेतलें. चीवरें करून संपल्यावरहि सूत शिल्लक राहिलें. तेव्हां आणखीहि सूत मागून घेऊन त्यांनीं कोष्ट्यांकडून चीवरवस्त्रें तयार करवून घेतलीं. तरी सूत शिल्लक राहिलें. पुन्हां आणखी सूत मागून घेऊन त्यांनीं आणखी चीवरवस्त्रें तयार करविलीं. तें पाहून लोक त्यांच्यावर टीका करूं लागले. हें वर्तमान भगवंताला समजलें तेव्हां त्यानें त्यांचा निषेध करून भिक्षूंला नियम घालून दिला तो असाः—

**जो भिक्षु स्वतः सूत मिळवून कोष्ट्याकडून चीवरवस्त्र विणवील त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ २६ ॥**

४६. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं एक मनुष्य प्रवासाला निघाला असतां आपल्या बायकोला म्हणाला, "सूत कांतून अमक्या कोष्ट्याला दे, व चीवरवस्त्र तयार करवून घे. मी आल्यावर आर्य उपनंदाला चीवरानें आच्छादीन." हें त्याचें भाषण एका पिंडपातिक भिक्षूनें ऐकलें, व त्यानें तें वर्तमान उपनंदाला सांगितलें. उपनंद त्या कोष्ट्याजवळ जाऊन त्याला म्हणाला, "हें चीवरवस्त्र माझ्यासाठीं विणविण्यांत येत आहे. तें तूं लांब, रुंद, भरीव, चांगलें विणलेलें, चांगली इस्तरी केलेलें व चांगलें धुतलेलें असें बनव." तो म्हणाला, "भदंत, मला त्यानें हें एवढेंच सूत दिलें आहे. ह्या सुतानें लांब, रुंद आणि भरीव चीवर-वस्त्र करतां येणें शक्य नाहीं. पण व्यवस्थितपणें विणलेलें, चांगली इस्तरी केलेलें व चांगलें धुतलेलें करतां येणें शक्य आहे." परंतु उपनंदानें लांब, रुंद व भरीव करण्याचा त्याला आग्रह केला. अर्थात तें सूत कमी पडलें. तेव्हां त्या स्त्रीजवळ जाऊन त्या कोष्ट्यानें आणखी सूत मागितलें; व तिनें कारण विचारलें असतां घडलेलें वर्तमान तिला सांगितलें. त्या स्त्रीनें त्याला पूर्वीं दिलें होतें तेवढेंच आणखी सूत दिलें; व तें चीवरवस्त्र तयार करवून घेतलें. तिचा नवरा घरीं आला तेव्हां उपनंद शाक्यपुत्र तेथें गेला. त्याला

पाहून त्या गृहस्थाला चीवर वस्त्राची आठवण झाली. त्यानें स्त्रीला विचारलें, व तिनें तें चीवरवस्त्र आणून त्याच्या हवालीं केलें, आणि घडलेली गोष्ट त्याला सांगितली. त्यानें तें चीवरवस्त्र उपनंदाला दिलें खरें; पण तो त्यावर व शाक्यपुत्रीय श्रमणांवर टीका करूं लागला. अनुक्रमें हें वर्तमान भगवंताला समजलें. त्यानें उपनंदाचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

**भिक्षूला उद्देशून अज्ञाति गृहपति किंवा गृहपत्नी कोष्टयाकडून चीवरवस्त्र विणवावयास लावील; ह्या बाबतींत अनधीष्ट भिक्षु कोष्टयाजवळ जाऊन विशिष्ट चीवराची आवड दर्शवील; म्हणेल कीं, हें चीवर माझ्यासाठींच विणविण्यांत येत आहे; तें लांब, रुंद, भरींव, चांगलें विणलेलें, चांगली इस्तरी केलेलें व चांगलें धुतलेलें असें करा; म्हणजे आम्हींहि तुम्हांला कांहीं देऊं. असें म्हणून जर तो भिक्षु त्यांना कांहीं-केवळ भिक्षान्न देखील-देईल त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥२७॥**

४७. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं एका महामात्रानें प्रवासाला जाते वेळीं भिक्षूंना निरोप पाठविला कीं, त्यांनीं येऊन वर्षाकालिक चीवर घ्यावें. परंतु भगवंतानें वर्षाकालिक चीवर स्वीकारण्याची परवानगी दिली नसल्यामुळें भिक्षु अनमान करूं लागले. तो महामात्र म्हणाला, "मी असा निरोप पाठविला असतां भदंत येत नाहींत हें कसें ? मी सैन्याबरोबर जात आहे. कधीं मरेन त्याचा नेम काय ?" हें वर्तमान भगवंताला समजलें; तेव्हां ह्या प्रकरणीं भिक्षूंना बोलावून भगवान् म्हणाला, "भिक्षूहो, अत्येक[1] चीवर घेण्यास मी तुम्हाला परवानगी देतों." भगवंतानें अत्येक चीवराची परवानगी दिली आहे म्हणून भिक्षु अत्येक चीवरवस्त्रें घेऊन त्यांचीं गाठोडीं बांधून ठेवूं लागले. तें आनंदानें पाहिलें; व त्यानें ती गोष्ट भगवंताला सांगितली. भगवंतानें त्या भिक्षूंचा निषेध करून सर्व भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

---

१. अत्येक चीवर म्हणजे प्रवासाला जाणाऱ्या मनुष्यानें, आजारी मनुष्यानें, गर्भिणी स्त्रीनें किंवा ज्यानें नुकताच बौद्ध धर्म स्वीकारला आहे अशा माणसानें वर्षाकाळीं दिलेलें चीवर.

**कातिकी पौर्णिमेपूर्वी दहा दिवस भिक्षूला अत्येक चीवर मिळेल. तें अत्येक आहे असें वाटल्यास त्यानें घ्यावें; व घेऊन चीवरवस्त्र शिवण्यापर्यंत ठेवून घ्यावें; त्यापेक्षां जास्त ठेवल्यास निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ २८ ॥**

४८. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं भिक्षु वर्षाकाळानंतर अरण्यांत रहावयास जात असत. कार्तिक महिन्यांतील चोर, ह्या भिक्षूंना पुष्कळ चीवरें मिळालीं असतील, ह्या समजुतीनें उपद्रव देत असत. हें वर्तमान भगवंताला समजलें, तेव्हां त्या प्रकरणीं भिक्षूंना बोलावून भगवान् म्हणाला, "भिक्षुहो, अरण्यांत रहाणाऱ्या भिक्षूंना तिहींपैकीं एक चीवर गांवांत ठेवण्यास मी परवानगी देतों." भगवंताची परवानगी मिळाली आहे म्हणून तिहींपैकीं एक चीवर ठेवून भिक्षु अरण्यांत रहात असत. अशीं चीवरें गांवांत फार दिवस राहिल्यानें नाश पावत असत (उंदीर वगैरे तीं खात असत). हें वर्तमान भगवंताला समजलें. तेव्हां त्यानें भिक्षूंना खालील नियम घालून दिला:-

**वर्षाकाल संपल्यावर-कार्तिक पौर्णिमेनतर-जीं सांशक आणि भयकारक आरण्यक वासस्थानें असतील, त्यांत रहाणाऱ्या भिक्षूनें वाटल्यास तिहींपैकीं एक चीवर गांवांत ठेवावें; व कांहीं कारणास्तव जरूर लागल्यास सहा दिवसपर्यंत त्या चीवरापासून दूर रहावें. भिक्षूंच्या संमतीशिवाय त्यापेक्षां जास्त दिवस त्या चीवरापासून अलग राहील, त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ २९ ॥**

४९. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं श्रावस्तींत एका पूगानें[1] संघाला भोजन तयार करून चीवरवस्त्र देण्याचा बेत केला होता. षड्वर्गीय भिक्षु त्या पूगाजवळ जाऊन तीं चीवरवस्त्रें मागूं लागले. पण पूगाचे सभासद म्हणाले, "आम्हीं दरवर्षी जेवण देऊन संघाला चीवरवस्त्रें देत असतों. तेव्हां हीं चीवरवस्त्रें तुम्हाला देतां येत नाहींत. षड्वर्गीय म्हणाले," "संघाला देणारे पुष्कळ आहेत. पण आम्हीं केवळ तुमच्यावर अवलंबून रहातों. तुम्ही जर आम्हांला देणार नाहीं तर दुसरा कोण देईल?" ह्याप्रमाणें अतिशय आग्रह केल्यामुळें त्या पूगानें

१. पूग म्हणजे कामगार लोकांचा संघ.

तीं चीवरवस्त्रें त्यांना दिलीं. पुढें संघाला जेवण दिल्यावर इतर भिक्षु म्हणाले, "आतां तुम्हीं तयार करून ठेवलेलीं वस्त्रें आणून संघाला द्या." तेव्हां पूगाचे सभासद म्हणाले, "आम्हीं वस्त्रें गोळा केलीं होतीं खरीं; परंतु षड्वर्गियांच्या आग्रहास्तव त्यांना देणें भाग पडलें. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं; व ती कळून आल्यावर भगवंतानें षड्वर्गियांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:–

**जो भिक्षु जाणून बुजून संघाला मिळणारा लाभ आपण मिळवील त्याला निस्सग्गिय पाचित्तिय होतें ॥ ३० ॥**

## ब्याण्णव पाचित्तिय

५०. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं हत्थक शाक्यपुत्र वादविवादांत गुंतला होता. इतर पंथांच्या परिव्राजकांबरोबर वाद करीत असतां, आपला मुद्दा अमूक असें म्हणून, पुन्हां तो आपला मुद्दाच नाहीं असें तो म्हणे; किंवा दुसरीच कांहीं तरी गोष्ट काढी. अमूक ठिकाणीं अमक्या वेळीं वादासाठीं येईन असें म्हणून त्यावेळीं हजर रहात नसे. दुसऱ्या पंथांचे परिव्राजक ह्या त्याच्या वर्तनावर टीका करूं लागले, व भगवंताला हें वर्तमान समजलें तेव्हां त्यानें त्याचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:–

**जो भिक्षु जाणून बुजून खोटें बोलेल त्याला पाचित्तिय होतें ॥ १ ॥**

५१. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु विद्वान् भिक्षूंबरोबर भांडण करून त्यांना शिवीगाळ करीत असत. तेव्हां त्यांचा निषेध करून भगवंतानें नियम केला तो असा:–

**वर्मी बोलणाऱ्यास पाचित्तिय होतें ॥ २ ॥**

५२. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु तंटा, भांडणें झालेल्या भिक्षूंच्या परस्परांशीं चहाड्या करीत असत. तेव्हां भगवंतानें त्यांचा निषेध करून नियम केला तो असा:–

**भिक्षूची चहाडी केली असतां पाचित्तिय होतें ॥ ३ ॥**

५३. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु उपासकांबरोबर शब्दशः धर्म वचनें म्हणत असत. त्यामुळें उपासकांचा भिक्षूविषयीं गौरव कमी होऊं लागला. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं; व ती समजली तेव्हां भगवंतानें षड्वर्गीयांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा :—

**जो भिक्षू अनुपसंपन्नाबरोबर[1] शब्दशः[2] धर्म म्हणेल, त्याला पाचित्तिय होतें ॥ ४ ॥**

५४. बुद्ध भगवान् आळवी येथें अग्गाळव चेतियांत रहात होता. त्या वेळीं धर्मश्रवणासाठीं उपासक आरामांत येत असत. धर्मदेशना झाल्यावर स्थाविर भिक्षु आपापल्या विहारांत जात असत. पण नवक भिक्षु तेथेंच उपासकांबरोबर एकाच उपस्थानशालेंत निजत असत. ते कधीं कधीं नागडे उघडे पडत असत, व त्यामुळें उपासक त्यांवर टीका करीत. हें वर्तमान भगवंताला समजलें तेव्हां त्यानें नियम केला तो असा :— "जो भिक्षु अनुपसंपन्नाबरोबर एका ठिकाणीं निजेल, त्याला पाचित्तिय होतें."

हा नियम घालून देऊन भगवान् आळवीहून कौशांबीला आला व तेथें बदरिकारामांत राहिला. त्या समयीं राहुल श्रामणेर होता. त्याला भिक्षु म्हणाले, "आम्हांला अनुपसंपन्नाबरोबर एका ठिकाणीं निजतां येत नाहीं. तेव्हां तूं आपल्या निजण्याची व्यवस्था पहा. "राहुलाला दुसरी जागा न मिळाल्यामुळें वर्चकुटींत (पायखान्यांत) निजावें लागलें. पहांटेला भगवान् तेथें गेला; व त्याला तेथें राहुल आढळला. आपणांला तेथें कां निजावें लागलें हें राहुलानें त्याला सांगितलें. तेव्हां भिक्षूंला बोलावून भगवान् म्हणाला, "भिक्षुहो, अनुपसंपन्नाबरोबर दोन तीन रात्री एकत्र निजण्यास मी परवानगी देतों." आणि त्यानें वरील नियमांत फेरफार केला तो असाः—

**जो भिक्षु अनुपसंपन्नाबरोबर दोन तीन रात्रींपेक्षां जास्ती रात्री एका ठिकाणीं निजेल त्याला पाचित्तिय होतें ॥ ५ ॥**

---

१. अनुपसंपन्न ज्याला भिक्षुसंघांत उपसंपदाविधीनें घेण्यांत आलें नाहीं तो पुरुष किंवा भिक्षुणीसंघांत घेण्यांत आलें नाहीं ती स्त्री.

२. प्रत्येक शब्द दुसऱ्याला उच्चारावयास लावून धर्म शिकवील.

५५. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं आयुष्मान् अनुरुद्ध कोसल देशांत प्रवास करीत श्रावस्तीला जात असतां एका गांवांत आला. तेथें एका स्त्रीचें आवसथागार[1] होतें. अनुरुद्धानें एक रात्र तेथें रहाण्यास जागा मागितली, व ती त्या स्त्रीनें दिली. त्यानंतर तेथें कांहीं पांथस्थ आले. त्यांनाहि त्या आवसथागारांत अनुरुद्धाच्या संमतीनें जागा देण्यांत आली. अनुरुद्धाला पाहिल्याबरोबर त्या स्त्रीचें मन विकृत झालें, व ती त्याला म्हणाली, "भदंत, येथें तुम्हांला फार दाटी होईल. आंतल्या बाजूला तुमची निजण्याची सोय मी करवितें." त्यावर कांहीं न बोलतां अनुरुद्धानें ही गोष्ट मान्य केली. रात्रीं ती स्त्री सर्व अलंकार घालून अनुरुद्ध निजला होता त्या खोलींत आली; व त्याला म्हणाली, "भदंत, तुम्ही अत्यंत सुरूप आहां, व मीहि तशीच सुरूप आहें. मला आपली बायको करा." अनुरुद्ध कांहींच बोलला नाहीं, तेव्हां ती पुन्हां म्हणाली, "मला तुम्ही स्वीकारा; एवढेंच नव्हे तर माझी सर्व संपत्तीहि स्वीकारा." त्यावर अनुरुद्ध कांहींच बोलला नाहीं. तेव्हां साडी टाकून देऊन ती स्त्री अनुरुद्धासमोर इकडून तिकडे फिरूं लागली, उभी राहूं लागली, बसूं लागली, व निजूं लागली; पण अनुरुद्धानें आपल्या इंद्रियांचें दमन करून तिच्याकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. त्यामुळें ती स्त्री आश्चर्यचकित झाली, व पुन्हां साडी नेसून अनुरुद्धाच्या पायांवर डोकें ठेवून तिनें त्याची माफी मागितली. अनुरुद्धानें तिला क्षमा केली; व दुसऱ्या दिवशीं तिला धर्मोपदेश करून तो तेथून श्रावस्तीला आला. तेथें त्यानें ही गोष्ट भिक्षूंना सांगितली. जेव्हां ती भगवंताला समजली; तेव्हां भगवंतानें त्याचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा :—

**जो भिक्षु स्त्रीबरोबर एका जागीं निजेल त्याला पाचित्तिय होतें ॥ ६ ॥**

५६. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं उदायी श्रावस्तीमध्यें पुष्कळ कुटुंबांत जात येत असे. अशा एका कुटुंबांत सासू बाहेरच्या दरवाजांत बसली होती, व सून आंतल्या दरवाज्यांत बसली होती. उदायी इकडे येऊन सासूच्या कानांत धर्मोपदेश करून सुनेपाशीं गेला; व तिलाहि त्यानें तसाच कानाशीं धर्मोपदेश केला.

१. धर्मशाळा.

तेव्हां त्या उभयतांना परस्परांविषयीं संशय उत्पन्न झाला; व उदायी कानाशीं काय बोलत होता हें परस्परांनीं परस्परांना विचारलें. त्यानें नुस्ता धर्मोपदेश केला हें समजून आल्यावर त्या दोघीहि त्यावर टीका करूं लागल्या; व ही गोष्ट अनुक्रमें भगवंताला समजली. त्यानें उदायीचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:—

" जो भिक्षु स्त्रीला धर्मोपदेश करील त्याला पाचित्तिय होतें. "

त्या काळीं उपासिका भिक्षूंना पाहून, आपणाला धर्मोपदेश करा अशी विनंती करीत असत. भिक्षु म्हणत, ' असें करणें योग्य नव्हे.' त्या म्हणत ' निदान पांच सहा वाक्यांनीं तरी धर्मोपदेश करा.' परंतु भिक्षु त्यांचें म्हणणें ऐकेनात. तेव्हां त्या भिक्षूंवर टीका करूं लागल्या. ही गोष्ट भगवंताला समजली तेव्हां त्यानें बायकांना पांच सहा वाक्यांनीं उपदेश करण्याची भिक्षूंना परवानगी दिली, व वरील नियमांत फेरफार केला तो असा:—

" जो भिक्षु स्त्रीला पांच सहा वाक्यांपेक्षां जास्त धर्मोपदेश करील त्याला पाचित्तिय होतें. "

त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु भगवंतानें अशी परवानगी दिली आहे म्हणून एकाद्या अजाण मनुष्याला स्त्रीजवळ बसून पुष्कळ धर्मोपदेश करीत असत. ही गोष्ट भगवंताला समजली, तेव्हां त्यांचा निषेध करून त्यानें वरील नियमांत फेरफार केला तो असा:—

**जो भिक्षु सुज्ञ पुरुष हजर असल्याशिवाय स्त्रीला पांच सहा वाक्यांपलिकडे धर्मोपदेश करील त्याला पाचित्तिय होतें ॥ ७ ॥**

५७. बुद्ध भगवान् वैशाली येथें महावनांत कूटागारशालेंत रहात होता. त्या काळीं कांही नाणावलेले भिक्षु वग्गुमुदा नदीच्या तीरावर वर्षाकाळीं राहिले. [ सर्व मजकूर चवथ्या कलमाप्रमाणें समजावा. ] वर्षाकाळानंतर जेव्हां ते भगवंताच्या दर्शनाला आले तेव्हां त्यांनीं परस्परांना लोकोत्तर धर्माचें ज्ञान झाल्याचें गृहस्थांना सांगितलें. ही गोष्ट भगवंताला समजली. पण त्यापैकीं बऱ्याच जणांना खरोखरच लोकोत्तर धर्माचें ज्ञान झालें होतें. तरी पण त्यांचा निषेध करून भगवंतानें भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:—

**जो भिक्षु अनुपसंपन्नाला लोकोत्तर धर्म प्राप्त झाल्याचें सांगेल— ही गोष्ट खरी असल्यास— त्याला पाचित्तिय होतें ॥ ८ ॥**

५८. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं उपनंद शाक्यपुत्र षड्वर्गीय भिक्षूंबरोबर भांडला होता. त्याच्या हातून चेतनायुक्त वीर्यपात करण्याची आपत्ति घडली होती, व संघानें त्याला त्याबद्दल परिवास दिला होता. तो अशा स्थितींत असतां श्रावस्तींत एका पूगाकडून संघाला निमंत्रण होतें. तेथें उपनंद एका बाजूला बसला. षड्वर्गीय भिक्षु त्या पूगांतील मनुष्यांना म्हणाले, "या उपनंदाचा तुम्ही बराच मान ठेवतां, पण हा ज्या हातानें दायकांनीं दिलेली भिक्षा ग्रहण करतो, त्याच हातानें वीर्यपात करीत असतो. ह्या अपराधाबद्दल संघानें त्याला परिवास दिला आहे; व म्हणून तो सर्वांच्या शेवटीं बसला आहे." हें त्यांचें भाषण सज्जन भिक्षूंना आवडलें नाहीं; व भगवंताला जेव्हां ही गोष्ट समजली तेव्हां त्यानें षड्वर्गीयांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:—

**जो भिक्षु संघाच्या संमतीशिवाय दुसऱ्या भिक्षूची संघादिशेष आपत्ति अनुपसंपन्नाला सांगेल, त्याला पाचित्तिय होतें ॥ ९ ॥**

५९. बुद्ध भगवान् आळवी येथें अग्गाळव चेतियांत रहात होता. त्या काळीं आळवक भिक्षु बांधकाम करीत असतां जमीन खोदवीत. त्यांच्यावर लोक टीका करूं लागले. ही गोष्ट समजली, तेव्हां भगवंतानें त्यांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:—

**जो भिक्षु जमीन खणील किंवा खणवील, त्याला पाचित्तिय होतें ॥ १० ॥**

६०. बुद्ध भगवान्, आळवी येथें अग्गाळव चेतियांत रहात होता. त्या काळीं आळवक भिक्षु बांधकाम करीत असतां झाडें तोडीत असत व तोडवीत असत. असा एक भिक्षु एक झाड तोडीत असतां त्या वृक्षावर राहणारी वृक्षदेवता त्याला म्हणाली, "भदंत, तुझें घर बनविण्यासाठीं माझ्या घराचा नाश करूं नकोस." तिचें वचन न ऐकतां भिक्षूनें तें झाड तोडलें. तें खालीं पडलें तेव्हां त्या देवतेला व तिच्या मुलांला पुष्कळ जखमा झाल्या. तिच्या मनांत त्या भिक्षूला ठार मारावें असा विचार आला; परंतु मनोनिग्रह

करून भगवंताजवळ जाऊन तिनें ही सर्व गोष्ट त्याला सांगितली. तिनें त्या भिक्षूला मारलें नाहीं ह्याबद्दल भगवंतानें तिची स्तुति केली, व तेथून कांहीं अंतरावर एक मोकळा वृक्ष होता त्यावर निवासस्थान करण्यास तिला सांगितलें. भिक्षु झाडें तोडतात म्हणून लोकहि भिक्षूंवर टीका करूं लागले. शेवटीं ह्या प्रकरणीं भगवंतानें भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः——

**वनस्पति तोडल्यास पाचित्तिय होतें ॥ ११ ॥**

६१. बुद्ध भगवान् कौशांबी येथें घोषितारामांत रहात होता. त्या काळीं छन्न भिक्षु अनाचार करून संघांत चौकशी होत असतां भलतें सलतें बोलत असे; म्हणे कीं, आपत्ति कोणाला झाली ? कोणत्या बाबतींत झाली ? कशी झाली ? कोणाला बोलतां ? काय बोलतां ? सज्जन भिक्षूंना ही गोष्ट आवडली नाहीं; व भगवंताला ती समजली, तेव्हां त्यानें छन्न भिक्षूंचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः——

" भलतें बोलेल त्याला पाचित्तिय होतें. "

त्या काळीं छन्न भिक्षु भलतेंच बोलल्यास आपत्ति होते म्हणून संघांत मुकाट्यानें रहात असे, व त्यामुळें संघाला त्रास होत असे. ही गोष्ट भगवंताला समजली, तेव्हां त्यानें वरील नियमांत फेरफार केला तो असाः——

**भलतें बोलेल किंवा ( मौन धरून ) संघास त्रास देईल, त्याला पाचित्तिय होतें ॥ १२ ॥**

६२. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेणुवनांत रहात होता. त्या काळीं दब्ब मल्लपुत्त संघाच्या निजण्याची व जेवणाची व्यवस्था पहात असे. मित्तिय आणि भुम्मजक हे दोघे भिक्षु त्याची अवज्ञा करूं लागले. तेव्हां भगवंतानें भिक्षूंसाठीं नियम केला तो असाः——

" अवज्ञा केली असतां पाचित्तिय होतें. "

अवज्ञा केली असतां पाचित्तिय होतें म्हणून मित्तिय आणि भुम्मजक दब्बाची निंदा करूं लागले, तेव्हां भगवंतानें वरील नियमांत फेरफार केला तो असाः——

**अवज्ञा किंवा निंदा केली असतां पाचित्तिय होतें ॥ १३ ॥**

६३. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं हिंवाळ्यांत भिक्षु मोकळ्या जागीं मंचक किंवा आसन ठेवून उन्हांत बसत असत; व तें जागच्या जागीं न ठेवतां किंवा दुसऱ्या कोणाला न सांगतां तेथेंच टाकून जात असत. हें वर्तमान भगवंताला समजलें तेव्हां त्यानें त्यांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:—

**जो भिक्षु सांघिक मंच, पीठ, बिछाना किंवा चटई मोकळ्या जागेंत पसरून किंवा पसरावयास लावून जातेवेळीं जागच्याजागीं न ठेवील, न ठेवावयास लावील. किंवा दुसऱ्याला न सांगतां जाईल, त्याला पाचित्तिय होतें ।। १४ ।।**

६४. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अ० आरामांत रहात होता. त्या काळीं सप्तदशवर्गीय भिक्षु परस्परांशीं मैत्रीनें वागत असत. ते एकत्र रहात व एकत्रच प्रवास करीत. एके दिवशीं एका सांघिक विहारांत बिछाने पसरून ते निजले व जातांना बिछाने तसेच टाकून गेले. त्यामुळें बिछान्याला वाळवी लागली. हें वर्तमान भगवंताला समजलें, तेव्हां त्यांचा निषेध करून त्यानें भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:—

**जो भिक्षु सांघिक विहारांत शय्या ( बिछाना ) हांतरून किंवा हांथरावयास लावून जातांना जागच्याजागीं न ठेवतां किंवा न ठेवावयास लावतां किंवा कोणाला न सांगतां जाईल, त्याला पाचित्तिय होतें ।। १५ ।।**

६५. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु चांगल्या चांगल्या जागीं जाऊन आगाऊच निजण्याच्या उद्देशानें बसत असत. स्थविर भिक्षु त्यांना तेथून उठवीत; परंतु षड्वर्गीय भिक्षु गर्दी करून तेथेंच निजत असत; हेतु हा कीं ज्याला गर्दी वाटत असेल त्यानें तेथून निघून जावें. ती गोष्ट भगवंताला समजली तेव्हां त्यानें षड्वर्गीयांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:—

**जो भिक्षु सांघिक विहारांत पूर्वी वस्तीला राहिलेल्या भिक्षूला गर्दी व्हावी व त्यानें तेथून निघून जावें अशा हेतूनें जाणूनबुजून गर्दी करून निजेल, त्याला ह्याच कारणास्तव पाचित्तिय होतें ।। १६ ।।**

६६. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं सप्तदशवर्गीय भिक्षूंनीं एका गांवठी विहाराची डागडुजी चालविली होती. ती होईपर्यंत षड्वर्गीय भिक्षूंनीं वाट पाहिली, व विहार साफसूफ झाल्यावर सप्तदशवर्गीयांना हांकून देऊन आपणच तेथें राहूं लागले. सप्तदशवर्गीयांनीं त्यांची पुष्कळ विनवणी केली; पण त्यांना ते आंत राहूं देईनात. हें वर्तमान भगवंताला समजलें, तेव्हां त्यानें षड्वर्गीयांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:—

**जो भिक्षु भिक्षूवर रागावून सांघिक विहारांतून त्याला बाहेर काढील, किंवा बाहेर काढवील, त्याला पाचित्तिय होतें ॥ १७ ॥**

६७. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या वेळीं दोन भिक्षु सांघिक विहारांतील दोन मजली कुटींत, एक तळमजल्यावर व दुसरा वरच्या मजल्यावर रहात होता. वरच्या मजल्यावर जमिनींत रोंवलेल्या पायांची एक खाट होती. वरच्या मजल्यावर राहणारा भिक्षु त्या खाटेवर जोरानें एकदम बसला. त्यामुळें खाटेचा पाय खालीं शिरून खालच्या मजल्यावर राहणाऱ्या भिक्षूच्या डोक्याला मोठा धक्का लागला, व त्यानें आरडाओरड केली. सज्जन भिक्षूंना ही गोष्ट आवडली नाहीं, व भगवंतानें त्या बाबतींत नियम घालून दिला तो असा:—

**जो भिक्षु सांघिक विहारांतील दोन मजली कुटींत वरच्या मजल्यावर पाय जमिनींत रोंवलेल्या खाटेवर किंवा आसनावर बसेल किंवा निजेल, त्याला पाचित्तिय होतें ॥ १८ ॥**

६८. बुद्ध भगवान् कौशांबी येथें घोषितारामांत रहात होता. त्या काळीं आयुष्मान् छन्नाच्या उपस्थायक महामात्रानें छन्नासाठीं एक विहार करविला. छन्न त्या विहारावर एकामागून एक आच्छादन घालूं लागला व त्याच्या भिंतीला पुन्हां पुन्हां गिलावा करूं लागला. त्यामुळें भार जास्त होऊन विहार पडूं लागला. छन्नानें त्याच्या दुरुस्तीसाठीं तृणकाष्ठ गोळा करीत असतां एका ब्राह्मणाचें जवाचें शेत ( यवक्षेत्र ) खराब केलें. तेव्हां तो ब्राह्मण भिक्षूंवर टीका करूं लागला. अनुक्रमें ही गोष्ट भगवंताला समजली. त्यानें छन्नाचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:—

**मोठा विहार करविणाऱ्या भिक्षूनें दरवाजाच्या बाजूला अर्गला ठेवण्याच्या जागेपर्यंत व खिडक्यांच्या बाजूला गिलावा करण्यासाठीं आणि दोनतीनदां छप्पर घालण्यासाठीं जेथें धान्यादिक नसेल अशा जागीं राहून प्रयत्न करावा. त्यापेक्षां जास्त— धान्यादिक नाहीं अशा जागीं राहून देखील— गिलावा करण्याचा किंवा छप्पर घालण्याचा प्रयत्न करील, त्याला पाचित्तिय होतें ।। १९ ।।**

६९. बुद्ध भगवान् आळवी येथें अग्गाळव चेतियांत रहात होता. त्या काळीं आळवी एथील भिक्षु बांधकाम करवितांना प्राणी असलेल्या पाण्यानें गवत व माती भिजवीत असत व भिजवावयास लावीत असत. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं ... आणि भगवंतानें नियम केला तो असा:—

**जो भिक्षु जाणूनबुजून प्राणी असलेल्या पाण्यानें गवत किंवा माती भिजवील किंवा भिजवावयास लावील, त्याला पाचित्तिय होतें ॥ २० ॥**

७०. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं स्थविर भिक्षु भिक्षुणींला उपदेश करीत असत, व त्यामुळें त्यांना चीवरपिंडपातादिकांचा लाभ होत असे. तें पाहून षड्वर्गीय भिक्षूंना भिक्षुणींना उपदेश करणें फायदेशीर आहे असें वाटलें, व भिक्षुणींजवळ जाऊन ते त्यांना म्हणाले, "भगिनीनों, आम्ही राहतों तिकडे येत जा; म्हणजे आम्हीहि तुम्हाला उपदेश करूं." जेव्हां त्या भिक्षुणी षड्वर्गीयांजवळ गेल्या, तेव्हां त्यांनीं त्यांना धर्मोपदेश फार थोडा केला, आणि वायफळ गोष्टी पुष्कळ सांगितल्या. तेथून त्या भगवंताच्या दर्शनाला गेल्या; व भगवंतानें प्रश्न केल्यावरून त्यांनीं घडलेली गोष्ट सांगितली. ह्या प्रकरणीं भगवंतानें भिक्षूंना एकत्र जमविलें, व षड्वर्गीयांचा निषेध केला; आणि भिक्षुणींना उपदेश करणारा भिक्षु पद्धतीप्रमाणें संघानें निवडावा असा नियम केला. संघानें निवडलेल्या भिक्षूनें भिक्षुणींस उपदेश करावा अशी अनुज्ञा देऊन भगवंतानें खालील नियम घालून दिला:—

**संघानें निवड केल्यावांचून जो भिक्षु भिक्षुणींना उपदेश करील त्याला पाचित्तिय होतें ॥ २१ ॥**

षड्वर्गीय भिक्षु भगवंतानें ह्या नियम केला आहे म्हणून आपणांपैकीं कोणाला तरी निवडून भिक्षुणींना उपदेश करावयाला लावीत असत. तेव्हां त्यांचा निषेध करून भगवान् भिक्षूंना म्हणाला, "भिक्षुहो, ( १ ) जो भिक्षु शीलवान् असेल, ( २ ) बहुश्रुत असेल, ( ३ ) ज्याला भिक्षुप्रातिमोक्ष आणि भिक्षुणीप्रातिमोक्ष तोंडपाठ असतील, ( ४ ) जो उत्तम वक्ता असेल, ( ५ ) भिक्षुणींना ज्याचा उपदेश आवडत असेल, ( ६ ) जो समर्थ असेल, ( ७ ) प्रव्रज्या घेतल्यापासून ज्याच्या हातून संघादिशेषासारखी आपत्ती घडली नसेल, व ( ८ ) जो वयानें वीस वर्षांहून अधिक असेल, त्यालाच भिक्षुणींना उपदेश करण्यासाठीं निवडण्यांत यावें. ह्या आठ गुणांनीं समन्वित असेल त्याला भिक्षुणींस उपदेश करण्यासाठीं निवडावें अशी अनुज्ञा देतों."

७१. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं स्थविर भिक्षु आळीपाळीनें भिक्षुणींना उपदेश करीत असत. एके दिवशीं चूळपंथकाची पाळी होती. भिक्षुणी म्हणाल्या, "आज आर्य चूळ-पन्थक आम्हांस विस्तारानें उपदेश न करतां पुन्हां पुन्हां आपली उद्गार-गाथाच म्हणत राहील" हें त्यांचें अनुमान खरें ठरलें. त्या उपदेशासाठीं आल्यावर चूळपंथकानें ही गाथा म्हटली:— "अधिचेतसो अप्पमज्जतो मुनिनो मोनपथेसु सिक्खतो । सोका न भवन्ति तादिनो उपसन्तस्स सदा सतीमतो ॥ ( समाधीमध्यें अप्रमत्त राहणाऱ्या, मौनमार्गांत आत्मदमन कर-ण्यास शिकणाऱ्या, शांत आणि सदोदित स्मृतिमान् तादृश मुनीला शोक-प्रसंग येत नसतात. )" आपण केलेलें अनुमान खरें ठरलें, असें भिक्षुणी आपसांत बोलूं लागल्या. त्यांचें बोलणें चूळपंथकानें ऐकलें; व तो सिद्धीच्या बळानें आकाशांत चंक्रमण करूं लागला, उभा राहूं लागला, बसूं लागला, निजूं लागला, धूर उत्पन्न करूं लागला, अग्नि उत्पन्न करूं लागला व अंतर्धान पावूं लागला; आणि वरचीच उद्गारगाथा व इतर पुष्कळ बुद्धवचनें म्हणूं लागला. तें पाहून भिक्षुणी म्हणूं लागल्या, "चूळपंथकाच्यासारखा प्रभाव-शाली उपदेश आम्हीं कधीं ऐकला नाहीं. पण ह्या चूळपंथकाच्या उपदेशा-मुळें शहरांत जाण्यास भिक्षुणींना उशीर झाला; व दरवाजे बंद झाल्यामुळें रात्र शहराबाहेर घालवून त्यांना सकाळीं शहरांत जावें लागलें. त्यांना पाहून लोक म्हणूं लागले कीं, ह्या भिक्षुणी अब्रह्मचारिणी आहेत; रात्रीं भिक्षूंबरोबर

राहून सकाळीं गांवांत येत आहेत. होतां होतां ही गोष्ट भगवंताच्या कानीं आली. त्यानें चूळपंथकाचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:—

**संघानें निवडलेला भिक्षुहि सूर्यास्तानंतर भिक्षुणींला उपदेश करील तर त्याला पाचित्तिय होतें ॥ २२ ॥**

७२. बुद्ध भगवान् शाक्य देशांत कपिलवस्तु येथें निग्रोधारामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु भिक्षुणीउपाश्रयांत जाऊन भिक्षुणींना उपदेश करीत असत. हें वर्तमान भगवंताला समजलें, तेव्हां त्यानें त्यांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:—

"जो भिक्षु भिक्षुणीच्या उपाश्रयांत जाऊन भिक्षुणीला उपदेश करील त्याला पाचित्तिय होतें."

त्या काळीं महाप्रजापती गोतमी आजारी होती. स्थविर भिक्षु तिच्या समाचाराला गेले. त्यांना तिनें धर्मोपदेश करण्याची विनंती केली. पण तसें करण्याची मनाई आहे म्हणून त्यांनीं धर्मोपदेश केला नाहीं. नंतर भगवान् महाप्रजापतीला भेटावयाला गेला. त्याला तिनें ही गोष्ट सांगितली. तेव्हां ह्या प्रकरणीं भगवान् भिक्षूंना म्हणाला, "आजारी भिक्षुणीला भिक्षुणीच्या उपाश्रयांत जाऊन उपदेश करण्याची मी परवानगी देतों. आणि त्यानें वरील नियमांत फेरफार केला तो असा:—

**जो भिक्षु प्रसंगाशिवाय भिक्षुणीच्या उपाश्रयांत जाऊन भिक्षुणीला उपदेश करील, त्याला पाचित्तिय होतें. भिक्षुणी आजारी असणें, हा ह्या बाबतींत प्रसंग जाणावा ॥ २३ ॥**

७३. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं स्थविर भिक्षूंना भिक्षुणींला उपदेश केल्यामुळें चीवरपिंडपातादिकांचा लाभ होत असे. षड्वर्गीय भिक्षु म्हणत कीं, केवळ लाभासाठीं स्थविर भिक्षु भिक्षुणींना उपदेश करतात. ही गोष्ट भगवंताला समजली, तेव्हां त्यानें षड्वर्गीयांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा :—

**लाभासाठीं स्थविर भिक्षु भिक्षुणींना उपदेश करतात असें जो भिक्षु म्हणेल, त्याला पाचित्तिय होतें ॥ २४ ॥**

७४. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं एक भिक्षु श्रावस्तींतील एका गल्लींत भिक्षाटन करीत असे. एक भिक्षुणीहि तेथेंच भिक्षेला जात असे. तेथें त्या दोघांची ओळख झाली. एकदां त्या भिक्षुणीला त्यानें चीवर दिलें. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं.......व भगवंतानें नियम केला तो असा :–

" जो भिक्षु अज्ञाति भिक्षुणीला चीवर देईल त्याला पाचित्तिय होतें. "

ह्यामुळें भिक्षुणीनें कांहीं पदार्थांच्या बद्दल चीवर मागितलें असतां भिक्षु देईनात. भगवंतानें पदार्थांच्या बद्दल चीवर देण्याची परवानगी दिली; व वरील नियमांत फेरफार केला तो असा :–

**जो भिक्षु पदार्थांच्या बदलीशिवाय अज्ञाति भिक्षुणीला चीवर देईल, त्याला पाचित्तिय होतें ॥ २५ ॥**

७५. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं उदायी भिक्षु चीवर शिवण्यांत प्रख्यात होता. एका भिक्षुणीनें चीवर शिवून देण्यास त्याला विनंती केली. त्यानें चीवर फार चांगलें तयार केलें, पण त्यावर एक बीभत्स चित्र काढलें; व त्या भिक्षुणीला सांगितलें कीं, ह्या चीवराची घडी न मोडतां तें तसेंच ठेवून दे, आणि जेव्हां भिक्षुणीसंघ उपदेश ऐकण्यास जाईल त्या वेळीं तें पांघरून सर्वांमागून जा. त्या भिक्षुणीनें तसें केलें. अर्थात तें बीभत्स चित्र तिला किंवा इतर भिक्षुणींना दिसलें नाहीं. पण वाटेंत लोक तें चित्र पाहून भिक्षुणींची निंदा करूं लागले. पुढें ही बातमी भगवंताला समजली, तेव्हां त्यानें उदायीचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

**जो भिक्षु अज्ञाति भिक्षुणीचें चीवर शिवील किंवा शिववील, त्याला पाचित्तिय होतें ॥ २६ ॥**

७६. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु बेत ठरवून भिक्षुणींबरोबर प्रवास करीत असत...ह्या बाबतींत भगवंतानें नियम केला तो असा :–

" जो भिक्षु बेत ठरवून भिक्षुणीबरोबर एका मार्गानें प्रवास करील –केवळ एका गांवांतून दुसऱ्या गांवांत देखील जाईल–त्याला पाचित्तिय होतें. "

एके समयीं कांहीं भिक्षु व भिक्षुणी साकेताहून श्रावस्तीला येत होत्या. त्या भिक्षुणींनीं भिक्षूंबरोबर प्रवास करण्याचा आपला विचार दर्शविला. पण वरील नियमांमुळें भिक्षूंना त्यांना तसें करूं देतां आलें नाहीं. ते म्हणाले, "आपणांला एकत्र प्रवास करतां येत नाहीं. तुम्ही पुढें व्हा. आम्ही मागाहून येऊं." भिक्षुणी म्हणाल्या, "भिक्षूंचा मान प्रथम. तेव्हां तुम्हीच पुढें जा. आम्ही मागाहून येतों." भिक्षु पुढें गेले, व भिक्षुणी मागाहून येत असतां त्यांना चोरांनीं गाठलें, त्यांचीं चीवरें हिरावून घेतलीं, व त्यांवर बलात्कार केला. हें वर्तमान भगवंताला समजलें, तेव्हां त्यानें वरील नियमांत फेरफार केला तो असा :-

**जो भिक्षु प्रसंगावांचून बेत ठरवून भिक्षुणीबरोबर एका मार्गानें प्रवास करील—केवळ एका गांवांतून दुसऱ्या गांवांत देखील जाईल —त्याला पाचित्तिय होतें. ज्या मार्गांत कारवानाबरोबर प्रवास करावयाचा असतो, व जेथें चोरांचें वगैरे भय असतें, हा ह्या बाबतींत प्रसंग जाणावा ॥ २७ ॥**

७७. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या वेळीं षड्वर्गीय भिक्षु बेत ठरवून भिक्षुणींबरोबर होडींतून प्रवास करीत असत. लोक म्हणूं लागले कीं, आम्ही जसे आपल्या बायकांना घेऊन नावेंत बसून क्रीडा करतों तसे हे शाक्यपुत्रीय श्रमण भिक्षुणींबरोबर नावेंत क्रीडा करीत असतात. .... या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असाः—

"जो भिक्षु बेत ठरवून नदींच्या खालच्या किंवा वरच्या बाजूला जाणाऱ्या नावेंत भिक्षुणीबरोबर बसेल, त्याला पाचित्तिय होतें."

त्या काळीं कांहीं भिक्षु आणि भिक्षुणी साकेताहून श्रावस्तीला येत होत्या. वाटेंत एक नदी होती. तेथें भिक्षु त्यांना म्हणाले, "तुम्ही पुढें जा. आम्ही मागून येतों." भिक्षुणींनीं भिक्षूंसच पुढें जाण्यास सांगितलें. ते नदीपार गेले असतां चोरांनीं भिक्षुणींचीं चीवरें हिरावून घेतलीं, व त्यांवर बलात्कार केला. हें वर्तमान समजलें तेव्हां, भिक्षूंनीं व भिक्षुणींनीं नदीपार जाणाऱ्या नावेंत एकत्र बसावें, अशी अनुज्ञा देऊन भगवंतानें वरील नियमांत फेरफार केला तो असाः—

**जो भिक्षु बेत ठरवून नदीपार जाणाऱ्या नावेशिवाय नदीच्या वरच्या किंवा खालच्या बाजूला जाणाऱ्या नावेंत भिक्षुणीबरोबर बसेल, त्याला पाचित्तिय होतें ॥ २८ ॥**

७८. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या काळीं थुल्लनंदा भिक्षुणी एका कुटुंबांत जात येत असे. त्या कुटुंबांत एके दिवशीं सारिपुत्त, महामोग्गलान वगैरे महास्थविरांना आमंत्रण होतें. हें वर्तमान जेव्हां थुल्लनंदा भिक्षुणीला समजलें, तेव्हां ती त्या गृहस्थाला म्हणाली, "तूं देवदत्तासारख्या थोर भिक्षूंना आमंत्रण न करितां ह्यांना आमंत्रण केलें हें कसें ? भिक्षुणींकडून लोकांस सांगून देवदत्त भिक्षा मिळवितो, ही गोष्ट जेव्हां प्रसिद्धीला आली, तेव्हां भगवंतानें त्याचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

"जो भिक्षु जाणूनबुजून भिक्षुणीच्या सांगण्यावरून मिळालेलें भिक्षान्न खाईल, त्याला पाचित्तिय होतें."

त्या काळीं एक भिक्षु आपल्या नातलगांच्या घरीं गेला. पुष्कळ वर्षांनीं तो आला असल्यामुळें नातलगांनीं त्याच्यासाठीं चांगलें जेवण तयार केलें. त्या कुटुंबांत येणारीजाणारी भिक्षुणी म्हणाली, "ठीक ! ह्या आर्याला तुम्ही जेवण द्या." त्या भिक्षूला भिक्षुणीच्या सांगण्यावरून आपणाला हें जेवण मिळत आहे अशी शंका आली, व त्यानें तें अन्न ग्रहण केलें नाहीं. त्या दिवशीं भिक्षाटनाची वेळहि निघून गेल्यामुळें त्याला उपवास करावा लागला. ही गोष्ट समजल्यावर भगवान् भिक्षूंना म्हणाला, "गृहस्थांनीं तयारी केली असतां भिक्षुणीच्या सांगण्यावरून अन्न मिळालें तरी तें स्वीकारण्यास मी परवानगी देतों." आणि त्यानें वरील नियमांत फेरफार केला तो असाः—

**जो जाणूनबुजून-पूर्वींच गृहस्थाची तयारी असल्याशिवाय—भिक्षुणीच्या सांगण्यावरून मिळालेलें भिक्षान्न खाईल, त्याला पाचित्तिय होतें ॥ २९ ॥**

७९. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं आयुष्मान् उदायीची गृहस्थाश्रमांतील बायको भिक्षुणी झाली

होती. उदायी एके दिवशीं एकटाच तिच्याशीं गोष्टी बोलत बसला. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं. आणि भगवंतानें उदायीचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:--

**जो भिक्षु एकट्या भिक्षुणीबरोबर एकान्तांत बसेल, त्याला पाचित्तिय होतें ॥ ३० ॥**

८०. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं श्रावस्तीपासून कांहीं अंतरावर एका पूगानें श्रमणांना भिक्षान्न देण्याचा परिपाठ सुरू ठेवला होता (त्याला आवसथपिंड असें म्हणत). षड्वर्गीय भिक्षु श्रावस्तींत भिक्षाटनाला गेले असतां तेथें त्यांना कांहीं मिळालें नाहीं. तेव्हां ते त्या पूगाच्या आवसथाकडे गेले. त्यांचा तेथें चांगला मान ठेवण्यांत आला. तेव्हां षड्वर्गीय भिक्षु नित्य तेथेंच जेवावयाला जाऊं लागले. पुढें त्यांनीं असा विचार केला कीं, आरामांत जाऊन तरी काय करावयाचें? पुन्हां दुसरे दिवशीं येथें यावयाचेंच आहे. तेव्हां आपण वस्तीला येथेंच राहूं. ह्याप्रमाणें विचार करून ते तेथेंच राहिले. त्यांना पाहून दुसऱ्या पंथांचे श्रमण तिकडे येत नसत. लोक म्हणाले, "हे शाक्यपुत्रीय श्रमण येथेंच बिऱ्हाड ठोकून आवसथपिंड खात रहातात हें कसें? आवसथपिंड केवळ ह्यांच्यासाठीं नसून सर्वपंथांच्या श्रमणासाठीं आहे." ही गोष्ट अनुक्रमें भगवंताला समजली. त्यानें षड्वर्गीयांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:--

"एकच दिवस आवसथपिंड ग्रहण करावा. त्यापेक्षां जास्त दिवस ग्रहण करील, त्याला पाचित्तिय होतें."

त्या काळीं आयुष्मान् सारिपुत्त कोशल देशांत प्रवास करीत असतां एका आवसथांत आला. पुष्कळ काळानें स्थविर आला आहे असें म्हणून तेथल्या लोकांनीं त्याचा फार आदर केला. त्याच दिवशीं संध्याकाळीं तो आजारी पडला, व त्या आवसथांतून दुसऱ्या ठिकाणीं जाऊं शकला नाहीं. दुसऱ्या दिवशीं त्याच्यासाठीं लोकांनीं जेवण केलें. परंतु भगवंतानें एक दिवसापेक्षां जास्त दिवस आवसथपिंड स्वीकारण्याची मनाई केली आहे म्हणून सारिपुत्तानें तें स्वीकारलें नाहीं. पुढें ही गोष्ट भगवंताला समजली,

तेव्हां त्यानें आजारी भिक्षूला एकाहून जास्त दिवस आवसथांत राहून भिक्षा ग्रहण करण्यास परवानगी दिली, व वरील नियमांत फेरफार केला तो असाः—

**निरोगी भिक्षूनें एकच दिवस आवसथपिंड ग्रहण करावा. त्यापेक्षां जास्त दिवस ग्रहण करील, त्याला पाचित्तिय होतें. ॥ ३१ ॥**

८१. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या काळीं लोकांकडून कांहीं मिळत नसल्यामुळें देवदत्त घरोघरीं स्वतः सांगून आपल्या साथ्यांना व आपणाला भिक्षा देण्यास लावीत असे. लोक त्यावर टीका करूं लागले; व भगवंतानें त्याचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

" गणासह[1] भिक्षा स्वीकारली असतां पाचित्तिय होतें. "

ह्या नियमांत भगवंतानें निरनिराळ्या प्रसंगीं फेरफार केला. त्याचा संग्रह खालील नियमांत केला आहे.

**प्रसंगावांचून गणासह भिक्षा स्वीकारली असतां पाचित्तिय होतें. भिक्षु आजारी असणें, चीवर करण्याची वेळ असणें, प्रवासाला जाण्याची वेळ असणें, नावेंतून प्रवास करण्याची वेळ असणें किंवा भिक्षूंचा मोठा समुदाय असणें, हा ह्या बाबतींत प्रसंग जाणावा ॥३२॥**

८२. बुद्ध भगवान् वैशाली येथें महावनांत कूटागारशालेंत रहात होता. त्या काळीं वैशालींत भिक्षूंना आमंत्रणपरंपरा होती. त्यांत एका गरीब लोहारानें सर्व भिक्षुसंघाला एके दिवशीं आपल्या घरीं आमंत्रण केलें. हा गरीब लोहार कसलें जेवण देणार म्हणून भिक्षु आगाऊच भिक्षाटन करून जेवले, व नंतर त्याच्या घरीं आले. त्या गरीब लोहाराला त्याच्या मालकानें विशेष वेतन दिल्यामुळें, व शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं चांगली मदत केल्यामुळें त्यानें भिक्षूसंघासाठीं उत्तम जेवण तयार केलें. पण जेवतेवेळीं भिक्षु थोडें थोडें खाऊं लागले. तो म्हणाला, " मी गरीब आहे असें समजून

---

१ गण म्हणजे चार किंवा त्याहून जास्त भिक्षूंचा समुदाय. अशा समुदायानें एका दिवशीं एकाच ठिकाणीं भोजन करणें योग्य नाहीं, असा ह्या नियमाचा अर्थ आहे.

तुम्हीं थोडें खाऊं नका. तुमच्यासाठीं पुष्कळ अन्न तयार केलें आहे." भिक्षु म्हणाले, "आम्ही आगाऊच भिक्षाटन करून आलों आहोंत. त्यामुळें आम्हांस जास्त खाण्याची इच्छा राहिली नाहीं. तेव्हां तो गरीब लोहार भिक्षूंवर टीका करूं लागला कीं, मीं आमंत्रण केलें असतां भिक्षु इतर ठिकाणीं भिक्षा ग्रहण करतात हें कसें ? .... ह्या प्रकरणीं भगवंतानें नियम केला तो असा:–

"परंपरेनें[1] भोजन केलें असतां पाचित्तिय होतें."

पुढें ह्या नियमांत वेळोवेळीं फरक करण्यांत आला तो असा:–

**प्रसंगावांचून परंपरेनें[1] भोजन केलें असतां पाचित्तिय होतें. आजारी असणें, चीवर करण्याची वेळ असणें, हा ह्या बाबतींत प्रसंग जाणावा ॥ ३३ ॥**

८३. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं काणमाता उपासिका फार श्रद्धाळू होती. तिची मुलगी काणा दुसऱ्या एका गांवीं दिली होती. ती आपल्या माहेरीं आली असतां नवऱ्यानें तिला आणण्यासाठीं एक मनुष्य पाठविला. तिला रिकाम्या हातानें पाठवूं नये म्हणून काणमातेनें अपूप ( वडे ) तयार केले. इतक्यांत एक भिक्षु भिक्षेसाठीं तेथें आला. त्याला तिनें कांहीं अपूप दिले. त्याने ती गोष्ट दुसऱ्या भिक्षूला, व दुसऱ्यानें तिसऱ्याला सांगितली. त्या सर्वांनीं तेथें भिक्षा घेतल्या-मुळें काणमातेनें तयार केलेले सर्व अपूप खलास झाले. अर्थात मुलीला सासरीं पाठविणें तिला तहकूब ठेवावें लागलें. पुन्हां मुलीच्या नवऱ्याकडून माणूस आला. पुन्हां भिक्षूंनीं पूर्वीं प्रमाणेंच भिक्षेला येऊन सर्व अपूप खलास केले. तिसऱ्यानदां मनुष्य आला तेव्हांहि अशीच गोष्ट घडली. बायकोला पाठवीत नाहीं म्हणून रागावून काणेच्या नवऱ्यानें दुसरें लग्न केलें. तें वर्तमान कळलें तेव्हां काणा रडूं लागली. भगवान् भिक्षेला आला असतां काणमातेनें त्याला ही गोष्ट सांगितली. भगवंतानें दोघींना धर्मोपदेश केला; व तो विहारांत परत गेला.

---

१ एकानें आमंत्रण दिलें असतां दुसऱ्या ठिकाणीं जेवून पुन्हां त्या ठिकाणीं जेवावयास जाणें ह्याला परंपरेनें भोजन करणें म्हणतात.

त्याच वेळीं दुसरी अशी एक गोष्ट घडली कीं, एक सार्थ (कारवानाचा तांडा) राजगृहाहून प्रवासाला जाण्याच्या बेतांत होता. एक भिक्षु तेथें भिक्षेला गेला असतां सार्थांपैकीं एका उपासकानें त्याला सत्तु दिला. त्यानें तें वर्तमान दुसऱ्या भिक्षूला, अशा रितीनें बऱ्याच भिक्षूंना सांगितलें; व त्या सर्वांनीं तेथेंच भिक्षा ग्रहण केल्यामुळें उपासकाचा सर्व सत्तु संपला. त्यानें सार्थांतील इतर मंडळीला तेथें राहण्यास विनंती केली, पण ते राहिले नाहींत. पुन्हां पाथेय तयार करून दुसऱ्या दिवशीं त्यांच्या मागोमाग जात असतां चोरांनीं त्या उपासकाला लुटलें. त्यामुळें लोक भिक्षूंवर टीका करूं लागले; म्हणाले कीं, हे शाक्यपुत्रीय श्रमण प्रमाण न जाणतां भिक्षा ग्रहण करतात हें कसें? पुढें ही गोष्ट भगवंताला समजली, तेव्हां त्यानें त्यांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:—

**भिक्षु एकाद्या कुटुंबांत गेला असतां त्याला अपूप किंवा मंथ[1] घेण्याची विनंती करण्यांत येईल; इच्छा असल्यास दोन तीन पात्र-भर त्या भिक्षूनें घ्यावे. त्याहून जास्त घेईल त्याला पाचित्तिय होतें. दोन तीन पात्रभर घेऊन भिक्षूंना वांटून द्यावे, हा ह्या बाबतींत शिष्टाचार जाणावा ॥ ३४ ॥**

८४. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं एका ब्राह्मणानें भिक्षूंना आमंत्रण करून जेवूं घातलें. भिक्षु त्याच्या घरीं जेऊन पुन्हां त्याच्या शेजारींपाजारीं रहाणाऱ्या आपल्या नातलगांकडे जाऊन जेवले. भिक्षु गेल्यावर ब्राह्मण शेजाऱ्यापाजाऱ्यांस आमंत्रण करावयास गेला. पण ते म्हणाले, "तूं भिक्षूंनांच धड जेवावयास घातलें नाहींस; आणि आतां आम्हांला कशाला बोलावितोस?" हें ऐकून तो ब्राह्मण भिक्षूंवर टीका करूं लागला; म्हणाला कीं, भिक्षु माझ्या घरीं जऊन पुन्हां दुसऱ्यांच्या घरीं जेवतात हें कसें? त्यांना पोटभर खाऊं घालणें मला शक्य नव्हतें कीं काय? ही गोष्ट अनुक्रमें भगवंताला समजली तेव्हां त्यान त्या भिक्षूंचा निषेध करून सर्व भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:— "जो भिक्षु जेवून तृप्त झाल्यानंतर पुन्हां जेवील किंवा खाईल, त्याला पाचित्तिय होतें."

---

१ मंथ म्हणजे प्रवासांत खाण्यासाठीं तयार केलेला पदार्थ.

त्या काळीं आजारी भिक्षूंसाठीं लोक चांगलें अन्न तयार करून पाठवीत असत. त्यांतून जें शिल्लक राही, तें बाहेर फेंकण्यांत येत असे; व तें खातांना कावळे मोठमोठ्यानें ओरडत असत. भगवंतानें आनंदापाशीं चौकशी केली असतां आनंदानें तें वर्तमान भगवंताला सांगितलें. तेव्हां ह्या प्रकरणीं भगवान् भिक्षूंना म्हणाला, "आजारी भिक्षूंचें किंवा इतर भिक्षूंचें शिल्लक राहिलेलें अन्न ग्रहण करण्यास मी परवानगी देतों." आणि त्यानें वरील नियमांत फेरफार केला तो असाः—

**जो भिक्षु जेवून तृप्त झाल्यानंतर भिक्षूंच्या शिल्लक राहिलेल्या अन्नाशिवाय इतर अन्न खाईल, त्याला पाचित्तिय होतें ॥ ३५ ॥**

८५. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं दोघे भिक्षु कोसल देशांत प्रवास करीत होते. त्यांपैकीं एक नियमाप्रमाणें वागत नसे, व दुसरा त्याला उपदेश करी. त्यामुळें पहिल्याला त्याचा राग आला. ते दोघे श्रावस्तीला आले. दुसरा भिक्षु तेथें एका पूगानें संघाला दिलेल्या भोजन प्रसंगीं जेवला. पहिल्याला ही गोष्ट माहीत होती. त्यानें त्याला आग्रह करून पुन्हां आपल्या नातलगाच्या घरीं जेवूं घातलें. आणि तो त्याला म्हणाला, "तूं मला उपदेश करीत होतास पण आज एकदां जेवून पुन्हां जेवलास!" ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं.... व भगवंतानें त्या भिक्षूचा निषेध करून सर्व भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

**जो भिक्षु दुसरा भिक्षु जेवून तृप्त झाला असतां त्याला जाणून बुजून आपत्ति लागू करण्याच्या हेतूनें भिक्षूंच्या शिल्लक राहिलेल्या अन्नाशिवाय इतर अन्न ग्रहण करण्यास आग्रह करील, म्हणेल कीं, भिक्षु, हें अन्न खा, किंवा हें जेवण जेव, त्याला—इतर भिक्षूनें तें अन्न ग्रहण केलें असतां—पाचित्तिय होतें ॥ ३६ ॥**

८६. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेणुवनांत रहात होता. त्या काळीं राजगृह येथें पर्वतावर जत्रा (गिरग्गसमज्जो) होती. सप्तदशवर्गीय भिक्षु तेथें गेले असतां लोकांनीं त्यांना स्नान वगैरे घालून जेवूं घातलें, व खाण्याचे जिन्नस देऊन परत पाठविलें. ते आरामांत येऊन षड्वर्गीयांना खाण्याचे

पदार्थ देऊं लागले. तेव्हां षड्वर्गीयांनीं ते विकालीं (मध्यान्हानंतर) खातात याबद्दल त्यांच्यावर टीका केली....व भगवंतानें नियम घालून दिला तो असाः--

**जो भिक्षु विकालीं खाईल किंवा जेवील, त्याला पाचित्तिय होतें ॥ ३७ ॥**

८७. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं आनंदाचा उपाध्याय बेलट्ठसीस अरण्यांत रहात होता. तो भिक्षाटन करून कोरडा भात आणीत असे व सुकवून ठेवीत असे; आणि जेव्हां भिक्षाटनाला जात नसे तेव्हां पाण्यानें भिजवून तो खात असे. ही गोष्ट भगवंताला समजली, तेव्हां त्यानें त्याचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः-

**जो भिक्षु खाण्याजेवण्याचे पदार्थ सांठवून खाईल किंवा जेवील त्याला पाचित्तिय होतें ॥ ३८ ॥**

८८. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु उत्तम पदार्थ मागवून खात असत. त्यांवर लोक टीका करूं लागले; व भगवंतानें नियम केला तो असाः-

"तूप, लोणी, तेल, मध, काकवी, मत्स्य, मांस, दूध आणि दहीं अशा प्रकारचे उत्तम पदार्थ जो भिक्षु आपणासाठीं मागवून खाईल, त्याला पाचित्तिय होतें."

त्या काळीं भिक्षु आजारी पडत. ते म्हणत, "पूर्वी आम्ही तूप, लोणी इत्यादि पदार्थ मागवून खात होतों; तेणेंकरून आम्हांस बरें वाटे." ही गोष्ट भगवंताला समजली तेव्हां त्यानें वरील नियमांत फेरफार केला तो असाः--

**तूप, लोणी, तेल, मध, काकवी, मांस, दूध आणि दहीं अशा प्रकारचे उत्तम पदार्थ जो निरोगी भिक्षु आपणासाठीं मागवून खाईल, त्याला पाचित्तिय होतें ॥ ३९ ॥**

८९. बुद्ध भगवान् वैशाली येथें महावनांत कूटागार शाळेंत रहात होता. त्या काळीं एक पांसुकूलिक ( चिंध्यांचीं चीवरें वापरणारा ) भिक्षु

स्मशानांत राहत होता. तो लोकांनीं दिलेलें कांहीं घेत नसे; झाडाखालीं किंवा उंबरठ्यावर लोकांनीं ठेवलेले पिंड खाऊन रहात असे. त्यावर लोक टीका करूं लागले... आणि भगवंतानें नियम केला तो असाः—

"जो भिक्षु न दिलेला आहार तोंडांत टाकील, त्याला पाचित्तिय होतें."

त्या काळीं पाणी पिण्यास व दंतकाष्ठाचा उपयोग करण्यास भिक्षूंना संकोच वाटूं लागला. तेव्हां भगवंतानें वरील नियमांत फेरफार केला तो असाः—

**जो भिक्षु पाणी आणि दंत-काष्ठ यांवांचून दुसरा न दिलेला आहार तोंडांत टाकील, त्याला पाचित्तिय होतें ॥ ४० ॥**

९०. बुद्ध भगवान् वैशाली येथें महावनांत कूटागार शाळेंत रहात होता. त्या काळी संघाला पुष्कळ खाण्याचे पदार्थ मिळाले होते. आनंदानें शिल्लक राहिलेल्या पदार्थांचें काय करावें असें भगवंताला विचारलें. तेव्हां भगवंतानें ते पदार्थ गरीब लोकांस वांटून देण्यास सांगितलें. त्यांत पुष्कळ परिव्राजिकाहि होत्या. आनंदानें प्रत्येकाला एक एक अपूप दिला. पण एका परिव्राजिकेच्या पात्रांत चुकून दोन अपूप पडले. तेव्हां इतर परिव्राजिका तिला, हा तुझा जार आहे, असें म्हणून हिणवूं लागल्या.

त्याच वेळीं दुसरी अशी एक गोष्ट घडली कीं, एक आजीवक आरामांत आला असतां एका भिक्षूनें त्याला पुष्कळ तूप घालून चांगलें अन्न दिलें. तो तें घेऊन गेला. वाटेंत दुसऱ्या आजीवकानें, हें कोठून आणलें, असा प्रश्न केला असतां तो म्हणाला, "मुंडगृहपति श्रमण गोतम ह्याच्या समाराधनेंत हें अन्न मला मिळालें." कांहीं उपासकांनीं हें त्याचें भाषण ऐकलें; व आरामांत येऊन भगवंताला नमस्कार करून ते म्हणाले, "हे तीर्थ्य (तित्थिय) बुद्ध, धर्म आणि संघ ह्यांची निंदाच करूं पहात असतात; तेव्हां अशा लोकांना आर्यांनीं (भिक्षूंनीं) आपल्या हातांनीं जेवण देऊं नये." भगवंतानें धर्मोपदेश करून त्या उपासकांना रवाना केलें; आणि ह्या प्रकरणीं भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

**जो भिक्षु अचेलक (नग्न) परिव्राजकाला किंवा परिव्राजिकेला स्वहस्तानें खाण्याचे किंवा जेवण्याचे पदार्थ देईल, त्याला पाचित्तिय होतें ॥ ४१ ॥**

९१. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं उपनंद शाक्यपुत्र आपल्या भाऊ शिष्याला म्हणाला, "चल, आपण गांवांत भिक्षाटनाला जाऊं;" व गांवांत पोहोंचल्यावर त्याला कांहीं एक न देवविता म्हणाला, "तूं येथून निघून जा. तुझ्याबरोबर बोलणें किंवा बसणें उठणें मला आवडत नाहीं. मला एकट्यालाच बरें वाटतें." त्याच्या भावाला उशीर झाल्यामुळें भिक्षा मिळाली नाहीं, व त्यानें परत येऊन ही गोष्ट भिक्षूंना सांगितली .... ह्या बाबतींत भगवंतानें भिक्षूंना नियम घालून दिला तो असा:—

**जो भिक्षु भिक्षूला म्हणेल कीं, चल आपण गांवांत किंवा शहरांत भिक्षेला जाऊं; आणि तेथें त्याला कांहीं द्यावयास लावून किंवा न द्यावयास लावून, जा, तुझ्याबरोबर बोलणें किंवा बसणें उठणें मला आवडत नाहीं, मी एकटाच असलों तर इतरांशीं बोलणें व बसणें उठणें मला आवडतें असें म्हणून त्याला परत पाठवील तर—ह्याच कारणास्तव—त्याला पाचित्तिय होतें ॥ ४२ ॥**

९२. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं उपनंद शाक्यपुत्र आपल्या मित्राच्या घरीं जाऊन त्याच्या बायकोबरोबर शयनगृहांत बसला. इतक्यांत तो मित्र तेथें आला; व त्यानें उपनंदाला भिक्षा द्यावयास लावून जाण्यास सांगितलें. पण त्याची बायको त्याला आणखी कांहीं वेळ बसण्यास आग्रह करूं लागली. तेव्हां उपनंद तेथेंच बसला. हें कृत्य त्या गृहस्थाला आवडलें नाहीं. तो उपनंदावर टीका करूं लागला.... आणि भगवंतानें ह्या बाबतींत नियम केला तो असा:—

**जो भिक्षु स्त्रीपुरुष एकत्र राहाणाऱ्या घरांत प्रवेश करून बसेल, त्याला पाचित्तिय होतें ॥ ४३ ॥**

९३. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं उपनंद शाक्यपुत्र आपल्या मित्राच्या घरीं जाऊन त्याच्या बायकोबरोबर एकान्तांत बसला. तें पाहून तो मित्र त्याच्यावर टीका करूं लागला, आणि ह्या बाबतींत भगवंतानें नियम केला तो असा:—

**जो भिक्षु स्त्रीबरोबर एकान्तांत बसेल त्याला पाचित्तिय होतें ॥ ४४ ॥**

९४. दुसऱ्या एका प्रसंगीं उपनंद असाच एकटा एकट्या स्त्रीबरोबर बसला असतां भगवंतानें नियम केला तो असाः—

**जो भिक्षु एकटा एकट्या स्त्रीबरोबर एकान्तांत बसेल त्याला पाचित्तिय होतें ॥ ४५ ॥**

९५. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या काळीं उपनंद शाक्यपुत्राच्या उपस्थायक कुटुंबांत उपनंदाला आणि इतर भिक्षूंना आमंत्रण होतें. सर्व भिक्षु येऊन आपापल्या आसनांवर बसले; व म्हणाले "विकाल होण्यापूर्वी आम्हांस जेवण दे." पण उपनंद दुसऱ्या कुटुंबांत फिरत होता. तो आल्यावांचून उपासक भिक्षूंना जेवूं घालीना. त्याला येण्यास उशीर झाला, व त्यामुळें भिक्षूंना शांतपणें जेवतां आलें नाहीं. सज्जन भिक्षूंना ही गोष्ट आवडली नाहीं.... आणि भगवंतानें नियम केला तो असाः—

"जो भिक्षु एका ठिकाणीं आमंत्रण केलें असतां जेवणापूर्वी इतर कुटुंबांत फिरत राहील, त्याला पाचित्तिय होतें."

एके दिवशीं उपनंदाच्या उपस्थायक कुटुंबांतून विहारांत कांहीं खाण्याचा पदार्थ पाठविण्यांत आला होता, व तो उपनंदाला दाखवून संघाला देण्यांत यावा असा त्या गृहस्थाचा निरोप होता. उपनंद भिक्षेसाठीं गांवांत गेला होता. तेव्हां तो परत येईपर्यंत भगवंतानें तो खाण्याचा पदार्थ तसाच ठेवावा असें सांगितलें. जेवण्यापूर्वी इतर कुटुंबांत जाण्याची मनाई केली आहे म्हणून उपनंद जेवण झाल्यावर आपल्या ओळखीच्या कुटुंबांत फिरत राहिला; व त्यामुळें आरामांत येण्यास त्यास फार उशीर झाला. जेवण्याची वेळ निघून गेल्यामुळें तो पदार्थ भिक्षूंना खातां आला नाहीं, व त्या माणसांनीं तो परत नेला. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं; आणि भगवंताला ती समजली, तेव्हां त्यानें उपनंदाचा निषेध करून वरील नियमांत फेरफार केला तो असाः—

"जो भिक्षु एका ठिकाणीं आमंत्रण केलें असतां जेवणापूर्वी किंवा जेवणानंतर इतर कुटुंबांत फिरत राहील, त्याला पाचित्तिय होतें."

पुढें एकदोन प्रसंगीं ह्या नियमांत फेरफार करण्यांत आला तो असाः—

**जो भिक्षु एका ठिकाणीं आमंत्रण केलें असतां जेवणापूर्वी किंवा जेवणानंतर प्रसंगांवाचून इतर कुटुंबांत फिरत राहील, त्याला पाचित्तिय होतें. चीवरदानाची वेळ, व चीवर करण्याची वेळ, हा ह्या बाबतींत प्रसंग जाणावा ॥ ४६ ॥**

९६. बुद्ध भगवान् शाक्य देशांत कपिलवस्तु येथें निग्रोधारामांत रहात होता. त्या काळीं महानाम शाक्याच्या घरीं तूप लोणी इत्यादि औषधी पदार्थ होते. चातुर्मासांत संघाला औषधी पुरवण्याची परवानगी द्यावी अशी त्यानें भगवंताला विनंती केली, व ह्या बाबतींत भगवंतानें चातुर्मासांत गृहस्थानें औषधें देण्याची व्यवस्था केली असतां ती स्वीकारण्यास भिक्षूंना परवानगी दिली. परंतु भिक्षु महानाम शाक्यापाशीं थोडक्या प्रमाणांतच हे पदार्थ मागत असत. तेव्हां महानामानें आणखीहि मागून घ्यावे अशी विनंती केली. तरी भिक्षु अल्पप्रमाणांतच ते पदार्थ घेत असत. तेव्हां महानाम भगवंताला म्हणाला, "मी आमरण भिक्षुसंघाला औषधी पदार्थ देऊं इच्छितों." तीहि गोष्ट भगवंतानें कबूल केली.

त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु नेसण्या पांघरण्यांत व्यवस्थितपणानें वागत नसत. त्यांना पाहून महानाम म्हणाला, "अशा रितीनें अव्यवस्थितपणें तुम्ही कां वागतां" ह्या त्याच्या बोलण्यामुळें षड्वर्गीय भिक्षूंना त्याचा राग आला; व सूड उगविण्याच्या उद्देशानें ते त्याजवळ जाऊन औषधासाठीं एकदम एक द्रोण[1] तूप मागूं लागले. महानामानें त्यांस एक दिवस रहाण्यास सांगितलें; तेव्हां ते म्हणाले, "तुझ्या विनंतीचा उपयोग काय झाला? औषधी पदार्थ देण्याची तुझी इच्छा नसून तूं संघाला विनंती करतोस हें कसें?" हें त्यांचें भाषण ऐकून महानाम त्यांजवर टीका करूं लागला; व ही गोष्ट भगवंताला समजली, तेव्हां त्यानें भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

**निरोगी भिक्षूनें चातुर्मासांत औषधें घेण्याची विनंती स्वीकारावी; दुसऱ्यांदा केलेली विनंतीहि स्वीकारावी; आणि सदोदित औषधें**

---

१. चार कुडव (एक मूठभर माप) म्हणजे एक प्रस्थ, चार प्रस्थ म्हणजे एक आढक, आणि चार आढक म्हणजे एक द्रोण.

**घेण्याची विनंतीहि स्वीकारावी. पण औषधें मागण्यांत जो अतिरेक करील त्याला पाचित्तिय होतें ॥ ४७ ॥**

९७. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं पसेनदि कोसल सैन्यासह कूच करीत होता. षड्वर्गीय भिक्षु फौजेचा कूच पहाण्यासाठीं गेले. त्यांना पाहून पसेनदि राजा म्हणाला, "तुम्ही येथें कां आलां?" ते म्हणाले, "आम्ही महाराजांच्या दर्शनासाठीं आलों." राजा म्हणाला, "युद्धांत आनंद मानणाऱ्या मला पाहून तुम्हांला कोणता फायदा होणार? भगवंताला पहाणें तुम्हांला योग्य नाहीं काय?" षड्वर्गीयांच्या ह्या कृत्यावर लोक टीका करूं लागले... आणि भगवंतानें ह्या बाबतींत नियम केला तो असाः—

"जो भिक्षु सैन्य कूच करीत असतां तें पाहण्यासाठीं जाईल त्याला पाचित्तिय होतें."

त्या काळीं एका भिक्षूचा मामा सैन्यांत आजारी होता. त्यानें त्या भिक्षूनें आपणांस येऊन भेटावें असा निरोप पाठविला. ही गोष्ट त्या भिक्षूनें भगवंताला कळविली, व भगवंतानें ह्या प्रसंगीं तशाच कारणास्तव सैन्यांत जाण्यास परवानगी दिली, आणि वरील नियमांत फेरफार केला तो असाः—

**जो भिक्षु सैन्य कूच करीत असतां तशाच कारणावांचून तें पाहण्यासाठीं जाईल त्याला पाचित्तिय होतें ॥ ४८ ॥**

९८. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु कांहीं कारणास्तव सैन्यांत जात, व तीन दिवसांपेक्षां जास्त दिवस रहात. लोक त्यांवर टीका करूं लागले .... आणि भगवंतानें नियम केला तो असाः—

**भिक्षूला कांहीं कारणास्तव सैन्यांत जाण्याचा प्रसंग आला असतां त्यानें दोन तीन दिवस सैन्यांत राहावें. त्यापेक्षां जास्त दिवस राहील, त्याला पाचित्तिय होतें ॥ ४९ ॥**

९९. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्याकाळीं षड्वर्गीय भिक्षु दोन तीन दिवस सैन्यांत राहिले असतां निशाण मारण्याच्या जागीं, सैन्याची गणती करण्याच्या जागीं, व्यूह रचण्याच्या जागीं आणि अनीक ( पथक ) तयार करण्याच्या जागीं जात असत. त्यापैकीं

एका भिक्षूला निशाण मारण्याच्या जागीं गेला असतां बाण लागला. लोक त्याची थट्टा करूं लागले; म्हणाले कीं, भदंत युद्ध चांगलें झालें काय ? तुम्ही किती निशाणें मारलीं ? तो भिक्षु फार लाजला, व पुढें ही गोष्ट भगवंताला समजलीं तेव्हां त्यानें षड्वर्गीयांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः–

**दोन तीन दिवस सैन्यांत राहिला असतां जो भिक्षु निशाण मारण्याच्या जागीं, सैन्य गणण्याच्या जागीं, व्यूह रचण्याच्या जागीं किंवा अनीक तयार करण्याच्या जागीं जाईल त्याला पाचित्तिय होतें ॥ ५० ॥**

१०० बुद्ध भगवान् चेतिय देशांत प्रवास करीत असतां भद्दवतिका नांवाच्या गांवाकडे जात होता. वाटेंत गवळी व शेतकरी त्याला म्हणाले, "भदंत, भद्दवतिकेजवळ आपण आम्रतीर्थ येथें जाऊं नका. कारण तेथें जटिलाच्या आश्रमांत एक भयंकर ऋद्धिमान् विषारी नाग रहात आहे." पण त्यांचें कांहीं न ऐकतां भगवान् भद्दवतिका गांवीं गेला. भगवंताच्या संघांपैकीं एक सागत नांवाचा भिक्षु त्या जटिलाच्या आश्रमांत जाऊन त्याच्या अग्निशाळेंत गवताचें आसन तयार करून आसनमांडी ठोकून मोठ्या सावधपणें त्यावर बसला. त्याला पाहून तो नाग रागावला, व त्यानें धूर सोडण्यास आरंभ केला. सागतानेंहि आपल्या सिद्धीच्या बळानें धूर सोडला. त्या नागाला तें असह्य होऊन त्यानें आग सोडली. सागतानेंहि आग सोडली, आणि आपल्या सिद्धिबळानें त्या नागाचें तेज हरण केलें. भगवान् कांहीं काळ भद्दवतिका येथें राहून प्रवास करीत कोशांबीला आला. सागतहि त्याच्याबरोबर होता. आम्रतीर्थांत रहाणाऱ्या नागाबरोबर युद्ध करून सागतानें त्याचा पराजय केला हें वर्तमान कौशांबी येथें आगाऊच फैलावलें होतें. तेथील उपासक भगवंताचें स्वागत करण्यासाठीं आले; व त्या प्रसंगीं सागताला म्हणाले, "भदंत, भिक्षूंसाठीं आम्हीं काय द्यावें ?" त्यावर षड्वर्गीय भिक्षु म्हणाले, "कापोतिक नांवाची शुद्ध दारू भिक्षूंना दुर्मिळ आहे. ती तुम्ही तयार करा." तेव्हां त्या उपासकांनीं आपापल्या घरीं कापोतिक शुद्ध दारू तयार करून सागत भिक्षेला आला असतां त्याला ती यथेच्छ पाजली. तो ती पिऊन धुंद झाला, व नगरद्वारांत येऊन पडला.

भगवंतानें कांहीं भिक्षूंसह नगरांतून आरामांत येतांना त्याला पाहिलें, व भिक्षूंकडून त्याला उचलवून आरामांत नेलें. भिक्षूंनीं त्याला आरामांत नेऊन भगवंताच्या पायांच्या बाजूला त्याचें डोकें करून जमिनीवर निजविलें; पण तो दारूच्या धुंदींत उठून भगवंताच्या बाजूला पाय करून निजला. तेव्हां भगवान् म्हणाला, "भिक्षुहो, हा सागत भिक्षु पूर्वीं तथागताविषयीं आदर बाळगीत नव्हता काय?" "होय भदंत," भिक्षूंनीं उत्तर दिलें. "पण आतां तथागताचा आदर ठेवीत आहे काय?" "नाहीं, भदंत" "भिक्षुहो, ह्याच सागतानें आम्रतीर्थक नागाचा पराजय केला नाहीं काय?" "होय, भदंत". "पण आतां तो नागाबरोबर लढूं शकेल काय?" "नाहीं, भदंत.". "भिक्षुहो, जेणेंकरून मनुष्य निश्चेष्टित होईल असें पेय पिणें योग्य आहे काय?" "नाहीं, भदंत". ह्याप्रमाणें सागताचा निषेध करून भगवंतानें भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

**सुरामेरेय[1]पान केलें असतां पाचित्तिय होतें ॥ ५१ ॥**

१०१. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षूंनीं सप्तदशवर्गीयांपैकीं एका भिक्षूला गुदगुल्या करून हंसविलें. हंसतां हंसतां श्वासोच्छ्वास कोंडून तो मरण पावला. सज्जन भिक्षूंना ही गोष्ट आवडली नाहीं......व ह्या बाबतींत भगवंतानें नियम केला तो असाः—

**गुदगुल्या केल्या असतां पाचित्तिय होतें ॥ ५२ ॥**

१०२. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं सप्तदशवर्गीय भिक्षु अचिरवती नदींत जलक्रीडा करीत असत. पसेनदि राजा मल्लिका राणीसह आपल्या प्रासादाच्या गच्चीवर बसला असतां त्यांना पाहून राणीला म्हणाला, "हे पहा अर्हन्त जलक्रीडा करीत आहेत!" मल्लिकाराणी म्हणाली, "एक तर भगवंतानें ह्या बाबतींत नियम केला नसावा किंवा हे भिक्षु अनभिज्ञ तरी असावे." आपण स्वतः न सांगतां हे भिक्षु जलक्रीडा करीत आहेत हे भगवंताला समजून यावें अशी एक युक्ती पसेनदि कोसल राजानें योजिली. त्या भिक्षूंना बोलावून त्यांजवळ

---

१. मेरय एक प्रकारची दारू. सुरा आणि मेरय ह्या दोन शब्दांत सर्व मादक पदार्थांचा समावेश करण्यांत येतो.

एक गुळाची ढेंप दिली, व ती भगवंताला देण्यास सांगितलें. त्यांनीं ती नेऊन भगवंताला दिली; व ती पसेनदि राजानें दिली आहे असें सांगितलें. राजानें तुम्हांस कोठें पाहिलें असा भगवंतानें प्रश्न केला. आम्ही अचिरवती नदींत जलक्रीडा करीत होतों, तेथें राजानें आम्हांस पाहिलें असें त्यांनीं उत्तर दिलें. भगवंतानें त्यांचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

**जलक्रीडा केली असतां पाचित्तिय होतें ॥ ५३ ॥**

१०३. बुद्ध भगवान् कौशांबी येथें घोषितारामांत रहात होता. त्या काळीं छन्न भिक्षु व्यवस्थितपणें वागत नसे. त्याला भिक्षु, हें करणें योग्य नाहीं, तें करणें योग्य असें शिकवीत. पण तो हट्टानें तसाच वागे. सज्जन भिक्षूंना ही गोष्ट आवडली नाहीं....आणि भगवंतानें नियम घालून दिला तो असाः—

**अनादर केला असतां पाचित्तिय होतें ॥ ५४ ॥**

१०४. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु सप्तदशवर्गीय भिक्षूंना भिववीत असत. ते घाबरून रडत असत. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं.....आणि भगवंतानें नियम घालून दिला तो असाः—

**जो भिक्षु भिक्षूला भिववील त्याला पाचित्तिय होतें ॥ ५५ ॥**

१०५. बुद्ध भगवान् भग्ग देशांत सुंसुमार येथें भेसकळा वनांत रहात होता. त्या काळीं भिक्षु हिंवाळ्यांत आगटी पेटवून त्यांत एक मोठें लांकूड टाकून जवळपास शेकत बसले. त्या लांकडाच्या पोकळींत एक मोठा कृष्ण सर्प होता. तो बाहेर पडला व भिक्षूंच्या मागें लागला. भिक्षु इतस्ततः पळूं लागले. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं....आणि भगवंतानें नियम केला तो असाः—

"जो भिक्षु शेकण्याच्या उद्देशानें आग पेटवील किंवा पेटवावयास लावील त्याला पाचित्तिय होतें."

ह्या नियमांत दोन प्रसंगीं फेरफार करण्यांत आला तो असाः—

**जो भिक्षु तशाच कारणांवांचून शेकण्याच्या उद्देशानें आग पेटवील किंवा पेटवावयास लावील, त्याला पाचित्तिय होतें ॥ ५६ ॥**

भिक्षु आजारी असला तर, दिवा पेटवावयाचा असला तर, अग्नि-शाळेंत आग तयार करवावयाची असली तर, अशा कारणास्तव आग पेटविणें किंवा आग पेटवावयास लावणें योग्य आहे. त्यामुळें आपत्ति होत नाहीं.

१०६. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या काळीं भिक्षु तपोदांत[1] स्नान करीत असत. एके दिवशीं भिक्षूंच्या स्नानाच्या वेळीं बिंबिसार राजा तेथें आला. पण भिक्षु स्नान करीत असल्यामुळें त्याला स्नान करण्यास बराच वेळ थांबावें लागलें. शेवटीं संध्याकाळीं फार उशीरां त्यानें स्नान केलें, व शहराचे दरवाजे बंद झाल्यामुळें रात्र नगरा-बाहेर घालवून सकाळीं तो भगवान् होता तेथें आला. भगवंतानें इतक्या सकाळीं येण्याचें कारण विचारलें असतां राजानें घडलेली गोष्ट त्याला सांगितली. भगवंतानें त्याला धर्मोपदेश केला; आणि तो तेथून निघून गेला. नंतर ह्या प्रकरणीं भगवंतानें भिक्षूंना गोळा करून वारंवार स्नान करणाऱ्या भिक्षूंचा निषेध केला, आणि नियम घालून दिला तो असा:—

"जो भिक्षु एकदां स्नान केल्यानंतर पंधरा दिवसांच्या आंत दुसऱ्यांदा स्नान करील, त्याला पाचित्तिय होतें."

ह्या नियमांत वेळोवेळीं फेरफार करण्यांत आला तो असा:—

**जो भिक्षु एकदां स्नान केल्यानंतर पंधरा दिवसांच्या आंत प्रसंगावांचून दुसऱ्यांदा स्नान करील, त्याला पाचित्तिय होतें. उन्हाळ्याचा शेवटचा दीड महिना व पावसाळ्याचा पहिला महिना मिळून अडीच महिने उष्णकाळ, आजारी असणें, मेहनत केल्यानंतर, प्रवासांत असणें, वातवृष्टींत सांपडणें, हा ह्या बाबतींत प्रसंग जाणावा ॥ ५७ ॥**

१०७. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या वेळीं कांहीं भिक्षु व परिव्राजक साकेताहून श्रावस्तीला येत होते. वाटेंत त्यांचीं चीवरें चोरांनीं हिरावून घेतलीं. राजाच्या योद्ध्यांनीं त्या चोरांना

---

१. ऊन पाण्याचा झरा. हा अद्यापि आहे, व ह्या झऱ्याच्या कुंडांत स्नान करण्यासाठीं आसपासच्या गांवचे पुष्कळ लोक यतात.

पकडलें, व भिक्षूंना आपलीं चीवरें ओळखून घेण्यास सांगितलें. परंतु तीं परिव्राजकांच्या वस्त्रांत मिसळलीं असल्यामुळें त्यांना ओळखतां येईनात. तेव्हां ते राजाचे शिपाई भिक्षूंवर टीका करूं लागले.... आणि भगवंतानें नियम केला तो असाः—

**नवीन चीवर मिळालें असतां त्यावर भिक्षूनें निळा रंग, चिखल किंवा काळा रंग ह्यापैकीं एकानें चिन्ह करावें. ह्या तिहींपैकीं एकानें चिन्ह न करतां नवीन चीवर वापरील, त्याला पाचित्तिय होतें ॥५८॥**

१०८. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं उपनंद शाक्यपुत्र आपल्या भावाला चीवर दिलें आहे असें म्हणून त्याच्या संमतीवांचूनच तें वापरीत होता. ती गोष्ट त्याच्या भावानेंच भिक्षूंस सांगितली.... आणि भगवंतानें नियम केला तो असाः—

**जो भिक्षु भिक्षूला, भिक्षुणीला, शिकणाऱ्या स्त्रीला, श्रामणेराला किंवा श्रामणेरीला चीवर दिलें आहे, असें म्हणून दिलेल्या व्यक्तीच्या परवानगीवांचून तें वापरील, त्याला पाचित्तिय होतें ॥ ५९ ॥**

१०९. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं सप्तदशवर्गीय भिक्षूंच्या वस्तू व्यवस्थितपणें ठेवलेल्या नसत; षड्-वर्गीय भिक्षु त्या लपवून ठेवीत. सप्तदशवर्गीय रडत असत. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं....आणि भगवंतानें नियम केला तो असाः—

**जो भिक्षु भिक्षूचें पात्र, चीवर, आसन, सुईची डबी किंवा कंबरपट्टा लपवील किंवा लपवावयास लावील, त्याला पाचित्तिय होतें ॥ ६० ॥**

११०. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. आयुष्मान् उदायी बाण मारण्यांत पटाईत असे. त्याला कावळे आवडत नसत. त्यानें कावळ्यांना मारून त्यांचीं डोकीं एकावर एक अशीं सुळावर चढवून ठेविलीं. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं... व भगवंतानें उदायीचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

**जो भिक्षु जाणूनबुजून प्राण्याला ठार मारील त्याला पाचित्तिय होतें ॥ ६१ ॥**

१११. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु जाणूनबुजून प्राणी असलेले पाणी वापरीत असत. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं... व भगवंतानें नियम केला तो असा:—

**जो भिक्षु जाणूनबुजून प्राणी असलेलें पाणी वापरील त्याला पाचित्तिय होतें ॥ ६२ ॥**

११२. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु नियमाप्रमाणें निकालांत काढलेला खटला पुन्हां उपस्थित करीत असत; म्हणत कीं, ह्या खटल्याचा निकाल बरोबर झाला नाहीं; त्याचा पुन्हां निकाल करावयास पाहिजे. सज्जन भिक्षूंना ही गोष्ट आवडली नाहीं.... आणि भगवंतानें नियम केला तो असा:—

**जो भिक्षु निकालांत काढलेला खटला जाणूनबुजून पुन्हां उपस्थित करील त्याला पाचित्तिय होतें ॥ ६३ ॥**

११३. बुद्ध भगवान् श्रावस्तीं येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं उपनंद शाक्यपुत्राला चेतनायुक्त वीर्यपाताची आपत्ति घडली; व त्यानें ही गोष्ट आपल्या भाऊ भिक्षूला कळवून गुप्त राखण्यास सांगितलें. पुढें ती गोष्ट उघडकीस आली ... आणि भगवंतानें नियम केला तो असा :—

**जो भिक्षु दुसऱ्या भिक्षूची संघादिशेषासारखी आपत्ति माहीत असतां जाणूनबुजून गुप्त ठेवतो, त्याला पाचित्तिय होतें ॥ ६४ ॥**

११४. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या काळीं सप्तदशवर्गीय तरुण मुलांत उपाली प्रमुख होता. उपालीच्या आईबापांस अशी काळजी पडली कीं, आपल्या पश्चात् श्रम न करतां उपाली सुखानें कसा राहील ? त्यांच्या मनांत त्याला लिहिण्यास शिकवावें असा विचार आला. पण त्या योगें उपालीचीं बोटें दुखण्याचा संभव होता. हिशोब ठेवण्यास शिकवावें, तर विचार करतां करतां त्याच्या छातींत दुखेल अशी भीति पडली. सराफी शिकवावी तर खरीं खोटीं नाणीं ताडतां ताडतां त्याचे डोळे दुखतील असें त्यांस वाटलें. शेवटीं शाक्यपुत्रीय भिक्षुसंघात त्याला प्रविष्ट केलें तर तो सुखानें राहील अशी त्यांची कल्पना झाली. आणि ह्यासंबंधीं

त्यांच्या आपसांत गोष्टी चालल्या. त्यांचें बोलणें उपालीनें ऐकलें, आणि आपल्या साथ्यांना तो म्हणाला, "चला, आपण शाक्यपुत्रीय संघांत जाऊं. "त्या सर्वांना ही गोष्ट पसंत पडली, व सर्वजणांनीं आपआपल्या आई-बापांची परवानगी घेऊन भिक्षूंजवळ जाऊन प्रव्रज्या घेतली. भिक्षूंच्या नियमाप्रमाणें दुपारचे बारा वाजल्यानंतर त्यांस जेवावयास मिळत नसे; आणि रात्रीं आपणाला कांहीं तरी खावयास द्या असें म्हणून ते रडत असत. भिक्षु त्यांचें सांतवन करण्याचा प्रयत्न करीत; पण ते ऐकत नसत. पहांटेला त्यांचें रडणें ऐकून भगवंतानें आनंदापाशीं त्यासंबंधीं चौकशी केली; व जेव्हां ही गोष्ट समजली तेव्हां अशा लहान मुलांना ज्यांनीं भिक्षुसंघांत घेतलें त्यांचा निषेध करून त्यानें नियम घालून दिला तो असा:—

**जो भिक्षु जाणूनबुजून वीस वर्षांपेक्षां कमी वयाच्या व्यक्तीला उपसंपदा देईल— ती व्यक्ति अनुपसंपन्न समजावी, व त्या वेळीं हजर असलेले भिक्षु निंद्य समजावे-- त्याला पाचित्तिय होतें ॥६५॥**

११५. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं एक सार्थ ( कारवानांचा तांडा ) राजगृहाहून पश्चिमेकडे जात होता. एक भिक्षु त्यांच्या बरोबर जाण्यास निघाला. ते राजाचा कर न देतां पळून जात होते. त्यांना वाटेंत राजपुरुषांनीं पकडलें व ते ह्या भिक्षूला म्हणाले, "तूं ह्या चोरांच्या तांड्याबरोबर कां जातोस ?" पुढें ही गोष्ट जेव्हां भगवंताला समजली तेव्हां त्यानें त्या भिक्षूचा निषेध करून नियम केला तो असा:--

**जो भिक्षु जाणूनबुजून बेत ठरवून चोरांच्या तांड्याबरोबर— एका गांवांतून दुसऱ्या गांवांत देखील— प्रवास करील त्याला पाचित्तिय होतें ॥ ६६ ॥**

११६. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं एक भिक्षु कोसल देशांतून प्रवास करीत असतां एका गांवाच्या वेशीवरून चालला होता. त्या गांवांतील एक बाई नवऱ्याशीं भांडण करून त्याच रस्त्यानें जात होती. तिनें भिक्षूबरोबर जाण्यास परवानगी मागितली, व भिक्षूनें, खुशाल चल, असें सांगितलें. लागोपाठ तिचा नवरा येत होता. हा भिक्षु आपल्या बायकोला पळवून नेत आहे असें वाटून त्यानें त्याला

यथास्थित चोप दिला. तेव्हां ती स्त्री त्याला म्हणाली, "ह्या भिक्षूला तूं कां मारतोस? त्याचा ह्यांत कांहींच अपराध नाहीं. तूं त्याची क्षमा माग." त्याप्रमाणें तिच्या नवऱ्यानें त्याची क्षमा मागितली. पुढें श्रावस्तीला जाऊन त्या भिक्षूनें ही गोष्ट इतर भिक्षूंना सांगितली ... आणि भगवंतानें नियम केला तो असाः—

**जो भिक्षु बेत करून स्त्रीबरोबर— एका गांवाहून दुसऱ्या गांवांत देखील— प्रवास करील त्याला पाचित्तिय होतें ॥ ६७ ॥**

११७. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं अरिष्ट भिक्षूला अशी पापकारक दृष्टि उत्पन्न झाली होती कीं, भगवंतानें उपदेशिलेल्या धर्माचा विचार केला असतां ज्या अंतरायकर गोष्टी भगवंतानें सांगितलेल्या आहेत त्यांचा उपभोग घेणाऱ्याला त्या अंतरायकारक होणार नाहींत. हें त्याचें मत कांहीं भिक्षूंना समजलें, व त्यांनीं त्याला त्यापासून परावृत्त करण्याची पुष्कळ खटपट केली. ते म्हणाले, "आयुष्मान् अरिष्ट, तूं भगवंतावर खोटा आळ आणूं नकोस. चैनीच्या पदार्थांचा उपभोग घेतला असतां मोक्षमार्गांत अंतराय घडतो असें भगवंतानें वारंवार प्रतिपादिलें आहे." तरी अरिष्ट आपल्या पापकारक दृष्टीपासून निवृत्त होईना; आणि ही गोष्ट भगवंताला समजली, तेव्हां त्यानें अरिष्टाचा निषेध करून भिक्षूंना नियम घालून दिला तो असाः—

**भगवंतानें उपदेशिलेल्या धर्माचा अर्थ मी असा समजतों कीं, जे अंतरायकारक धर्म ( कामोपभोग ) भगवंतानें सांगितले आहेत ते सेवन करणाऱ्याला त्यांजपासून अंतराय होणार नाहीं, असें जो भिक्षू म्हणेल त्याला भिक्षूंनीं म्हणावें, "आयुष्मान् तूं असें म्हणूं नकोस. भगवंतावर आळ आणूं नकोस. भगवंतावर आळ आणणें चांगलें नाहीं. भगवान् (तूं म्हणतोस) असें कधींहि बोलणार नाहीं. भगवंतानें अनेक रितीनें अंतरायकर धर्म ( कामोपभोग ) अंतरायकारक आहेत आणि ते सेवन केल्यास अंतराय घडेल असें सांगितलें आहे." असें भिक्षूंनीं सांगितलें असतां जर तो भिक्षु तसाच हट्ट धरून बसेल, तर ती दृष्टि सोडण्यासाठीं भिक्षूंनीं त्याची तीनदां समजूत घालावी. तीनदां समजूत घातली असतां ती दृष्टि तो सोडील तर चांगलें; जर सोडली नाहीं, तर त्याला पाचित्तिय होतें ॥ ६८ ॥**

११८. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं अरिष्टानें आपली पापदृष्टि सोडून प्रायश्चित्त केलें नव्हतें. असें असतां षड्वर्गीय भिक्षु त्याच्या बरोबर जेवीत, रहात व एके ठिकाणीं निजत. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं...आणि भगवंतानें नियम केला तो असा:—

**जो भिक्षु, ज्यानें पापदृष्टि सोडून प्रायश्चित्त घेतलें नाहीं अशा दुसऱ्या भिक्षूबरोबर जेवील, राहील किंवा एके ठिकाणीं निजेल, त्याला पाचित्तिय होतें ॥ ६९ ॥**

११९. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं अरिष्टाप्रमाणेंच खंडक नांवाच्या श्रामणेराला पापदृष्टि उत्पन्न झाली होती. त्याला भगवंतानें भिक्षुसंघांतून घालवून देण्यास सांगितलें. तरी षड्वर्गीय भिक्षु त्याच्याशीं संबंध ठेवीत असत. तेव्हां त्यांचा निषेध करून भगवंतानें नियम केला तो असा:—

**भगवंतानें उपदेशिलेल्या धर्माचा अर्थ मी असा समजतों कीं, जे अंतरायकारक धर्म (कामोपभोग) भगवंतानें सांगितलेले आहेत, ते सेवन करणाऱ्याला त्यांजपासून अंतराय होणार नाहीं असें जो श्रामणेरहि म्हणेल, त्याला भिक्षूंनी म्हणावें, "आयुष्मान् श्रामणेर, तूं असें म्हणूं नकोस. भगवंतावर आळ आणूं नकोस. भगवंतावर आळ आणणें चांगलें नाहीं. भगवान् (तूं म्हणतोस) असें कधींहि बोलणार नाहीं. भगवंतानें अनेक रितीनें अंतरायकर धर्म (कामोपभोग) अंतरायकारक आहेत, आणि ते सेवन केल्यास अंतराय घडेल, असें सांगितलें आहे." असें भिक्षूंनीं सांगितलें असतां तो श्रामणेर तसाच हट्ट धरून बसेल, तर त्याला भिक्षूंनीं म्हणावें, "आजपासून आयुष्मान् श्रामणेर, त्या भगवंताला तूं आपला शास्ता (गुरु) म्हणूं नकोस. दुसरे श्रामणेर भिक्षूंबरोबर दोन तीन दिवस एके ठिकाणीं निजूं शकतात तेंहि तुला शक्य नाहीं. जा; तुझें वाटेल तें होऊं द्या." जो भिक्षु अशा रितीनें घालवून दिलेल्या श्रामणेराशीं जाणूनबुजून सलोखा करील, त्याच्याकडून आपली सेवा करवील, त्याच्याबरोबर जेवील किंवा एके ठिकाणीं निजेल, त्याला पाचित्तिय होतें ॥ ७० ॥**

१२०. बुद्ध भगवान् कौशांबी येथें घोषितारामांत रहात होता. त्या काळीं छन्न भिक्षु अव्यवस्थितपणें वागे, आणि, भिक्षूनें असें वागणें योग्य नाहीं, असें म्हटल्यास म्हणे कीं, चांगल्या हुशार भिक्षूला विचारल्याशिवाय तुमचें म्हणणें मी स्वीकारणार नाहीं. सज्जन भिक्षूंना ही गोष्ट आवडली नाहीं...आणि भगवंतानें नियम केला तो असाः–

**जो भिक्षु भिक्षूंनीं नियमाची आठवण करून दिली असतां म्हणेल, "जोंपर्यंत दुसऱ्या हुशार, विनयधर भिक्षूला मी विचारून खात्री करून घेतली नाहीं तोंपर्यंत मी ह्या शिक्षापदाप्रमाणें (नियमाप्रमाणें) वागणार नाहीं," त्याला पाचित्तिय होतें. शिकणाऱ्या भिक्षूनें नियम समजून घ्यावे, त्यासंबंधीं इतरांस विचारावें, प्रश्न करावे, हा ह्या बाबतींत शिष्टाचार समजावा ॥ ७१ ॥**

१२१. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं भगवान् भिक्षूंना अनेक रितीनें विनयकथा सांगत होता, विनयाचे गुण वर्णीत होता; आणि उपालीचे गुण वर्णीत होता. भगवान् उपालीची स्तुति करीत आहे, म्हणून भिक्षु त्याजपाशीं जाऊन विनय शिकत. परंतु षड्वर्गीयांना ही गोष्ट आवडली नाहीं. सगळे भिक्षु विनयांत कुशल झाले, तर आपणाला वारंवार दोष लावतील असें त्यांस वाटलें; आणि तेव्हांपासून ते विनयाची निंदा करूं लागले; म्हणाले कीं, हे लहानसहान नियम म्हणत बसण्यांत काय अर्थ आहे? ह्यापासून शंका आणि त्रास होतो. ही गोष्ट सज्जन भिक्षूंना आवडली नाहीं... आणि भगवंतानें नियम केला तो असाः—

**प्रातिमोक्ष म्हणत असतां जो भिक्षु म्हणेल, "हीं लहानसहान शिक्षापदें (नियम) म्हणण्यांत काय अर्थ ? त्यांच्यापासून संशय, त्रास आणि मनाची रुखरुख मात्र उत्पन्न होते." (अशा रितीनें) शिक्षापदांची निंदा केली असतां पाचित्तिय होतें ॥ ७२ ॥**

१२२. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या वेळीं षड्वर्गीय भिक्षु नियमांचा भंग करून प्रातिमोक्ष म्हटला जात असतां म्हणत असत कीं, ह्या नियमाचा प्रातिमोक्षांत समावेश होतो, हें

आम्हास आतांच समजलें.... त्यांचा निषेध करून भगवंतानें नियम घालून दिला तो असा:—

जो भिक्षु दर पंधरवड्याला प्रातिमोक्ष म्हटला जात असतां म्हणेल, "ह्या नियमाचा समावेश प्रातिमोक्षांत होतो, व दर पंधरवड्याला तो म्हटला जातो, हें मला आतांच समजलें." परंतु तो भिक्षु दोनतीनदां किंवा त्याहीपेक्षां जास्ती वेळां प्रातिमोक्ष म्हणण्याच्या समयीं हजर होता, असें जर बऱ्याच भिक्षूंना माहीत असेल, तर केवळ अजाणपणामुळें तो भिक्षु त्या आपत्तीपासून मुक्त होत नाहीं. तिचें प्रायश्चित्त त्यानें केलें पाहिजे. आणखी त्याच्यावर जडतेचाहि (मोहाचाहि) आरोप लागू करावा:— आयुष्मन्, प्रातिमोक्ष म्हटला जात असतां तूं सावधपणें त्याजकडे लक्ष देत नाहींस, त्यामुळें तुझें फार नुकसान होत आहे. आणि ह्या त्याच्या जडतेबद्दल त्याला पाचित्तिय होतें ॥ ७३ ॥

१२३. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु रागावून विकृतमनानें सप्तदशवर्गियांवर प्रहार करीत; ते रडत असत...ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा:—

**जो भिक्षु दुसऱ्या भिक्षूवर रागावून विकृतमनानें प्रहार करील, त्याला पाचित्तिय होतें ॥ ७४ ॥**

१२४. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु रागावून विकृतमनानें सप्तदशवर्गियांवर हात उगारीत असत...ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा:—

**जो भिक्षु भिक्षूवर रागावून विकृतमनानें हात उगारील, त्याला पाचित्तिय होतें ॥ ७५ ॥**

१२५. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु पुरावा नसतां इतर भिक्षूंना संघादिशेष आपत्ति लागू करीत...ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा:—

**जो भिक्षु पुराव्याशिवाय इतर भिक्षूला संघादिशेष आपत्ति लागू करील, त्याला पाचित्तिय होतें ॥ ७६ ॥**

१२६. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु सप्तदशवर्गीय भिक्षूंना बुद्धिपुरःसर संशयांत पाडीत; आणि म्हणत कीं, वीस वर्षें पुरीं झाल्याशिवाय उपसंपदा देऊं नये, असा भगवंतानें नियम केला आहे; आणि तुम्हांला तर वीस वर्षें पुरीं झालीं नाहींत; तेव्हां तुम्ही भिक्षु नव्हेत, असें तर नसेल ना ? ते (सप्तदशवर्गीय भिक्षु) रडत असत.. ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असाः--

**जो भिक्षु भिक्षूला क्षणमात्रहि दुःख व्हावें, ह्या उद्देशानें बुद्धिपुरःसर संशयांत पाडील, त्याला ह्याच कारणास्तव पाचित्तिय होतें ॥ ७७ ॥**

१२७. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु सज्जन भिक्षूंबरोबर भांडत असत. सज्जन भिक्षु आपआपसांत म्हणत कीं, हे षड्वर्गीय भिक्षु निर्लज्ज आहेत. त्यांच्या बरोबर भांडण्यांत अर्थ नाहीं. षड्वर्गीय भिक्षु कान देऊन त्यांचें भाषण ऐकत, व आम्हांला तुम्ही निर्लज्ज कां म्हणतां, अशी तक्रार करीत...ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असाः--

**जो भिक्षु आपले विरोधी भिक्षु काय बोलतात, तें लपून ऐकण्याचा प्रयत्न करील, त्याला ह्याच कारणास्तव पाचित्तिय होतें ॥७८॥**

१२८. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु नियमांचा भंग करीत, व त्या संबंधीं संघानें चौकशी करून प्रत्येकाला प्रायश्चित्त ठरविलें असतां शिवीगाळ करीत असत. एके दिवशीं कांहीं कारणास्तव संघ एकत्र जमला होता. षड्वर्गीय भिक्षु चीवरें करण्यांत गुंतले होते. तेव्हां संघकार्याला आपली संमति देण्यासाठीं आपणांपैकीं एकाला त्यांनीं प्रतिनिधी म्हणून संघाच्या सभेला पाठविलें. संघानें त्याचीच चौकशी करून त्यावर आपत्ति लागू केली. ही गोष्ट त्याच्या साथीदारांना समजली, तेव्हां ते संघाची निंदा करूं लागले; संघ असें करील, हें आम्हांस ठाऊक असतें, तर त्याला आम्हीं तेथें पाठविलेंच नसतें, असें म्हणूं लागले ... त्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असाः--

**जो भिक्षु धार्मिक संघकृत्यांस संमति देऊन मागाहून निंदा करील, त्याला पाचित्तिय होतें ॥ ७९ ॥**

१२९. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जें० अ० आरामांत रहात होता. काळीं कांहीं कारणास्तव संघ एकत्र जमला होता. षड्वर्गीय भिक्षु चीवर करण्यांत गुंतले होते; म्हणून आपली संमति देण्यासाठीं त्यांनीं आपल्यापैकीं एकाला पाठविलें. त्याच भिक्षूची संघांत चौकशी चालली असतां, तो संमति न देतां मध्येंच उठून गेला ... ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा:--

**जो भिक्षु संघांत एखाद्या गोष्टीची चौकशी चालली असतां संमति न देतां मध्येंच उठून जाईल, त्याला पाचित्तिय होतें ॥ ८० ॥**

१३०. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या काळीं दब्ब मल्लपुत्र संघाच्या शयनासनाची व जेवणाची व्यवस्था पहात असे. त्याचें चीवर जीर्ण झालें होतें. त्या काळीं संघाला एक नवीन चीवर मिळालें, व संघानें तें दब्बाला दिलें. तेव्हां, भिक्षु आपल्या आवडीच्या मनुष्याला संघाची वस्तू देतात, अशा रीतीनें षड्वर्गीय भिक्षु इतर भिक्षूंची निंदा करूं लागले ... ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा:--

**जो भिक्षु समग्र संघानें चीवर दिल्यानंतर, आपल्या आवडीच्या माणसाला भिक्षु सांघिक वस्तू देतात असें म्हणून निंदा करील, त्याला पाचित्तिय होतें ॥ ८१ ॥**

१३१. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं श्रावस्ती येथील एका पूगानें संघासाठीं चीवरें व जेवण तयार केलें होतें. षड्वर्गीय भिक्षूंनीं तीं चीवरें दुसऱ्याच भिक्षूंला देवविलीं ... ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा:--

**जो भिक्षु संघाला मिळणारी वस्तू बुद्धिपुरःसर व्यक्तीला देववील, त्याला पाचित्तिय होतें ॥ ८२ ॥**

१३२. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. तेव्हां पसेनदि कोसल राजानें उद्यानपाळाला बोलावून उद्यान साफ करण्यास सांगितलें. उद्यानपाळ राजाला म्हणाला, "उद्यानांत दुसरें कांहीं

नाहीं. केवळ भगवान् तेथें बसला आहे." राजा म्हणाला, "आपण आज भगवंताचें दर्शन घेऊं." तो उद्यानांत आला तेव्हां बुद्धाजवळ त्यानें एका उपासकाला पाहिलें, व (तो मारेकरी असेल असें वाटून) राजा संत्रस्त झाला. पण पुन्हां राजाच्या मनांत असा विचार आला कीं, हा मनुष्य जर नीच असता तर भगवंताच्या सेवेंत तत्पर राहिला नसता. त्यानंतर पसेनदि कोसल बुद्धापाशीं आला, व नमस्कार करून एका बाजूला बसला. बुद्धाच्या समोर राजाला नमस्कार करणें योग्य न वाटल्यामुळें त्या उपासकानें पसे-नदीला नमस्कार केला नाहीं; व त्यामुळें राजाचें मन विकृत झालें. तेव्हां भगवान् राजाला म्हणाला, "महाराज, हा उपासक बहुश्रुत आणि विरक्त आहे." अशा रितीनें भगवंतानें स्तुति केल्यामुळें राजा प्रसन्न होऊन त्या उपासकाला म्हणाला, "जर कांहीं काम पडलें तर मला सांगत जा." "बरें महाराज," असें त्या उपासकानें उत्तर दिलें. नंतर पसेनदीला भग-वंतानें उपदेश केला, व भगवंताला नमस्कार करून आणि प्रदक्षिणा करून पसेनदि राजा तेथून निघून गेला.

एके दिवशीं तो उपासक छत्री घेऊन राजवाड्यावरून जात होता. त्याला बोलावून आणून राजानें आपल्या स्त्रियांना धर्म शिकविण्यास सांगितलें. तेव्हां उपासक म्हणाला, "मी जें कांहीं शिकलों. तें आर्यांकडून (भिक्षूं-कडून) शिकलों. तेव्हां तेच महाराजांच्या स्त्रीमंडळाला धर्म शिकविण्यास योग्य आहेत." राजाला त्याचें म्हणणें योग्य वाटलें, व स्त्रीमंडळाला धर्म शिकविण्यासाठीं एकादा भिक्षु पाठवावा, अशी त्यानें भगवंताला विनंति केली. त्याप्रमाणें भगवंतानें आनंदाची ह्या कामीं नेमणूक केली. तो एके दिवशीं राजवाड्यांत गेला असतां, पसेनदि राजा व मल्लिका राणी आपल्या शयन-गृहांत एकाच शय्येवर निजलीं होतीं. आनंदाला पाहून मल्लिका देवी एकदम उठली, व अशा घाईमुळें तिची साडी सुटली. आनंद तेथूनच माघारा आरामांत गेला, व त्यानें ही गोष्ट इतर भिक्षूंना सांगितली....ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा:—

**जो भिक्षु मूर्धावसिक्त क्षत्रियराजाच्या शयनगृहाचा उंबरठा राजा किंवा राणी आंत असतां—पूर्वीं वर्दी दिल्याशिवाय उल्लंघील, त्याला पाचित्तिय होतें ॥ ८३ ॥**

१३३. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं कोणी एक भिक्षु अचिरवती नदींत स्नान करीत असतां त्याच ठिकाणीं दुसरा एक ब्राह्मण स्नानासाठीं आला; व बरोबर आणलेली पांचशें कार्षापणांची थैली कांठावर ठेवून, स्नान करून परत जातांना ती थैली तेथेंच विसरला. दुसऱ्या कोणीं घेऊन जाऊं नये म्हणून त्या भिक्षूनें ती थैली आपणापाशीं ठेविली. वाटेंत आठवण झाल्यामुळें ब्राह्मण तसाच परत आला, तेव्हां भिक्षूनें ती थैली त्याला दिली. भिक्षूला बक्षीस[1] देण्याचा प्रसंग येऊं नये, म्हणून ब्राह्मण म्हणाला कीं, त्या थैलींत हजार कार्षापण होते. असें म्हणून तो आपली थैली घेऊन गेला....ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असाः—

"जो भिक्षु सांपडलेलें द्रव्य किंवा मूल्यवान वस्तू घेईल किंवा घेववील त्याला पाचित्तिय होतें."

ह्या नियमांत दोन प्रसंगीं कांहीं फेरफार करून शेवटच्या प्रसंगीं जो नियम करण्यांत आला तो असाः—

**जो भिक्षु आरामाबाहेर किंवा आवसथाबाहेर सांपडलेलें द्रव्य किंवा मूल्यवान् वस्तू घेईल किंवा घेववील, त्याला पाचित्तिय होतें. आरामांत किंवा आवसथांत सांपडलेलें द्रव्य किंवा मूल्यवान् वस्तू, ज्याची त्याला मिळावी ह्या हेतूनें घेऊन किंवा घेववून ठेवण्यास सांगावें, हा ह्या बाबतींत शिष्टाचार ॥ ८४ ॥**

१३४. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु अवेळीं गांवांत जाऊन राजकथा, चोरकथा, सेनाकथा, युद्धकथा, अन्नपानकथा वगैरे बाष्कळ[2] गोष्टी करीत असत...ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असाः—

"जो भिक्षु अवेळीं गांवांत जाईल, त्याला पाचित्तिय होतें."

---

१. एखाद्याची हरवलेली वस्तू दुसऱ्यास सांपडली असतां त्या वस्तूची शेंकडा पांच टक्के किंमत त्याला द्यावी, अशी वहिवाट असे. त्याला पालिभाषेंत 'पुण्णपत्त' असें म्हटलें आहे.

२. ह्या गोष्टींना पालि भाषेंत 'तिरच्छानकथा' म्हणतात. विशेष माहितीसाठीं राजवाडेकृत दीघनिकायांचें भाषांतर ( पृ. १० ) पहावें.

त्या काळीं कांहीं भिक्षु श्रावस्तीला येत असतां संध्याकाळीं एका गांवाजवळ आले. तेथील रहिवाशांनीं त्यांना गांवांत बोलाविलें. परंतु भगवंतानें अवेळीं गांवांत जाण्याची मनाई केल्यामुळें गांवांत न जातां वस्तीला ते बाहेरच राहिले. तेथें चोरांनीं त्यांचीं चीवरें हिरावून घेतलीं. ही गोष्ट भगवंताला समजली, तेव्हां तो ह्मणाला, " भिक्षुहो, इतर भिक्षूंच्या संमतीनें अवेळीं गांवांत जाण्यास मी परवानगी देतों. "

दुसऱ्या एका प्रसंगीं एक भिक्षु श्रावस्तीला येत असतां संध्याकाळीं एका गांवाजवळ आला; व दुसरा भिक्षु बरोबर नसल्यामुळें त्याला गावांत प्रवेश करतां आला नाहीं. ही गोष्ट भगवंताला समजली, तेव्हां त्यानें वरील नियमांत फेरफार केला तो असा:—

" जो भिक्षु बरोबर दुसरा भिक्षु असतां त्याला विचारल्यावांचून अवेळीं गांवांत जाईल, त्याला पाचित्तिय होतें. "

त्या काळीं एका भिक्षूला साप चावला. त्याला बरा करण्यासाठीं दुसरा भिक्षु विस्तव आणावा म्हणून गांवांत जात असतां त्याच्या मनांत, आपण भगवंतानें केलेल्या नियमाचा भंग करतों कीं काय, अशी शंका आली.... ह्या प्रसंगीं भगवंतानें वरील नियमांत फेरफार केला तो असा:——

**जो भिक्षु दुसरा भिक्षु बरोबर असतां त्याला न कळतां तशाच अत्यंत जरूरीच्या कामावांचून गांवांत जाईल, त्याला पाचित्तिय होतें ॥ ८५ ॥**

१३५. बुद्ध भगवान् शाक्यदेशांत कपिलवस्तु येथें निग्रोधारामांत रहात होता. त्या वेळीं हस्तिदंताचें काम करणाऱ्या एका कारागिरानें भिक्षूंना सुया ठेवण्यासाठीं डब्या ( सूचिगृह ) करून देण्याचें कबूल केलें होतें. भिक्षु त्याजपाशीं नानाप्रकारच्या डब्या मागूं लागल्यामुळें इतर वस्तू तयार करून आपला निर्वाह करणें त्याला फार कठीण झालें...ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा:–

**जो भिक्षु हाडाची, हस्तिदंती किंवा शिंगाची सुयांची डबी करवील त्याला—ती डबी फोडवून—पाचित्तिय होतें ॥ ८६ ॥**

१३६. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं उपनंद शाक्यपुत्र उंच मंचकावर निजत असे...ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा:—

**नवीन खाट किंवा आसन करवीत असतां त्याचे पाय खालचे अटनीपासून[1] आठ सुगत अंगुळें ठेवावे. त्यापेक्षां जो जास्त उंच ठेवील, त्याला—ते कापावयास लावून—पाचित्तिय होतें ॥ ८७ ॥**

१३७. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं षड्वर्गीय भिक्षु मंचक आणि आसन, कापूस भरून वरून कपड्यांनीं शिवून तयार करीत असत. त्यांची लोक निंदा करीत... ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा:—

**जो भिक्षु कापूस भरलेला मंचक किंवा आसन तयार करवील, त्याला--कापूस काढावयास लावून--पाचित्तिय होतें ॥ ८८ ॥**

१३८. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या वेळीं भगवंतानें भिक्षूंना आसन वापरण्याची परवानगी दिली होती. षड्वर्गीय भिक्षु मोठमोठालीं आसनें वापरीत असत. तीं मंचकाच्या किंवा लांकडी बैठकीच्या खालीं लोंबकळत असत...ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा:--

"भिक्षु बसण्याचें आसन करवीत असतां त्यानें तें प्रमाणांत करवावें. तें प्रमाण असें:- दोन सुगतवितस्ति लांबी आणि दीड सुगत-वितस्ति रुंदी. ह्या प्रमाणांचा अतिक्रम करील, त्याला--तें आसन कापावयास लावून--पाचित्तिय होतें."

परंतु उदायी भिक्षु धिप्पाड असल्यामुळें त्याला एवढें आसन पुरत नसे. तेव्हां भगवंतानें वरील नियमांत फेरफार केला तो असा:--

**भिक्षु बसण्याचें आसन करवीत असतां त्यानें तें प्रमाणांत करवावें. तें प्रमाण असें:—दोन सुगतवितस्ति लांबी, दीड सुगतवितस्ति रुंदी आणि एक वीत कांठ. ह्या प्रमाणाचा अतिक्रम करील, त्याला—तें आसन कापावयास लावून— पाचित्तिय होतें ॥ ८९ ॥**

---

१. अटनी म्हणजे घोड्याच्या खुरासारखा किंवा अशाच दुसऱ्या कांहीं आकाराचा पायाचा बुडाचा भाग. तीन अंगुळें म्हणजे एक सुगत अंगुळ.

१३९. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या वेळीं भगवंतानें भिक्षूंना खरूज झाली असतां कण्डुप्रतिच्छादक पंचा वापरण्याची परवानगी दिली होती. पण षड्वर्गीय भिक्षु असे पंचे प्रमाणाबाहेर वापरीत असत; म्हणून भगवंतानें नियम केला तो असा:--

**कण्डुप्रतिच्छादक पंचा भिक्षूनें प्रमाणांत करवावा. त्याचें प्रमाण असें:--चार सुगतवितस्ति लांबी व दोन सुगतवितस्ति रुंदी. त्याचा अतिक्रम करील, त्याला--पंचा कापावयास लावून--पाचित्तिय होतें ॥ ९० ॥**

१४०. श्रावस्ती येथें असतांना षड्वर्गीयांनीं पावसाळ्यांत वापरण्याच्या पंचाच्या प्रमाणांत अतिक्रम केल्यामुळें भगवंतानें खालील नियम केला:--

**वर्षाकालीन पंचा करवितांना भिक्षूनें प्रमाणांत करवावा. त्याचें प्रमाण असें:--सहा सुगतवितस्ति लांबी, व अडीच सुगतवितस्ति रुंदी. ह्या प्रमाणाचा अतिक्रम करील त्याला--तो पंचा कापावयास लावून--पाचित्तिय होतें ॥ ९१ ॥**

१४१. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं भगवंताचा मावसभाऊ नंद अत्यंत देखणा होता, व सुगतचीवराएवढें चीवर तो धारण करीत असे....ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा:--

**जो भिक्षु सुगतचीवराएवढें किंवा त्यापेक्षां मोठें चीवर करवील त्याला--तें चीवर कापावयास लावून--पाचित्तिय होतें. सुगतचीवराचें प्रमाण असें:-- नऊ सुगतवितस्ति लांबी व सहा सुगतवितस्ति रुंदी. हें सुगतचीवराचें प्रमाण ॥ ९२ ॥**

---

## चार पाटिदेसनिय

१४२. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं कोणी एक भिक्षुणी श्रावस्तींत भिक्षाटन करून परत येत असतांना एका भिक्षूला पाहून म्हणाली, "आर्य, भिक्षा ग्रहण करा." त्या

भिक्षूनें तिची सर्व भिक्षा घेतल्यामुळें व भिक्षाटनाची वेळ निघून गेली असल्यामुळें त्या भिक्षुणीला उपाशीं रहावें लागलें. हा प्रकार अनुक्रमें तीन दिवस घडला. चवथ्या दिवशीं ती कांपत कांपत रस्त्यानें चालली असतां समोरून रथांत बसून येणाऱ्या एका श्रेष्ठीनें तिला बाजूस व्हावयास सांगितलें. ती अडखळून तेथेंच पडली. श्रेष्ठीनें खालीं उतरून तिची क्षमा मागितली. तेव्हां ती म्हणाली, "ह्यांत तुमचा कांहीं अपराध नाहीं. भुकेनें व्याकुळ झाल्यामुळें मी खालीं पडलें." तिच्या भुकेचें कारण समजलें, तेव्हां तो श्रेष्ठी भिक्षूंची निंदा करूं लागला ... ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा:—

**जो भिक्षु गांवांत गेलेल्या अज्ञाति भिक्षुणीकडून खाण्याचा किंवा जेवण्याचा पदार्थ आपल्या हातानें घेऊन खाईल किंवा जेवील, त्यानें आपला दोष कबूल करावा:— बंधुहो, निंद्य आणि अयोग्य ( पाटिदेसनिय ) गोष्ट माझ्या हातून घडली, ती मी कबूल करतों ॥ १ ॥**

१४३. बुद्ध भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या काळीं एका कुटुंबांत आमंत्रित भिक्षु भोजन करीत असतां षड्वर्गीय भिक्षुणी गृहस्थांनां सांगून षड्वर्गीय भिक्षूंना नानाप्रकारचे पदार्थ वाढावयास लावीत.... ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा:—

**निमंत्रित भिक्षु कुटुंबामध्यें भोजन करीत असतां त्यांचा परामर्श घेण्यासाठीं एकादी भिक्षुणी, इकडे आमटी आणा, इकडे भात आणा, असें म्हणून उभी राहील, तर त्या भिक्षूंनीं, जोंपर्यंत भिक्षु जेवीत आहेत तोंपर्यंत तूं येथून दूर हो, असें म्हणून तिचा निषेध करावा. जर त्यांपैकीं एकाद्या भिक्षूनेंहि तिचा निषेध केला नाहीं, तर त्या सर्वांनीं आपला दोष कबूल करावा:— बंधुहो, निंद्य आणि अयोग्य ( पाटिदेसनिय ) गोष्ट आमच्या हातून घडली, ती आम्ही कबूल करतों ॥ २ ॥**

१४४. बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें जे० अ० आरामांत रहात होता. त्या काळीं तेथील एका कुटुंबांत स्त्रीपुरुषें संघाचीं भक्त होतीं. श्रद्धेनें आणि संपत्तीनें त्या कुटुंबाची सारखी अभिवृद्धि होत होती. कधीं कधीं खाण्याचे

सर्व पदार्थ भिक्षूंना देऊन त्या कुटुंबांतील माणसें स्वतः उपाशीं रहात असत ... ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असाः—

"जीं शैक्षसंमत[1] कुटुंबें असतील, त्या कुटुंबांत जाऊन जो भिक्षु खाण्याचा किंवा जेवण्याचा पदार्थ आपल्या हातानें[2] घेऊन खाईल किंवा जेवील, त्यानें आपला दोष कबूल करावा, बंधूहो, निंद्य आणि अयोग्य (पाटिदेसनिय) गोष्ट माझ्या हातून घडली, ती मी कबूल करतों."

ह्या नियमांत पुढें एकदोन प्रसंगीं फेरफार करण्यांत आला तो असाः—

**जीं शैक्षसंमत कुटुंबें असतील, त्या कुटुंबांत जाऊन पूर्वी आमंत्रण केलें नसतां जो निरोगी भिक्षु खाण्याचा किंवा जेवण्याचा पदार्थ आपल्या हातानें घेऊन खाईल किंवा जेवील, त्यानें आपला दोष कबूल करावाः—बंधुहो, निंद्य आणि अयोग्य (पाटिदेसनिय) गोष्ट माझ्या हातून घडली, ती मी कबूल करतों ॥ ३ ॥**

१४५. बुद्ध भगवान् शाक्य देशांत कपिलवस्तु येथें निग्रोधारामांत रहात होता. त्यावेळीं शाक्यांचे दास जंगलांत पळून जाऊन बंड करीत असत. शाक्यांच्या कांहीं बायका अरण्यांत राहणाऱ्या भिक्षूंसाठीं खाण्याचे व भोजनाचे उत्तम पदार्थ घेऊन जात असतां, त्या बंडवाल्यांनीं त्यांच्यावर

---

१ शैक्षसंमत म्हणजे संघानें ज्यांना बौद्ध धर्माचे अधिकारी ठरविले असतील, अशा गृहस्थांचीं कुटुंबें.

२ येथें मूळ शब्द 'सहत्था' असा आहे. तसाच तो पाटिदेसनियांतहि आहे. ज्यावेळीं ह्या नियमांवर टीका लिहिली गेली, त्या वेळीं कोणत्याहि भिक्षूनें आपल्या हातानें कोणताहि पदार्थ घेऊन खातां कामा नये, अशी वहिवाट सुरू झाली होती; व त्यामुळें ह्या नियमाच्या टीकेंत 'सहत्था' ह्या शब्दाचा अर्थ मुळींच केला नाहीं आणि मूळच्या वहिवाटीला निराळें स्वरूप देण्याचा प्रयत्न केला आहे. मज्झिमनिकायांत घटीकारसुत्तांत (P. T. S. Majjhimanikaya, part II p. 52) काश्यप बुद्ध कुंभाराच्या घरीं जाऊन तो घरीं नसतांना स्वतःच्या हातानें त्याच्या भांड्यांतील अन्न घेऊन खात असे, असा उल्लेख आहे. ह्यावरून एका काळीं भिक्षु श्रद्धावान् कुटुंबांत जाऊन स्वतःच्या हातानें अन्न घेऊन खात असावे, असें सिद्ध होतें.

हल्ला केला व त्यांना लुटलें. पुढें शाक्यांनीं त्यांना पकडलें....ह्या प्रसंगीं भगवंतानें नियम केला तो असा--

**जीं संशयाचीं आणि धोक्याचीं अरण्यांतील वसतिस्थानें, त्यांत राहणारा भिक्षु ( गृहस्थांना ) पूर्वी माहिती दिल्यावांचून आरामांत आणलेला खाण्याचा किंवा जेवण्याचा पदार्थ आपल्या हातानें घेऊन खाईल किंवा जेवील, त्यानें आपला दोष कबूल करावा:--बंधुहो, निंद्य आणि अयोग्य ( पाटिदेसनिय ) गोष्ट माझ्या हातून घडली, ती मी कबूल करतों ॥ ४ ॥**

---

## पंचाहत्तर सेखिय

सेखिय म्हणजे शिकण्याजोगे नियम. हे बहुतेक षड्वर्गीयांनीं केलेल्या दोषांमुळें भगवंतानें श्रावस्ती येथें असतांना घालून दिले. परंतु त्या दोषांचें सविस्तर वर्णन देण्यापासून विशेष फायदा नसल्यामुळें व नियमांवरूनच त्या दोषांचें अनुमान सहज करतां येण्याजोगें असल्यामुळें केवळ नियमांचें भाषांतर येथें देण्यांत येत आहे.

१४६. **परिमंडल नेसेन, असा नेम करावा[1] ॥ १ ॥**

१४७. **परिमंडल पांघरीन, असा नेम करावा ॥ २ ॥**

१४८. **शरीर नीट आच्छादून गावांत जाईन, असा नेम करावा ॥ ३ ॥**

१४९. **शरीर नीट आच्छादून गांवांत बसेन, असा नेम करावा ॥४॥**

१५०. **सुसंवृत गांवांत जाईन, असा नेम करावा ॥ ५ ॥**

१५१. **सुसंवृत गांवांत बसेन, असा नेम करावा ॥ ६ ॥**

१५२. **दृष्टि[2] खालीं ठेवून गांवांत जाईन, असा नेम करावा ॥७॥**

---

१ परिमंडल म्हणजे जैन किंवा बौद्ध साधु नेसतात त्याप्रमाणें कासोटा वगैरे न घालतां वर्तुलाकार नेसणें. नेम करावा = सिक्खा करणीया.

२ विशुद्धिमार्गांत म्हटलें आहे:—

अधो खिपेय्य चक्खूनि युगमत्तदसो सिया ।
वनमक्कटलोलस्स न चित्तस्स वसं वजे ॥

अर्थ:—दृष्टि खालीं घालावी; केवळ पायांजवळील दोन हात जमीन पाहावी; वनमर्कटासारख्या चंचल मनाला वश होऊं नये.

१५३. दृष्टि खालीं ठेवून गांवांत बसेन, असा नेम करावा ॥ ८ ॥

१५४. चीवर उडवीत उडवीत गांवांत जाणार नाहीं, असा नेम करावा ॥ ९ ॥

१५५. चीवर उडवीत उडवीत गांवांत बसणार नाहीं, असा नेम करावा ॥ १० ॥

१५६. मोठ्यानें हंसत हंसत गांवांत जाणार नाहीं, असा नेम करावा ॥ ११ ॥

१५७. मोठ्यानें हंसत हंसत गांवांत बसणार नाहीं, असा नेम करावा ॥ १२ ॥

१५८. गांवांत जातांना हळू बोलेन, असा नेम करावा ॥ १३ ॥

१५९. गांवांत बसला असतां हळू बोलेन, असा नेम करावा ॥ १४ ॥

१६०. शरीर हालवीत गांवांत जाणार नाहीं, असा नेम करावा ॥ १५ ॥

१६१. शरीर हालवीत गांवांत बसणार नाहीं असा नेम करावा ॥ १६ ॥

१६२. हात हालवीत गांवांत जाणार नाहीं असा नेम करावा ॥ १७ ॥

१६३. हात हालवीत गांवांत बसणार नाहीं, असा नेम करावा ॥ १८ ॥

१६४. डोकें हालवीत गांवांत जाणार नाहीं, असा नेम करावा ॥ १९ ॥

१६५. डोकें हालवीत गांवांत बसणार नाहीं, असा नेम करावा ॥ २० ॥

१६६. कटीवर हात ठेवून गांवांत जाणार नाहीं, असा नेम करावा ॥ २१ ॥

१६७. कटीवर हात ठेवून गांवांत बसणार नाहीं, असा नेम करावा ॥ २२ ॥

१६८. डोक्यावरून पांघरून गांवांत जाणार नाहीं, असा नेम करावा ॥ २३ ॥

१६९. डोक्यावरून पांघरून गांवांत बसणार नाहीं, असा नेम करावा ॥ २४ ॥

१७०. टांचा वर करून गांवांत जाणार नाहीं, असा नेम करावा ॥ २५ ॥

१७१. गांवांत पल्लत्थिकेवर[१] बसणार नाहीं, असा नेम करावा ॥ २६ ॥

[ वरील सव्वीस नेम भिक्षूच्या सदाचाराला पोषक समजावे. ]

१७२. लक्ष्यपूर्वक पिंडपात ( भिक्षा ) ग्रहण करीन, असा नेम करावा ॥ २७ ॥

१७३. पात्रावर लक्ष्य ठेवून पिंडपात ग्रहण करीन, असा नेम करावा ॥ २८ ॥

१७४. भाताला लागेल एवढेंच वरण घेईन, असा नेम करावा ॥ २९ ॥

१७५. पात्र भरून न जाईल, अशा प्रमाणानें पिंडपात ग्रहण करीन, असा नेम करावा ॥ ३० ॥

१७६. लक्ष्यपूर्वक भोजन करीन, असा नेम करावा ॥ ३१ ॥

१७७. पात्रावर लक्ष्य ठेवून भोजन करीन, असा नेम करावा ॥ ३२ ॥

१७८. अनुक्रमें एका बाजूनें जेवीत जाईन, असा नेम करावा ॥ ३३ ॥

१७९. भाताला लागेल एवढेंच वरण घेऊन जेवीन, असा नेम करावा ॥ ३४ ॥

१८०. मधलाच भात घेऊन जेवणार नाहीं, असा नेम करावा ॥ ३५ ॥

---

१ पल्लत्थिका म्हणजे आरामखुर्चीसारखें बसण्याचें आसन. हें बहुधा वस्त्राचें करीत असत.

१८१. ज्यास्ती मिळविण्याच्या इच्छेनें वरण किंवा भाजी भातानें झांकून ठेवणार नाहीं, असा नेम करावा ॥ ३६ ॥

१८२. आजारी नसतां वरण किंवा भात आपल्यासाठीं करवून जेवणार नाहीं, असा नेम करावा ॥ ३७ ॥

१८३. टीका करण्याच्या हेतूनें दुसऱ्याच्या पात्राकडे पहाणार नाहीं असा नेम करावा ॥ ३८ ॥

१८४. मोठा घास करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ३९ ॥

१८५. बेताचा घास करीन, असा नेम करावा ॥ ४० ॥

१८६. घास तोंडाजवळ आणण्यापूर्वी तोंड उघडणार नाहीं, असा नेम करावा ॥ ४१ ॥

१८७. जेवतांना तळहात तोंडांत घालणार नाहीं, असा नेम करावा ॥ ४२ ॥

१८८. तोंडांत घास असतां बोलणार नाहीं, असा नेम करावा ॥ ४३ ॥

१८९. हातांतील घास तोंडांत फेंकून जेवणार नाहीं, असा नेम करावा ॥ ४४ ॥

१९०. घासाचा भाग तोंडानें तोडून जेवणार नाहीं, असा नेम करावा ॥ ४५ ॥

१९१. गालांत अन्न भरून जेवणार नाहीं, असा नेम करावा ॥४६॥

१९२. हात झाडीत झाडीत जेवणार नाहीं, असा नेम करावा ॥ ४७ ॥

१९३. भात इकडे तिकडे शिंपडून जेवणार नाहीं, असा नेम करावा ॥ ४८ ॥

१९४. जीभ इकडे तिकडे हालवीत जेवणार नाहीं, असा नेम करावा ॥ ४९ ॥

१९५. चपु चपु शब्द करीत जेवणार नाहीं, असा नेम करावा ॥ ५० ॥

१९६. सुरुसुरु शब्द करीत जेवणार नाहीं, असा नेम करावा ॥५१॥

१९७. हात चाटीत जेवणार नाहीं, असा नेम करावा ॥ ५२ ॥

१९८. पात्र चाटीत जेवणार नाहीं, असा नेम करावा ॥ ५३ ॥

१९९. ओंठ चाटीत जेवणार नाहीं, असा नेम करावा ॥ ५४ ॥

२००. उष्ट्या हातानें पाण्याचें भांडें घेणार नाहीं, असा नेम करावा ॥ ५५ ॥

२०१. भाताचीं शितें असलेलें पात्र धुवून तें पाणी गांवांत टाकणार नाहीं, असा नेम करावा ॥ ५६ ॥

[ वरील तीस नेम भोजनविषयक आहेत. ]

२०२. छत्री हातांत असलेल्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ५७ ॥

२०३. काठी हातांत असलेल्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ५८ ॥

२०४. तलवार हातांत असलेल्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ५९ ॥

२०५. आयुध (धनुष्य वगैरे) हातांत असलेल्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥६०॥

२०६. पादुका घातलेल्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ६१ ॥

२०७. वाहाणा घातलेल्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ६२ ॥

२०८. वाहनावर बसलेल्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ६३ ॥

२०९. बिछान्यांत असलेल्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ६४ ॥

२१०. पर्ह्लत्थिकेवर बसलेल्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ६५ ॥

२११. डोक्याला वस्त्र गुंडाळलेल्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ६६ ॥

२१२. डोक्यावरून पांघरूण घेतलेल्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ६७ ॥

२१३. आपण जमिनीवर बसून आसनावर बसलेल्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ६८ ॥

२१४. आपण नीच आसनावर बसून उच्च आसनावर बसलेल्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ६९ ॥

२१५. आपण उभें राहून बसलेल्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ७० ॥

२१६. आपण मागून जात असतां पुढें जाणाऱ्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ७१ ॥

२१७. आपण मार्गाबाहेर चालत असतां मार्गांतून चालणाऱ्या निरोगी माणसाला धर्मोपदेश करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ७२ ॥

[ वरील सोळा नियम धर्मोपदेशविषयक आहेत. ]

२१८. आजारी नसतां उभ्यानें शौचविधि किंवा लघ्वी करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ७३ ॥

२१९. गवत वाढलेल्या ठिकाणीं आजारी नसतां शौचविधि किंवा लघ्वी करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ७४ ॥

२२०. आजारी नसतां पाण्यांत शौचविधि किंवा लघ्वी करणार नाहीं, असा नेम करावा ॥ ७५ ॥

## सात अधिकरणसमथ

संघांत उत्पन्न झालेल्या तंटयाची शांति आणि तडजोड करण्यासाठीं:—

२२१. सन्मुखविनय द्यावा; ( १ )
२२२. स्मृतिविनय द्यावा; ( २ )
२२३. अमूढविनय द्यावा; ( ३ )
२२४. प्रतिज्ञातकरण करावें; ( ४ )
२२५. बहुमतानें निकाल करावा; ( ५ )
२२६. ‘ ज्याचें पाप त्याला ’ विधि करावा; ( ६ )
२२७. तृणावस्तार विधि करावा. ( ७ )

## व्याख्या

अधिकरणसमथ म्हणजे खटल्याचा निकाल लावून तो मिटविणें.

१. **सन्मुखविनयः**— कोणत्याहि भिक्षूनें अपराध केला असतां व त्याच्यावर दुसऱ्या भिक्षूनें आरोप आणला असतां, त्याची चौकशी संघासमोर करावी. संघासमोर चौकशी करून खटला मिटविणें, याला सन्मुखविनय देणें असें म्हणतात.

२. **स्मृतिविनयः**— हा सामान्य भिक्षूला देतां येत नाहीं. अरहंतासारख्या अत्यंत सदाचरणी भिक्षूला देतां येतो. त्याच्यावर जर एकाद्या भिक्षूनें भलताच आळ आणला, व त्यानें, तो आळ खोटा आहे असें संघाला समजावून सांगितलें, तर अशा प्रसंगीं संघ त्याची स्मृति ( आठवण ) योग्य ठरवून त्याला स्मृतिविनय देतो. नंतर पुन्हां असा आळ आणण्यांत आला तर ती वृथा बडबड आहे, असें समजण्यांत येतें.

३. **अमूढविनयः**—एकाद्या भिक्षूला वेड लागलें असतां त्याच्या हातून पुष्कळ दोष घडतात, व तो बरा झाल्यावर चौकशी केली असतां आपणाला कांहींच आठवत नाहीं किंवा स्वप्नासारखें कांहीं आठवतें असें जर म्हणूं लागला, तर उन्मत्तावस्थेंत घडलेल्या त्याच्या दोषांची संघाकडून त्याला माफी मिळते, व त्या दिवसापासून तो बरा झाला, असें गृहीत धरण्यांत येतें. याला अमूढविनय देणें असें म्हणतात.

४. **प्रतिज्ञातकरणः**— कोणत्याहि भिक्षूवर तो हजर असल्याशिवाय आरोप करावयाचा नाहीं; व त्यानें तो आरोप कबूल केला तर तेवढ्यानेंच हा खटला मिटवावयाचा, ह्याला प्रतिज्ञातकरण म्हणतात.

५. **बहुमतानें निकालः**— कोणत्याहि प्रकरणाचा सामोपचारानें निकाल लागत नसला, तर तो बहुमतानें करण्यांत येतो. अशा प्रसंगीं सर्व भिक्षूंच्या संमतीनें एक अत्यंत गुणज्ञ भिक्षु मतग्राहक ( सलाकागाहापक ) निवडण्यांत येतो. व तो सर्वांचीं मतें घेऊन[१] बहुमताचा विचार करून योग्य निकाल देतो.

---

१. तांबड्या, पांढऱ्या वगैरे रंगाच्या काड्या मतदारांकडे देऊन त्यांनीं परत केलेल्या काड्यांवरून बहुमत ठरविण्याची वहिवाट असे. ह्या काड्यांना शलाका ( सलाका ) म्हणत.

**६. ज्याचें पाप त्याला:—** एकादा भिक्षु क्षणांत दोष कबूल करतो, क्षणांत नाकबूल करतों. अशा प्रसंगीं त्याचा पक्षपात किंवा विरोध न करतां सर्व संघ तो ताळ्यावर येईपर्यंत त्याला बहिष्कृत करतो. ह्या विधीला ज्याचें पाप त्याला ( तस्सपापिय्यसिका ) विधि म्हणतात.

**७. तृणावस्तारविधि:—** संघांत तट पडून लहानसहान कारणासाठीं जेव्हां भांडणें होतात, तेव्हां दोन्ही तटांत शांतता स्थापित करण्यासाठीं ह्या विधि करण्यांत येतो. घाणेरडी जमीन जशी आपण गवतानें झांकतों, त्याप्रमाणें भिक्षूंच्या हातून झालेल्या लहानसहान चुका ह्या विधीनें झांकण्यांत येतात. म्हणून ह्याला तृणावस्तारविधी म्हणतात.

हे विधि कोणकोणत्या प्रसंगीं करावे ह्याचा विस्तार चुल्लवग्गाच्या चौथ्या खंधकांत केला आहे. अर्थात ह्याचा संग्रह पहिल्या भागांत व्हावयास पाहिजे होता. पण तसें केलें असतां तेथें फार विस्तार करावा लागला असता, व पुन्हां येथें ह्या नियमांची व त्या प्रकरणाची संगति जुळवावी लागली असती. म्हणून विस्तारभयास्तव ह्या नियमांची थोडक्यांत माहिती येथेंच दिली आहे.

पाराजिका, संघादिशेष वगैरे नियम म्हणून झाल्यावर प्रातिमोक्ष म्हणणारा भिक्षु त्या प्रकरणीं संघाचे सभासद शुद्ध आहेत कीं नाहींत, असा त्रिवार प्रश्न करतो व सर्व सभासद मुकाट्यानें राहिले म्हणजे, ते त्या त्या दोषांपासून मुक्त आहेत, असें गृहीत धरतो. सर्व प्रातिमोक्ष ( म्हणजे हे २२७ नियम ) म्हणून झाल्यावर तो म्हणतो, " बंधुहो, मी प्रातिमोक्षाचें निदान म्हटलें; चार पाराजिका, तेरा संघादिशेष, दोन अनियत, तीस निस्सग्गिय पाचित्तिय, ब्याण्णव पाचित्तिय, चार पाटिदेसनिय सेखिय, सात अधिकरण समथ ( हे सर्व नियम ) म्हटले. एवढे ( नियम ) त्या भगवंताच्या सूत्रांत आले असून ते दर पंधरवड्याला म्हटले जात असतात, ह्या बाबतींत सर्वांनीं सामग्रीनें एकीनें मुदितमनानें तंटा बखेडा न करतां वर्तावें. "

यानंतर भिक्षुणीचे नियम यावयास पाहिजे होते. त्यांच्या नियमांत आठ पाराजिका, सतरा संघादिशेष, तीस निस्सग्गिय पाचित्तिय, एकशें सासष्ट पाचित्तिय, आठ पाटिदेसनिय आणि पंचाहत्तर सेखिय यांचा समावेश होतो. भिक्षूंच्या नियमांत आणि यांत पुष्कळसें साम्य आहे. पहिल्या

चार पाराजिका सारख्याच आहेत. बाकीच्या भिक्षुणीसाठीं अधिक आहेत. त्या अशाः—— (१) गुडघ्याच्यावर पुरुषानें विकृत मनानें स्पर्श केला आणि तो तशाच मनानें भिक्षुणीनें स्वीकारला तर तिला पाराजिका आपत्ति होते. (२) दुसऱ्या भिक्षुणीनें पाराजिका आपत्ति केली असतां व ती माहीत असतां लपवून ठेवण्याचा प्रयत्न करणाऱ्या भिक्षुणीलाहि पाराजिका आपत्ति होते. (३) संघानें बहिष्कृत केलेल्या भिक्षूचा पक्ष घेणाऱ्या भिक्षुणीला तीनदां तसें न करण्यास सांगावें. असें असतांहि त्याचा पक्ष सोडला नाहीं तर तिला पाराजिका आपत्ति होते. (४) जी भिक्षुणी बेत ठरवून पुरुषाशीं एकान्त करण्याचा प्रयत्न करील तिला पाराजिका आपत्ति होते.[1] याचप्रमाणें इतर नियमांतहि बरेच फेरफार आहेत. त्यांवरून असें दिसून येतें कीं, भिक्षुणीचे नियम अतिशय कडक करण्याचा भिक्षूंकडून बराच प्रयत्न झाला असावा. या सर्व नियमांचें भाषान्तर आणि पूर्वपीठिका देऊन वाचकांना कंटाळा आणण्याची माझी इच्छा नाहीं.

---

१. हें भाषान्तर नाहीं. केवळ या नियमांचा सारांश आहे.

# भाग तिसरा

# महाश्रावकांचा परिचय

'असीति महासावक'[1] म्हणजे ऐशीं महाश्रावक अशा अर्थाचा उल्लेख बुद्धघोषाचार्यांच्या अट्ठकथांतून अनेक ठिकाणीं आला आहे. परंतु त्यांचीं नांवें कोठेंहि दिलीं नसल्यामुळें हे महाश्रावक कोण, असा प्रश्न उपस्थित होतो. थेरगाथेंत २६४ थेरांच्या गाथा आहेत. व अपदानांत थेरांची ५५० अपदानें आहेत. तेव्हां ह्यांपैकीं ऐशीं महाश्रावक कोण होते, हें सांगतां येणें शक्य नाहीं.

अंगुत्तरनिकायाच्या एककनिपातांत एतदग्ग नांवाचें एक प्रकरण आहे. निरनिराळ्या भिक्षूंना, भिक्षुणींना, उपासकांना आणि उपासिकांना त्या त्या गुणांत बुद्धानें अग्रस्थान दिलें असल्यामुळें ह्या प्रकरणाला एतदग्ग असें म्हणतात. ह्यांत सात वग्ग असून एकंदर ऐशीं सुत्तें आहेत. बहुधा प्रत्येक व्यक्तीला उद्देशून एक एक सुत्त आहे. परंतु चुल्लपंथकाला उद्देशून दोन, सुभूतीला उद्देशून दोन व आनंदाला उद्देशून पांच सुत्तें आहेत; आणि तपुस्स व भल्लिक ह्यांचा एका सुत्तांत समावेश केला आहे. म्हणजे ह्या ऐशीं सुत्तांत एकंदर ७५ व्यक्तींचा उल्लेख आहे. पैकीं ४१ भिक्षु, १३ भिक्षुणी, ११ उपासक व १० उपासिका आहेत.

बुद्धाच्या श्रावकसमूहाचा एका ठिकाणीं सर्वांत प्राचीन असा उल्लेख ह्या एतदग्ग प्रकरणांत आहे. पण येथें दिलेल्या व्यक्तींना महाश्रावक म्हणतां

---

१. कोठें कोठें 'असीति महाथेरा' असाहि उल्लेख आढळतो. परंतु त्रिपिटक वाङ्मयांत नांवाजलेल्या स्थविरांचीं जीं नांवें सांपडतात, त्या सर्वांचा एतदग्ग प्रकरणांत समावेश झाल्याचें दिसून येतें. हे सर्व स्थविर एकेचाळीसच आहेत. तेव्हां दुसरे एकुणचाळीस कोण, हें सांगणें कठीण पडतें. भिक्षुणी, उपासक आणि उपासिका ह्यांची महती कमी कमी होत गेल्यामुळें 'असीति महासावक' म्हणण्याच्या ऐवजीं 'असीति महाथेरा' म्हणण्याचाहि प्रघात पडला असावा.

येईल कीं काय, हा प्रश्न आहे. एकतर ह्यांत भिक्षु आणि भिक्षुणींचाच नव्हे तर उपासक आणि उपासिकांचाहि संग्रह केलेला आहे; व दुसरें त्यांची संख्या बरोबर ऐशीं भरत नाहीं.

बुद्धाच्या श्रावकांत भिक्षु, भिक्षुणी, उपासक आणि उपासिका असे चार भेद होते. त्यांपैकीं भिक्षूंचे आणि भिक्षुणींचे भिन्न भिन्न संघ असत; आणि उपासक व उपासिका ह्यांचे संघ नसत. परंतु धर्माच्या बाबतींत चारांनाहि सारखाच अधिकार असे. जसे भिक्षुभिक्षुणीसंघांत सोतापन्न, सकदागामी आणि अनागामी असत, तसेच ते उपासक-उपासिकांतहि असत. उपासक अर्हन् झाला तर तो बहुधा गृहस्थाश्रमांत न राहतां भिक्षु होत असे. महापरिनिब्बानसुत्तांत एके ठिकाणीं मार[1] बुद्धाला म्हणतो, "भगवन्, आतां आपण परिनिर्वाणाला जा. हा आपला परिनिर्वाणकाल आहे. तुम्ही म्हणालांत कीं, 'हे मार, जोंपर्यंत माझे भिक्षु .... भिक्षुणी .... उपासक .... उपासिका व्यक्त, विनीत, विशारद, बहुश्रुत, धर्मधर, धर्मानुधर्म-प्रतिपन्न, सामीचीप्रतिपन्न, धर्माप्रमाणें वागणारे, माझा धर्म शिकून उत्तम रितीनें उपदेश करण्यास समर्थ व वादांत हार न जाणारे असे श्रावक व श्राविका होणार नाहींत तोंपर्यंत मी परिनिर्वाणाला जाणार नाहीं.' परंतु आतां तुमच्या भिक्षु, भिक्षुणी वगैरे श्रावक, श्राविका तुमच्या म्हणण्याप्रमाणें तयार झाल्या आहेत. तेव्हां आतां आपण परिनिर्वाणाला जा. आपला हा परिनिर्वाण काल आहे.[2] "

ह्यावरून असें सिद्ध होतें कीं, व्यवहारांत जरी भिक्षुभिक्षुणींना उपासक-उपासिका नमस्कारादिकेंकरून मान देत असत, तरी वाङ्मयाच्या ज्ञानांत आणि धर्माचरणांत सर्वांना सारखेंच मानण्यांत येत असे. आतां या एतदग्ग प्रकरणांत ७५ व्यक्तींचा उल्लेख आला असतां त्यांना ८० महा-श्रावक म्हणतां येईल कीं काय, हा प्रश्न राहिला. त्याचें सरळपणें उत्तर देतां येणें कठीण आहे. ज्या अर्थी पालि वाङ्मयांत ८० महाश्रावकांची

१. दीघनिकाय भाग. २. पृष्ठ १०४–१०५.

२. भिक्षुभिक्षुणी व उपासक-उपासिका ह्यांचा निरनिराळचा कलमांत उल्लेख आहे. पण सर्वांना लावलेलीं विशेषणें एकच असल्यामुळें येथें तो सर्व मजकूर थोडक्यांत आणण्याचा प्रयत्न केला आहे.

यादी कोठेंच सांपडत नाहीं, त्या अर्थी त्यांचा संबंध ह्या एतदग्ग प्रकरणाकडे लावल्याशिवाय दुसरा मार्ग दिसत नाहीं. जुन्या टीकाकारांना अनुसरून मध्यमपदलोपी समास करून कसा तरी अर्थ लावणें भाग आहे. 'असीति महासावका' येथें 'असीतिया सुत्तेहि वण्णिता महासावका,' असा पदच्छेद केला तर कदाचित् ह्याचा अर्थ लागेल. ८० सुत्तें पाहून त्यांतील व्यक्तींची गणना न करतां 'असीति महासावका' म्हणण्याचा प्रघात पडला असावा, हेंहि संभवनीय आहे. कांहीं असो, ज्या अर्थी एतदग्ग प्रकरणाशिवाय दुसरी अत्यंत प्राचीन अशी महाश्रावकांची यादी उपलब्ध नाहीं, त्या अर्थी त्या प्रकरणांत आलेल्या व्यक्तींची चरित्रें— अंगुत्तर निकायअट्ठकथेच्या (मनोरथपूरणीच्या) आधारें, आणि जेथें शक्य असेल तेथें सुत्त आणि विनय पिटकाच्या आधारें— 'महाश्रावकांचा परिचय' ह्या सदराखालीं थोडक्यांत देत आहें.

एतदग्ग प्रकरणांत ज्या ज्या व्यक्तीसंबंधानें जें जें सुत्त आहे, त्या त्या सुत्ताचें भाषांतर त्या त्या व्यक्तीच्या चरित्राच्या आरंभीं अवतरणांत दिलें आहे.

## १

## आज्ञात कौण्डिन्य[१]

"भिक्षुहो, दीर्घकाल संघांत रहाणाऱ्या माझ्या भिक्षुश्रावकांत कौण्डिन्य पहिला आहे."

बोधिसत्त्व जन्मल्यावर ज्या आठ ब्राह्मणांनीं त्याचें भविष्यकथन केलें, त्या सर्वांत हा अत्यंत तरुण होता. कौडिन्य हें त्याचें गोत्र व सुदत्त हें नांव, असें जातकअट्ठकथाकाराचें म्हणणें आहे. इतर ब्राह्मणांनीं बोधिसत्त्वाचें भविष्य द्विधा कथन केलें—जर तो गृहस्थाश्रमांत राहिला, तर चक्रवर्ती होईल; संन्यासी झाला तर बुद्ध होईल. पण कौण्डिन्यानें त्याचीं लक्षणें पाहून तो खात्रीनें बुद्ध होणार असें सांगितलें. बोधिसत्त्वानें गृहत्याग केला

---

१. ह्याला त्रिपिटकांत 'अञ्ञा कोण्डञ्ञ' असें म्हटलें आहे व ललितविस्तराच्या आरंभीं 'ज्ञान कौण्डिन्य' म्हटलें आहे.

त्या वेळीं कौण्डिन्याचे साथीदार ह्यात नव्हते. तेव्हां तो त्यांच्या मुलांना म्हणाला, " गौतमानें गृहत्याग केला असून तो खात्रीनें बुद्ध होणार आहे, तर आपणहि प्रव्रज्या घेऊन त्याच्या धर्मामृताचा लाभ करून घेऊं. " त्या सात ब्राह्मणांच्या मुलांपैकीं चौघांनीं कौण्डिन्याबरोबर प्रव्रज्या घेतली, – व हे पांच जण " पंचवर्गीय भिक्षु ' ह्या नांवानें प्रसिद्धीला आले. उरुवेला प्रदेशांत बोधिसत्त्वानें घोरतम तपस्या आरंभली, त्या वेळीं हे त्याची सेवा करीत असत. पण बोधिसत्त्वानें देहदंडनाची निष्फलता जाणून परिमित आहार ग्रहण करण्यास सुरवात केल्याबरोबर, तो पतित झाला असें वाटून ह्यांनीं त्याला सोडून दिलें; व ते वाराणसीला गेले. पुढें बुद्धाला बोधिवृक्षाखालीं धर्मज्ञान झालें. तेव्हां त्यानें आळार कालाम व उद्रक रामपुत्र ह्या आपल्या दोन बोधिसत्त्वावस्थेंतील गुरूंना प्रथम धर्मोपदेश करण्याचा विचार मनांत आणला. पण ते दोघेहि नुकतेच निवर्तले होते. तेव्हां त्यानें ह्या पंचवर्गीय भिक्षूंस प्रथमतः उपदेश करावा, असा बेत केला, व उरुवेलेहून प्रवास करीत करीत आषाढ पौर्णिमेच्या सुमारास तो वाराणसीला ऋषिपत्तनांत— जेथें पंचवर्गीय भिक्षु रहात होते तेथें—आला.

त्याला पाहून पंचवर्गीय भिक्षु परस्परांला म्हणाले, " हा ढोंगी श्रमण येत आहे, हा पतित गौतम येत आहे; त्याचा कोणत्याहि प्रकारें आदरसत्कार करतां कामा नये. एक तेवढें आसन येथें मांडावें. त्याची इच्छा असेल तर बसेल, नाहीं तर नाहीं ! " परंतु जसजसा बुद्ध जवळ येत गेला, तसतसा पंचवर्गीयांचा बेत ढांसळत गेला. एकानें आसन मांडलें, तर दुसऱ्यानें पाय धुण्यास पाणी तयार केलें, आणि बाकीच्यांनीं भिक्षापात्र व चीवर घेऊन बुद्धाचा सन्मान केला. आपणाला धर्मज्ञानाचा साक्षात्कार झाल्याचें वर्तमान भगवंतानें त्यांस सांगितलें; पण आरंभीं त्यांचा विश्वास बसेना. शेवटीं आषाढ पौर्णिमेच्या दिवशीं भगवंतानें त्यांना पहिला धर्मोपदेश केला. तो ह्या पंचवर्गीयांत प्रथमतः कौण्डिन्याला पटला. तेव्हां बुद्ध उद्गारला, " कौण्डिन्यानें जाणलें ( अञ्ञासि वत भो कोण्डञ्ञो, अञ्ञासि वत भो कोण्डञ्ञो ). " तेव्हांपासून त्याला ' आज्ञात कौण्डिन्य ' असें नांव पडलें.

# २ आणि ३

# सारिपुत्त आणि मोग्गल्लान

"भिक्षुहो, माझ्या महाज्ञानी भिक्षुश्रावकांत सारिपुत्त श्रेष्ठ आहे."

"भिक्षुहो, माझ्या बुद्धिमान भिक्षुश्रावकांत महामोग्गल्लान श्रेष्ठ आहे."

हे दोघेहि राजगृहाजवळ सधन ब्राह्मणकुळांत जन्मले, ते वयानें भगवंतापेक्षां मोठे होते. सारिपुत्त उपतिष्य[1] गांवच्या पुढारी कुटुंबांत जन्मला म्हणून त्याला 'उपतिष्य' हेंच नांव ठेवण्यांत आलें होतें. सारि ब्राह्मणीचा मुलगा म्हणून त्याला सारिपुत्त म्हणत असत, व ह्याच नांवानें पुढें तो प्रसिद्धीस आला. कोलित[1] गांवच्या पुढारी कुटुंबांत जन्मल्यामुळें मोग्गल्लानाला 'कोलित' हेंच नांव ठेवण्यांत आलें होतें. मोग्गली ब्राह्मणीचा मुलगा म्हणून त्याला मोग्गल्लान म्हणत, व ह्याच नांवानें पुढें तो प्रसिद्धीस आला. ह्या दोन कुटुंबांत पुष्कळ पिढ्यांचें सख्य नांदत होतें. त्यांत सारिपुत्त आणि मोग्गल्लान समवयस्क व समानशील असल्या कारणानें त्या दोघांची निकट मैत्री जडली. बाहेर गांवीं कोठेंहि जावयाचें असलें तर ते एकामेकांना सोडून जात नसत.

राजगृह येथें टेंकडीवर दर वर्षी जत्रा भरत असे. तिला गिरग्गसमज्जा (गियग्रसमज्या) म्हणत असत. हे दोघेहि तेथें जाऊन नाचतमाशा पहाण्यांत गुंतले असतां त्यांच्या मनांत पूर्वपुण्यप्रभावानें एकाएकीं असा विचार आला कीं, शंभर वर्षांनंतर ह्यांतील एकहि प्राणी शिल्लक रहावयाचा नाहीं. ते दोघेहि विचारांत मग्न झाले. शेवटीं कोलित उपतिष्याला म्हणाला, "मित्रा, तूं रोजच्याप्रमाणें आनंदी दिसत नाहींस, याचें कारण काय?" तेव्हां उपतिष्यानें आपल्या मनांतला विचार सांगितला; व कोलिताच्या विचारमग्नतेचें कारण विचारलें. कोलितानेंहि, आपल्या मनांत तंतोतंत तोच विचार आला, असें जेव्हां सांगितलें, तेव्हां तेथेंच त्या दोघांनीं गृहत्याग करून परिव्राजक होण्याचा निश्चय केला; आणि राजगृह येथें

१. सारिपुत्त आणि मोग्गल्लान हे प्रसिद्धीला आल्यावर त्यांच्या जन्मग्रामाला त्यांचीं लहानपणचीं नांवें दिलीं गेलीं असतील, हेंहि संभवनीय आहे.

राहणाऱ्या प्रसिद्ध संजय परिव्राजकाचे ते दोघेहि शिष्य झाले. परंतु संजयाच्या धर्माच्या अभ्यासानें त्यांच्या मनाला शांति मिळेना. तेव्हां त्यांनीं असा निश्चय केला कीं, इतर पंथाच्या श्रमणांशीं धर्मचर्चा करून जर आपणांपैकीं एखाद्याला खऱ्या मार्गाचा बोध झाला, तर त्यानें ती गोष्ट तत्काळ दुसऱ्याला कळवावी, व दोघांनींहि मिळून त्या पंथांत शिरावें.

वाराणसी येथें धर्मचक्राची स्थापना करून व साठ भिक्षूंना धर्मोपदेशासाठीं इतस्ततः पाठवून बुद्ध भगवान् स्वतः उरुवेलेला आला. तेथें त्यानें उरुवेलकाश्यप, नदीकाश्यप व गयाकाश्यप ह्या तीन प्रसिद्ध जटिल तपस्वी बंधूंना आपल्या संघांत घेतलें, व त्यांच्या पंथांतील सर्व जटिलांना भिक्षु करून ह्या मोठ्या भिक्षुसमुदायासह तो राजगृहाला आला. येथें बिंबिसारराजानें त्याचा मोठा गौरव करून त्याला व भिक्षुसंघाला राहण्यासाठीं वेळुवन नांवाचें उद्यान दान दिलें. बुद्ध भगवान् ह्या उद्यानांत रहात असतां एके दिवशीं अस्सजि (अश्वजित्) भिक्षु राजगृहांत भिक्षाटन करीत होता. त्याची प्रसन्न चर्या पाहून सारिपुत्ताच्या मनांत एकदम त्याजविषयीं आदर उत्पन्न झाला. परंतु भिक्षाटनाच्या वेळीं प्रश्न विचारणें योग्य नव्हतें, म्हणून कांहीं एक न बोलतां सारिपुत्त अस्सजीच्या मागोमाग राजगृहांतून बाहेर पडला; व अस्सजीला शहराबाहेर गांठून कुशलप्रश्नादि विचारून म्हणाला, "आयुष्मन्, तुझी चर्या प्रसन्न दिसत आहे. तुझा गुरु कोण ? तूं कोणत्या धर्मास अनुसरून वागतोस ?"

अस्सजिः– आयुष्मन् शाक्य कुलांतून निघून प्रव्रज्या घेतलेला महाश्रमण आहे. तो भगवान् माझा गुरु. त्या भगवंताच्या धर्मास अनुसरून मी वागतों.

सारिपुत्तः– तुझ्या गुरूचा धर्म कोणता ? तो कोणतें मत प्रतिपादन करतो ?

अस्सजिः– मी ह्या पंथांत नुकताच आलों आहें. तेव्हां माझ्या गुरूचा धर्म सविस्तर मला सांगतां येत नाहीं. पण तो थोडक्यांत मी तुला सांगूं शकेन.

सारिपुत्तः– संक्षेपानें सांग किंवा विस्तारानें सांग. भावार्थ सांग म्हणजे झालें. मला भावार्थ पाहिजे आहे. पुष्कळ शब्द घेऊन काय करावयाचे ?

अस्साजि:- कारणापासून उत्पन्न झालेले जे पदार्थ ( पंचस्कंधादिक दु:खद पदार्थ ) त्यांचें कारण तथागतानें सांगितलें आहे, आणि त्यांचा निरोध कसा होतो हेंहि सांगितलें आहे; हेंच महाश्रमणाचें मत होय.[1]

तें ऐकून सारिपुत्ताच्या अंत:करणांत तत्काळ चक्क प्रकाश पडला. ज्या दु:खाचा उत्पाद होतो त्याचा निरोधहि झाला पाहिजे, आणि हाच तो मोक्षाचा मार्ग आहे, अशी त्याची खात्री झाली. त्यानें मोग्गल्लानापाशीं जाऊन हें वर्तमान त्याला सांगितलें. तेव्हां मोग्गल्लान म्हणाला, "ह्या पंथांत आमच्या आश्रयानें रहाणारे हे अडीचशें भिक्षु आहेत. त्यांनाहि आपण ही गोष्ट कळवूं." त्यांजजवळ जाऊन सारिपुत्त आणि मोग्गल्लान त्यांना म्हणाले, "तुम्ही आमच्या आश्रयानें या परिव्राजकपंथांत रहात आहां. पण आतां आम्हीं भगवंताच्या पंथांत जाण्याचा निश्चय केला आहे. जर तुमची इच्छा असेल तर आमच्या बरोबर चला." ह्या दोघांनीं आपला विचार संजय परिव्राजकालाहि कळविला. तेव्हां संजय म्हणाला "तुम्ही असें करूं नका. आपण तिघेहि ह्या परिव्राजकसंघाचे प्रमुख होऊं." पण सारिपुत्त आणि मोग्गल्लान ह्यांनीं त्याचें बोलणें ऐकलें नाहीं; आणि आपल्या आश्रयानें रहाणाऱ्या २५० परिव्राजकांना घेऊन ते भगवंताकडे गेले. त्यामुळें संजयाला अत्यंत दु:ख झालें.

भगवान् ह्या वेळीं वेळुवनांत रहात होता. सारिपुत्त आणि मोग्गल्लान येत असल्याचें पाहून तो भिक्षूंना म्हणाला, "कोलित आणि उपतिष्य हे दोघे इकडे येत आहेत. ते माझे अग्रश्रावक होतील." भगवंताजवळ येऊन त्यांनीं व त्यांच्या साथीदार परिव्राजकांनीं भिक्षुसंघांत घेण्याची भगवंताला विनंति केली. भगवान् म्हणाला, "भिक्षुहो, इकडे या. धर्माचें उत्तम विवरण केलें आहे. दु:खाचा पूर्णपणें उच्छेद करण्यासाठीं ब्रह्मचर्य आचरा." हीच ह्या सर्वांची उपसंपदा झाली.

---

१ मूळ गाथा अशी आहे:—

**येधम्मा हेतुप्पभवा हेतुं तेसं तथागतो आह ।**
**तेसं च यो निरोधो एवंवादी महासमणो ॥**

ही गाथा फार प्रसिद्ध असून प्राचीन शिलालेखांत पुष्कळ ठिकाणीं सांपडते.

त्रिपिटक वाङ्मयांत ज्याचा प्रवेश झाला असेल, त्याला सारिपुत्त आणि मोग्गल्लान यांची थोरवी सांगण्याची आवश्यकता नाहीं. सारिपुत्तानें उपदेशिलेलीं पुष्कळ सुत्तें सुत्तपिटकांत आहेत. सेल ब्राह्मणानें, 'आपला सेनापति कोण' असा प्रश्न केला असतां भगवान् म्हणतोः—

**मया पवत्तितं चक्कं धम्मचक्कं अनुत्तरं ।**
**सारिपुत्तो अनुवत्तेति अनुजातो तथागतं ।।**

मीं प्रस्थापित केलेलें चक्र—श्रेष्ठ धर्मचक्र—सारिपुत्र चालवीत आहे. तथागताच्या मागोमाग जाणारा तो आहे.[१]

मोग्गल्लानाच्या योगसिद्धीसंबंधानें तर सुत्त आणि विनयपिटकांत अनेक गोष्टी उपलब्ध आहेत. तेव्हां मथळ्यावरील अवतरणांत केलेलें त्यांचें अतिसंक्षिप्त गुणवर्णन यथार्थ आहे, हें निराळें सांगणें नलगे.

## ४

## महाकाश्यप

"[२]अत्यंत साधेपणानें रहाणाऱ्या माझ्या भिक्षुश्रावकांत महाकाश्यप श्रेष्ठ आहे."

वाराणसी येथील ऋषिपत्तनांत धर्मचक्राची प्रस्थापना करून व उरुवेलकाश्यपादिक बंधूंना भिक्षुसंघांत घेऊन बुद्ध भगवान् राजगृहाला आला. त्या वेळीं मगध देशांतील महातीर्थ गांवच्या एका अत्यंत धनाढ्य

---

१ सुत्तनिपात, सेलसुत्त.

२ प्रत्येक अवतरणाच्या आरंभीं असलेला 'भिक्षुहो' हा शब्द येथपासून गाळला आहे. 'धुतवादानं यदिदं महा कस्सपो' असें मूळ वाक्य आहे. तेरा धुतंगांचें वर्णन विशुद्धिमार्गाच्या दुसऱ्या परिच्छेदांत आहे. तरी त्रिपिटकांत प्राधान्येंकरून चार धुतंगांचा उल्लेख आढळतो. अरण्यांतच रहाणें. चिंध्यांचींच चीवरें धारण करणें, तीनच चीवरें ठेवणें व आमंत्रण न स्वीकारतां भिक्षेवरच निर्वाह करणें, हीं तीं चार धुतंगें होत. महाकाश्यप आजीवन हीं धुतंगें पाळीत होता; व तीं पाळण्याविषयीं दुसऱ्या भिक्षूंना उपदेश करीत होता. म्हणून साधेपणानें वागणाऱ्या भिक्षूंत त्याला अग्रस्थान मिळालें.

ब्राह्मणकुळांत महाकाश्यपाचा जन्म झाला[1]. त्याचें लहानपणचें नांव पिप्फलि असें होतें. तो वयांत आल्यावर लग्न करण्यासाठीं आईचा त्याच्या मागें तगादा लागला. आमरण ब्रह्मचर्य पाळण्याचा निश्चय व मातृप्रेम ह्यांच्या तो कचाटयांत सांपडला. शेवटीं एका सोनाराला हजार मोहरा ( निष्क ) देऊन त्यानें सोन्याची एक उत्तम स्त्रीप्रतिमा बनविली, व ती वस्त्रांनीं, दागिन्यांनीं आणि फुलांनीं अलंकृत करून तो आईला म्हणाला, “अशा तऱ्हेची सुंदर स्त्री मिळेल तर मी लग्न करीन.” तशी सुस्वरूप स्त्री मिळणार नाहीं व आपणाला आमरण अविवाहित रहातां येईल असें काश्यपाला वाटत होतें. पण त्याची आई मोठी खटपटी. तिनें आठ हुशार ब्राह्मणांना तशा सुंदरीच्या शोधासाठीं देशोदेशीं पाठविलें. मद्र राष्ट्रांतील स्त्रियांच्या सौंदर्याची त्यावेळीं फार ख्याती होती. तेव्हां तें ब्राह्मण प्रथमतः त्या राष्ट्रांतील शागल नगराला आले, व ती सुवर्णमूर्ति नदीकांठीं ठेवून तेथें विश्रांतीसाठीं बसले. कौशिक गोत्री ब्राह्मणाच्या दासीनें त्याच्या मुलीला-भद्रेला-न्हाऊं घालून स्वतः स्नान करण्यासाठीं ती नदीवर आली. त्या सुवर्णमूर्तीला पाहून आपल्या मालकाचीच मुलगी तेथें आली असावी, असा तिला भास झाला; व ती मोठ्यानें हात उगारून म्हणाली, “अग, तुला एकटीला येथें येऊन बसण्याला लाज वाटत नाहीं काय?” ते ब्राह्मण म्हणाले, “बाई, अशा तऱ्हेची सुंदर स्त्री तरी कोण आहे?”

दासी:– अहो, ही तुमची प्रतिमा जड आहे. पण आमची भद्रा जिवंत सौंदर्याची पुतळी आहे. तिची ह्या प्रतिमेशीं कशी तुलना करतां येईल?

---

१ भगवान् बुद्ध होऊन राजगृह येथें आला, तेव्हां त्याचें वय कमींत कमी सदतीस वर्षांचें असलें पाहिजे. मनोरथपूरणीच्या म्हणण्याप्रमाणें महाकाश्यपाचा जन्म ह्या वेळीं झाला असें जर गृहीत धरलें, तर भगवंताच्या परिनिर्वाण-समयीं महाकाश्यपाचें वय त्रेचाळीस वर्षांचें असलें पाहिजे. एवढ्या तरुणपणीं राजगृह येथें भरलेल्या पहिल्या संगीतीचा ( सभेचा ) त्याला अध्यक्ष नेमण्यांत आलें, हें संभवत नाहीं. दुसरा एक मनोरथपूरणीच्या विरुद्ध बळकट पुरावा सांपडतो. कस्सपसंयुत्ताच्या पांचव्या सुत्तांत भगवान् कस्सपाला म्हणतो, “कस्सप, आतां तूं म्हातारा झाला आहेस. हीं तागाचीं पांसुकूलें ( चिंध्यांचीं वस्त्रें ) धारण करणें तुला आतां जड जाईल.” त्रेचाळीस वर्षांच्या वयापूर्वीं बुद्धकाळीं तरी मनुष्य म्हातारा होत नसला पाहिजे.

त्या ब्राह्मणांनीं कौशिक ब्राह्मणाच्या घरीं जाऊन 'आम्ही काश्यपाच्या बापाकडून त्याच्या मुलाला मुलगी पहाण्यासाठीं येथें आलों आहों, व आपली मुलगी काश्यपाला पसंत पडेल, अशी आमची खात्री आहे,' वगैरे सर्व सांगितलें. काश्यपाचा बाप कपिल ब्राह्मण फार प्रसिद्ध होता; तेव्हां अशा कुटुंबांत आपली मुलगी जाणें कौशिकाला इष्टच होतें. त्याला त्यांचें म्हणणें पसंत पडलें, व त्याप्रमाणें परस्पर कुटुंबांत पत्रव्यवहार होऊन वाङ्निश्चय झाला.

काश्यपाचें वय वीस वर्षांचें व भद्रेचें सोळा वर्षांचें होतें. वाङ्निश्चयाचें वर्तमान समजल्याबरोबर त्या दोघांनीं परस्परांना अशा अर्थाचीं पत्रें लिहिलीं कीं, प्रपंचांत रहाण्याचा आपला विचार नाहीं; तेव्हां विवाहपाशांत बद्ध झाल्यानें विनाकारण त्रास मात्र होणार आहे. हीं दोन्ही पत्रें भद्रेच्या आणि काश्यपाच्या पालकांच्या हातीं आलीं, व त्यांनी तीं परस्पर फाडून टाकलीं. 'लहान आहेत, कांहीं तरी भलतेच विचार डोक्यांत घेऊन बसतात,' असें त्यांना वाटलें असल्यास नवल नाहीं. ह्याप्रमाणें महाकाश्यपाची आणि भद्रेची इच्छा नसतांच त्यांना विवाहपाशांत बद्ध करण्यांत आलें.

त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें रात्रीं एकाच शयनगृहांत आणि एकाच पलंगावर त्या दोघांना निजावें लागत असे. परंतु दोघांच्याहि मध्यें दोन फुलांच्या माळा ठेवून भद्रा काश्यपाला म्हणे, "ज्याच्या बाजूची माळ कोमेजेल, त्याच्या मनांत कामविकार उत्पन्न झाला, असें समजावें." महाकाश्यपाचे वडील जोंपर्यंत जिवंत होते, तोंपर्यंत त्याला किंवा भद्रेला गृहत्याग करतां येणें शक्य नव्हतें. परंतु एका घरांत राहिल्यानें त्यांच्या अखंड ब्रह्मचर्यांत आणि उदात्त प्रेमांत कधींहि [illegible] नाहीं. जेव्हां महाकाश्यपाचीं आईबापें निवर्तलीं, तेव्हां तो भद्रेला म्हणाला, "तूं आपल्या घरून आणलेलें द्रव्य, व ह्या घरांत असलेलें द्रव्य आजपासून तुझेंच आहे."

भद्राः— "पण आपण कोठें चाललां ?"

काश्यपः— "मी आतां प्रव्रज्या घेणार आहें."

भद्राः— "हा आपला विचार मलाहि पसंत आहे. आपल्या मागोमाग मीहि येतें."

महाकाश्यप परिव्राजकवेशानें घरांतून बाहेर पडला. त्याच्या मागोमाग भद्राहि परिव्राजिका होऊन निघाली. त्यांच्या नोकरचाकरांनीं व मालकीच्या गांवांत रहाणाऱ्या रयतेनें त्यांला ओळखलें, आणि परत फिरण्यास अतिशय आग्रह केला. पण महाकाश्यपाचा निश्चय मुळींच ढळला नाहीं. गांवापासून कांहीं अंतरावर गेल्यावर तो भद्रेला म्हणाला, "भद्रे, तुझ्यासारखी सुंदर स्त्री माझ्या मागोमाग चाललेली पाहून, प्रव्रज्या घेतली तरी ह्या दोघांचा घरगुती संबंध तुटला नाहीं, अशी कुकल्पना लोकांच्या मनांत उत्पन्न होणें संभवनीय आहे. अशा विकृतविचाराला आपण कारणीभूत कां व्हावें ? चल, येथें हे दोन रस्ते झाले आहेत; तूं एकानें जा व मी दुसऱ्यानें जातों."

भद्राः— आपण म्हणतां तें ठीक आहे. ज्या अर्थी आपण थोर आहांत, त्या अर्थी आपण उजव्या रस्त्यानें जा, व मी डाव्या रस्त्यानें जातें.[1]

त्या दिवशीं बुद्ध भगवान् राजगृह आणि नालंदा ह्यांच्या दरम्यान असलेल्या बहुपुत्रक नांवाच्या एका वडाच्या झाडाखालीं बसला होता. महाकाश्यपानें जातांना त्याला पाहिलें, व त्याची भव्य मुद्रा पाहून, 'हाच माझा गुरु आहे,' अशी महाकाश्यपाची खात्री झाली. भगवंतानें त्याला उपदेश केला, व महाकाश्यपाला बरोबर घेऊन भगवान् त्या वडाखालून निघाला. वाटेंत विश्रांतीसाठीं बसण्याची त्याची इच्छा दिसून आल्यामुळें महाकाश्यपानें आपलें पांघरण्याचें वस्त्रखंड जमिनीवर पसरलें. त्यावर बसून बुद्ध भगवान् म्हणाला, "काश्यप, हें तुझें वस्त्रखंड मऊ लागतें."

काश्यपः— भगवान्, तें आपण ग्रहण करा."

भगवान्ः— हें जर मी घेतलें तर तूं काय पांघरशील ?"

काश्यपः— आपली तेवढी संघाटि मला द्याल, तर ती मी पांघरीन."

भगवान्ः— पण काश्यप, ही चिंध्यांची केलेली संघाटि पुष्कळ दिवस वापरल्यानें जीर्ण झाली आहे. ती सामान्य माणसाला वापरतां येणें शक्य नाहीं.

काश्यपानें ती आग्रहपूर्वक मागून घेतली, व त्या दिवसापासून कधींहि गृहस्थानें दिलेलें वस्त्र वापरलें नाहीं. आपलीं चीवरें तो चिंध्यांचींच

---

१ ह्याच्या पुढील भद्रेची गोष्ट ५१ व्या प्रकरणांत पहावी.

बनवीत असे; व तींहि तीनच ठेवीत असे. तो जंगलांत राही, व पिंडपातावरच ( भिक्षेवरच ) आपला निर्वाह करी.

कस्सपसंयुत्ताच्या चंदूपमसुत्तांत भगवान् हवेंत हात हालवून भिक्षूंना म्हणतो, "भिक्षुहो, हा माझा हात हवेंत चिकटत नाहीं आणि बद्ध होत नाहीं. ह्याप्रमाणें कुटुंबांत भिक्षाटन करीत असतां ज्या भिक्षूचें चित्त तेथें बद्ध होत नाहीं, ज्यांची लाभ करून घेण्याची इच्छा असेल, त्यांना लाभ होवो, व ज्यांना (दायकांना) इच्छा असेल ते पुण्य जोडोत, अशा विचारानें जो आपणाला मिळालेल्या वस्तूनें जसा संतुष्ट होतो तसाच इतरांना मिळालेल्या वस्तूनेंहि प्रमुदित होतो—अशा प्रकारचा भिक्षु कुटुंबांत भिक्षाटन करण्याला योग्य आहे. भिक्षुहो, कुटुंबांत भिक्षाटन करीत असतां काश्यपाचें चित्त तेथें बद्ध होत नाहीं... आपणाला मिळालेल्या वस्तूनें जसा तो संतुष्ट होतो, तसाच दुसऱ्याला मिळालेल्या वस्तूनें प्रमुदित होतो.... भिक्षुहो, लोक माझा धर्मोपदेश ऐकतील, आणि प्रसन्न होतील व माझी योग्य संभावना करतील अशा बुद्धीनें जो भिक्षु धर्मोपदेश करतो, त्याचा तो धर्मोपदेश शुद्ध नव्हे...पण जो, माझा धर्मोपदेश ऐकून धर्म जाणतील व त्याप्रमाणें वागतील, अशा शुद्ध विचारानें केवळ करुणेनें, दयेनें आणि अनुकंपेनें इतरांना धर्मोपदेश करतो, त्याचा तो धर्मोपदेश शुद्ध होय. भिक्षुहो, काश्यप अशाच बुद्धीनें इतरांना धर्मोपदेश करीत असतो."

बुद्ध भगवंताच्या परिनिर्वाणानंतर तीन महिन्यांनीं राजगृह येथें धर्माचा आणि विनयाचा संग्रह करण्यासाठीं जी पांचशें भिक्षूंची सभा (संगीति) भरली होती, तींत महाकाश्यपाला अध्यक्ष (संघस्थविर) निवडण्यांत आलें होतें. ह्यावरून संघांत महाकाश्यपाचा केवढा मोठा मान होता, हें स्पष्ट दिसतें.

## ५

## अनुरुद्ध

"माझ्या दिव्यचक्षु भिक्षुश्रावकांत अनुरुद्ध श्रेष्ठ आहे."

अनुरुद्धाचा जन्म अमितोदन शाक्याच्या घरीं[1] झाला. महानाम शाक्य त्याचा वडील बंधु. पित्याच्या मरणानंतर तोच घरची सर्व व्यवस्था पहात असे. अनुरुद्धाला प्रपंचाची माहिती मुळींच नव्हती. बुद्ध भगवंताची सर्वत्र प्रसिद्धि झाल्यावर थोर थोर शाक्य कुळांतील तरुण, भिक्षु होऊन त्याच्या संघांत प्रवेश करूं लागले. तेव्हां महानाम अनुरुद्धाला म्हणाला, "आमच्या कुळांतून एकहि भिक्षु झाला नाहीं. तेव्हां तूं तरी भिक्षु हो, किंवा मी तरी भिक्षु होतों." अनुरुद्ध म्हणाला, "माझ्यानें हें काम झेंपणार नाहीं. तेव्हां तुम्हीच भिक्षु व्हा."

महानामानें ही गोष्ट कबूल केली, व धाकट्या भावाला प्रपंचाची माहिती करून देऊं लागला. शेत नांगरावें कसें, पेरावें कसें, त्याला पाणी कसें द्यावें लागतें, त्याची कापणी कशी करतात इत्यादि माहिती करून देत असतां अनुरुद्ध म्हणाला, "ही खटपट फारच मोठी दिसते. तेव्हां घरचा व्यवहार तुम्हीच संभाळा. मी भिक्षु होतों." पण ह्या कामीं त्याला आपल्या आईची संमति मिळेना, व तो हट्ट धरून बसला. तेव्हां ती म्हणाली, "शाक्यांचा राजा भद्दिय जर तुझ्याबरोबर भिक्षु होत असेल तर मी तुला भिक्षु होण्यास परवानगी देतें."

भद्दिय अनुरुद्धाचा मित्र होता, व तो राज्यपद सोडून भिक्षु होण्यास तयार होणार नाहीं, असें अनुरुद्धाच्या आईला वाटत होतें. पण अनुरुद्ध

---

१ 'अमितोदनसक्कस्स गेहे पटिसांध गण्हि.' आनंदासंबंधानें लिहितांना ह्याच अट्ठकथेंत 'अमितोदनसक्कस्स गेहे निब्बत्ति' असें म्हटलें आहे. परंतु मज्झिमनिकायाच्या चूळदुक्खक्खन्ध सुत्ताच्या अट्ठकथेंत ह्या कुटुंबाची माहिती दिली आहे ती अशी:—

शुद्धोदन, शुक्लोदन, शाक्योदन, धोतोदन आणि अमितोदन हे पांच भाऊ. अमितादेवी त्यांची बहिण. तिष्यस्थविर तिचा मुलगा. तथागत आणि नंद शुद्धोदनाचे मुलगे. महानाम आणि अनुरुद्ध शुक्लोदनाचे, व आनंदस्थविर अमितोदनाचा मुलगा. तो भगवंतापेक्षां लहान, आणि महानाम मोठा. येथें दिलेल्या अनुक्रमांत अमितोदन शेवटला भाऊ दिसतो, व त्याचा मुलगा आनंद भगवंतापेक्षां वयानें लहान होता, हें ठीकच आहे. परंतु अमितोदनाच्या घरीं अनुरुद्धाचा जन्म झाला, ह्या मनोरथपूरणीच्या म्हणण्याला ह्यामुळें बळकट विरोध येतो.

त्याच्या जवळ जाऊन त्यालाही भिक्षु होण्याचा आग्रह धरून बसला. भद्दिय म्हणाला, " तूं सात वर्षें थांब. नंतर आपण दोघेहि भिक्षु होऊं." पण इतकीं वर्षें अनुरुद्ध थांबतो कसला ? सहा वर्षें, पांच वर्षें, चार तीन, दोन, एक वर्ष, सात महिने, असें करतां करतां भद्दिय सात दिवसांनीं अनुरुद्धाबरोबर जाण्यास कबूल झाला. एका आठवड्यानंतर भद्दिय, अनुरुद्ध, आनंद, भृगु, किम्बिल आणि देवदत्त हे सहा शाक्यपुत्र आणि त्यांच्या बरोबर उपालि नांवाचा न्हावी असे सात असामी चतुरंगिनी सेना सज्ज करून कपिलवस्तूपासून सेनेबरोबर दूर अंतरावर गेले, व तेथून सैन्य मागें फिरवून त्यांनीं शाक्य देशाची सीमा उल्लंघन केली. शाक्यकुमारांनीं आपल्या अंगावरचे दागिने काढून एका उपरण्यांत बांधले, व ते उपालीला म्हणाले, " हे अलंकार घेऊन तूं घरीं जा. हें द्रव्य तुझ्या निर्वाहाला पुरे आहे." तें गांठोडें घेऊन माघारें चालला असतां उपालीच्या मनांत असा विचार आला कीं, शाक्य क्षत्रिय मोठे तापट आहेत. 'ह्यानें आमच्या कुमारांना पळवून नेलें,' असें म्हणून माझा शिरच्छेद करण्यास ते कमी करावयाचे नाहींत. हे एवढे मोठे शाक्यकुमार गृहत्याग करून भिक्षु होत आहेत. मग मला घरांत राहून काय करावयाचें ? त्यानें अशा विचारानें तें गांठोडें एका झाडाला टांगलें, व तो शाक्य कुमारांच्या मागोमाग जाऊं लागला. 'तूं पुन्हां कां आलास ?' असा त्यांनीं प्रश्न केला तेव्हां उपालीनें आपल्या मनांतील विचार त्यांना कळविला.

त्या काळीं बुद्ध भगवान् अनुप्रिय नांवाच्या मल्लांच्या[1] गांवीं रहात होता. हे सहा शाक्यकुमार उपालीसह तेथें आले, व भगवंताला नमस्कार करून म्हणाले,

" भगवन् आम्ही शाक्य मोठे मानी आहोंत. तेव्हां आपण ह्या आमच्या उपालि न्हाव्याला प्रथम उपसंपदा द्या, म्हणजे ह्याला नमस्कार व ह्याची सेवा करावी लागल्यामुळें आमचा शाक्यकुलाभिमान नष्ट होईल."

त्यांच्या विनंतीप्रमाणें भगवंतानें प्रथम उपालीला, आणि नंतर त्या सहा शाक्यपुत्रांना प्रव्रज्या दिली. त्या वर्षाकाळीं अनुरुद्धानें ध्यानसमाधीचा अभ्यास करून दिव्यचक्षुज्ञान प्राप्त करून घेतलें.

---

१ वज्जींप्रमाणें ह्याचेंहि राज्य गणसत्ताक होतें.

भगवंताच्या परिनिर्वाणसमयीं अनुरुद्ध जवळ होता, भगवान् कोण-कोणत्या ध्यानांतून परिनिर्वाणाला गेला, हें त्यानें अंतर्ज्ञानानें जाणलें, अशा अर्थाचा उल्लेख महापरिनिर्वाण सूत्रांत आहे.

## ६

## कालिगोधेचा पुत्र भद्दिय

" उच्चकुलांत जन्मलेल्या माझ्या भिक्षुश्रावकांत कालिगोधेचा पुत्र भद्दिय श्रेष्ठ आहे."

अनुरुद्धाचा मित्र तो हाच. ह्याच्या आईचें नांव कालिगोधा होतें, हें स्पष्टच आहे. परंतु ह्याचा बाप कोण होता, व ह्याला आपल्या गुणांमुळें किंवा थोर कुळांत जन्मला म्हणून शाक्यराज्याची गादी मिळाली, ह्याचा थांग लागत नाहीं.

अनुरुद्धाबरोबर त्यानें प्रव्रज्या घेतली, व तो अरण्यांत किंवा झाडाखालीं रहात असतां, 'अहो सुख, अहो सुख,' असें म्हणत असे. तें ऐकून कांहीं भिक्षु भगवंताला म्हणाले, "भदन्त, हा भद्दिय एकाकी रहात असतां, 'अहो सुख, अहो सुख,' असें म्हणत असतो. त्यावरून तो ब्रह्मचर्य आचरण्यांत संतुष्ट नसावा' असें दिसून येतें. त्याला आपल्या राज्यसुखाची आठवण होत असली पाहिजे."

भगवंतानें भद्दियाला बोलावून आणलें, व त्याच्या ह्या उद्गारांचा अर्थ काय असा त्याला प्रश्न केला. तो म्हणाला, "भदंत, जेव्हां मी राजा होतों, तेव्हां राजमहालाच्या आंत व बाहेर, नगराच्या आंत व बाहेर, व सर्व राज्यांत माझ्या देहाच्या संरक्षणाबद्दल जय्यत तयारी ठेवण्यांत येत असे. असें असतां मी सदोदित साशंकितपणें व भयभीतपणें वागत असें. पण आतां मी जेथें जेथें राहतों, तेथें तेथें निःशंकपणें व निर्भयपणें राहतों. मला कशाशीच उत्कंठा नाहीं. अरण्यांत रहाणाऱ्या मृगांप्रमाणें माझें चित्त स्वतंत्र आहे, आणि ह्याच कारणास्तव माझ्या तोंडून, 'अहो सुख, अहो सुख,' असे उद्गार निघतात."

## ७

# लकुण्टक ( ठेंगणा ) भद्दिय

" माझ्या मंजुभाषी भिक्षुश्रावकांत लकुण्टक भद्दिय श्रेष्ठ आहे. "

हा श्रावस्ती येथें संपन्न कुळांत जन्मला, व जेव्हां बुद्ध भगवान् प्रथमतः श्रावस्तीला आला, त्याच वेळीं भगवंताचा उपदेश ऐकून त्यानें प्रव्रज्या घेतली, एवढी माहिती मनोरथपूरणींत सांपडते. पण निदानवग्गांतील भिक्खुसंयुत्तांत ह्यासंबंधानें एक सुत्त आहे. तें विशेष महत्त्वाचें वाटल्यामुळें त्याचें रूपांतर येथें देत आहें.

भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात असतां लकुण्टक भद्दिय तेथें आला. त्याला दुरून पाहून भगवान् भिक्षूंना म्हणाला, " भिक्षुहो, हा जो दुर्वर्ण, कुरूप, ठेंगणा, भिक्षूंच्या थट्टेला कारण असा भिक्षु येत आहे, त्याला तुम्हीं पाहिलें आहे काय ? "

" होय भदन्त, ' असें भिक्षूंनीं उत्तर दिलें.

" भिक्षुहो, हा मोठा बुद्धिमान् आणि महानुभाव आहे. अशी कोणतीहि समाधि नाहीं कीं, जी ह्याला प्राप्त झाली नाहीं. ज्या ध्येयासाठीं थोर लोक घर सोडून प्रव्रज्या स्वीकारतात, त्या ब्रह्मचर्याच्या पर्यवसानाचा ह्यानें साक्षात्कार करून घेतला आहे. " असें म्हणून भगवंतानें ह्या गाथा म्हटल्याः—

> **हंसा कोञ्चा मयूरा च हत्थियो पसदा मिगा ।**
> **सब्बे सीहस्स भायन्ति नत्थि कायस्मिं तुल्यता ॥ १ ॥**
> **एवमेव मनुस्सेसु दहरो चे पि पञ्ञवा ।**
> **सो हि तत्थ महा होति नेव बालो सरीरवा ॥ २ ॥**

( १ ) हंस, क्रौंच, मोर, हत्ती आणि मृग हे सर्व सिंहाला भितात. येथें शरीराची तुलना उपयोगी नाहीं.

( २ ) त्याप्रमाणें माणसांत लहान असून जो प्रज्ञावान् असतो तोच मोठा होय. महाशरीर मूर्ख मोठा ठरत नाहीं.

८

# पिंडोल भारद्वाज

"सिंहगर्जना[1] करणाऱ्या माझ्या भिक्षुश्रावकांत पिंडोल भारद्वाज श्रेष्ठ आहे."

ह्याचा जन्म राजगृह नगरांत एका ब्राह्मणकुलांत झाला. भारद्वाज हें त्याचें नांव. वयांत आल्यावर वेदाध्ययनांत पारंगत होऊन तो पांचशें शिष्यांना वेद शिकवीत असे. स्वभावानें जरा लोभी असल्यामुळें आपल्या शिष्यांसह जेवण्याखाण्याचीं आमंत्रणें मिळविण्यांत बरीच खटपट करीत असे. त्यामुळें पिंडोल म्हणजे 'पिंडासाठीं लोल' असें त्याला नांव पडलें. भगवान् राजगृहाला आल्यावर त्याचा धर्मोपदेश ऐकून भारद्वाज भिक्षु झाला, व लवकरच अर्हत्पद पावला.

ही मनोरथपूरणीची गोष्ट झाली. पण सळायतन संयुत्ताच्या तिसऱ्या पण्णासकाच्या चोवीसाव्या सुत्ताच्या अट्ठकथेंत[2] ह्याची गोष्ट निराळीच सांपडते:—

"हा अत्यंत दरिद्री ब्राह्मण होता, व भिक्षुसंघाचा लाभसत्कार पाहून उदरनिर्वाहासाठीं भिक्षु झाला. त्यानें एक मोठें मातीचें पात्र भिक्षेसाठीं ठेवलें होतें, व तो तें भरून पेज (यवागू) पीत असे, त्या पात्रभर वडे खात असे व भात जेवीत असे. त्याचा अधाशीपणाचा स्वभाव भिक्षूंनी भगवंताला कळविला. भगवंतानें त्याला 'पात्रस्थविका' (पिशवी) वापरण्यास परवानगी दिली नाहीं. तो आपलें पात्र खाटेखालीं ठेवीत असे. तें काढीत असतां व ठेवीत असतां झिजत गेलें व त्यामुळें त्यांत पावशेराचाच भात (नाळिकोदन) मावूं लागला. ही गोष्ट भगवंताला समजली तेव्हां त्यानें भारद्वाजाला पात्रस्थविका वापरण्यास परवानगी दिली. ह्याप्रमाणें पिंडासाठीं भिक्षु झाला

१ सिंहगर्जना किंवा सिंहनाद ह्याचा अर्थ 'मोठमोठ्यानें बोलणें' नव्हे. मुद्द्याची गोष्ट सांगून ती प्रतिपादन करण्याचें सामर्थ्य असणें, ह्याला सिंहगर्जना किंवा सिंहनाद म्हणतात.

२ केवळ सयामी अक्षरांनीं छापलेल्या अट्ठकथेच्या आधारें हा मजकूर लिहिला आहे.

म्हणून त्याचें 'पिंडोल' हें नांव पडलें. त्याचें गोत्र भारद्वाज होतें. दोन्ही मिळून 'पिंडोल भारद्वाज' म्हणत.

इंद्रियसंयुत्ताच्या एकुणपन्नासाव्या सुत्तांत पिंडोल भारद्वाजानें आपणाला अर्हत पद मिळाल्याचें आविष्करण केल्याची कथा आहे ती अशी:-

'एके समयीं बुद्ध भगवान् कौशांबी येथें घोषितारामांत रहात होता. त्या वेळीं पिंडोल भारद्वाजानें, आतां जन्म राहिला नाहीं, ब्रह्मचर्य परिपूर्ण झालें, कर्तव्य केलें, आणि ह्यापुढें भव नाहीं हें मी जाणतों, अशा रीतीनें अर्हत्पदप्राप्तीचें आविष्करण केलें.

ही गोष्ट भगवंताला कळवून भिक्षु म्हणाले, "भदंत, पिंडोल भारद्वाजानें असें कां केलें असावें ?" भगवान् म्हणाला, "स्मृति, समाधि आणि प्रज्ञा ह्या तीन इंद्रियांची[१] भावना परिपूर्ण झाल्यामुळें भारद्वाजानें अर्हत्पदप्राप्तीचें आविष्करण केलें आहे .... ही इंद्रियें जातिजरामरणाचा अंत करणारीं आहेत."

कौशांबी येथें असतांनाच तेथील राजा उदयन ह्याचा व भारद्वाजाचा संवाद वर सांगितलेल्या सळायतन संयुत्ताच्या सुत्तांत आला आहे. तो प्रसंग कसा घडून आला ह्याचें वर्णन त्या सुत्ताच्या अट्ठकथेंत आलें आहे तें असें:—

एके दिवशीं पिंडोल भारद्वाज गंगेच्या[२] [ यमुनेच्या ? ] कांठीं असलेल्या उदकस्थान नांवाच्या उदयन राजाच्या उद्यानांत येऊन विश्रांतीसाठीं एका वृक्षाखालीं बसला. उदयनराजानें त्यावेळी दारू पिण्याचा सप्ताह केला होता. सात दिवसपर्यंत यथेच्छ मद्यपान करून आठव्या दिवशीं आपल्या स्त्रीपरिवाराला घेऊन तो त्या उद्यानांत आला, व तेथें नाचतमाशाला सुरुवात झाली. राजा एका शय्येवर पडला होता, व एक बाई त्याचे पाय दाबीत बसली होती. इतक्यांत त्याला गाढ झोंप लागली. इकडे तिकडे फिरून मजा करण्याची हीच वेळ आहे, असें जाणून इतर स्त्रियांनीं आपलीं विविध वाद्यें तेथेंच ठेवून उद्यानांत प्रवेश केला. फळें फुलें

---

१ येथें इंद्रियशब्द सामर्थ्य किंवा शक्तिवाचक आहे.

२ सिंहल द्वीपांत बहुतेक नद्यांना गंगाच म्हणण्याची वहिवाट असे.

तोडीत त्या पिंडोल भारद्वाज बसला होता तेथें आल्या, व त्याला पाहून अत्यंत शांत वृत्तीनें त्याजवळ येऊन त्याला नमस्कार करून बाजूला बसल्या. लोभ सोडावा, ईर्ष्या सोडावी, मात्सर्याचा नाश करावा इत्यादि क्रमानें पिंडोल भारद्वाजानें त्यांना उपदेश केला.

इकडे पाय दाबणाऱ्या बाईनें पाय हालवून हालवून राजाला जागें केलें. ' इतर बायका कोठें गेल्या, ' असा त्यानें प्रश्न केला. तेव्हां ती म्हणाली, " आपणाला त्या कशाला पाहिजेत ? त्या एका श्रमणाला घेरुन बसल्या आहेत." चुलींत टाकलेल्या मिठाप्रमाणें तडतडणारा तो राजा अत्यंत क्रोधाविष्ट होऊन उठला. जवळच्या एका अशोक वृक्षावर तांबड्या मुंग्यांचें घरटें होतें. तें काढून भारद्वाजाच्या डोक्यावर फोडण्यासाठीं त्यानें ती फांदी वांकविली. परंतु तें घरटें तुटून राजाच्याच डोक्यावर पडलें. सगळें अंग भाताच्या तुसानें भरल्यासारखें झालें, आणि अंगाला मशाली लावल्यासारखा दाह होऊं लागला.

राजा क्रोधाविष्ट झाला, हें पाहून पिंडोल भारद्वाजानें आपल्या ऋद्धि-बळानें आकाशमार्गानें तेथून गमन केलें. तेथें बसलेल्या स्त्रिया राजाजवळ आल्या आणि राजाचें शरीर साफ करण्याच्या मिषानें खालीं पडलेल्या मुंग्या उचलून राजाच्या अंगावर टाकूं लागल्या. त्या म्हणाल्या, " दुसरे राजे श्रमणांना नमस्कार करीत असतात, पण आमचे राजेसाहेब श्रमणाच्या डोक्यावर मुंग्यांचें घरटें फोडूं पहात आहेत !" राजाला आपला अपराध दिसून आला, आणि उद्यानपाळाला बोलावून तो म्हणाला, " हा भिक्षु जर पुन्हां येथें आला तर मला वर्दी दे."

कांहीं दिवसांनीं भारद्वाज पुन्हां त्या उद्यानांत येऊन एका झाडा-खालीं बसला. आपणाला बक्षीस मिळण्याची ही चांगली संधि आहे असें जाणून उद्यानपाळानें धांवत जाऊन राजाला वर्दी दिली. तेव्हां बरोबर वाद्यें वगैरे न घेतां निवडक मंत्री घेऊन उदयन राजा तेथें आला. त्याचा भारद्वाजाबरोबर संवाद[१] झाला तो असाः–

राजा म्हणाला, " भो भारद्वाज, कांहीं भिक्षु तरुण असतां आमरण ब्रह्मचर्य पाळतात, हें कसें ?"

---

१ हा संवाद मूळ सुत्तांतच आहे.

भारद्वाजः—महाराज, भगवंतानें म्हटलें आहे कीं, भिक्षुहो, ज्या स्त्रिया तुमच्या आईच्या वयाच्या असतील, त्यांना तुम्ही आई माना; ज्या बहिणीच्या वयाच्या असतील, त्यांना बहिणी माना; आणि ज्या मुलीच्या वयाच्या असतील त्यांना मुली माना.

राजाः— पण, भो भारद्वाज, चित्त मोठें चंचल आहे. आईच्या वयाच्या, बहिणीच्या वयाच्या किंवा मुलीच्या वयाच्या स्त्रियांविषयींहि त्यांत कामविकार उत्पन्न होत असतात. तेव्हां त्याच्या दमनाला दुसरा कांहीं उपाय आहे काय, कीं, ज्याच्यामुळें तरुण भिक्षु आमरण ब्रह्मचर्य पाळूं शकतात ?

भारद्वाजः— महाराज, भगवंतानें म्हटलें आहे कीं, पायाच्या तळव्यापासून वर डोक्याच्या केसांखालीं त्वचेनें आच्छादलेल्या व अशुचि पदार्थांनीं भरलेल्या ह्या देहाचें तुम्ही नीट निरीक्षण करा; ह्या देहांत केंस, लोम, नखें, दांत, चामडी, मांस, स्नायु, हाडें, अस्थिमज्जा, वृक्क, हृदय, यकृत्, क्लोम, प्लीहा, फुप्फुस, आंतडें, आंतड्याच्या भोंवतालची दोरी, औदर्य [ कोठ्यांतील पदार्थ ], विष्ठा, पित्त, श्लेष्म, पू, रक्त, स्वेद, मेद, अश्रु, वसा, थुंकी, नाकांतील मळ, लसिका[१], मूत्र हे पदार्थ आहेत. महाराज, ह्या भावनेमुळें, ह्या कारणास्तव तरुण भिक्षु आमरण ब्रह्मचर्य पाळतात.

राजाः— भो भारद्वाज, ज्या भिक्षूंनीं अशा रितीनें देहाची भावना, शीलाची भावना, समाधीची भावना, प्रज्ञेची भावना केली असेल, त्यांना [ ब्रह्मचर्य पाळणें ] हें काम सुकर आहे. परंतु ज्यांनीं अशा प्रकारें भावना केली नसेल त्यांना हें कठीण जाईल. कारण कधीं कधीं अशुचि दृष्टीनें देहाकडे पहाण्याचा प्रयत्न केला तरी सौंदर्य दिसून येतें.[२]

भारद्वाजः— ( अशा तरुण भिक्षूंना ), महाराज, भगवंतानें म्हटलें आहे कीं, भिक्षुहो, तुम्ही इंद्रियांचें रक्षण करा. डोळ्यांनीं रूप पाहून

---

१ लसिका म्हणजे अवयवांच्या संधीमध्यें असलेला 'स्नेहमय पदार्थ,' असें बुद्धघोषाचार्याचें म्हणणें आहे. संस्कृत अर्थ 'लाळ' असा आहे.

२ कामासक्ति बळकट असली व इच्छाशक्ति दुर्बल असली म्हणजे स्वतःच्या शरीरांतील अशुभ पदार्थांचें ध्यान करीत असतां स्त्रीला पुरुषाची व पुरुषाला स्त्रीची आठवण होऊन त्या त्या पदार्थांचें सौंदर्यच दिसून येतें, व त्यामुळें असा प्रकार घडतो.

चेहऱ्याचें व हावभावादिकांचें ( कामासक्तिपूर्वक ) ग्रहण करूं नका. नेत्रेंद्रिय रक्षण केलें नाहीं तर विषय लोभ, दौर्मनस्य इत्यादिक पापकारक, अकुशल विचार मनांत शिरतील; म्हणून याचें नीट रक्षण करा. ( त्याचप्रमाणें इतर इंद्रियांचा रक्षणविधि समजावा ). महाराज, या कारणामुळें तरुण भिक्षु ब्रह्मचर्य पाळूं शकतात.

राजाः— फार चांगलें ! फार चांगलें ! भो भारद्वाज, त्या भगवंताचें हें म्हणणें फार चांगलें आहे. ह्याच कारणामुळें तरुण भिक्षु ब्रह्मचर्य पालन करीत असले पाहिजेत. जेव्हां मी शरीर, वाचा आणि मन ह्यांजविषयीं संयम न ठेवतां, स्मृति कायम न ठेवतां असंवृत इंद्रियांनीं अंतःपुरांत प्रवेश करतों तेव्हां कामविकार माझा पूर्णपणें पराभव करतात. पण जेव्हां मी काया, वाचा आणि मन संयमित करून स्मृति कायम ठेवून संवृत इंद्रियांनीं अंतःपुरांत जातों, त्यावेळीं कामविकार माझा पराभव करूं शकत नाहींत.

अशा रितीनें भारद्वाजाचा गौरव करून उदयन राजा भारद्वाजाचा उपासक झाला.

राजगृहक श्रेष्ठीनें चंदनाचें पात्र बांबूच्या टोंकाला लावून ठेवलें होतें. तें योगसिद्धिबळानें पिंडोल भारद्वाजानें तेथून घेतलें, ही कथा चुल्लवग्गाच्या पांचव्या खन्धकांत आहे व ती मनोरथपूरणींतहि घेतली आहे. परंतु तिचें ऐतिहासिक महत्त्व विशेष न वाटल्यामुळें ती येथें सविस्तर देण्यांत येत नाहीं.

## ९

## पुण्ण मन्तानिपुत्त

" माझ्या धर्मोपदेशक भिक्षुश्रावकांत पुण्ण मन्तानिपुत्त श्रेष्ठ आहे. "

हा आज्ञात कौण्डिन्याचा भाचा. आईचें नांव मन्तानी; म्हणून ह्याला मन्तानिपुत्त असें म्हणत असत. कपिलवस्तूजवळ द्रोणवस्तु नांवाच्या ब्राह्मण-ग्रामांत ह्याचा जन्म झाला. बुद्धाचा धर्म जाणून अर्हत्पद मिळविल्यावर कौण्डिन्य स्वदेशीं आला, व त्यानें ह्या आपल्या भाच्याला प्रव्रज्या दिली; व आज्ञात कौडिन्य पुन्हां बुद्धाजवळ आला, आणि भगवंताची परवानगी घेऊन एकाकी रहाण्याच्या उद्देशानें षड्दन्त सरोवराच्या प्रदेशांत गेला.

पुण्ण कपिलवस्तूजवळच रहात होता. भगवंताच्या धर्मांत पारंगत होऊन तो पुष्कळ शिष्यांना शिकवीत होता, तरी त्यानें भगवंताचें प्रत्यक्ष दर्शन घेतलें नव्हतें. कांहीं वर्षांनंतर आपल्या शिष्यांना पुढें पाठवून मागाहून एकटाच भगवंताच्या दर्शनाला येण्यासाठीं तो निघाला. ह्याच्या पुढील हकीगत मज्झिमनिकायांतील रथविनीत सुत्तांतच आली आहे. ती अशी:—

भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. वर्षावास संपल्यावर जातिभूमीहून[१] कांहीं भिक्षु भगवंताच्या दर्शनाला आले, आणि भगवंताला नमस्कार करून एका बाजूला बसले. त्यांना भगवान् म्हणाला, "भिक्षुहो, स्वतः अल्पेच्छ असून भिक्षूंना अल्पेच्छकथा सांगणारा, स्वतः संतुष्ट असून भिक्षूंना संतुष्टिकथा सांगणारा, स्वतः प्रविविक्त असून भिक्षूंना प्रविवेककथा सांगणारा, स्वतः असंसृष्ट असून भिक्षूंना असंसर्ग कथा सांगणारा, स्वतः आरब्धवीर्य असून भिक्षूंना वीर्यारंभकथा सांगणारा, स्वतः शीलसंपन्न असून भिक्षूंना शीलसंपत्तिकथा सांगणारा, स्वतः समाधिसंपन्न असून भिक्षूंना समाधिसंपत्तिकथा सांगणारा, स्वतः प्रज्ञासंपन्न असून भिक्षूंना प्रज्ञासंपत्तिकथा सांगणारा, स्वतः विमुक्तिसंपन्न असून भिक्षूंना विमुक्तिसंपत्तिकथा सांगणारा, स्वतः विमुक्तिज्ञानदर्शनसंपन्न असून भिक्षूंना विमुक्तिज्ञानदर्शनसंपत्तिकथा[२] सांगणारा उपदेशक, विज्ञापक, संदर्शक समादपक आणि समुत्तेजक अशी ज्याची संभावना केली जात आहे, असा जातिभूमींतील भिक्षूंमध्यें कोणी आहे काय?"

अशा प्रकारचा भिक्षु पुण्ण मन्तानिपुत्त आहे, असें त्यांनीं भगवंताला सांगितलें. सारिपुत्त तेथें जवळच बसला होता. तो आपल्या मनाशींच म्हणाला, "सहब्रह्मचारी ज्याची अशी स्तुति करतात, तो पुण्ण खरोखरच धन्य असला पाहिजे! आमची भेट झाली व संभाषणाचा प्रसंग आला तर फार चांगलें होईल!"

भगवान् योग्य काल राजगृहांत राहून अनुक्रमें उपदेश करीत करीत श्रावस्तीला आला. पुण्णाला ही बातमी लागली, तेव्हां तोहि एकटाच

---

१ जातिभूमि म्हणजे भगवंताची जन्मभूमि, शाक्यदेश.

२ ह्या दहा कथांना 'दसकथावत्थु' व त्या सांगणाऱ्या समर्थ भिक्षूला 'दसकथावत्थुलाभी' म्हणतात.

तेथें आला, व अनाथपिंडिकाच्या आरामांत जाऊन त्यानें भगवंताची भेट घेतली. भगवंतानें त्याला धर्मोपदेश केला; तेव्हां तो भगवंताला नमस्कार करून विश्रांतीसाठीं जवळच्या अंधवनांत जाण्यास निघाला. त्याला पाहून दुसरा एक भिक्षु सारिपुत्तापाशीं जाऊन त्याला म्हणाला, "आयुष्मन्, तूं ज्या पुण्णाची स्तुति करीत होतास, तो भगवंताला नमस्कार करून नुकताच अंधवनांत जाण्यास निघाला आहे." तें ऐकून त्वरेत्वरेनें आपलें आसन घेऊन सारिपुत्त पुण्णाचें डोकें दिसेल इतक्या अंतरावरून मागोमाग जाऊं लागला. पुण्ण अंधवनांत शिरून दुपारच्या वेळीं विश्रांति घेण्यासाठीं एका झाडाखालीं बसला. सारिपुत्तहि तेथेंच दुसऱ्या एका झाडाखालीं बसला.

सायंकाळीं सारिपुत्त पुण्णाजवळ जाऊन आगतस्वागत करून एका बाजूला बसला, आणि त्याला म्हणाला, "भगवंताच्या नेतृत्वाखालीं जें आम्ही ब्रह्मचर्य आचरीत आहों, तें शीलविशुद्धीसाठीं आहे काय?"

'नाहीं, आयुष्मन्', असें पुण्णानें उत्तर दिलें.

'चित्तविशुद्धीसाठीं, दृष्टिविशुद्धीसाठीं, कांक्षावितरणविशुद्धीसाठीं, मार्गामार्गज्ञानदर्शनविशुद्धीसाठीं, प्रतिपदाज्ञानदर्शनविशुद्धीसाठीं, ज्ञानदर्शनविशुद्धीसाठीं[१] भगवंताच्या नेतृत्वाखालीं आम्ही ब्रह्मचर्य आचरीत आहों काय?' असे सहा प्रश्न सारिपुत्तानें क्रमानें विचारले, व पुण्णानें त्या

---

१ या सात विशुद्धींचें सविस्तर स्पष्टीकरण विशुद्धिमार्गांत केलें आहे. त्यांचा थोडक्यांत अर्थ असाः—

(१) लाभसत्कारादिकांच्या इच्छेनें शीलाचें पालन न करतां केवळ जगाच्या कल्याणासाठीं व आत्मबोधासाठीं शीलाचें पालन करणें ही शीलविशुद्धि. (२) शुद्ध समाधि प्राप्त करून घेणें ही चित्तविशुद्धि. (३) बुद्धाच्या मध्यम मार्गाविषयीं दृष्टि साफ करणें, ही दृष्टिविशुद्धि. (४) त्याविषयीं येणाऱ्या शंकांचें समाधान करून घेणें, ही कांक्षावितरणविशुद्धि. (५) त्या मार्गाची भावना करीत असतां मार्ग कोणता आणि अमार्ग कोणता याचें ज्ञान करून घेणें, ही मार्गामार्गज्ञानदर्शनविशुद्धि. (६) अमार्गाचें ज्ञान झाल्यावर तो सोडून ध्येयाकडे जाणाऱ्या मार्गाचें (प्रतिपदेचें) पूर्ण ज्ञान मिळविणें, ही प्रतिपदाज्ञानदर्शनविशुद्धि. (७) ध्येयाचें (निर्वाणाचें) अनुभविक ज्ञान मिळविणें, ही ज्ञानदर्शनविशुद्धि.

सर्वांचें नकारार्थीच उत्तर दिलें. तेव्हां सारिपुत्त म्हणाला, " तर मग कशा-साठीं आम्ही ब्रह्मचर्य आचरीत आहों ?"

पुण्णः– उपादानावांचून (आसक्तीवांचून) परिनिर्वाणाचा लाभ करून घ्यावा म्हणून आम्ही ब्रह्मचर्य आचरीत आहों.

ह्या प्रत्येक विशुद्धींत उपादानविरहित परिनिर्वाण आहे कीं काय? असा सारिपुत्तानें प्रश्न विचारला, तेव्हां त्याचेंहि पुण्णानें नकारार्थी उत्तर दिलें. या सातांच्या बाहेर परिनिर्वाण आहे कीं काय, ह्या प्रश्नाचेंहि पुण्णानें नकारार्थीच उत्तर दिलें. सारिपुत्तानें त्याचें स्पष्टीकरण विचारलें, तेव्हां पुण्ण म्हणाला, " समजा, कोसलराजाला जरूरीच्या कारणास्तव श्रावस्तीहून साकेताला जाणें भाग पडलें; व त्यानें वाटेंत सात टप्प्याचे रथ ठेविले. पहिल्या रथांतून उतरून दुसऱ्या रथांत व दुसऱ्यांतून तिसऱ्यांत ह्याप्रमाणें सातव्या रथांतून तो साकेताला पोहोंचला. तेथें त्याचे आप्तमित्र त्याला म्हणाले कीं, ' ह्या रथानें महाराज श्रावस्तीहून साकेताला आले काय ?' पण राजानें, ' आपण सात रथांतून कसा आलों ' हें त्यांस सांगितलें. त्याचप्रमाणें ह्या सात विशुद्धि निर्वाणाच्या पायऱ्या आहेत (म्हणजे यांच्यावांचून निर्वाण नाहीं, पण त्या पायऱ्यांना निर्वाणहि म्हणतां येत नाहीं)."

सारिपुत्तानें पुण्णाचें नांव विचारिलें, व तें त्यानें सांगितल्यावर तो म्हणाला, " फार चांगलें ! फार चांगलें ! भगवंताच्या विद्वान् श्रावकानें जशीं प्रश्नांचीं उत्तरें द्यावीं, तशीं तुम्हीं दिलीं आहेत. तुमच्यासारखा सहब्रह्मचारी ज्यांना मिळाला, ते मोठे भाग्यवान होत. तुमच्यासारख्याला डोक्यावर घेऊन फिरलें असतांहि सहब्रह्मचाऱ्यांचा फायदा आहे. तुमचें दर्शन झाल्यानें मीहि स्वतःला भाग्यवान् समजतों."

पुण्णानें सारिपुत्ताचें नांव विचारलें, व तें समजल्यावर तो म्हणाला, " बुद्ध गुरूच्या योग्यतेच्या श्रावकाबरोबर माझा संवाद झाला, ह्याची मला कल्पना नाहीं. मला हें समजलें असतें, तर अशा रितीनें प्रश्नांचीं उत्तरेंहि देतां आलीं नसतीं.... तुमच्या दर्शनानें मी स्वतःला मोठा भाग्यवान् समजतों."

ह्याप्रमाणें त्या महानागांनीं (थोर अर्हंतांनीं) परस्परांचें अभिनंदन केलें[1].

---

१ हा रथविनीतसुत्ताचा सारांश आहे.

## १०

# महाकात्यायन

" संक्षिप्त उपदेशाचा विस्तारानें अर्थ करणाऱ्या माझ्या भिक्षुश्रावकांत महाकात्यायन श्रेष्ठ आहे. "

हा उज्जयनीच्या चंडप्रद्योत राजाच्या पुरोहिताचा मुलगा. सोन्यासारखी त्याची कांति होती म्हणून त्याचें नांव कांचन ठेवलें होतें. पण तो कात्यायन ह्या गोत्रनांवानें प्रसिद्धीला आला. वेदवेदांगांत पारंगत झाल्यामुळें पित्याच्या मरणानंतर तरुणपणींच त्याला पुरोहितस्थान मिळालें. त्याच वेळीं बुद्धाची कीर्ति सर्वत्र फैलावत चालली होती. चंडप्रद्योत बुद्धदर्शनाला अत्यंत उत्सुक होता; परंतु आपल्या राज्यमर्यादेबाहेर जाणें त्याला शक्य नव्हतें. शेवटीं सर्वानुमतें कात्यायन पुरोहिताला पाठवून बुद्धाला उज्जयनीला आणावें, असा बेत ठरला. 'आपणाला प्रव्रज्या घेण्यास परवानगी देत असाल, तरच आपण जाईन, ' असें कात्यायनाचें म्हणणें पडलें, व राजाला तें कबूल करावें लागलें. तेव्हां, बुद्धदर्शनाला जातांना मोठ्या परिवाराची आवश्यकता नाहीं, असें म्हणून निवडक सात असामी बरोबर घेऊन महाकात्यायन बुद्धापाशीं आला, व भगवंताचा धर्मोपदेश श्रवण करून त्या सात असामींसह अर्हत्पदाला पावला.

निर्वाणप्राप्ति झाल्यावर महाकात्यायन, उज्जयनीला जाणें चांगलें, असें भगवंताला सांगूं लागला. कात्यायन आपल्या जन्मभूमीला तथागतानें जावें अशी इच्छा बाळगीत आहे, हें भगवंतानें जाणलें; तरी कांहीं कारणास्तव स्वतः तिकडे जाणें त्याला योग्य वाटलें नाहीं, व कात्यायनास त्यानें तिकडे जाण्यास परवानगी दिली. बुद्धाचा शब्द बदलणें शक्य नाहीं, हें कात्यायनाला माहीत असल्यामुळें जास्ती आग्रह न करतां आपल्या सात साथीदारांना घेऊन तो उज्जयनीस जाण्यास निघाला. वाटेंत ' तेलप्पनाळि ' नांवाचें एक लहानसें शहर होतें. तेथें ह्या भिक्षूंना मुळींच भिक्षा मिळाली नाहीं. हें वर्तमान एका व्यापाऱ्याच्या गरीब मुलीला समजलें, व तिनें आपले केंस विकून त्या द्रव्यानें अन्न तयार करवून कात्यायनादिकांला भिक्षा दिली.

ह्या तरुण मुलीची गोष्ट येथें देणें योग्य आहे. आईबापें बाळपणींच वारल्यामुळें तिच्या दाईनें तिचें मोठ्या कष्टानें आपल्या मुलीप्रमाणें संगोपन केलें. तिच्या सौंदर्याची आणि विशेषत: लांब केसांची त्या शहरांत फार ख्याति होती. दुसऱ्या एका श्रीमंताची मुलगी अल्पकेशा होती. तिनें हजार कार्षापणांपर्यंत ह्या मुलीच्या केसांची किंमत देऊं केली. परंतु हें नैसर्गिक आभरण द्रव्य घेऊन विकण्यास ती कधींहि कबूल झाली नाहीं. एवढ्या शहरांत महाकात्यायनासारख्या भिक्षूला भिक्षा मिळूं नये, हें पाहून तिला अत्यंत वाईट वाटलें, आणि आपल्या शहराची अब्रू बचावण्यासाठीं तिनें आपले केंस आपल्या हातानें कापून ते दाईकडून त्याच श्रीमंत मुलीकडे विकावयाला पाठविले. ते वस्त्रानें झांकून एका हातानें आंसवें पुशीत व दुसऱ्या हातानें केंस आणि आपलें तुटून पडूं पाहणारें हृदय संभाळीत ती दाई त्या श्रीमंत मुलीकडे गेली.

केंस पाहून ती मुलगी आपल्या मनाशीं म्हणाली, "आपण हिला किती तरी पैसे देण्याचें कबूल केलें होतें! पण आतां ह्यांच्या खऱ्या किंमतीसच हे मला मिळतील." दाईच्या हातावर आठ कार्षापण ठेवून ती म्हणाली, "तूं ते कोठें जरी नेलेस, तरी ह्या केसांची किंमत आठच कार्षापण!" बिचारी दाई कांहीं न बोलतां ते कार्षापण घेऊन माघारी आली; व तें सर्व द्रव्य खर्चून त्या गरीब मुलीनें महाकात्यायनादिकांना भिक्षा दिली.

महाकात्यायन उज्जयनीला आला, तेव्हां प्रद्योतानें त्याचा चांगला आदरसत्कार केला. वाटेंत घडलेली ही गोष्ट सहजासहजीं कात्यायनानें राजाला सांगितली; तेव्हां त्यानें आपल्या मंत्र्याला पाठवून मोठ्या आदर-सत्कारानें त्या गरीब मुलीला उज्जयनीला आणून आपली पट्टराणी केलें. तिला जो मुलगा झाला, त्याला तिच्या बापाचें 'गोपाल' हें नांव ठेवण्यांत आलें, व त्यामुळें तिला 'गोपालमाता देवी' असें म्हणत असत. तिनें राजाकडून कांचनवनोद्यानांत महाकात्यायनासाठीं एक विहार बांधविला. ह्याप्रमाणें उज्जयनी येथें महाकात्यायनाचा मोठा गौरव झाला. तरी त्याला गंगायमुनेच्या प्रदेशांत रहाणें अधिक आवडत असे; कां कीं, तेथें बुद्धदर्शन सुलभ होतें.

मज्झिमनिकायांतील मधुपिंडिक, महाकच्चानभद्देसकरत्त व उद्देसविभंग ह्या तीन सुत्तांत महाकात्यायनानें भगवंताच्या संक्षिप्त उपदेशाचा विस्तारानें अर्थ सांगितला आहे. मधुर किंवा मधुरिय सुत्तांत महाकात्यायनाचा मधुर-राजाशीं झालेला संवाद आहे. तो बराच बोधप्रद वाटल्यावरून त्याचा सारांश येथें देतों:—

एके वेळीं महाकात्यायन मधुरा[1] येथें गुंदावनांत रहात होता. मधुरेचा अवंतिपुत्र नांवाचा राजा महाकात्यायनाच्या दर्शनासाठीं तेथें आला, व कुशलप्रश्नादिक विचारून म्हणाला, “भो कात्यायन, ब्राह्मणवर्णच श्रेष्ठ आहे व दुसरे वर्ण हीन आहेत; ब्राह्मणांलाच मोक्ष आहे, इतरांना नाही; ब्राह्मण ब्रह्मदेवाच्या मुखापासून झाले, असें ब्राह्मणांचें म्हणणें आहे. त्या बाबतींत आपलें मत काय ?”

कात्यायन:—महाराज, हा नुसता घोष आहे ! समजा, इतर जातीचे लोक धनाढ्य झाले तर त्यांची मोठ्या स्वामिभक्तीनें सेवा करण्यास ब्राह्मण तयार असतात कीं नाहीं ?

राजानें ‘होय’ असें उत्तर दिल्यावर कात्यायन म्हणाला, “असें आहे तर सर्व वर्ण समान ठरत नाहींत काय ? व ब्राह्मण वर्ण श्रेष्ठ आहे, हा नुसता घोष आहे, असें ठरत नाहीं काय ? जर ब्राह्मणानें पापकर्म केलें तर तो नरकांत जाणार नाहीं, आणि शूद्रानें केलें तर तो जाईल, असें घडेल काय ? किंवा ब्राह्मणानें पुण्यकर्म केलें तर तो स्वर्गाला जाईल, आणि शूद्रानें केलें तर तो जाणार नाहीं, असें होणें शक्य आहे काय ?”

महाराजानें, ‘नाहीं’ असें उत्तर दिलें तेव्हां कात्यायन पुढें म्हणाला, “तुमच्या राज्यांत ब्राह्मणानें चोरी किंवा इतर गुन्हा केला तर त्याला माफी मिळते, व शूद्रानें केला तर त्याला शिक्षा होते, अशी पद्धत आहे काय ?”

राजा:— असें होणें कधींच शक्य नाहीं, ब्राह्मण असो कीं शूद्र असो, ज्याच्या त्याच्या गुन्ह्याप्रमाणें त्याला योग्य शिक्षा देण्यांत येत असते.

---

१ मथुरेला बौद्ध ग्रंथांत मधुरा हें नांव आहे, व त्याजवरून मद्रास इलाख्यांतील मधुरा शहराचें नांव घेतलें असावें अशी कित्येक प्राच्यपंडितांची समजूत आहे. गुंदा ( सं. गुन्द्रा ) म्हणजे भद्रमुस्तक नांवाचें गवत. स्याद्भद्र-मुस्तको गुन्द्रा ( अमरकोश ).

कात्यायनः—— आणि ब्राह्मण भिक्षु झाला तर त्याला तेवढा मान मिळतो, व शूद्र भिक्षु झाला तर मिळत नाहीं काय ?

राजाः—— माझ्या राज्यांत सर्व जातींच्या शीलवान भिक्षूंना सारखाच मान मिळतो.

कात्यायनः—— असें आहे तर सर्व वर्ण समान आहेत, असें ठरत नाहीं काय ? आणि ब्राह्मणवर्ण श्रेष्ठ, हा केवळ घोष ठरत नाहीं काय ?

अवंतिपुत्र राजा महाकात्यायनाच्या भाषणानें प्रसन्न झाला व त्याला शरण गेला; ह्मणजे त्याचा उपासक झाला. पण आपणाला शरण न जातां भगवंताला शरण जाणें योग्य आहे, कारण आपणहि त्याला शरण गेलों आहें, असें महाकात्यायनानें त्याला सांगितलें.

राजाः—— पण तो भगवान् सध्यां कोठें आहे ?

कात्यायनः—— महाराज, तो भगवान् परिनिर्वाण पावला.

हें ऐकून राजाला फार वाईट वाटलें व तो म्हणाला, "जर त्या भगवंताचें दर्शन होणें शक्य असतें तर मी दहा आणि वीस योजनें नव्हे, तर शंभर योजनेंहि प्रवास केला असता. जरी त्याचें दर्शन होणें शक्य नाहीं, तरी मी त्याला शरण जातों."

## ११ आणि १२

## चूळपंथक आणि महापंथक

"मनोमय देह उत्पन्न करणाऱ्या माझ्या भिक्षुश्रावकांत चूळपंथक श्रेष्ठ आहे."

"चेतोविवर्तकुशल भिक्षुश्रावकांत चूळपंथक श्रेष्ठ आहे."

"संज्ञाविवर्तकुशल[1] भिक्षुश्रावकांत महापंथक श्रेष्ठ आहे."

राजगृहांत धनश्रेष्ठी नांवाचा एक सधन व्यापारी रहात असे. त्याच्या तरुण मुलीचें प्रेम त्याच्या एका तरुण दासावर जडलें, तें इतकें कीं, हाताला लागणारी चीजवस्तू घेऊन तीं दोघें घरांतून पळून गेलीं, व

१ चार ध्यानें भराभर उल्लंघन करीत जाणाऱ्याला चेतोविवर्तकुशल, व आकाश आनंत्यादिक आरूपावचर आयतनें भराभर उल्लंघन करीत जाणाऱ्याला संज्ञाविवर्तकुशल म्हटलें आहे.

दूरच्या एका गांवांत जाऊन राहिलीं. कांहीं काळानें ती तरुणी गरोदर झाली. अशा प्रसंगीं आपल्या आईबापांची आठवण येणें साहाजिक होतें. कितीहि मोठा अपराध केला असला तरी आईबाप आपणाला क्षमा करतील, असें तिला वाटे. पण गांधर्वविधीनें वरलेला तिचा नवरा राजगृहाचें नांव घेतलें कीं घाबरत असे, व तो, आज जाऊं उद्यां जाऊं असें म्हणून दिवस काढीत असे.

नवमास पूर्ण झाल्यावर एके दिवशीं नवरा कामावर गेला असतां घरांतील वस्तू जागच्याजागीं ठेवून व शेजाऱ्यापाजाऱ्यांना सांगून ती तरुणी एकाकीच राजगृहाला जाण्यास निघाली. नवरा घरीं आल्यावर शेजाऱ्यापाजाऱ्यांकडून त्याला हें वर्तमान समजलें. तेव्हां पळत जाऊन त्यानें तिला गांठलें. रस्त्यांतच एके ठिकाणीं ती पुत्र प्रसवली. आतां आई-जवळ जाऊन काय करावयाचें, अशा विचारानें ती नवऱ्याबरोबर पुन्हां राहात्या गांवीं आली. हा मुलगा रस्त्यांत जन्मला म्हणून त्याला 'पंथक' हें नांव देण्यांत आलें. त्याच्या मागोमाग कांहीं वर्षांनीं अशाच रीतीनें प्रवास करीत असतां दुसरा एक मुलगा जन्मला. तेव्हां पहिल्याला 'महापंथक' व ह्याला 'चूळपंथक' म्हणूं लागले.

बाळपणीं हे दोघे दुसऱ्या मुलांबरोबर खेळत असतां कोणी मुलगे, आपला आजा, आपली आजी, आपला चुलता, असें म्हणत. तें ऐकून महापंथक आईला म्हणे कीं, 'आमचे असे कोणी नातलग नाहींत काय?' ती म्हणे, "बाळ, तुमचे पुष्कळ नातलग राजगृहांत आहेत."

"मग तूं आम्हाला तेथें कां घेऊन जात नाहींस?"

'तेथें जाणें योग्य नाहीं,' अशी त्या मुलाची समजूत घालण्याची ती खटपट करी; पण तो एकसारखा हट्ट धरून बसे. शेवटीं ती नवऱ्याला म्हणाली, "हे मुलगे मला फार त्रास देतात, व स्वतःहि त्रास करून घेतात! काय माझे वडील माझें मांस थोडेंच खाणार आहेत! चला, आपण ह्या मुलांना घेऊन तिकडे जाऊं."

तोः– त्यांच्या समोर जाणें मला अगदीं अशक्य आहे. पण तुला मी राजगृहापर्यंत पोहोंचवितों.

ही गोष्ट तिला पसंत पडली, व मुलांला घेऊन तीं दोघें प्रवास करीत राजगृहाच्या नगरद्वाराजवळ असलेल्या एका धर्मशाळेंत येऊन उतरलीं. 'आपण मुलांना घेऊन आलें आहें,' असा आपल्या आईबापांला तिनें निरोप पाठविला. त्यांनीं कांहीं द्रव्य देऊन आपल्या एका मनुष्याकडून उलटा निरोप पाठविला कीं, 'तुझें तोंड आह्मी पाहूं इच्छित नाहीं. पण हें द्रव्य घेऊन जर मुलांला देत असशील, तर त्यांना ह्याच माणसाच्या स्वाधीन कर. हें द्रव्य तुमच्या दोघांच्या उपजीविकेला पुरे आहे. तुम्हाला जेथें बरें वाटेल तेथें जाऊन रहा.' मुलांचें कल्याण होत असल्यास होऊं द्या, असा विचार करून व आईबापांनीं पाठविलेलें द्रव्य घेऊन तिनें त्या दोघां मुलांना आलेल्या माणसांच्या हवालीं केलें.

ते दोघेहि आजोबाच्या घरीं उत्तम रितीनें वृद्धिंगत होत होते. महापंथक आज्याबरोबर वारंवार भगवंताचा धर्मोपदेश ऐकण्यास जात असे, व त्यामुळें गृहत्याग करून भिक्षु होण्याची त्याला उत्कट इच्छा उद्भवली; आणि हा आपला विचार त्यानें आजोबाला कळविला. आजोबा भगवंताचा भक्तच होता. त्याला नातवाच्या बोलण्यानें दुःख न होतां उलटा आनंद झाला, व त्या मुलाला बुद्ध भगवंतापाशीं घेऊन जाऊन त्याला प्रव्रज्या देण्याची त्यानें विनंति केली. एका पिंडपातिक भिक्षूकडून भगवंतानें त्या मुलाला प्रव्रज्या देवविली. पुढें हा महापंथक बुद्धशासनांत व आकाशानंत्यादिक चार अरूपावचर आयतनांत पारंगत झाला.

आपल्या भावालाहि बुद्धधर्मामृत पाजण्याची उत्कट इच्छा झाल्यामुळें आजोबाच्या परवानगीनें महापंथकानें चूळपंथकालाहि प्रव्रज्या दिली व त्याला

**पदुमं यथा कोकनदं सुगन्धं ।**
**पातो सिया फुल्लमवीतगन्धं ॥**
**अंगीरसं पस्स विरोचमानं ।**
**तपन्तमादिच्चमिवन्तळिक्खे[1] ॥**

---

१ कोसल संयुत्तांत बुद्धाचें गुणवर्णन करण्याच्या उद्देशानें चंदनंगलिक उपासकानें, व अंगुत्तरनिकायाच्या पंचक निपातांत पिंगियानी ब्राह्मणानें ही गाथा म्हटल्याचा उल्लेख आहे. कांहीं असो, बुद्धाच्या स्तुतिपर गाथांत ही फार

ही गाथा शिकविण्यास आरंभ केला. परंतु पूर्वकर्मविपाकामुळें चार महिने खटपट करूनहि चूळपंथकाच्या डोक्यांत ती शिरेना. तेव्हां महापंथक म्हणाला, "ह्या शासनांत तुझी अभिवृद्धि होणें शक्य नाहीं. चार महिन्यांत तुला जर एक गाथा शिकतां येत नाहीं तर भिक्षुकृत्यांत प्राविण्य तूं कसें संपादन करशील ?" असें म्हणून त्यानें त्याला हांकून लावलें.

बिचारा चूळपंथक वडील भावानें विहारांतून घालवून दिल्यामुळें विहाराबाहेर रडत उभा होता. त्याला बुद्ध भगवंतानें पाहिलें, व त्याच्या रडण्याचें कारण विचारलें. घडलेलें वर्तमान समजलें, तेव्हां भगवान् म्हणाला, "तूं रडूं नकोस. मी तुला हें निर्मळ वस्त्रखंड देत आहें. त्याच्यावर, 'हें स्वच्छ करतों, हें स्वच्छ करतों,' असें म्हणून ध्यान कर."

भगवंतानें सांगितलेल्या नियमानें, 'हें स्वच्छ करतों, हें स्वच्छ करतों,' असें म्हणत म्हणत व हातानें तें चोळीत चोळीत चूळपंथक त्यावर ध्यान करूं लागला. तें अधिकाधिक सुरकुतलेलें व मलीन झालेलें दिसूं लागलें. तेव्हां चूळपंथकाला आपोआप आत्मबोध झाला. 'माझे अंतःकरण अत्यंत परिशुद्ध असून तें ह्या शरीराच्या तडाक्यांत सांपडल्यामुळें या वस्त्रखंडाप्रमाणें अधिकाधिक मलीन होत चाललें आहे,' असें तो आपणाशींच म्हणाला; आणि तेथल्यातेथेंच त्यानें अर्हत्पदाचा लाभ करून घेतला. विशेषतः 'मनोमयकाय[1]' उत्पन्न करण्यांत तो अत्यंत कुशल झाला.

दुसऱ्या दिवशीं प्रसिद्ध जीवक वैद्याचे घरीं भगवंताला आणि भिक्षुसंघाला आमंत्रण होतें. परंतु भावानें हांकून लावलें असल्यामुळें चूळपंथकाला तेथें जातां येईना. भगवान् आणि भिक्षु आपापल्या आसनावर बसल्यावर जीवक स्वतः वाढावयास आला. भगवंतानें पात्रावर हात ठेवला.

---

प्राचीन असावी, असें वरील गोष्टीवरूनहि दिसून येतें. तिचा अर्थ असाः—

ज्याप्रमाणें कोकनद नांवाचें सुगंधी पद्म प्रातःकाळीं प्रफुल्लित होऊन सुगंधदायक होतें, त्याप्रमाणें शोभणाऱ्या व अंतरिक्षांत प्रकाशणाऱ्या सूर्यासारख्या अंगीरसाला ( बुद्धाला ) पहा.

१ मनोमयकाय म्हणजे सिद्धीच्या बळानें आपणासारखे हजारों देह उत्पन्न करणें.

'असें कां करतां' असा प्रश्न केला असतां भगवान् म्हणाला, "विहारांत एक भिक्षु अद्यापि शिल्लक राहिला आहे."

त्याला बोलावण्यासाठीं जीवकानें ताबडतोब मनुष्य पाठविला. इकडे तरुण चूळपंथक आपणाला मिळालेल्या नवीन सिद्धीचा प्रयोग करीत बसला होता. त्यानें आपणासारखे हजार भिक्षु निर्माण केले होते. जीवकाच्या मनुष्यानें त्यांना पाहिलें. व तेथें एकसारखेच पुष्कळ भिक्षु असल्याचें जीवकाला वर्तमान कळविलें. ह्यावर भगवंतानें अशी तोड सांगितली कीं, जो कोणी पहिला भिक्षु दिसेल, त्याच्या चीवराला पकडून, 'तुला भगवान् बोलावीत आहेत,' असें सांगावें. त्याप्रमाणें जीवकाच्या मनुष्यानें केलें; तेव्हां खऱ्या चूळपंथकाशिवाय बाकी सर्व मनोमयकायधारी भिक्षु गुप्त झाले, व चूळपंथक त्या मनुष्याबरोबर येऊन भिक्षुसंघांत सामील झाला.

## १३

## सुभूति

"निक्लेशवृत्ति भिक्षुश्रावकांत सुभूति श्रेष्ठ आहे."

"दक्षिणार्ह भिक्षुश्रावकांत सुभूति श्रेष्ठ आहे."

हा श्रावस्ती येथें सुमन श्रेष्ठीच्या घरीं जन्मला. सुभूति हें त्याचें नांव. बुद्ध भगवंताला आमंत्रण करून अनाथपिंडिकानें श्रावस्तीला आणलें व जेतवनविहार दान दिला, त्या वेळीं बुद्धोपदेश ऐकून हा भिक्षु झाला. जात्याच हा निष्कामबुद्धि होता, व मनस्ताप शमन करण्यासाठीं इतर श्रावकांप्रमाणें ह्याला प्रयास पडले नाहींत. म्हणून भगवंतानें निक्लेशवृत्ति भिक्षूंत त्याला अग्रस्थान दिलें. मैत्रीचें ध्यान सुभूतीला अत्यंत प्रिय असे. मैत्रीची भावना केल्यावांचून तो पाऊल पुढें टाकीत नसे; घरोघरीं मैत्रीयुक्त चित्तानेंच भिक्षा ग्रहण करी. म्हणून त्याला दक्षिणार्ह भिक्षूंत अग्रस्थान मिळालें. पालि वाङ्मयांत सुभूतीसंबंधानें थोडा उल्लेख आहे; पण मैत्री हेंच त्याचें ब्रीद असल्यामुळें त्याला महायान वाङ्मयांत बरेंच महत्त्व होतें असें वाटतें. त्या पंथाचे जे अल्पस्वल्प ग्रंथ उपलब्ध आहेत, त्यांत वज्रच्छेदिका हा एक आहे; व हें सूत्र भगवंतानें सुभूतीलाच उद्देशून उपदेशिलेलें आहे.

## १४

# खदिरवनिय रेवत

"आरण्यक भिक्षुश्रावकांत खदिरवनिय रेवत श्रेष्ठ आहे."

हा सारिपुत्ताचा कनिष्ठ बंधु. सारिपुत्त तीन बहिणींत आणि भावांत वडील, व हा सर्वांत लहान[1]. ह्या भिक्षु होऊं नये म्हणून त्याच्या आईबापांनीं लहानपणीं त्याचें लग्न करण्याचा बेत केला. त्याच्यासाठीं ठरविलेली मुलगी त्यांच्या आजीला व आज्याला नमस्कार करण्यासाठीं आली होती. त्या वेळीं, तूं ह्या तुझ्या आजीबाईपेक्षां जास्ती वर्षें जग, असा आजोबानें तिला आशीर्वाद दिला. तेव्हां लहानगा रेवत म्हणाला, "तुम्ही काय म्हणतां? ही सुंदर दिसणारी मुलगी आमच्या आजीबाईसारखीच दिसणार कीं काय?" आजोबा म्हणाला, "रे मुला, तुला कांहीं समजत नाहीं. पुण्यवान प्राणी असतात, ते असे वृद्ध होतात." तें ऐकून रेवत चिंतामग्न झाला. 'अरेरे, हें सुंदर शरीर आजीबाईप्रमाणें सुरकुतलेलें, ज्याच्या डोक्याचे केंस पांढरे झाले आहेत, दांत भग्न झाले आहेत, असें होणार ना? अशा रूपावर आसक्त होऊन मी काय करणार आहें! माझ्या बंधूचाच मार्ग मला पत्करला पाहिजे,' अशा विचारांनीं रेवताचें मन भरून गेलें; व शेवटीं घरांतून पळ काढण्याचा त्यानें निश्चय केला.

लग्नाचा दिवस मुक्रर झाला. सगे सोयरे गोळा झाले. पण सकाळपासून रेवताचें मन ह्या मंगल कार्यांत नसून तो समवयस्क मुलांबरोबर इकडे तिकडे दौडत होता. आईबाप म्हणाले, "अशा दिवशीं तूं इकडे तिकडे धांवत आहेस, हें तुला शोभतें काय?" रेवत म्हणाला, "माझ्या सोबत्यांबरोबर जरा खेळलों तर काय झालें?" मुलगा उनाड आहे, असें म्हणून आईबापांनीं आपल्या मनाची समजूत करून घेतली. पण लग्नविधीला सुरवात होण्यापूर्वीं रेवतानें आपल्या सोबत्यांना मागें टाकून असा पळ

---

१ चाला, उपचाला आणि सीसूपचाला हीं त्याच्या बहिणींचीं नांवें थेरीगाथेंत आणि तिच्या व थेरगाथेच्या अट्ठकथेंत सांपडतात. सारिपुत्त, वंगन्तपुत्त व रेवत, हे तिघे भाऊ.

काढला कीं, पुन्हां त्याच्या आईबापांना आणि नातलगांना तो सांपडला नाहीं[१] !

एका अरण्यप्रदेशांत कांहीं भिक्षु रहात होते. तेथें येऊन रेवत त्यांजपाशीं प्रव्रज्या मागूं लागला. पण ते म्हणाले, “ मुला तूं आहेस कोण ? हा नवरदेवाचा पोशाख काय आणि प्रव्रज्या मागतोस काय ? ”

तें ऐकून, ‘ मला लुटतात, मला लुटतात ’ अशी रेवतानें आरडा-ओरड केली.

भिक्षु म्हणाले, “ अरे सज्जन मुला, आम्हांला तुजपासून कांहीं नको आहे, आणि उगाच आरडाओरड कां करतोस ? ”

“ भदंत, माझीं वस्त्रप्रावरणें तुम्ही हिरावूं पहात नाहीं, हें मी पक्कें जाणून आहें. पण माझ्या वडील बंधूनें मिळविलेली संपत्ति तुम्ही मला देऊं इच्छीत नाहीं. ”

“ अरे पण तुझा वडील बंधु कोण ? त्यानें मिळविलेली संपत्ति ती काय ? आणि आमच्यापाशीं ती कशी आली ? ”

“ माझ्या वडील बंधूचें नांव उपतिष्य; पण तो सारिपुत्त ह्या नांवानेंच प्रसिद्ध आहे. त्याची मिळकत कोणती, हें तुम्हांस सांगावयास पाहिजे काय ? ”

सारिपुत्त सर्व भिक्षुसंघांत प्रसिद्धच होता, व त्याच्या धाकट्या भावाला शोभण्यासारखी हुशारी रेवताच्या आंगीं पाहून त्या भिक्षूंनीं त्याचें कौतुक केलें व त्याला श्रावणेरप्रव्रज्या दिली.

श्रामणेर झाल्यावर रेवत एका भयंकर खदिरवनांत रहात असे, व तेथेंच तो अर्हत्पदाला पावला. त्याला भेटण्याची सारिपुत्ताला इच्छा होती. पण एक दोनदां खदिरवनाला जाण्याची परवानगी मागितली असतां भगवंतानें ती दिली नाहीं, कां कीं, रेवत त्या वेळीं अर्हत्पदाला पावला नव्हता. पुन्हां सारिपुत्तानें परवानगी मागितली, तेव्हां भिक्षुसंघासह भगवान्‌हि तिकडे जाण्यास सिद्ध झाला. रेवताच्या वसतिस्थानीं जाण्याला दोन रस्ते होते. सरळ रस्ता साठ योजनांचा व जवळचा रस्ता तीस

---

१ येथें ‘ सुमुहूर्त सावधान ’ म्हटल्याबरोबर पळ काढणाऱ्या नारायणाची ( रामदासांची ) वाचकांना आठवण झाल्यावांचून राहणार नाहीं.

योजनांचा होता; पण हा रस्ता अडचणीचा असून वाटेंत अन्नपाण्याची टंचाई होती. कोणत्या रस्त्यानें जाऊं या, असा आनंदानें प्रश्न केला; तेव्हां जवळचा रस्ता पत्करण्यास भगवंतानें सांगितलें. आनंद म्हणाला, "पण भदन्त, ह्या रस्त्यांत भिक्षुसंघाला अन्नपाण्याची टंचाई पडेल." भगवान् म्हणाला, "आनंद, त्याची तुला काळजी नको. आमच्याबरोबर सीवलि[१] आहे, तो सर्व व्यवस्था पाहील."

भगवान् निवासस्थानाजवळ आला, तेव्हां रेवतानें त्याची व भिक्षुसंघाची रहाण्यासवरण्याची यथाशक्ती व्यवस्था लाविली. भगवान् त्याला म्हणाला, "रेवता, हें तर हिंस्रप्राण्यांचें जंगल दिसतें. येथें सिंहव्याघ्रादिकांच्या गर्जना व हत्तींच्या किंकाळ्या ऐकून तुला काय वाटतें ?

रेवत म्हणाला, "भदंत, अशा प्रसंगीं मला भय न वाटतां एक प्रकारचें अरण्यप्रेम वाटतें !"

हें त्याचें उत्तर ऐकून भगवान् प्रसन्न झाला, व अरण्यवासापासून, कोणकोणते फायदे आहेत, ह्या संबंधानें त्यानें रेवताला सविस्तर उपदेश केला.

भिक्षुसंघासह भगवान् परत श्रावस्तीला आला तेव्हां विशाखा उपासिकेनें, हा प्रवास कसा काय झाला व रेवताचें रहाण्याचें स्थान कसें काय आहे, इत्यादिकांची भिक्षूंपाशी चौकशी केली. जे भिक्षु अर्हत्पदाला पोहोंचले होते, त्यांनीं रेवताच्या स्थानाची स्तुति केली; पण सामान्य भिक्षूंला तें अरण्यमय स्थान आवडलें नाहीं, असें त्यांच्या बोलण्यावरून विशाखेला दिसून आलें. जेव्हां तिनें त्या प्रवासासंबंधीं भगवंताला विचारलें, तेव्हां भगवंतानें ही गाथा म्हटली:—

**गामे वा यदि वारञ्ञे निन्ने वा यदि वा थले ।**
**यत्थारहन्तो विहरन्ति तं भूमिं रामणेय्यकं ॥**

गांवांत काय कीं अरण्यांत काय, खोलगट प्रदेशांत काय की सपाट प्रदेशांत काय, जेथें अर्हन्त रहातात, तें स्थळ रमणीय होय.

---

१ सीवलीनें मोठमोठाले प्रवास केले होते, व पूर्वपुण्याईमुळें त्याला कोठेंच अन्नपाण्याची ददात पडली नाहीं. सीवलीची कथा ह्या भागाच्या अठराव्या प्रकरणांत पहावी.

अरण्यवासी पुष्कळ भिक्षु होते; पण रेवतासारखा अत्यंत बिकट जागीं रहाणारा दुसरा क्वचितच होता; म्हणून आरण्यक भिक्षूंत त्याला अग्रस्थान मिळालें.

## १५
## कांक्षारेवत

" ध्यानरत भिक्षुश्रावकांत कांक्षारेवत श्रेष्ठ आहे. "

ह्याचा जन्म श्रावस्तींतील एका धनाढ्य कुटुंबांत झाला. इतर लोकांबरोबर तो भगवंताचा उपदेश ऐकण्यास जात असे. कांहीं काळानें प्रपंचाविषयीं वैराग्य उत्पन्न झाल्यामुळें तो भिक्षु झाला. कोणती गोष्ट करणें योग्य व कोणती अयोग्य, ह्याविषयीं त्याला फार शंका वाटे, व वृद्ध भिक्षूंपाशीं ह्यासंबंधीं तो नीट विचारपूस करी. लहानसहान गोष्टींतहि याला शंका वाटते, म्हणून भिक्षु त्याला ' कांक्षारेवत ' असें म्हणूं लागले, व ह्याच नांवानें पुढें तो प्रसिद्धीला आला. तो समाधिभावनेमध्यें अत्यंत दक्ष असे व त्यांतच आनंद मानी. म्हणून ध्यानरत भिक्षूंत त्याला अग्रस्थान मिळालें.

## १६
## सोण कोळिविस

" उत्साही भिक्षुश्रावकांत सोण कोळिविस श्रेष्ठ आहे. "

सोण हें त्याचें नांव व कोळिविस आडनांव. कालचंपा नगरांत त्याचा जन्म झाला. तो घरचा अत्यंत सधन होता. त्याच्या सुकुमारपणाची ख्याति त्या वेळीं सर्व मगधदेशांत पसरली होती; आणि म्हणूनच बिंबिसार राजानें त्याला मुद्दाम बोलावून नेलें. याच्या पुढची सर्व हकिकत पहिल्या भागांत ( कलम ४६–५० ) आलीच आहे.

## १७
## सोण कुटिकर्ण

" प्रेमळ भाषण करणाऱ्या भिक्षुश्रावकांत सोण कुटिकर्ण श्रेष्ठ आहे."

राजगृह येथील काली नांवाची एक तरुणी अवंती राष्ट्रांतील कुरुरघर नांवाच्या शहरांत एका मोठ्या धनाढ्य कुटुंबांत दिली होती. केवळ

बुद्धाची कीर्ति ऐकून ती बुद्धोपासिका झाली. तिचा हा मुलगा. एक कोटी किंमतीचीं कुंडलें त्याच्या कानांत असत, म्हणून कोटिकर्ण म्हणण्याच्या जागीं सामान्य लोक त्याला कुटिकर्णच म्हणत; ह्याच नांवानें तो पुढें प्रसिद्धीला आला.

महाकात्यायन कुररघर येथें एका पर्वतावर वारंवार रहात असे, व सोण त्याचा उपदेश ऐकण्यासाठीं त्याजपाशीं जात असे. सोणाच्या प्रपंचांत कोणत्याहि प्रकारें कमतरता नव्हती. तरी महाकात्यायनाचा उपदेश ऐकून त्याचें मन प्रपंचांत रमेनासें झालें, व त्यानें वारंवार विनंति करून महाकात्यायनाकडून प्रव्रज्या घेतली. ह्याचें वर्णन पहिल्या भागांत (कलम ५१-५४) आलेंच आहे.

## १८

## सीवलि

“लाभी भिक्षुश्रावकांत सीवलि श्रेष्ठ आहे.”

ह्याच्या आईचें नांव सुप्पवासा. ती एका कोलिय राजाची मुलगी होती. तिची गोष्ट उदानवग्गांत आहे ती अशी:—

भगवान् बुद्ध कुंडिया नांवाच्या नगराजवळ कुंडधान वनांत रहात होता. कोलियराजाची मुलगी सुप्पवासा सात वर्षेपर्यंत गरोदर असून त्या वेळीं सात दिवस प्रसववेदना भोगीत होती. (१) तो भगवान् सम्यक्संबुद्ध आहे खरा, जो अशा दुःखाच्या विनाशासाठीं धर्मोपदेश करतो; (२) त्या भगवंताचा श्रावकसंघ सन्मार्गानें चालणारा खरा, जो अशा प्रकारच्या दुःखाच्या विनाशासाठीं प्रयत्न करतो; (३) तें निर्वाण सुखकारक खरें, ज्यांत अशा प्रकारचें दुःख आढळत नाहीं; ह्या तीन सद्विचारांनीं ती आपल्या असह्य वेदना सहन करी. आपण अशा रितीनें दुःख भोगीत आहें, हें तिनें नवऱ्याकडून भगवंताला कळविलें. तें ऐकून ‘ती सुखी होवो,’ असा भगवंतानें आशीर्वाद दिला, व त्याच वेळीं सुप्पवासा प्रसववेदनांतून मुक्त होऊन पुत्र प्रसवली. पुढें तिनें भिक्षुसंघासह भगवंताला आमंत्रण

---

१ हिची गोष्ट ह्या भागाच्या ७५ व्या प्रकरणांत पहावी.

करून सात दिवसपर्यंत दानसमारंभ केला. त्या वेळीं सारिपुत्तानें सीवलीला[1] 'प्रपंचांत कसें काय वाटतें,' असा प्रश्न केला. तेव्हां तो म्हणाला, "सात वर्षे मातेच्या उदरांत काढलेल्या मला प्रपंचाचें सुख काय विचारतां?"

सीवलि वयांत आल्यावर भिक्षु झाला. त्यानें पुष्कळ लांबलांबचे प्रवास केले होते; आणि पूर्वपुण्याईमुळें प्रवासांत त्याला चीवरपिंडपातादिकांची कधींहि टंचाई पडत नसे. त्याच्या प्रवासाची यादी ह्या दोन गाथांत आहे:—

> **निग्रोधं पठमं पस्सि दुतियं पण्डवपब्बतं ।**
> **ततियं अचिरवतियं चतुत्थं वरसागरं ॥**
> **पञ्चमं हिमवन्तं सो छट्ठं छद्दन्तमागमि ।**
> **सत्तमं गन्धमादनं अट्ठमं अथ रेवतं ॥**

अर्थ:— पहिल्यानें निग्रोधाला[2] आला, नंतर राजगृह येथील पांडवपर्वतावर, तिसऱ्यानें श्रावस्ती येथील अचिरवती नदीवर, चवथ्यानें महासमुद्रापर्यंत, पांचव्यानें हिमालयावर, सहाव्यानें षड्दन्त सरोवराला, सातव्यानें गंधमादनाला, व आठव्यानें (भगवंताबरोबर) खदिरवनिय रेवताला भेटण्यासाठीं.

अशा बिकट प्रवासांत सीवलीला त्रास पडला नाहीं, म्हणून त्याला लाभी भिक्षूंत अग्रस्थान मिळालें.

## १९

## वक्कलि

"श्रद्धावान् भिक्षुश्रावकांत वक्कलि श्रेष्ठ आहे."

ह्याचा जन्म श्रावस्ती येथें एका ब्राह्मणकुळांत झाला. वक्कलि हें त्याचें नांव. लहानपणींच वेदवेदांगांत तो पारंगत झाला होता, व बुद्धाला पाहिल्या-

---

१ ह्या वेळीं सीवलीचें वय जन्मल्यापासून अठरा दिवसांचें होतें, असें उदानअट्ठकथेंत सांगितलें आहे.

२ तो एका निग्रोधवृक्षाजवळ आला व तेथें त्याला देवतेनें भिक्षा दिली, असें मनोरथपूरणीचें म्हणणें आहे. परंतु प्रथमत: तो कपिलवस्तु येथील निग्रोधारामांत आला, असें म्हणणें विशेष सयुक्तिक दिसतें.

बरोबरच त्याची त्याच्यावर अत्यंत श्रद्धा जडली. रोज भगवंताला पाहिल्या-शिवाय त्याला चैन पडत नसे. पण श्रद्धा बलवती झाल्यामुळें व प्रज्ञेच्या कार्याला वाव न मिळाल्यामुळें निर्वाणमार्गांत वक्कलीला मोठा अंतराय झाला. त्याच्या पुढची गोष्ट खन्धसंयुत्ताच्या दुसऱ्या पण्णासाच्या चौथ्या वग्गांत वक्कलिसुत्तांत आलीच आहे. तिचा सारांश असाः—

"भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या वेळीं वक्कलि एका कुंभाराच्या[1] घरीं अत्यंत आजारी होता. एका उपस्थायकाकडून हें वर्तमान त्यानें भगवंताला कळविलें. भगवान् कुंभाराच्या घरीं आला, तेव्हां वक्कलि त्याला मान देण्यासाठीं खाटेवरून उठण्याचा प्रयत्न करूं लागला. पण भगवान् म्हणाला, "वक्कलि, असा उठण्याचा प्रयत्न करण्याचें कांहीं कारण नाहीं. येथें आसनें मांडलेलीं आहेत, तेथें मी बसूं शकतों." भगवान् एका आसनावर बसला आणि म्हणाला, "वक्कलि, तुला कसें काय वाटतें ? तुझें दुखणें कमी होत आहेना ?"

वक्कलिः— तुम्हांला काय सांगूं ! मला अगदीं बरें वाटत नाहीं. अत्यंत तीव्र वेदना उत्पन्न होतात, पण त्यांचें पर्यवसान दिसून येत नाहीं.

भगवान्ः— पण वक्कलि, तुझ्या मनाला एखादी शंका किंवा पश्चात्ताप जाचत नाहींना ?

वक्कलीनें होकारार्थी उत्तर दिलें. तेव्हां भगवान् म्हणाला, "ही मनाची रुखरुख तुझ्या आचरणांत कांहीं निंद्य कृत्य घडून आल्यामुळें तर नसेलना ?"

"नाहीं," असें वक्कलीनें उत्तर दिलें.

"तर मग, वक्कलि, तुझ्या मनाला एवढी रुखरुख कां लागून रहावी ?"

"भगवंताच्या दर्शनाला जाण्यास जें बळ लागतें तें मजजवळ नाहीं, एवढ्याच साठीं माझ्या मनाला तळमळ लागली आहे."

"वक्कलि, ह्या माझ्या सडून जाणाऱ्या (पूति) देहाकडे पाहून काय उपयोग ! जो धर्म जाणतो तो मला पहातो, व जो मला पहातो तो धर्म जाणतो. वक्कलि, मी तुला असें विचारतों कीं, रूप नित्य कीं अनित्य ?

---

१ कुंभाराच्या घरीं म्हणजे भांडीं बनवावयाच्या कारखान्यांत (शाळेंत), असें अट्ठकथेचें म्हणणें आहे.

वेदना, संज्ञा, संस्कार, विज्ञान नित्य कीं अनित्य?" 'हे सर्व स्कंध अनित्य आहेत,' असें वक्कलीनें उत्तर दिलें.

"असें जाणून, हे वक्कलि, विद्वान् आर्यश्रावक ह्या पांच स्कंधांविषयीं विरक्त होतो आणि वैराग्यामुळें विमुक्त होतो."

ह्याप्रमाणें उपदेश करून भगवान् गृध्रकूटपर्वताच्या बाजूला गेला. तेव्हां वक्कलि आपल्या उपस्थायकांना म्हणाला, "बंधुहो, मला खाटेसह उचलून ऋषिगिलीच्या पायथ्याशीं कालशिला येथें घेऊन जा. माझ्या-सारख्यानें गांवांत मरणें मला योग्य वाटत नाहीं" .... तेथें नेल्यावर वक्कलि विमुक्त झाला, व त्यानें शस्त्रप्रयोग करून आत्मघात केला, कांहीं वेळानें भिक्षूंसह भगवान् तेथें आला, व त्यानें वक्कलि खाटेवर लोंबकळत पडल्याचें पाहिलें. त्या वेळीं अंधकारमय धुकें जिकडे तिकडे पसरलें होतें. तें दाखवून भगवान् भिक्षूंला म्हणाला, "भिक्षुहो, हा मार आहे. वक्कलीचें विज्ञान कोठें पैदा झालें, ह्याच्या शोधांत तो आहे. परंतु वक्कलि परिनिर्वाण पावला असल्यामुळें त्याच्या विज्ञानाला पुनर्जन्म नाहीं."

## २०

## राहुल

"नियम शिकण्याची आस्था बाळगणाऱ्या भिक्षुश्रावकांत राहुल श्रेष्ठ आहे."

राहुलाची गोष्ट पहिल्या भागांत (कलम ३२–३४) आलीच आहे. त्याला उद्देशून भगवंतानें उपदेशिलेलीं अंबलट्ठिकराहुलोवाद, महाराहुलोवाद व चूळराहुलोवाद, अशीं मज्झिमनिकायांत तीन सुत्तें आहेत. तीं अनुक्रमें शील, समाधि आणि प्रज्ञा ह्या ज्या बुद्ध शासनाच्या तीन पायऱ्या आहेत, त्यासंबंधानें आहेत. शीलांत भगवंतानें सत्याला अत्यंत महत्त्व दिलें आहे, आणि ह्याचसंबंधानें पहिल्या सुत्तांत उपदेश आहे. अशोक राजानेंहि आपल्या बाभ्रा येथील शिलालेखांत त्या सुत्ताचा उल्लेख केला आहे. त्याचा सारांश बुद्धलीलासारसंग्रहाच्या तिसऱ्या भागांत (प्र० २१) आलाच आहे. बाकी दोन सुत्तांचा सारांश येथें देण्यात येत आहे :—

(१) भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडकाच्या आरामांत रहात होता. एके दिवशीं आपलें पात्रचीवर घेऊन भगवान श्रावस्तींत

भिक्षेला गेला. त्याच्या मागोमाग राहुलहि जाऊं लागला. त्याला पाहून भगवान् म्हणाला, "राहुल, सर्व प्रकारचें रूप माझें नाहीं, तें मी नाहीं व तें माझा आत्मा नाहीं, हें प्रज्ञेनें यथार्थतया जाणावें."

राहुल म्हणाला, "भगवन्, रूपच तेवढें आपला आत्मा नाहीं, असें जाणावें काय?"

भगवान्:— राहुल, वेदना, संज्ञा, संस्कार आणि विज्ञानहि असेंच समजावें. भगवंतानें उपदेश केला असतां, 'आज कशाला भिक्षेला जा,' असा विचार करून राहुल श्रावस्तींत न जातां बाहेरच एका झाडाखालीं बसला. त्याला पाहून सारिपुत्त म्हणाला, "राहुल, आनापानस्मृतीची (प्राणायामाची) भावना वृद्धिंगत केली असतां फार फायदेशीर होते."

संध्याकाळीं तेथून उठून राहुल भगवंतापाशीं गेला, आणि 'आनापानस्मृतीची भावना कशी करावी?' असा त्यानें भगवंताला प्रश्न केला. भगवान् म्हणाला, "पूर्वजन्मींच्या कर्मापासून उत्पन्न झालेले केशलोमादिक कठीण शरीरावयव ही आध्यात्मिक पृथ्वीधातु आहे. आध्यात्मिक पृथ्वीधातु काय कीं, बाहेरची पृथ्वीधातु काय, सर्व सारखीच. ती माझी नाहीं, ती मी नाहीं, ती माझा आत्मा नाहीं, हें प्रज्ञेनें यथार्थतया जाणावें. राहुल, पित्तश्लेष्मादिक आध्यात्मिक आपोधातु काय, कीं बाहेरची आपोधातु काय, ती सर्व सारखीच. ती माझी नाहीं, ती मी नाहीं, ती माझा आत्मा नाहीं, हें प्रज्ञेनें यथार्थतया जाणावें. अन्नाचें पचन करणारी, दाह करणारी इत्यादिक आध्यात्मिक तेजोधातु काय कीं बाहेरची तेजोधातु काय.... श्वासोच्छ्वासादिक आध्यात्मिक वायुधातु काय कीं बाहेरची वायुधातु काय.... आध्यात्मिक आकाशधातु काय, की बाहेरची आकाशधातु काय, ती सर्व सारखीच. ती माझी नाहीं, ती मी नाहीं, ती माझा आत्मा नाहीं, हें प्रज्ञेनें यथार्थतया जाणावें.

"राहुल, पृथ्वीसमान मनाची भावना कर. पृथ्वीवर लोक शुचि आणि अशुचि पदार्थ फेंकीत असतात; पण त्यायोगें पृथ्वी कंटाळत नाहीं. ह्याप्रमाणें मनाची भावना केली असतां तुझ्या मनावर अनिष्ट स्पर्शाचा आघात व्हावयाचा नाहीं. पाण्याप्रमाणें मनाची भावना कर. पाण्यांत लोक शुचि आणि अशुचि पदार्थ धूत असतात.... अग्नीप्रमाणें मनाची भावना

कर. शुचि आणि अशुचि पदार्थ अग्नि सारखेच जाळीत असतो...वायू-सारखी मनाची भावना कर. शुचि आणि अशुचि पदार्थांवर वायु सारखाच वहात असतो; पण त्यायोगें तो कंटाळत नाहीं....आकाशाप्रमाणें मनाची भावना कर. आकाश कशांतच संलग्न होत नाहीं. ह्याप्रमाणें भावना केली असतां तुझ्या मनावर अनिष्ट स्पर्शाचा आघात व्हावयाचा नाहीं.

"राहुल, मैत्रीची भावना कर. मैत्रीची भावना केली असतां तुझी द्वेषबुद्धि नष्ट होईल. करुणेची भावना कर. करुणेची भावना केली असतां तुझी त्रासदायक बुद्धि नष्ट होईल. मुदितेची भावना कर. मुदितेची भावना केली असतां तुझी असंतोषबुद्धि नष्ट होईल. उपेक्षेची भावना कर. उपेक्षेची भावना केली असतां तुझी प्रत्याघातबुद्धि नष्ट होईल. अशुभाची[1] भावना कर. अशुभाची भावना केली असतां तुझा कामविकार नष्ट होईल. अनित्यतेची भावना कर. अनित्यतेची भावना केली असतां तुझा अहंकार नष्ट होईल.

"राहुल, आनापानस्मृतीची भावना कर. आनापानस्मृतीची भावना अत्यंत हितावह होते. ती कशी ? राहुल, एकादा भिक्षु, अरण्यांत, झाडाखालीं किंवा एकांत स्थळीं जाऊन देह सरळ ठेवून मोठ्या सावधगिरीनें बसतो. तो सावधानपणें आश्वास घेतो व सावधानपणें प्रश्वास सोडतो. दीर्घ आश्वास घेत असला तर, दीर्घ आश्वास घेत आहें असें जाणतो. दीर्घ प्रश्वास सोडीत असला तर, दीर्घ प्रश्वास सोडीत आहें असें जाणतो. ऱ्हस्व आश्वास घेत असला तर, ऱ्हस्व आश्वास घेत आहें असें जाणतो. ऱ्हस्व प्रश्वास सोडीत असला तर, ऱ्हस्व प्रश्वास सोडीत आहें असें जाणतो. सर्व देहाची स्मृति ठेवून आश्वास करण्याचा व प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. कायसंस्कार शांत करून आश्वास करण्याचा व प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. प्रीतीचा अनुभव घेऊन आश्वास करण्याचा व प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. सुखाचा अनुभव घेऊन आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. चित्तसंस्कार जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. चित्तसंस्कार शांत करून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो. चित्त जाणून आश्वास प्रश्वास

१. अशुभभावना म्हणजे शरीरांतील अस्थिमांसादिक अमंगल पदार्थांचें चिंतन करून चित्ताची एकाग्रता साधणें. बुद्ध, धर्म आणि संघ पृ. ३२ पहा.

करण्याचा अभ्यास करितो. चित्ताला प्रमुदित करून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. चित्ताचें समाधान करून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. चित्ताला विमुक्त करून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. अनित्यता जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. वैराग्य जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. निरोध जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. त्याग जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करितो. अशा प्रकारें जर तूं आनापानस्मृतीची भावना करशील तर अंतकाळच्या आश्वासप्रश्वासांचीहि तुला जाणीव राहील. तुला नकळत त्यांचा निरोध होणार नाहीं."

असें भगवान् बोलला. मुदितमनानें राहुलानें भगवंताच्या उपदेशाचें अभिनंदन केलें.

(२) बुद्ध भगवान् श्रावस्ती येथें रहात होता. एके दिवशीं राहुलाजवळ आपलें आसन देऊन व त्याला बरोबर घेऊन तो अंधवनात गेला आणि एका झाडाखालीं बसला. राहुलहि त्याला वंदन करून एका बाजूला बसला. तेव्हां भगवान् म्हणाला, "राहुल, चक्षु नित्य आहे कीं अनित्य आहे?"

"भदंत तें अनित्य आहे."

"जें अनित्य आहे, तें सुखकारक आहे कीं दुःखकारक आहे?"

"दुःखकारक, भदंत."

"आणि जें अनित्य, दुःखकारक, विपरिणामधर्मी तें माझें आहे, तें मी आहें आणि तो माझा आत्मा आहे, असें समजणें योग्य होईल काय?"

"नाहीं, भदंत."

ह्याप्रमाणें रूप, चक्षुर्विज्ञान, चक्षुःस्पर्श व त्यापासून उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखादिक वेदना, संज्ञा, संस्कार, विज्ञान; श्रोत्र, शब्द ... श्रोत्रविज्ञान; घ्राण गन्ध ... घ्राणविज्ञान; जिव्हा, रस .... जिव्हाविज्ञान; काय, स्पर्श... कायविज्ञान; ह्या सर्वांविषयीं भगवंतानें प्रश्न विचारले व त्यांचीं वरच्याच पद्धतीनें राहुलानें यथायोग्य उत्तरें दिलीं. तेव्हां भगवान् म्हणाला, "राहुल, विद्वान् आर्यश्रावक असें जाणून ह्या सर्व पदार्थांविषयीं विरक्त होतो, आणि वैराग्यामुळें विमुक्त होतो."

भगवंताच्या ह्या उपदेशानें राहुल अर्हत्पद पावला.

## २१

# राष्ट्रपाल

"श्रद्धेनें प्रव्रज्या घेतलेल्या भिक्षुश्रावकांत राष्ट्रपाल श्रेष्ठ आहे."

ह्याची गोष्ट मज्झिमनिकायांतील रट्ठपाल सुत्तांत आली असून तिचाच अनुवाद मनोरथपूरणींत केला आहे. रट्ठपालसुत्ताचा सारांश असा:—

भगवान् बुद्ध कुरुराष्ट्रांत प्रवास करीत मोठ्या भिक्षुसंघासह थुल्लकोट्ठित नांवाच्या कुरूंच्या शहरापाशीं आला. तेथील ब्राह्मणांनीं त्याची कीर्ति ऐकून ते सर्व त्याच्या दर्शनाला गेले. कोणी त्याला नमस्कार करून, कोणी कुशल प्रश्न विचारून, कोणी अंजलि करून, कोणी आपलें नामगोत्र सांगून व कोणी मुकाट्यानेंच जाऊन एका बाजूला बसले. त्या ब्राह्मणांना भगवंतानें जेव्हां धर्मोपदेश केला तेव्हां राष्ट्रपालहि तेथें होता. त्याच्या मनावर एकदम परिणाम झाला, व प्रव्रज्या घेण्याचा आपला विचार त्यानें भगवंताला कळविला. पण त्याच्या आईबापांची परवानगी नसल्यामुळें त्याला प्रव्रज्या देण्याचें भगवंतानें नाकारलें. तेव्हां घरीं जाऊन प्रव्रज्या घेण्यास परवानगी देण्याविषयीं आपल्या आईबापांशीं तो हट्ट धरून बसला. त्यांनीं त्याची पुष्कळ प्रकारें समजूत घातली, व आपण जिवंत असतां त्याला परवानगी देतां येणें शक्य नाहीं असें सांगितलें. 'एकतर परवानगी किंवा दुसरें मरण,' असें म्हणून राष्ट्रपाल तेथेंच जमिनीवर पडला, व अन्न-ग्रहण करणें त्यानें वर्ज केलें. त्याच्या सख्यासोयऱ्यांनींहि त्याची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण राष्ट्रपालाच्या दृढ निश्चयापुढें त्यांचा कांहीं इलाज चालेना. शेवटीं आईबापांनीं परवानगी देऊन कसें बसें त्याचें एकदाचें समाधान केलें; व अन्न खाऊन अंगीं थोडें बळ आल्याबरोबर भगवंतापाशीं जाऊन त्यानें प्रव्रज्या घेतली. दोन आठवड्यांनीं भगवान् त्याला बरोबर घेऊन भिक्षुसंघासह श्रावस्तीला आला.

तेथें रहात असतां एकान्तांत राहून राष्ट्रपालानें मोठ्या प्रयत्नानें अर्हत्पद मिळविलें, व भगवंताजवळ जाऊन आईबापांस भेटण्याची परवानगी मागितली. आर्यमार्गांत त्याची झालेली उन्नति पाहून भगवंतानें त्याला स्वदेशीं जाण्यास परवानगी दिली. भिक्षाटनासाठीं जेव्हां तो थुल्लकोट्ठित

शहरांत शिरला, तेव्हां त्याचा पिता मधल्या दिवाणखान्यांत हजामतीला[1] बसला होता. राष्ट्रपालाला पाहून ' ह्या मुंडकांनीं ह्या श्रमणकांनीं आमच्या आवडत्या एकुलत्या एका मुलाला भिक्षु केलें ' असें तो म्हणाला. अर्थात् राष्ट्रपालाला आपल्या पित्याच्या घरीं शिव्यांशिवाय दुसरा पदार्थ मिळाला नाहीं. तो परत जाण्याला निघाला तेव्हां त्याच्या घरची एक दासी कुल्माषे[2] नांवाचें शिळें अन्न फेकण्यासाठीं बाहेर आली होती. तिला पाहून राष्ट्रपाल म्हणाला, " भगिनी, हें अन्न फेकायचें असेल तर माझ्या पात्रांतच तें घाल. " तें तिनें त्याच्या पात्रांत घातलें, व इतक्यांत तिची खात्री पटली कीं, हाच आपल्या मालकाचा पुत्र आहे. ताबडतोब हें वर्तमान तिनें आपल्या यजमानिणीला सांगितलें. ती म्हणाली, " हें वर्तमान जर खरें असेल तर तुला मी दास्यांतून मोकळें करीन. " असें म्हणून तिनें नवऱ्याला राष्ट्रपालाच्या शोधासाठीं पाठविलें.

राष्ट्रपाल एका भिंतीच्या सावलींत बसून तें शिळें अन्न खात होता. तें पाहून त्याचा पिता म्हणाला, " बा राष्ट्रपाला, हें शिळें अन्न तूं कसें खातोस ? तुझें घर तुला नाहीं काय ? "

रा०— गृहपति, आम्हांला आमचें घर कुठलें ? आम्हीं तें कधींच सोडून दिलें आहे. आपल्या घरीं गेलों होतों खरा; परंतु तेथें शिव्यांशिवाय दुसरें कांहीं मला मिळालें नाहीं.

पित्यानें त्याला घरीं येण्याचा आग्रह केला; पण त्या दिवशीं जेवण झालें असल्यामुळें त्यानें आमंत्रण न स्वीकारतां तें दुसऱ्या दिवशीं स्वीकारलें. राष्ट्रपाल सकाळच्या प्रहरीं भोजनासाठीं आला, तेव्हां पित्यानें आपली सर्व धनदौलत दाखवून त्याला प्रपंचांत आणण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. शेवटीं त्याच्या बायकांकडून[3] त्याचे पाय धरावयास

---

१ मूळ शब्द ' उल्लिखापेति.' त्यावर टीका—कप्पकेन केसे अपहरापेति. परंतु दुसरा असाहि अर्थ होऊं शकेल कीं, मधल्या दिवाणखान्यांत चित्रकर्म करवीत होता. येथें टीकेला अनुसरूनच अर्थ केला आहे. हजामतीच्या अर्थी हा शब्द वापरण्यांत आलेला दुसऱ्या कोठें आढळला नाहीं.

२ कुल्माष म्हणजे यवांचा केलेला पदार्थ.

३ ह्या किती होत्या, हें मूळग्रंथांत किंवा अट्ठकथेंत सांगितलें नाहीं. अट्ठकथेंत पुष्कळ नर्तकी होत्या, असें दंतकथात्मक वर्णन आहे.

लावले. परंतु ह्या सर्वांचा परिणाम राष्ट्रपालाच्या मनावर मुळींच झाला नाहीं. तो म्हणाला, " मला उपद्रव कशाला देतां ? जर जेवावयाला घालावयाचें असेल तर घाला." पित्यानें त्याला उत्तम प्रकारचें भोजन दिलें. भोजनोत्तर तो आपल्या रहाण्याच्या जागीं– कौरव्यराजाच्या उद्यानांत– गेला.

त्याच वेळीं मिगव नांवाच्या उद्यानपालाला कौरव्य राजानें उद्यान साफ करावयास हुकूम केला. त्यानें राजाला वर्दी दिली कीं, 'उद्यानांत कांहीं भय नाहीं. तेवढा राष्ट्रपाल— ज्याची आपण वारंवार स्तुति करतां — एका झाडाखालीं बसला आहे ' तें ऐकून कौरव्यराजानें उद्यानक्रीडेचा नाद सोडून दिला, व मोठ्या परिवारासह तो राष्ट्रपालाच्या दर्शनाला आला. कुशलप्रश्नादि विचारून झाल्यावर त्यानें राष्ट्रपालाला तेथें पसरलेल्या गालिचावर बसण्यास विनंति केली. पण राष्ट्रपाल आपल्या आसनावरून उठला नाहीं. त्यानें राजालाच त्या गालिचावर बसण्यास सांगितलें.

राजा खाली बसला व राष्ट्रपालाला म्हणाला, "जराव्यसन, व्याधिव्यसन भोगव्यसन व ज्ञातिव्यसन, ह्या चार व्यसनांमुळें लोक प्रव्रज्या घेत असतात. कोणी म्हातारा झालेला असतो, व आतां आपल्या हातून दुसरें कांहीं होणें नाहीं, असें म्हणून प्रव्रज्या घेतो. कोणी जन्माचा व्याधिग्रस्त असतो, व प्रपंच नकोसा होऊन संन्यासी होतो. कोणाची एकाएकीं सर्व संपत्ति नष्ट होते, व ह्या भोगव्यसनामुळें तो संन्यासी होतो. कोणाचे सखे-सोयरे अकस्मात मरण पावतात, व ह्या ज्ञातिव्यसनांमुळें तो भिक्षु होतो. पण ह्या चारहि व्यसनांपासून तुम्ही मोकळे आहां. असें असतां ह्या वयांत भिक्षु झालांत याचें कारण काय ? "

राष्ट्र०— महाराज, त्या सम्यक्संबुद्धानें ज्या चार गोष्टी सांगितल्या आहेत, त्या ऐकून, पाहून आणि जाणून मी भिक्षु झालों आहें. ( १ ) जीवलोक हांकला जात आहे, त्याला थारा नाहीं; ( २ ) त्याचें रक्षण करणारा कोणी नाहीं, त्याला सुरक्षित जागा नाहीं; ( ३ ) त्याचें स्वकीय असें कांहीं नाहीं, सगळें सोडून त्याला गेलें पाहिजे; ( ४ ) त्याची तृप्ति नाहीं, तृष्णेचा तो दास आहे. ह्या त्या चार गोष्टी आहेत, ज्या ऐकून, पाहून आणि जाणून मी भिक्षु झालों.

ह्या गोष्टींचा अर्थ राजाला बरोबर समजला नाहीं, व त्याविषयीं त्यानें प्रश्न विचारला. तेव्हां राष्ट्रपाल म्हणाला, "महाराज, वीस पंचवीस वर्षांच्या वयाच्या दरम्यान तुम्हीं जेव्हां शस्त्रास्त्रांत प्राविण्य मिळविलें, तेव्हांच्या आणि आतांच्या तुमच्या परिस्थितींत फरक आहे काय ?"

राजाः– भो राष्ट्रपाल, मी काय सांगावें ! तेव्हां मी तरुण होतों; माझ्या अंगीं विलक्षण सामर्थ्य होतें. पण आतां ऐशींच्या घरांत मी आहें. एका ठिकाणीं पाऊल टाकावयास जातों तों तें भलत्याच ठिकाणीं पडतें ! अशी माझी स्थिति आहे !

राष्ट्र०– ह्यासाठींच, महाराज, भगवंतानें म्हटलें आहे कीं, जीवलोक हांकला जात आहे, त्याला थारा नाहीं.

राजाः– किती उत्तम ! भो राष्ट्रपाल, हें त्या भगवंताचें म्हणणें अगदीं सत्य आहे.

राष्ट्र०– महाराज, तुमच्या अंगी जडलेला एकादा चिरकालिक रोग आहे काय ?

राजाः– होय, मला संधिवाताचा विकार आहे, आणि त्यामुळें मी असा बेहोष होऊन जातों कीं, कधीं कधीं माझा प्राण जातो असें सर्वांना वाटतें.

राष्ट्र०– अशा वेळीं, महाराज, तुमचे आप्तमित्र तुमचें रक्षण करूं शकतात काय ? 'चला, आपण सर्व एकत्र होऊन महाराजांचें दुःख वांटून घेऊं व त्यांला सुखी करूं,' असें ते म्हणूं शकतात काय ?

राजा :– नाहीं, भो राष्ट्रपाल.

राष्ट्र०– ह्यालाच उद्देशून भगवंतानें म्हटलें आहे कीं, जीवलोकाचें रक्षण करणारा कोणी नाहीं, त्याला सुरक्षित जागा नाहीं.

राजा :– किती उत्तम ! भो राष्ट्रपाल, हें त्या भगवंताचें म्हणणें अगदीं सत्य आहे.

राष्ट्र०– महाराज, सध्या आपण सर्व संपत्तीचा उपभोग घेत आहां. पण अंतकाळीं तिचा त्याग करून तुमच्या कर्माप्रमाणें तुम्हांला एकाकी जावें लागणार नाहीं काय ?

राजा :– ह्यांत काय शंका ?

राष्ट्र०— ह्यालाच उद्देशून, महाराज, भगवंतानें म्हटलें आहे कीं, जीवलोकाचें स्वकीय असें कांहीं नाहीं, सर्व सोडून त्याला गेलें पाहिजे

राजा :— किती उत्तम ! भो राष्ट्रपाल, हें त्या भगवंताचें म्हणणें अगदीं सत्य आहे.

राष्ट्र०— महाराज, अत्यंत भरभराटींत असलेल्या ह्या कुरूंच्या राष्ट्राचे तुम्ही अधिपति आहां; आणि समजा, एकादा मनुष्य येऊन तुम्हांला म्हणाला कीं, पूर्वेच्या बाजूला दुसरें असेंच एक समृद्ध राज्य आहे. तेथें धन धान्य, हत्ती घोडे वगैरे पुष्कळ आहेत. जर शक्य असेल तर तें राष्ट्र तुम्ही जिंकणार नाहीं काय?

राजा :— ह्यांत काय शंका ?

राष्ट्र०— ह्यालाच उद्देशून, महाराज, भगवंतानें म्हटलें आहे कीं, जीवलोकाची तृप्ती नाहीं, तृष्णेचा तो दास आहे.

राजा :— किती उत्तम ! भो राष्ट्रपाल हें त्या भगवंताचें म्हणणें अगदीं सत्य आहे."

## २२

## कुण्डधान

"पहिल्यानें शलाका[1] घेणाऱ्या भिक्षुश्रावकांत कुण्डधान पहिला आहे."

हा श्रावस्तींतील एका ब्राह्मणकुळांत जन्मला. वेदाध्ययन वगैरे करून विद्वान् झाल्यावर उतारवयांत त्यानें बौद्धसंघांत प्रव्रज्या घेतली. तो भिक्षेसाठीं गांवांत जात असतां त्याच्या मागोमाग एक स्त्रीहि जात असे; व परत येतांना ती मागोमाग येत असे. त्यामुळें गांवांतील बायकापोरें त्याची

१ सध्या जशा आमंत्रणपत्रिका किंवा तिकिटें पाठवून कांहीं समारंभाला तीं घेऊन येणाऱ्यांनांच आंत घेतलें जातें. त्याप्रमाणें पूर्वीं निरनिराळ्या रंगाच्या काड्या देत व त्या घेऊन येणाऱ्यांना आंत घेतलें जात असे. ह्या काड्यांना 'शलाका' म्हणत. मतदारांसाठींहि अशा काड्यांचा उपयोग करीत. पृ. २३४ पहा.

थट्टा करूं लागलीं. 'धान्याचा कोंडा झाला, धान्याचा कोंडा झाला'[1] असें तीं म्हणत. तेव्हां धानहि 'तुम्ही कोंडा' इत्यादि बोलून त्यांना शिव्या देई. त्यामुळें त्याला कुण्डधान हें नांव मिळालें. तो असा लोकांशीं भांडतो, हें भगवंताला समजलें, तेव्हां त्याला बोलावून आणून धम्मपदांतल्या या दोन गाथा भगवन्तानें म्हटल्या :–

मावोच फरुसं कञ्चि वुत्ता पटिवदेय्यु तं।
दुक्खा हि सारम्भकथा पटिदण्डा फुसेय्यु तं॥
सचे नेरेसि अत्तान कंसो उपहतो यथा।
एस पत्तोसि निब्बानं सारम्भो ते न विज्जति॥

अर्थ :– दुसऱ्याला अपशब्द बोलूं नकोस. तूं बोललास तर लोकहि तुला बोलतील. ह्याप्रमाणें हमरीतुमरी दुःखदायक आहे. त्यायोगें तुझ्यावर प्रत्याघात होतील. पालथ्या घातलेल्या भांड्याप्रमाणें[2] जर तूं मनांतून आवाज बाहेर पडूं दिला नाहींस तर तूं निर्वाणाजवळच आहेस. कारण तुला प्रत्याघातबुद्धि राहिली नाहीं.

पुढें भगवंताच्या उपदेशाप्रमाणें वागून स्वप्रयत्नानें धानभिक्षु अर्हत् झाला. तरी कुण्डधान हेंच त्याचें नांव कायम राहिलें. त्याची अशी कांहीं पुण्याई होती कीं, उपासकांनीं आमंत्रणशलाका पाठविल्या असतां बहुधा पहिली शलाका त्याला मिळे; आणि म्हणूनच पहिल्यानें शलाका घेणाऱ्या भिक्षूंत त्याला अग्रस्थान मिळालें.

---

१ 'धानो कोण्डो जातो' हा मूळ पालि शब्द. संस्कृतांत 'धानाः' स्त्रीलिंगी असून बहुवचनी आहे. येथें त्याच्या मागोमाग जाणारी स्त्री खरी नसून त्याच्या पूर्वकर्मामुळें उत्पन्न झाली होती, ही गोष्ट विस्तारपूर्वक न देतां संभवनीय तेवढाच अंश स्वीकारला आहे.

२ 'कंसो उपहतो' याचा अर्थ 'फुटलेलें पितळेचें भांडें' असा केलेला आहे. 'पालथें घातलेलें' असा करणें विशेष सयुक्तिक दिसतें. त्यावर आघात केला असतां आवाज निघत नाहीं. त्याप्रमाणें वाक्प्रहार झाले असतां आपलें मन अंतर्मुख (पालथें) झालें, तर तोंडांतून अपशब्द निघणार नाहीं.

## २३

## वंगीस

"प्रतिभाशाली भिक्षुश्रावकांत वंगीस श्रेष्ठ आहे."

मनोरथपूरणीच्या म्हणण्याप्रमाणें हा श्रावस्ती येथें ब्राह्मणकुळांत जन्मला. वंगीस हें ह्याचें नांव. तरुणपणीं सर्व वेदांत पारंगत होऊन त्यानें एक विलक्षण मंत्र[1] संपादन केला होता. त्याच्या योगें तो मेलेल्या माणसाच्या डोक्यावर चिटक्या मारून तो मनुष्य कोठें जन्मला, हें सांगत असे. त्याचें ब्राह्मणांनीं फारच देव्हारें माजविलें. ते झांकलेल्या यानांत त्याला बसवून गांवोगांवीं घेऊन जात, व लोकांना सांगत कीं, जो वंगीसाला पाहतो, त्याला धनाचा किंवा यशाचा लाभ होतो, व मेल्यानंतर तो स्वर्गाला जातो. अशा रितीनें ते पुष्कळ पैसा गोळा करीत असत. ब्राह्मणांबरोबर चारी दिशांना फिरून वंगीस परत श्रावस्तीला आला, तेव्हां भगवंताच्या दर्शनाची त्याला उत्कट इच्छा झाली, व त्याप्रमाणें तो भगवंताच्या भेटीला गेला. आपणाला अशा अशा तऱ्हेचा मंत्र येतो, असें वंगीसानें सांगितलें, तेव्हां भगवंतानें तीन निरनिराळ्या मेलेल्या माणसांची परीक्षा करण्यास त्यास लाविलें. दोहोंची त्यानें बरोबर परीक्षा केली; पण तिसऱ्याची त्याला परीक्षा करतां येईना; कां कीं, त्याला जिवंतपणीं अर्हत्पद मिळालें होतें. आपला मंत्र फुकट गेला असें वाटून वंगीसाला फार दुःख झालें, व भगवंताकडून नवीन मंत्र शिकण्याच्या आशेनें तो भिक्षु झाला. हा मनोरथपूरणीच्या गोष्टीचा सारांश.

परंतु संयुत्तनिकायांत वंगीस संयुत्त नांवाचें एक बारा सुत्तांचें प्रकरण आहे. त्यांतील शेवटच्या सुत्ताच्या अट्ठकथेंत वंगीसाची गोष्ट निराळ्याच प्रकारची आहे. तिचा सारांश असा:—

ह्याची आई वादपटु परिव्राजिका होती. तिला पांचशें प्रकारचे वाद येत असत व ती साऱ्या परिव्राजकांना वादांत जिंकीत असे. पण शेवटीं एका परिव्राजकानें तिला जिंकलें. तेव्हां तिनें त्याच्याबरोबर विवाह केला. त्या दोघांना जो मुलगा झाला, तो हा वंगीस. हाहि आपल्या आईबापां-

---

१ ह्याला शवशीर्ष मंत्र असें म्हटलें आहे.

प्रमाणें वादपटु होऊन वाद करीत फिरत असे. ह्याशिवाय त्याला एक विद्या माहीत होती. तिच्या योगें मेलेल्या माणसाच्या डोक्यावर चिटक्या मारून तो कोठें जन्मला, हें तो सांगत असे. ( बाकी गोष्ट सरासरी वरच्या सारखी आहे. )

परंतु खुद्द वंगीससंयुत्ताचें आणि विशेषतः त्यातील शेवटच्या सुत्ताचें नीट निरीक्षण केलें असतां असें दिसून येतें कीं, तो पूर्वीं मोठा कवि होता; व काव्याच्या योगें लोकरंजन करीत फिरत असे ( कावेय्यमत्ता विचरिम्ह पुब्बे ). कवि असल्याकारणानें भिक्षु झाला तरी त्याचे कामादिक वितर्क फार प्रबळ होते. आणि त्यांचें दमन करण्याविषयीं त्याला स्वतःच्या मनाला उपदेश करावा लागे. कधीं कधीं सभेंत बसला असता भगवंतावर किंवा दुसऱ्या एखाद्या विषयावर काव्य रचून तें तेथल्या तेथें तो म्हणून दाखवी; आणि त्यामुळेंच त्याला प्रतिभाशाली भिक्षूंत अग्रस्थान मिळालें.

## २४

## उपसेन वंगंतपुत्त

"सर्वांना प्रसन्न करणाऱ्या भिक्षुश्रावकांत उपसेन वंगंतपुत्त श्रेष्ठ आहे."

हा सारिपुत्ताचा धाकटा भाऊ. सारिपुत्ताला जसें आईच्या नांवावरून सारिपुत्त म्हणत, तसे त्याला बापाच्या नांवावरून वंगंतपुत्त म्हणत. तरुणपणीं वेदाभ्यास पुरा झाल्याबरोबर तो भिक्षु झाला. उपसंपदेनंतर एकाच वर्षानें संघाची अभिवृद्धि करण्याच्या हेतूनें त्यानें दुसऱ्या एका तरुणाला आपल्या हाताखालीं प्रव्रज्या दिली. हें वर्तमान भगवंताला समजलें; तेव्हां त्यानें त्याचा निषेध केला, व असा नियम केला कीं, ज्याला भिक्षु होऊन दहा वर्षें झालीं नाहींत, त्यानें दुसऱ्याला आपल्या हाताखालीं उपसंपदा देऊ नये.[1] ह्याचा परिणाम उपसेनाच्या मनावर फार चांगला झाला, व अरण्यवासादिकांच्या योगानें आपणालाच नव्हे, तर दुसऱ्या तरुण भिक्षूंनाहि त्यानें उत्तम वळण लाविलें. दहा वर्षें संघात राहिल्यावर त्यानें नियमाप्रमाणें पुष्कळ शिष्य केले. तेहि आपल्या उपाध्यायाप्रमाणें अत्यंत

१ महावग्ग ( Oldenberg's Edition ) पृ. ५९.

साधेपणानें वागत असत. त्यांना घेऊन एकदां उपसेन बुद्धदर्शनाला आल्याची हकिगत दुसऱ्या भागांत (कलम ३४) आलीच आहे.

सळायतनसंयुत्ताच्या दुसऱ्या पण्णासकाच्या दुसऱ्या वग्गाच्या सातव्या सुत्तांत उपसेनाच्या अंतकाळची गोष्ट आली आहे. तिचा सारांश असा :—

सारिपुत्त आणि उपसेन राजगृह येथें रहात होते. त्या वेळीं उपसेनाला सर्पदंशाची बाधा झाली. तो भिक्षूंना म्हणाला, "माझ्या शरीराला खाटेवर घालून बाहेर न्या. नाहींतर तें येथेंच भुशासारखें होईल." सारिपुत्त म्हणाला, "तुझ्या शरीरांत कांहीं व्यंग दिसत नाहीं, असें असतां, तें भुशासारखें होईल असें कसें म्हणतोस ?"

उपसेन म्हणाला, "ज्याला हीं इंद्रियें माझीं आहेत किंवा तीं मीच आहें, असें वाटतें त्याचींच इंद्रियें विकृत होणें संभवनीय आहे. पण मला असें वाटत नाहीं; तेव्हां माझ्या शरीरांत व्यंग कसें दिसेल ?"

हा संवाद झाल्यानंतर उपसेनाला खाटेवरून बाहेर नेण्यांत आलें, व तेथें तो मरण पावला.

साधेपणाचें वळण लावून आपल्या शिष्यांना व त्यायोगें इतर भिक्षूंना आणि भगवंताला तो प्रसन्न करी. म्हणून प्रसाद उत्पन्न करणाऱ्या भिक्षूंत त्याला अग्रस्थान मिळालें.

## २५

## दब्ब मल्लपुत्त

"शयनासनांची व्यवस्था लावणाऱ्या भिक्षुश्रावकांत दब्ब मल्लपुत्त श्रेष्ठ आहे."

हा मल्लांच्या राज्यांत अनुप्पिय येथें एका मल्लराजाच्या घरीं जन्मला. आईला नवमास पूर्ण झाल्यावर ती एकाएकीं मरण पावली. तिला चितेवर ठेवून अग्नि देण्यांत आला. तेव्हां अग्निसंतापानें पोट फुटून गर्भ खालीं एका बाजूला द्रव्यतृणावर (दूर्वांवर) पडला. त्यांतून जिवंत मुलगा निघाला; व त्याला आणून आजीच्या स्वाधीन करण्यांत आलें. द्रव्यतृणावर पडून बचावला म्हणून आजीनें त्याचें नांव दब्ब (द्रव्य) हेंच ठेविलें. वयांत आल्यावर

आजीची परवानगी घेऊन तो भिक्षु झाला. त्याची कार्यक्षमता पाहून संघानें त्याला शयनासनांचा व्यवस्थापक नेमलें. हें काम तो उत्कृष्ट रितीनें करीत असे. पण त्यामुळें मेत्तिय आणि भुम्मजक हे दोघे भिक्षु त्याचे वैरी झाले. दुसऱ्या भागाच्या १२, १३ व ६२ कलमांत ह्याची गोष्ट आलीच आहे. दब्बाचें चीवर जीर्ण झालें असतां संघानें आपल्या मालकीचें चीवर दब्बाला दिलें व त्यामुळें षड्वर्गीय भिक्षु संघाला दोष देऊं लागले, ही गोष्ट त्याच भागाच्या १३० व्या कलमांत आहे. ह्यावरून असें दिसून येतें कीं, अपवादादाखल थोडे भिक्षु खेरीज करून व्यवस्थापक ह्या नात्यानें दब्ब मल्लपुत्त सर्व भिक्षु-संघाला प्रिय होता, व त्यामुळेंच शयनासनांची व्यवस्था लावणाऱ्या भिक्षु-श्रावकांत त्याला अग्रस्थान मिळालें.

## २६

## पिलिंदवच्छ

"देवतांना प्रिय असलेल्या भिक्षुश्रावकांत पिलिंदवच्छ श्रेष्ठ आहे."

हा श्रावस्ती येथें ब्राह्मणकुळांत जन्मला. पिलिंदवच्छ हें त्याचें नांव. वयांत आल्यावर भिक्षु होऊन अनुक्रमें तो अर्हत्पदाला पावला. तरी भिक्षूंना आणि इतरांना 'वृषल' म्हणून हांक मारण्याची त्याची खोड गेली नव्हती. ह्या संबंधीं उदानवग्गांत जी गोष्ट आहे, तिचा सारांश असा:—

एके समयीं भगवान् राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या वेळीं पिलिंदवच्छ भिक्षूंना 'वृषल' म्हणत असे. ही गोष्ट भगवंताला समजली, तेव्हा पिलिंदवच्छाला बोलावून आणून त्यानें ह्यासंबंधीं चौकशी केली. 'आपण असें म्हणत असतों.' हें पिलिंदवच्छानें कबूल केलें. पण त्याच्या मनांत दुष्टबुद्धि मुळींच नाहीं हें जाणून भगवान् भिक्षूंना म्हणाला, "भिक्षुहो, पांचशें जन्म हा ब्राह्मणकुळांत जन्मला असल्यामुळें वृषल शब्द ह्याच्या तोंडीं बसला आहे. पण ह्याच्या मनांत कपट किंवा मान नाहीं."

## २७

## बाहिय दारुचीरिय

"तत्काळ बोध करून घेणाऱ्या भिक्षुश्रावकांत बाहिय दारुचीरिय श्रेष्ठ आहे."

हा बाहिय राष्ट्रांत समुद्रकिनाऱ्याच्या गांवीं जन्मला होता, व नौकानयनानें आपला निर्वाह करी. एके वेळीं नावेंतून सुवर्णभूमीला जात असतां नाव तुफानांत सांपडून बुडाली. पण सुदैवानें एका दारुखंडाच्या आश्रयानें तरंगत तरंगत हा सुप्पारक पट्टनाजवळ येऊन किनाऱ्याला लागला. त्याचीं वस्त्रेंप्रावरणें समुद्राच्या लाटांनीं हिरावून नेल्यामुळें नग्नस्थितींत गांवांत जाणें त्याला लज्जास्पद वाटलें, व जवळच्या तलावाच्या कांठीं पडलेलें शेवाळें नेसून व एक मृत्कपाल हातांत घेऊन तो गांवांत भिक्षेला गेला. सुप्पारक येथील लोक त्याला पाहून फार प्रसन्न झाले. हा कोणी तरी मोठा सत्पुरुष असावा, असें त्यांस वाटलें, व त्याचें सत्त्व पहाण्यासाठीं त्यांनीं नानाप्रकारचीं वस्त्रें देऊं केलीं. शेवाळ नेसल्यानें आपला इतका गौरव होत आहे, हें पाहून बाहियानें तीं वस्त्रें घेण्याचें साफ नाकारलें. तेव्हांपासून त्याचा अधिकच गौरव होऊं लागला. शेवाळापेक्षां फळकाचा तुकडा अधिक साधा व सोईस्कर, असें जाणून फळकाच्या तुकड्यांला दोऱ्या बांधून, तें तो नेसत असे; म्हणून त्याला दारुचीरिय हें नांव पडलें. ह्या गुणामुळें लोकांनीं त्याचे फार देव्हारे माजविल्यामुळें त्यालाहि आपण अर्हन्त झालों असें वाटूं लागलें.

पूर्वजन्मीं जी बाहियाची नातलग होती, अशी एक देवता बाहियाच्या आश्रमाजवळ राहात असे. बाहियाची अशी समजूत झालेली पाहून ती म्हणाली, "बा, बाहिया, तूं अर्हन्त तर नाहींसच, पण अर्हत्त्वाचा मार्गहि तुला माहीत नाहीं."

बाहियः—तर मग देवते, जगांत अर्हन्त किंवा अर्हत्त्वमार्गावरून चालणारे कोण आहेत ?

देवताः—बाहिय, उत्तर देशांत श्रावस्ती नांवाचें नगर आहे. तेथें सध्या सम्यक्संबुद्ध भगवान् रहात आहे. तो स्वतः अर्हन्त असून अर्हत्पदलाभासाठीं धर्मोपदेश करीत असतो.

त्या देवतेच्या बोलण्यानें बाहियाला संवेग उत्पन्न झाला, व ताबडतोब सुप्पारकाहून श्रावस्तीला जाण्याला तो निघाला. वाटेंत त्यानें कोठेंहि एका

---

१ उदानअट्ठकथेंत, 'रुईचीं फळें वाकाच्या दोऱ्यांनीं बांधून तीं नेसला,' असें आहे.

रात्रीहून जास्त मुक्काम केला नाहीं. तो जेतवनविहारांत आला, तेव्हां त्याला असें समजलें कीं, भगवान् नुक्ताच श्रावस्तींत भिक्षाटनाला गेला आहे. बाहियानें मागोमाग जाऊन भगवंताला एका गल्लींत गांठलें व वंदन करून उपदेश करण्यास विनंति केली. 'ही भिक्षाचर्येची वेळ आहे, धर्मोपदेशाची नव्हे,' असें भगवंताचें म्हणणें पडलें. पण बाहिय म्हणाला, "भदन्त, आमच्या जगण्याचा काय नेम आहे? मला आपला उपदेश लवकर ऐकूं द्या." त्याच्या आग्रहास्तव भगवंतानें संक्षेपानें त्याला उपदेश केला तो असा:—

"बाहिय, तूं जें पहाशील तें पाहिलेंस एवढेंच होऊं दे; जें ऐकशील तें ऐकलें एवढेंच, जें अनुभवशील तें अनुभवलें एवढेंच, व जें जाणशील तें जाणलें एवढेंच होऊं दे. असा तूं अभ्यास करशील, तर दृष्ट, श्रुत, अनुभूत आणि ज्ञात ह्यांत तूं आपणाला पहाणार नाहींस; आणि जेव्हां तूं ह्यांत आपणाला पहाणार नाहींस, तेव्हां इहलोकीं, परलोकीं किंवा दुसऱ्या कोठेंहि तुला जन्म नाहीं; आणि हाच दुःखाचा अंत होय."

हा उपदेश ऐकून बाहिय तेथल्या तेथें अर्हत्पदाला पावला. भगवान् तेथून निघून गेल्यावर एका व्यालेल्या गाईनें बाहियाला ठार मारलें. भिक्षाटनाहून परत येतांना भगवंतानें त्याचें प्रेत पाहिलें; व तें एका खाटेवर घालावयास लावून भिक्षूंकडून शहराबाहेर नेववून जाळावयास लाविलें; आणि त्याच्या अवशेषांवर स्तूप बांधावयास लाविला. त्याची काय गति झाली, असा जेव्हां भिक्षूंनीं प्रश्न केला, तेव्हां, तो परिनिर्वाण पावला असें भगवंतानें सांगितलें. अत्यंत अल्पावकाशांत निर्वाणपदाचा बोध झाला म्हणून तत्काळ बोध करून घेणाऱ्या भिक्षुश्रावकांत त्याला अग्रस्थान मिळालें.

## २८

## कुमार काश्यप

"उत्तम भाषण करणाऱ्या भिक्षुश्रावकांत कुमार काश्यप श्रेष्ठ आहे."

राजगृह येथील एका तरुणीला भिक्षुणी होण्याची उत्कट इच्छा होती. पण आईबापांची तिला परवानगी मिळेना. पुढें लग्न झाल्यावर

आपल्या नवऱ्याचें मन वळवून त्याच्याकडून तिनें परवानगी मिळविली, व ती भिक्षुणी झाली. भिक्षुणी झाल्यावर गर्भवतीचीं लक्षणें तिच्यांत स्पष्ट दिसूं लागलीं, व त्याबद्दल गवगवा झाला. ह्या प्रकरणीं चौकशी करण्यासाठीं भगवंतानें उपालीला नेमलें. त्यानें विशाखेला व श्रावस्ती येथील इतर उपासिकांना बोलावून ह्या प्रकरणीं नीट चौकशी करून 'त्या तरुण भिक्षुणीचा कांहीं दोष नाहीं, कारण भिक्षुणी होण्यापूर्वींच ती गरोदर होती,' असा निकाल दिला; व तो भगवंतालाहि पसंत पडला. तिला जो मुलगा झाला त्याला पसेनदि राजाच्या स्वाधीन करण्यांत आलें. पसेनदीनें त्याचें काश्यप असें नांव ठेवलें, व तो मोठा झाल्यावर त्याला प्रव्रज्या देवविली. काश्यप नांवाचे दुसरेहि भिक्षु होते; म्हणून त्याला कुमार काश्यप म्हणण्याचा प्रघात पडला; व त्याच नांवानें तो पुढें प्रसिद्धीला आला. मज्झिमनिकायांतील वम्मीक सुत्ताच्या अट्ठकथेंतहि अशाच तऱ्हेची कुमार काश्यपाची गोष्ट आली आहे.

## २९

## महाकोट्ठित

"प्रतिसंभिदाज्ञानें[1] झालेल्या भिक्षुश्रावकांत महाकोट्ठित श्रेष्ठ आहे."

हा श्रावस्ती येथें ब्राह्मणकुळांत जन्मला. कोट्ठित हें त्याचें नांव. पुढें भिक्षु झाल्यावर त्याला महाकोट्ठित म्हणूं लागले. मज्झिमनिकायांतील महावेदल्लसुत्तांत त्याचप्रमाणें संयुत्त आणि अंगुत्तरनिकायांतील बऱ्याच सुत्तांत ह्यानें सारिपुत्ताला फार महत्त्वाचे प्रश्न विचारल्याचें आढळून येतें, व त्यावरून त्याला प्रतिसंभिदाज्ञान झालें होतें, हें स्पष्ट दिसतें. परंतु दुःखाची गोष्ट ही कीं, ह्या सर्व सुत्तांतून किंवा त्यांच्या अट्ठकथांतून महाकोट्ठिताच्या चरित्रावर विशेष प्रकाश पाडणारा मजकूर सांपडत नाहीं.

---

१ अर्थ, धर्म, निरुक्ति आणि प्रतिभान, अशा चार प्रतिसंभिदा आहेत. पदार्थाच्या यथार्थ ज्ञानाला अर्थप्रतिसंभिदा, कार्यकारणाच्या ज्ञानाला धर्मप्रतिसंभिदा, भाषाज्ञानाला निरुक्तिप्रतिसंभिदा व निर्वाणाच्या ज्ञानाला प्रतिभानप्रतिसंभिदा असें म्हणतात. ह्या चार प्रतिसंभिदांचा विस्तार त्रिपिटकान्तर्गत 'पटिसंभिदामग्ग' ह्या ग्रंथांत केला आहे. अभिधर्म पिटकाच्या विभंग प्रकरणांतहि ह्यांच्यावर टीका आहे.

## ३०

## आनंद

"बहुश्रुत भिक्षुश्रावकांत आनंद श्रेष्ठ आहे."
"स्मृतिमान् भिक्षुश्रावकांत आनंद श्रेष्ठ आहे."
"गतिमान[1] भिक्षुश्रावकांत आनंद श्रेष्ठ आहे."
"धृतिमान् भिक्षुश्रावकांत आनंद श्रेष्ठ आहे."
"उपस्थायक भिक्षुश्रावकांत आनंद श्रेष्ठ आहे."

आतांपर्यंत आलेल्या भिक्षूंत किंवा पुढें येणाऱ्यांत दोहोंच्या पलिकडे सुत्तें कोणालाहि मिळालीं नाहींत; पण आनंदाला पांच देण्यांत आलीं आहेत. त्यावरून त्रिपिटकवाङ्मयांत आनंदाची केवढी योग्यता आहे, याचें अनुमान सहज करतां येईल. हा भगवंताचा चुलत भाऊ; अमितोदन शाक्याचा मुलगा; भगवंतापेक्षां वयानें लहान. अनुरुद्धाबरोबर पांच शाक्य-कुमारांनीं प्रव्रज्या घेतली, त्यांपैकीं हा एक. हा इतका बहुश्रुत होता कीं, भगवंताच्या पश्चात् त्याच्या उपदेशाचें संकलन करण्यासाठीं महाकाश्यपाला त्याची फार मदत झाली. बहुतेक सुत्ताच्या आरंभीं 'एवं मे सुतं (असें मी ऐकलें आहे)' हें वाक्य असतें. भगवंताच्या परिनिर्वाणानंतर तीन महिन्यांनीं राजगृह येथें भरलेल्या सभेंत (संगीतींत) महाकाश्यपानें 'तूं काय ऐकलें आहेस?' असा आनंदाला प्रश्न विचारला असतां, त्यानें 'एवं मे सुतं' असें म्हणून भगवंताकडून ऐकलेलीं उपदेशात्मक सुत्तें सांगितलीं, असा अट्ठकथाकाराचा खुलासा आहे. हा जरी सर्वत्र लागू पडत नाहीं--कांकीं, असें मीं ऐकलें आहे : एके समयीं आयुष्मान् आनंद अमुक तमुक ठिकाणीं रहात होता, अशा प्रस्तावनेचींहि कांहीं सुत्तें आढळतात--तरी कांहीं निवडक सुत्तें पहिल्या सभेत आनंदानेंच म्हटलीं असावीं, आणि तेव्हांपासून वरील वाक्य प्रत्येक सुत्ताच्या आरंभीं घालण्याचा प्रघात रूढ झाला असावा. भगवंताचा अत्यंत अमोलिक उपदेश ज्यानें शीघ्रगतीनें आपल्या अंतःकरणांत सांठवून ठेवला, त्याला बहुश्रुत, स्मृतिमान्, गतिमान्, आणि धृतिमान् भिक्षूंत अग्रस्थान मिळालें ह्यांत आश्चर्य काय?

---

१ गतिमान् म्हणजे वेगवान्; उपदेशकाचा उपदेश त्वरित लक्षांत घेणारा.

आनंद खरा भक्त होता. भगवंताच्या परिनिर्वाणापर्यंत त्याला अर्हत्पद मिळालें नाहीं. तो केवळ 'स्रोतआपन्न' होता. तरी भगवंतावर त्याचें निस्सीम प्रेम होतें. नागसमाल, नागित, उपवाण, सुनक्खत्त, चुन्दश्रामणेर, सागत, राध व मेधिय ह्या सर्वांनीं मधून मधून भगवंताची सेवा (उपस्थान) केली आहे. तरी आनंदासारखा त्या सर्वांत कोणीहि नव्हता. कोणच्या वेळीं भगवंताला काय पाहिजे असतें, कोणाची भेट कशी करून द्यावी, इत्यादि सर्व गोष्टींत आनंद कुशल आणि दक्ष असे. एक तेवढें महापरिनिब्बानसुत्त[1] वाचलें म्हणजे आनंदाला उपस्थायकांत अग्रस्थान कां मिळालें हें सहज समजतें.

## ३१

## उरुवेल काश्यप

"महापरिवार भिक्षुश्रावकांत उरुवेल काश्यप श्रेष्ठ आहे."

हा ब्राह्मणकुळांत जन्मला; वयानें भगवंतापेक्षां थोडा मोठा. वयांत आल्यानंतर जटिलपंथांत शिरून मोठ्या परिवारासह उरुवेल प्रदेशांत रहात होता. नदीकाश्यप व गयाकाश्यप हे त्याचे धाकटे भाऊहि जटिलांचे पुढारी होऊन त्याच प्रदेशांत रहात होते. ह्यांना भगवंतानें आपले शिष्य कसें केलें ह्याचें वर्णन बुद्धलीलासारसंग्रहांत (भाग १, प्रकरण ६) आलेंच आहे.

## ३२

## काळुदायी

"कुलप्रसादक भिक्षुश्रावकांत काळुदायी श्रेष्ठ आहे."

आमचा बोधिसत्त्व, बोधिवृक्ष, राहुलमाता देवी, कंथक अश्व, छन्न सारथि आणि काळुदायी हे एकाच दिवशीं जन्मले. हा बोधिसत्त्वाचा बाळमित्र होता. उदायी त्याचें नांव; पण जरा काळा असल्यामुळें त्याला काळुदायी म्हणत असत. बोधिसत्त्व बुद्ध होऊन जेव्हां सर्वत्र प्रसिद्धीला

---

१ ह्याचा सारांश बुद्धलीलासारसंग्रहाच्या तिसऱ्या भागाच्या शेवटीं आला आहे.

आला, तेव्हां शुद्धोदन राजानें बरेच दूत त्याला कपिलवस्तूला आणण्यासाठीं राजगृहाला पाठविले. पण ते सर्व बुद्धाचा धर्म ऐकून अर्हन्त होत असत, व त्याच सुखांत रहात असत. शेवटीं काळुदायीची ह्या कामीं योजना करण्यांत आली. तो जरी अर्हत् झाला, तरी बुद्धाला स्वदेशीं नेण्याचें काम करण्यास विसरला नाहीं.[1]

मज्झिम निकायांतील लटुकिकोपमसुत्तांत व संयुत्तनिकायांतील कांहीं सुत्तांत एक उदायी भिक्षु सांपडतो; आणि अट्ठकथांत जरी तो आणि हा काळुदायी एकच आहे, असा आधार सांपडत नाहीं, तरी तो एकच, असें अनुमान करण्यास हरकत दिसत नाहीं. दुसरा एक उदायी भिक्षु विनय-ग्रंथांत वारंवार येत असतो. परंतु तो हा नसून लाळुदायी नांवाचा दुसरा एक निर्लज्ज भिक्षु होता, असें विनयअट्ठकथेवरून दिसून येतें.[2] गृहस्थांच्या कुटुंबांत हा सर्वांना प्रिय होत असे म्हणून कुलप्रसादकांत अग्रस्थान मिळालें.

## ३३

## बक्कुल*

" निरोगी भिक्षुश्रावकांत बक्कुल पहिला आहे. "

हा भगवंतापेक्षां वयानें मोठा; कौशांबी येथें एका श्रेष्ठिकुलांत जन्मला. जन्मल्यावर पांचव्या [3]दिवशीं त्याला यमुनेवर स्नानासाठीं नेलें असतां तो दाईच्या हातांतून निसटून नदींत पडला, व त्याला एका मोठ्या

१. बुद्धलीलासारसंग्रह भा. २, प्रकरण ८ वें.

२. अयं हि सेय्यसकस्स उपज्झायो लाळुदायी नाम भन्तमिगसप्पटिभागो निद्दारामतादिमनुयुत्तानं अञ्ञतरो लोलभिक्खु। (पठम संघादिसेस—अट्ठकथा). हा सेय्यसकाचा उपाध्याय, नांवानें लाळुदायी, भ्रान्त मृगासारखा, निजण्यांत वगैरे सुख मानणाऱ्या भिक्षूंपैकीं एक लोभी भिक्षु.

* बाकुल असाही पाठ सांपडतो.

३. हें मज्झिमनिकायांतील बक्कुलसुत्ताच्या अट्ठकथेचें म्हणणें, व तें विशेष ग्राह्य दिसल्यामुळें येथें स्वीकारलें आहे. मनोरथपूरणींत जन्मल्या दिवशींच त्याला यमुनेवर नेण्यांत आलें असें आहे.

माशानें गिळून टाकलें;[१] तो मासा तसाच तडक नदीच्या प्रवाहांतून खालीं जाऊन वाराणसी येथें कोळ्याच्या जाळ्यांत सांपडला. त्या कोळ्यानें तो एका सावकाराच्या घरीं नेऊन विकला. उत्तम मासा पाहून मालकीणबाई स्वतःच कापावयास बसली, व तो कापीत असतां तिला हा मुलगा सांपडला. तिला मुळींच मूल नव्हतें. तेव्हां या पुत्रलाभानें तिला फार आनंद होणें साहजिक होतें. तिनें त्याचें उत्तम रितीनें संगोपन केलें. परंतु माशाच्या पोटांत मुलगा सांपडल्याची गोष्ट चहूंकडे फैलावली. तेव्हां कौशांबी येथील सावकाराची सर्व मंडळी वाराणसीला येऊन मुलाला परत मागूं लागली, व त्यायोगें खटला उपस्थित झाला. शेवटीं ही फिर्याद राजाकडे नेण्यांत आली. राजा म्हणाला, " ह्या आईनें ह्याला नवमास उदरांत बाळगिलें, तेव्हां ती त्याची आई नव्हे, असें म्हणतां येत नाहीं. पण ह्या दुसरीनें माशाच्या पोटांतून सुखरूपपणें बाहेर काढून ह्याचें संगोपन केलें. तेव्हां तिचीहि योग्यता आईएवढीच आहे. आतां तुम्ही असें करा कीं, ह्या मुलाला दोन्ही कुटुंबांचा वारस समजा. "

राजाच्या निकालाप्रमाणें दोन्ही कुळांत त्याचें संगोपन होऊं लागलें. तो कधीं कौशांबीला व कधीं वाराणसीला रहात असे; व ह्यामुळेंच ह्याचें नांव बक्कुल ( द्विकुल ) असें पडलें.

कौशांबी येथें भगवंताचा धर्म श्रवण करून तो भिक्षु झाला, असें मनोरथपूरणीचें म्हणणें; परंतु बक्कुलसुत्ताच्या अट्ठकथेंत वाराणसी येथें तो भिक्षु झाला, असें म्हटलें[२] आहे.

भिक्षु झाल्यानंतर त्यानें आपलें आयुष्य कसें घालविलें, ह्याचें वर्णन बक्कुल सुत्तांतच आहे. त्याचा सारांश असाः--

---

१. Now the Lord had prepared a great fish to swallow up Jonah. And Jonah was in the belly of the fish three days and three nights ( Jon. 1. 17 ). येथें बायबलांतील ह्या ज्योनाच्या गोष्टीची आठवण होते.

२. मज्झिमभाणकांचा पहिला आणि हा फरक मनोरथपूरणीच्या कर्त्याला माहीत होता, असें दिसतें. पंचम दिवसे...पेसेसीति मज्झिमभाणका । त्याचप्रमाणें ह्या ठिकाणीं, वाराणसिं ति मज्झिमभाणका.

आयुष्मान् बक्कुल राजगृह येथें वेळुवनांत रहात होता. त्या वेळीं बक्कुलाचा जुना मित्र अचेल (नग्न) काश्यप त्याजपाशीं आला, आणि त्याला म्हणाला, "आयुष्मान् बक्कुल, तुला भिक्षु होऊन किती वर्षे झालीं?"

ब०:— ऐशीं वर्षे.[१]

का०:— ह्या ऐशीं वर्षांत तूं कितीदा स्त्रीसंग केलास?

ब०:— आयुष्मान् काश्यप, तूं भलताच प्रश्न विचारलास. असें न विचारतां, असें विचार कीं, या ऐशीं वर्षांत तुझ्या मनांत किती वेळां कामविकार उत्पन्न झाला.

का०:— बरें ठीक, किती वेळां कामविकार उत्पन्न झाला हें सांग.

ब०— आयुष्मान् काश्यप, ह्या ऐशीं वर्षांत माझ्या मनांत एकदां सुद्धां कामविकार उत्पन्न झाल्याचें मला आठवत नाहीं. एवढेंच नव्हे, द्वेषबुद्धी किंवा दुसऱ्याला आणि आपणाला त्रास देण्याची बुद्धी मला कधीं उद्भवली नाहीं. मी गृहस्थानें दिलेलें चीवर कधीं स्वीकारलें नाहीं. कधीं दुसऱ्याकडून चीवर शिववून घेतलें नाहीं, कधीं गांवांत बसलों नाहीं, किंवा जेवलों नाहीं. कधीं भिक्षुणींच्या उपाश्रयांत गेलों नाहीं... कधीं मला रोग उत्पन्न झाला नाहीं, आणि कधीं औषधासाठीं मीं एक हरडाहि खाल्ला नाहीं. कधीं लोडाला टेंकून बसलों नाहीं, आणि कधीं गांवांत चातुर्मास घालविला नाहीं. प्रव्रज्येनंतर मी सातच दिवस [२]पृथग्जन होतों; सातच दिवस ऋणी होऊन मी राष्ट्रपिंड खाल्ला; आठव्या दिवशीं अर्हत्पद मिळविलें."

---

१. बक्कुलानें प्रव्रज्या घेतली त्या वेळीं तो ऐशीं वर्षांचा होता, असें दोन्ही अट्ठकथांचें म्हणणें आहे. त्या हिशोबानें मरणसमयीं त्याचें वय १६० वर्षांचें असलें पाहिजे. कदाचित् अट्ठकथांची ही अतिशयोक्ति असण्याचा संभव आहे.

२. पृथग्जन म्हणजे सामान्य जन, जो आर्यमार्गाला लागला नाहीं तो. असा मनुष्य भिक्षेवर निर्वाह करूं लागला तर तो राष्ट्राचा ऋणी होतो. परंतु अर्हत् अनृण होऊन राष्ट्रीय अन्न खातो.

हें बक्कुलाचें भाषण ऐकून अचेल काश्यप प्रसन्न होऊन त्याचा शिष्य झाला. नंतर आपण आज परिनिर्वाण पावणार आहें, असें सांगून बक्कुलानें सर्व विहारांत जाऊन भिक्षूंना बोलावून आणलें व भिक्षुसंघामध्यें बसला असतां तो परिनिर्वाण पावला.

## ३४

## सोभित

" पूर्वजन्म आठवणाऱ्या भिक्षुश्रावकांत सोभित श्रेष्ठ आहे. "

ह्याचा जन्म ब्राह्मणकुळांत झाला. ह्याचें नांव सोभित. पुढें वयांत आल्यावर तो भिक्षु झाला, व ध्यानसमाधीची भावना करून पूर्वजन्मस्मृति-ज्ञानांत निपुण झाला. विनयग्रंथांत चौथ्या पाराजिकेच्या टीकेंत तेवढा ह्याचा उल्लेख आला आहे. इतर ठिकाणीं याची माहिती सांपडत नाहीं.

## ३५

## उपालि

" विनयधर भिक्षुश्रावकांत उपालि श्रेष्ठ आहे. "

हा जातीचा न्हावी. ह्याची गोष्ट अनुरुद्धाच्या गोष्टींत (प्रकरण ५ वें) आलीच आहे. पहिल्या संगीतींत महाकाश्यपानें ह्यालाच विचारून विनयाचा संग्रह केला, असें विनयअट्ठकथेंत म्हटलें आहे. त्यावरून विनयधर-परंपरेचा हा पहिला आचार्य होता, असें दिसून येतें.

## ३६

## नंदक

" भिक्षुणींना उपदेश करणाऱ्या भिक्षुश्रावकांत नंदक श्रेष्ठ आहे. "

हा श्रावस्ती येथें एका चांगल्या कुटुंबांत जन्मला, व पुढें वयांत आल्यावर भिक्षु झाला. हा भिक्षुणींना अत्यंत निःस्पृहपणें उपदेश करीत असे. ह्यासंबंधानें नंदकोवाद नांवाचें एक सुत्त मज्झिमनिकायांत आहेच. ह्याशिवाय भगवान् ह्याच्या उपदेशाला किती महत्त्व देत असे, ह्याचा एक दाखला अंगुत्तरनिकायाच्या नवक निपातांत सांपडतोः—

एके वेळीं नंदक श्रावस्ती येथें अनाथपिंडिकाच्या आरामांतील उपस्थानशाळेंत भिक्षुंला उपदेश करीत बसला होता. भगवान् तेथें आला, व त्याचा उपदेश संपेपर्यंत दरवाजाबाहेर उभा राहिला. नंतर त्यानें हळूच दार ठोठावलें. भिक्षुंनीं दार उघडलें, तेव्हां उपस्थानशाळेंत जाऊन भगवान तेथें मांडलेल्या आसनावर बसला आणि म्हणाला, "नंदक, तूं भिक्षूंला बराच लांब उपदेश केलास. दाराबाहेर उभा राहून माझी पाठ दुखूं लागली."

नंदक म्हणाला, "भदंत, आपण बाहेर उभे होतां, हें जर मला समजलें असतें, तर मला इतका वेळ उपदेश करण्यास सुचलेंच नसतें."

नंदकाला ओशाळलेला पाहून भगवान् म्हणाला, "नंदक, तूं सज्जनाला शोभण्यासारखेंच आचरण केलेंस. तुझ्यासारख्या चांगल्या भिक्षूंला एकत्र जमलां असतां ह्या दोनच गोष्टी शोभतात—एक तर धार्मिक संभाषण किंवा दुसरें आर्य मौन."

## ३७

## नंद

"इंद्रियांचें रक्षण करणाऱ्या भिक्षुश्रावकांत नंद श्रेष्ठ आहे."

हा महाप्रजापती गोतमीचा मुलगा; भगवंताचा सावत्र—आणि मावसभाऊ. त्रिपिटकांतच ह्याच्या संबंधानें बरीच माहिती मिळते. उदानवग्गांत ह्याची माहिती आहे तिचा सारांश असाः—

"हा भिक्षु झाला होता तरी आपल्या स्त्रीचें स्मरण करून अत्यंत दुःख पावत होता. तेव्हां भगवंतानें त्याला ऋद्धिबळानें देवलोकीं नेऊन अप्सरा दाखविल्या. मेल्यावर आपणाला अप्सरांचा लाभ होईल, ह्या बुद्धीनें बायकोचा नाद सोडून तो नीटपणें ब्रह्मचर्य आचरूं लागला. पण ही गोष्ट भिक्षूंला समजली, तेव्हां ते म्हणूं लागले कीं, नंद केवळ चाकर आहे; वेतन मिळावें म्हणून ब्रह्मचर्य आचरतो. त्या योगें त्याला वैराग्य उत्पन्न झालें, व तो निर्वाणपदाला पावला."

निदानवग्गांतील भिक्खुसंयुत्तांत ह्या संबंधानें मजकूर आहे, त्याचा सारांशः—

" भगवान् बुद्ध श्रावस्ती येथें रहात होता. त्या वेळीं आयुष्मान् नंद—— भगवंताचा मावसभाऊ—— चांगलीं इस्तरी केलेलीं चीवरें नेसून डोळ्यांत अंजन घालून व स्वच्छ पात्र घेऊन भगवंताजवळ गेला. त्याला भगवान् म्हणाला, " नंद तुला, श्रद्धापूर्वक घर सोडून प्रव्रज्या घेतलेल्या कुलपुत्राला अशा रितीनें वागणें योग्य नाहीं. आरण्यक, पिंडपातिक आणि पांसुकूलिक होऊन कामोपभोगाविषयीं निःस्पृह होणें, हेंच तुला योग्य आहे. "

ह्यानंतर नंद कसा वागूं लागला, ह्याचा उल्लेख अंगुत्तरनिकायाच्या अट्ठकनिपातांत आला आहे. भगवान म्हणतो, " भिक्षुहो, जर कोणाला कुलपुत्र म्हणतां येईल तर तें नंदाला होय. बलवान् कोणाला म्हणावयाचें असेल, देखणा म्हणावयाचें असेल, तीव्र कामी म्हणावयाचें असेल तर नंदालाच म्हणतां येईल. नंद इंद्रियांचें रक्षण करण्यांत दक्ष, भोजनांत प्रमाण जाणणारा, अल्पनिद्रा घेणारा व स्मृतिसंप्रजन्यानें युक्त ( सावधान ) नसता तर दुसऱ्या कशामुळें परिपूर्ण आणि परिशुद्ध ब्रह्मचर्य आचरूं शकला असता ?

" भिक्षुहो, ज्या ज्या दिशेला नंद पहातो, त्या त्या दिशेला आपल्या मनांत लोभदौर्मनस्यादिक पापविचार उत्पन्न होऊं नयेत, अशा निश्चयानेंच पहातो. अशा रितीनें तो आपल्या इंद्रियांचें रक्षण करतो.

" तो विचार करून पिंडपात ग्रहण करतो. क्रीडेसाठीं, मदासाठीं, मंडनासाठीं, किंवा विभूषणासाठीं तो आहार ग्रहण करीत नाहीं. केवळ ह्या शरीराचें पालन व्हावें, त्रास दूर व्हावा, ब्रह्मचर्याला मदत व्हावी, एवढ्याच-साठीं तो आहार ग्रहण करतो. ह्या आहारानें भुकेच्या वेदना नाहींशा करून, मी ( जास्ती खाण्यानें ) नव्या वेदना उत्पन्न करणार नाहीं, ह्या अन्नानें माझ्या शरीराची यात्रा सुखावह होईल, मी दोषी ठरणार नाहीं, व माझ्या मनाला सुख मिळेल, असा विचार करून तो पिंडपात ग्रहण करीत असतो. ह्याप्रमाणें तो आपल्या भोजनांत प्रमाण जाणतो.

" भिक्षुहो, नंद दिवसभर चंक्रमण करून किंवा बसून आपल्या चित्ताचा आळस दूर करतो. त्याचप्रमाणें रात्रीच्या प्रथम यामींहि वागून मध्यमयामीं उजव्या कुशीवर, पायावर पाय ठेवून मोठ्या सावधपणें सिंहा-

सारखा निजतो.[१] पुन्हां रात्रीच्या शेवटच्या यामीं उठून चंक्रमण करून किंवा बसून चित्ताचा आळस दूर करतो. अशा रितीनें तो अल्पनिद्रा घेत असतो.

"नंदाला ज्या ज्या वेदना उत्पन्न होतात, त्या त्या माहीत असतात; जे जे वितर्क उत्पन्न होतात, ते ते माहीत असतात. अशा रितीनें तो स्मृतिसंप्रजन्ययुक्त रहातो."

## ३८

## महाकप्पिन

"भिक्षूंना उपदेश करणाऱ्या भिक्षुश्रावकांत महाकप्पिन श्रेष्ठ आहे."

हा सरहद्दीवरील कुक्कुटवती नांवाच्या नगरांत राजकुलांत जन्मला, व पित्याच्या मरणानंतर राजा झाला. श्रावस्तीहून आलेल्या व्यापाऱ्यांकडून भगवंताची कीर्ति ऐकून भिक्षु होण्यास तो उत्सुक झाला, व उद्यानांतून परस्पर आपल्या अमात्यांसह श्रावस्तीला जाण्याला निघाला. त्याची पट्टराणी अनोजा देवी हें वर्तमान ऐकून त्याच्या मागोमाग आपल्या परिवारासह श्रावस्तीला जाण्याला निघाली. ह्या सर्वांची आणि भगवंताची गांठ चंद्रभागा नदीच्या कांठीं पडली. कप्पिनाला आणि त्याच्या अमात्यांना भगवंतानें भिक्षु केलें, व उप्पलवण्णा भिक्षुणीकडून अनोजा देवीला व तिच्या स्त्रीपरिवाराला भिक्षुणी करविलें.

हा मनोरथपूरणीच्या गोष्टीचा सारांश; व तो संयुत्तअट्ठकथेच्या गोष्टीशीं जुळतो. संयुत्ताच्या मूळसुत्तांत[२] कप्पिनासंबंधानें मजकूर आहे, त्याचा सारांश असाः--

भगवान् श्रावस्ती येथें रहात होता. त्यानें आयुष्मान् महाकप्पिनाला दुरून येतांना पाहिलें आणि तो भिक्षूंना म्हणाला, "भिक्षुहो, ह्या इकडे येणाऱ्या गोऱ्या, सडपातळ, उंच नाकाच्या भिक्षूला तुम्ही पहात आहां

१. अशा निजण्याला सिंहशय्या असें म्हणतात.

२ निदानवग्ग, भिक्खुसंयुत्त, सुत्त ११. इतर ठिकाणीं मनोरथपूरणीचें आणि संयुत्तअट्ठकथेचें बहुधा जुळत नसतें. परंतु येथें दोहोंतील मजकूर जवळजवळ एकसारखाच आहे.

काय ? ह्याला सर्व प्रकारची समाधि प्राप्त झाली आहे; आणि ज्यासाठीं कुलपुत्र गृहाचा त्याग करतात, त्या ब्रह्मचर्यपर्यवसानाचा ( निर्वाणाचा ) ह्यानें साक्षात्कार करून घेतला आहे."

ह्या उताऱ्यावरून महाकप्पिन राजा होता कीं नाहीं, हें जरी सांगतां आलें नाहीं, तरी तो सरहद्दीवरील राजकुलांत जन्मला असावा, असा त्याच्या वर्णनावरून भास होतो.

## ३९

## सागत

"तेजोधातुकुशल[१] भिक्षुश्रावकांत सागत श्रेष्ठ आहे."

हा श्रावस्ती येथें ब्राह्मणकुळांत जन्मला, व पुढें वयांत आल्यावर भिक्षु झाला. अर्हत् होण्यापूर्वींच ह्याला योगसिद्धि प्राप्त झाली होती व त्यायोगें भद्दवतिका गांवांत त्यानें एका भयंकर नागाचें तेज हरण केल्याची गोष्ट दुसऱ्या भागांत ( कलम १०० ) आलीच आहे.

## ४०

## राध

"वक्त्या भिक्षुश्रावकांत राध श्रेष्ठ आहे."

हा राजगृहांत एका ब्राह्मणकुळांत जन्मला. राध हें त्याचें नांव. म्हातारपणीं बायकोमुलांकडून हेळसांड होऊं लागली म्हणून त्यानें भिक्षु होण्याचा विचार केला. पण त्याला म्हातारा म्हणून प्रव्रज्या देण्यास कोणी तयार होईना. शेवटीं सारिपुत्त स्थविराकडून भगवंतानें त्याला प्रव्रज्या देवविली. त्याला भगवंतानें उपदेशिलेली पुष्कळ सुत्तें मज्झिम आणि संयुत्त-निकायांत आहेत. संयुत्तांत तर राध संयुत्त नांवाचें एक प्रकरणच आहे. त्यांत एके ठिकाणीं भगवान् म्हणतो, "राध, लहान मुलगे आणि मुली

---

१ समाधि साधल्यानंतर आपल्या तेजानें दुसऱ्याला दिपवून टाकण्याचें किंवा दुसऱ्याचें तेज हरण करण्याचें सामर्थ्य असणाऱ्याला तेजोधातुकुशल म्हणतात.

धुळीचीं घरें करून खेळत असतात; आणि जोंपर्यंत त्या घरात त्यांची आसक्ति असते, तोंपर्यंत ते त्या घरांवर अत्यंत प्रेम करतात. पण जेव्हां त्या घरांचा त्यांना कंटाळा येतो, तेव्हां हातांनीं आणि पायांनीं तीं मोडून टाकून धूळ जिकडे तिकडे फैलावतात. त्याचप्रमाणें, हे राध, तुम्ही रूपवेदनादिक स्कंधांचा विध्वंस करा ( त्यांच्यावर आसक्ति ठेवूं नका )."

## ४१

## मोघराज

"रुक्ष चीवर धारण करणाऱ्या भिक्षुश्रावकांत मोघराज श्रेष्ठ आहे."

बावरी नांवाचा एक प्रसिद्ध ब्राह्मण श्रावस्तीहून दक्षिण देशांत गोदावरीच्या कांठीं जाऊन राहिला, व तेथें त्यानें एक महायज्ञ[1] केला. त्या यज्ञाच्या शेवटीं एक ब्राह्मण येऊन त्यानें बावरीजवळ पांचशें नाणीं मागितलीं. पण बावरी म्हणाला, "जें कांहीं मजपाशीं होतें, तें यज्ञांत खर्चिलें; आतां माझ्या जवळ कांहीं राहिलें नाहीं." तेव्हां त्या ब्राह्मणानें क्रोधाविष्ट होऊन, 'सातव्या दिवशीं तुझ्या डोक्याचे सात तुकडे होवोत' असा शाप दिला. त्यायोगें बावरी फार घाबरला. त्याची हितचिंतक देवता तेथें प्रकट होऊन त्याला म्हणाली, "डोकें कोणतें व तें फुटतें कसें, हें त्या ढोंगी, लोभी ब्राह्मणाला माहीत नाही !"

बा०—— मग देवते, हें तूं आम्हांला सांगशील काय ?

देवता:—— मलाहि हें माहीत नाहीं. पण कपिलवस्तूहून निघालेला व इक्ष्वाकु राजाच्या कुळांत जन्मलेला सर्वज्ञ बुद्ध हें तुला सांगूं शकेल.

बुद्ध हें नांव ऐकिल्याबरोबर बावरीला अतिशय आनंद झाला. पण वृद्धपणामुळें त्याला स्वतःला श्रावस्ती येथें जातां येणें शक्य नव्हतें. म्हणून त्यानें आपले सोळा शिष्य तिकडे पाठविले. ते सर्व बुद्धाचे शिष्य झाले. त्यांपैकीं मोघराज हा एक होता. तो अत्यंत साधें चीवर धारण करीत असे, म्हणून त्याला रुक्ष चीवर धारण करणाऱ्यांत अग्रस्थान मिळालें.

---

१ ही कथा सुत्तनिपातांतील पारायणवग्गाच्या आरंभीं आहे.

# भिक्षुणी

## ४२

## महाप्रजापती गोतमी

" चिरप्रव्रजित भिक्षुणीश्राविकांत महाप्रजापती गोतमी पहिली आहे. "

हिचा जन्म देवदह नगरांत महासुप्पबुद्ध शाक्याच्या घरीं झाला. मायादेवीची ही धाकटी बहीण. ह्या दोघी उपवर झाल्यावर शुद्धोदन शाक्यानें त्यांच्याशीं विवाह केला. बोधिसत्त्व जन्मल्यानंतर कांहीं काळानें हिला नंद नांवाचा एक मुलगा झाला. मायादेवी प्रसूतीनंतर सातव्या दिवशीं मरण पावली, व तेव्हांपासून बोधिसत्त्वाचें लालनपालन करण्याचा सर्व भार हिच्यावर पडला. गोतमीनें आपल्या मुलापेक्षांहि अधिक प्रेमानें बोधिसत्त्वाचा संभाळ केला. ती भिक्षुणी कशी झाली, हा सर्व वृत्तांत चुल्लवग्गांत व अंगुत्तरनिकायाच्या अट्ठकनिपातांत आला आहे. त्याचा सारांश पहिल्या भागांत (कलम ८७) पहावा. अर्हत्पदाला पावल्यावर तिनें म्हटलेल्या म्हणतात अशा सहा गाथा थेरीगाथेंत आहेत; त्यांतील शेवटलीं गाथा अशी आहे:—

**बहूनं वत अत्थाय माया जनयि गोतमं ।**
**व्याधिमरणतुन्नानं दुक्खक्खन्धं व्यपानुदि ॥**

अर्थ— खरोखर बहुजनांच्या कल्याणासाठीं मायेनें गोतमाला जन्म दिला. व्याधीनें आणि मरणानें पीडित लोकांचा त्यानें दुःखराशि नष्ट केला.

## ४३

## खेमा (क्षेमा)

" महाप्रज्ञ भिक्षुणीश्राविकांत खेमा श्रेष्ठ आहे. "

हिचा जन्म मद्रराष्ट्रांत सागल नांवाच्या नगरांत राजकुळांत झाला. ती अत्यंत देखणी होती, व तिचें लग्न मगध देशाच्या बिंबिसार राजाबरोबर झालें होतें. राजगृहाजवळ वेळुवनांत भगवान् रहात असतां बिंबिसार राजा

वारंवार त्याच्या दर्शनास जात असे. परंतु 'रूप अनित्य आहे, रूपावर आसक्त होऊं नका' असे वैराग्यपर उपदेश भगवान् करीत असतो, असें खेमेच्या ऐकण्यांत आलें असल्यामुळें ती वेळुवनांत जाऊं इच्छीत नव्हती. तिनें तेथें जावें म्हणून राजानें आपल्या पदरच्या कवींकडून वेळुवनांतील वनश्रीवर काव्य रचवून तें तिच्या समोर म्हणावयास लाविलें. उद्यानश्रीचीं तीं रसभरित वर्णनें ऐकून खेमेला तिकडे जाण्याची उत्कट इच्छा झाली, व राजाची तिनें परवानगी मागितली. राजा म्हणाला, "वेळुवनांत जाऊन भगवंताचें दर्शन घेतल्याशिवाय येतां कामा नये." ती कांहीं बोलली नाहीं. पण राजानें तिच्या बरोबरच्या नोकरांस सांगितलें कीं, जर खेमा भगवंताचें दर्शन घेतल्यावांचून येऊं लागली, तर माझ्या आज्ञेची तिला आठवण द्या.

खेमा वेळुवनाची शोभा पाहून बुद्धदर्शन घेतल्यावांचून माघारें येऊं लागली. तेव्हां तिला नोकरांनीं राजाज्ञेची आठवण दिली. त्यामुळें नाखुशी-नेंच भगवंताच्या दर्शनाला जाणें तिला भाग पडलें. भगवंताजवळ येऊन पाहाते, तर त्याच्या मागें एक अत्यंत लावण्यवती स्त्री वारा घालीत उभी होती. तिला पाहून खेमा आपल्या मनांत म्हणाली, "अशा दिव्य स्त्रिया ज्या महर्षींच्या सेवेला तत्पर असतात, त्याच्या दर्शनाची मला लाज वाटावीना ? धिक्कार असो मला आणि माझ्या आढ्यतेला ! ह्या अप्सरेची मी दासी देखील शोभणार नाहीं !"

हे विचार खेमेच्या मनांत चालले आहेत तोंच ती सुंदर स्त्री क्रमाक्रमानें पालटत चालली. थोडक्या अवकाशांत ती प्रौढ, म्हातारी व मरून पडलेली दिसली. तें पाहून आपल्या रूपाविषयीं खेमेचा अभिमान नाहींसा झाला. तेव्हां भगवान् म्हणाला, "कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें आपल्या भोंवतीं जाळें विणून त्यांत कामासक्त मनुष्य बद्ध होतात. परंतु हेंहि तोडून आणि कामसुखाचा त्याग करून (सत्पुरुष) निरपेक्षपणें परिव्राजक होतात[1]."

हा उपदेश कानीं पडल्याबरोबर खेमा तेथल्या तेथें अर्हत्पदाला पावली. पुढें बिंबिसारराजाच्या परवानगीनें ती भिक्षुणी झाली.

---

१ मूळ गाथा धम्मपदांत आहे. तिचें हें भाषांतर नसून सार मात्र आहे.

अब्याकतसंयुत्ताच्या पहिल्या सुत्तांत खेमेचा आणि पसेनदि कोसल राजाचा संवाद आला आहे त्याचा सारांश असाः—

"भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. त्यावेळीं खेमा भिक्षुणी कोसल देशांत प्रवास करीत श्रावस्ती आणि साकेत यांच्या दरम्यान तोरणवत्थु गांवीं वर्षावासासाठीं राहिली होती. पसेनदि कोसल राजा साकेताहून श्रावस्तीला येत असतां एक रात्र मुक्कामाला तोरणवत्थूजवळ राहिला. त्या रात्रीं कोणातरी श्रमणाचा किंवा ब्राह्मणाचा उपदेश ऐकण्याची त्याला इच्छा झाली; व गांवांत चौकशी करण्यासाठीं त्यानें मनुष्य पाठविला. पण खेमेशिवाय दुसरा कोणी विद्वान् श्रमण किंवा ब्राह्मण तेथें नव्हता. खेमेच्या पांडित्याचें जेव्हां त्या मनुष्यानें वर्णन केलें, तेव्हां राजानें तिचीच भेट घेण्याचा निश्चय केला, व ती होती तेथें जाऊन तिला नमस्कार करून तो एका बाजूला बसला आणि म्हणाला, "आर्ये, तथागत मरणोत्तर होतो कीं नाहीं."

खेमाः—महाराज, हें भगवंतानें सांगितलें नाहीं.

राजाः—ह्याचें कारण काय बरें ?

खेमाः—महाराज, येथें तुम्हांला मी असा प्रश्न करतें कीं, तुमच्या पदरीं असा एकादा गणक आहे काय, कीं जो ह्या गंगेंतील वाळूची गणना करूं शकेल, किंवा जो महासमुद्रांतील उदक मापूं शकेल ?

राजाः—आर्ये, असें करणें कसें शक्य होईल ? महासमुद्र गंभीर असून अप्रमाण आहे.

खेमाः—त्याचप्रमाणें, महाराज, ज्या रूपानें तथागताला मोजतां येईल तें तथागताचें रूप नष्ट झालें आहे. ज्या वेदनेनें... ज्या संज्ञेनें.... ज्या संस्कारांनीं.... ज्या विज्ञानानें तथागताला मोजतां येईल तें तथागताचें विज्ञान नष्ट झालें आहे. म्हणून मरणोत्तर तथागत होतो किंवा नाहीं, इत्यादि प्रश्नांचीं सरळ उत्तरें देतां येणें शक्य नाहीं."

पसेनदि राजा खेमेचें अभिनंदन करून श्रावस्तीला आला, व तेथें त्यानें भगवंताला हेच प्रश्न विचारले. भगवंतानेंहि खेमेप्रमाणेंच त्यांचीं उत्तरें दिलीं. तेव्हां तो म्हणाला, "ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. खेमा भिक्षुणीनेंहि ह्या प्रश्नांचीं अशींच उत्तरें दिलीं."

ह्यावरून खेमेला प्रज्ञावती भिक्षुणींत अग्रस्थान कां मिळालें होतें, हें सहज लक्ष्यांत येण्याजोगें आहे.

## ४४
## उप्पलवण्णा

" ऋद्धिमती भिक्षुणीश्राविकांत उप्पलवण्णा श्रेष्ठ आहे."

ही श्रावस्ती येथें एका श्रेष्ठीच्या कुळांत जन्मली. कमलासारखी तिची कांति होती म्हणून उप्पलवण्णा (उत्पलवर्णा) असें तिचें नांव ठेवण्यांत आलें. ती वयांत आल्यावर तिच्या सौंदर्याची कीर्ति ऐकून पुष्कळ राजकुमारांनीं आणि श्रेष्ठिकुमारांनीं तिची मागणी केली. तिच्या बापावर हें एक मोठें संकटच ओढवलें. मुलीनें प्रव्रज्या घेतली तर ह्यांतून आपण सुटेन, असें वाटून तो तिला म्हणाला, " तूं भिक्षुणी होऊं शकशील काय ?" हें ऐकून तिला अतिशय आनंद झाला, व ती भिक्षुणी होण्यास तेव्हांच तयार झाली. त्याप्रमाणें तिला भिक्षुणी करण्यांत आलें. भिक्खुणीसंयुत्तांत हिचा माराबरोबर संवाद आहे, त्याचा सारांश असा:--

उप्पलवण्णा सकाळच्या प्रहरीं एका प्रफुल्लित शालवृक्षाखालीं उभी होती. त्या वेळीं पापी मार उप्पलवण्णा भिक्खुणीला भय आणि लोमहर्ष उत्पन्न करण्याच्या आणि समाधीपासून भ्रष्ट करण्याच्या उद्देशानें तिकडे आला आणि म्हणाला, " या सुपुष्पित शालवृक्षाखालीं तूं एकटी उभी आहेस. तुझ्यासारखी दुसरी सुंदर स्त्री मिळणें कठीण; हे वेडे तुला धूर्तांचें भय वाटत नाहीं काय ?"

उप्पलवण्णा म्हणाली, " येथें शंभर आणि हजार जरी धूर्त आले, तरी ते माझा एक लोमहि वाकवूं शकणार नाहींत. हे मार, मी जरी एकटी आहें, तरी मी तुला भीत नाहीं....माझें चित्त माझ्या स्वाधीन आहे. ऋद्धिपाद[१] मला पूर्णपणें अवगत आहेत, व मी सर्व बंधनांपासून मुक्त झालें आहें. बा मारा, मी तुला घाबरत नाहीं."

---

१ छंद, वीर्य, चित्त आणि मीमांसा हे चार ऋद्धिपाद आहेत. यांच्या योगें सिद्धि प्राप्त होतात.

## ४९

# पटाचारा

" विनयधर भिक्षुणीश्राविकांत पटाचारा श्रेष्ठ आहे. "

ही श्रावस्ती येथें एका सावकाराच्या कुटुंबांत जन्मली. वयांत आल्यावर आपल्या बापाच्या एका नोकरावर तिचें मन जडलें. अर्थातच ही गोष्ट घरांत कोणास माहीत नव्हती. पुढें समानजातीच्या तरुणाबरोबर तिचें लग्न ठरलें असतां ह्या नोकराला बरोबर घेऊन, व बरोबर नेण्याजोगे दागदागिने घेऊन ती घरांतून पळून गेली. तीं दोघें श्रावस्तीहून तीन चार योजनांच्या अंतरावर एका खेडेगांवीं जाऊन राहिलीं. कांहीं काळानें ती गरोदर झाली, व नवमास पूर्ण झाल्यावर आपल्या बापाच्या घरीं जाण्यास सिद्ध झाली. नवऱ्याला ही गोष्ट इष्ट नव्हती. म्हणून तो आजउद्यां करीत राहिला. शेवटीं ती एकटीच निघाली. नवऱ्यानें मागोमाग येऊन तिला गांठलें. वाटेंतच तिला मुलगा झाल्यामुळें श्रावस्तीला जाण्याचा बेत रहित करून तीं आपल्या राहत्या गांवीं आलीं. पुन्हा कांहीं वर्षांनीं ती गरोदर झाली, व नवमास पूर्ण झाल्यावर नवरा टंगळमंगळ करीत असतां एकटीच श्रावस्तीला जाण्यास निघाली.[१]

वाटेंत एका निर्जन प्रदेशांत तिला नवऱ्यानें गांठलें. तेथेंच तिला प्रसववेदना होऊं लागल्या. इतक्यांत अकालमेघ उद्भवून जिकडे तिकडे पाणीच पाणी होऊन गेलें. अशा स्थितींत आपणावर कांहीं तरी आच्छादन असावयास पाहिजे, असें ती नवऱ्यास म्हणाली. त्यानें खुंट वगैरे गाडून एक झोपडी बनविण्यास आरंभ केला. ती शाकारण्यासाठीं एका वारुळाजवळ असलेलें गवत कापीत असतां, तेथील भयंकर कृष्णसर्प त्याच्या पायाला चावला, व तो मरून खालीं पडला. इकडे त्याची स्त्री प्रसूत होऊन पुत्र प्रसवली, व ती सारी रात्र दोन्ही मुलांना उराशीं घेऊन तिनें मोठ्या संकटांत घालविली. ' मी अनाथ झालेली पाहून मला माझा पति सोडून तर गेला नसेल ना ? ' असें तिला वारंवार वाटे.

---

१ येथपर्यंत ही गोष्ट चूळपंथक आणि महापंथक ह्यांच्या आईच्या गोष्टीसारखीच आहे.

पण दुसऱ्या दिवशीं इकडे तिकडे हिंडत असतां तिला त्याची गत काय झाली हें समजलें. तेव्हां मुलांना घेऊन कोठें तरी गांवाच्या जवळ जाण्याच्या उद्देशानें ती तशीच पुढें चालली. लहान मुलाला ओटींत, व मोठ्या मुलाला तिनें हातांत धरलें होतें. वाटेंत पावसामुळें एका ओढ्याला बरेंच पाणी आलें होतें. तेव्हा मोठ्या मुलाला अलीकडच्या तीरावर ठेवून व धाकट्याला पलीकडच्या तीराला घेऊन जाऊन त्याला तेथें चिंध्यांच्या बिछान्यावर निजविलें, व ती परत येऊं लागली. ती त्या ओढ्याच्या मध्यभागीं आल्यावर एक ससाणा धाकट्या मुलाला पकडण्यासाठीं येत असलेला तिनें पाहिला. जोरानें हात हालवून ती त्या ससाण्याला पळवूं लागली. पण त्यामुळें, आई आपणास बोलावते आहे असें वाटून मोठ्या मुलानें ओढ्यांत उडी टाकली व तो वाहून गेला !

इकडे धाकट्या मुलाला बचावण्यासाठीं ती धांवत आहे, तोंच ससाणा त्याला घेऊन पळून गेला. त्यायोगें अत्यंत शोकाकुल होऊन,—

**दोघे पुत्र मेले, मला माझा पति ।**

असें म्हणत म्हणत ती श्रावस्तीला आली. तेथें तिचे आईबाप व भाऊ घराला आग लागून एकाच ठिकाणीं जळून मेल्याचें तिला वर्तमान समजलें. तेव्हां ती अगदींच वेडी होऊन गेली, व म्हणूं लागली कीं,

**दोघे पुत्र मेले, मेला माझा पति ।**
**आईबाप जळती, बंधूसहं[1] ।।**

अशा स्थितींत ती नागडीउघडी भटकत असे, व कोणी कपडा दिला तर तो फाडून फाडून त्याच्या चिंध्या करी; म्हणून तिला पटाचारा हें नांव पडलें. एके दिवशीं भगवान् बुद्ध जेतवनांत पुष्कळ लोकांना धर्मोपदेश करीत असतां ती तेथें येऊन एका बाजूला उभी राहिली. तेव्हां भगवंतानें

---

१ मूळ गाथा थेरी अपदानांत आहे. ती अशी:—

**उभो पुत्ता कालकता पन्थे मय्हं पति मतो ।**
**माता पिता च भाता च एकचितकस्मि डय्हरे ।।**

दोन्ही पुत्र मेले. मार्गांत माझा पति मेला. आईबाप आणि भाऊ एकाच चितेवर जळाले.

मैत्रीभावनेनें तिच्याकडे पाहिलें, आणि तो म्हणाला, " भगिनी ताळ्यावर ये, भगिनी ताळ्यावर ये. " हे शब्द कानीं पडल्याबरोबर तिच्या मनांत अत्यंत लज्जा उद्भवली, व ती मटकन् खालीं बसली. जवळ उभा असलेल्या एका मनुष्यानें आपलें उपरणें तिच्या अंगावर फेकलें. तें नेसून ती धर्मश्रवण करूं लागली. तेव्हां भगवान् म्हणाला, " पुत्र, पिता किंवा बांधव आपलें रक्षण करूं शकत नाहींत. ज्याच्यावर काळाचा घाला आला असेल, त्याचें आप्तांकडून संरक्षण होत नसतें. हें जाणून शीलसंवृत होऊन शहाण्या माणसानें त्वरित निर्वाणगामी मार्गाला [१] लागावें. "

नंतर तिनें भिक्षुणींच्या संघांत प्रवेश केला व क्रमानें अर्हत्पद मिळविलें. भिक्षुसंघांत जसा उपालि स्थविर विनयाच्या नियमांत कुशल होता, तशी ही भिक्षुणीसंघांत होती. म्हणून विनयधर भिक्षुणींत तिला अग्रस्थान मिळालें.

## ४६

## धम्मदिन्ना

" धर्मोपदेशक भिक्षुणीश्राविकांत धम्मदिन्ना श्रेष्ठ आहे. "

राजगृहांत विशाख नांवाचा एक श्रेष्ठी बिंबिसार राजाचा मित्र होता. राजाच्या सहवासानेंच तो भगवंताच्या उपदेशाकडे वळला, व क्रमानें अनागामी झाला. धम्मदिन्ना ही त्याची आवडती बायको होती. पण ज्या दिवशीं त्याला अनागामिफळ मिळालें, त्या दिवशीं रोजच्या प्रमाणें त्याचें स्वागत करण्यासाठीं धम्मदिन्नेनें पुढें केलेला हात त्यानें स्वीकारला नाहीं. जेवण्याच्या वेळींहि तो मुकाट्यानें जेवला. तेव्हां आपला कांहीं दोष असावा असें वाटून त्याविषयीं धम्मदिन्नेनें त्याला प्रश्न केला. त्यानें घडलेला प्रकार सांगितला, व तो म्हणाला, " आजपासून माझ्याजवळ बसणें किंवा

---

१. मूळ गाथा धम्मपदांतील आहेत त्या अशाः—

**न सन्ति पुत्ता ताणाय, न पिता न पि बन्धवा ।**
**अन्तकेनाधिपन्नस्स नत्थि ञातीसु ताणता ॥**
**एतमत्थवसं ञत्वा पण्डितो सीलसंवुतो ।**
**निब्बानगमनं मग्गं खिप्पमेव विसोधये ॥**

जेवणें तुला योग्य नाहीं. ह्या घरांत असलेली सर्व संपत्ति घेऊन तूं तिचा यथारुचि विनियोग कर; पाहिजे तर येथें रहा, पाहिजे तर आपल्या आईच्या घरीं जा." धम्मदिन्नेला ही गोष्ट पसंत पडली नाहीं, व नवऱ्याची परवानगी घेऊन ती भिक्षुणी झाली. कांहीं काळ खेडेगांवांत एकांतवासांत घालवून तिनें अर्हत्पद मिळविलें व ती पुन्हां राजगृहाला आली. विशाखश्रेष्ठीला तिच्या आगमनाची बातमी लागली, तेव्हां तिची परीक्षा पहाण्यासाठीं ती होती तेथें जाऊन त्यानें तिला धर्मविषयक अनेक प्रश्न विचारले. त्यांचीं धम्मदिन्नेनें यथायोग्य उत्तरें दिल्यावर विशाखानें तें सर्व वर्तमान भगवंताला निवेदित केलें. तेव्हां भगवान् म्हणाला, "हे विशाख, धम्मदिन्ना भिक्षुणी पंडिता आहे, महाप्रज्ञावती आहे. मला जर तूं हे प्रश्न विचारले असतेस, तर मीहि तुला अशींच उत्तरें दिलीं असतीं."[१]

## ४७

## नंदा

"ध्यानरत भिक्षुणीश्राविकांत नंदा श्रेष्ठ आहे."

ही महाप्रजापती गोतमीची मुलगी. भगवंतापेक्षां जरा वयानें मोठी. तिच्या सौंदर्यावरून तिला रूपनंदा असेंहि म्हणत. तिचें लग्न झालें होतें कीं नाहीं, व झालें असल्यास तिच्या नवऱ्याचें नांव काय, ह्याची माहिती सांपडत नाहीं. महाप्रजापतीच्या प्रव्रज्येनंतर हीहि भिक्षुणी झाली. परंतु रूपाचा गर्व वहात असल्यामुळें ती भगवंताच्या दर्शनाला जात नव्हती. पण एके दिवशीं भिक्षुणी ह्या नात्यानें तिला स्वतःच बुद्धदर्शनाला जाणें भाग पडलें; व भगवंतानें खेमेप्रमाणें हिलाहि क्षणोक्षणीं पालटत जाणारी स्त्री दाखवून हिचा रूपगर्व हरण केला.

थेरीगाथेंत एक दुकनिपातांत व दुसरी पंचक निपातांत अशा दोन नंदा आहेत. त्यांच्या गाथांच्या अट्ठकथेंत थेरीअपदानाला अनुसरून पहिलीचें अभिरूपनंदा व दुसरीचें सुंदरीनंदा अशीं नांवें दिलीं आहेत. पहिली खेमक शाक्याची मुलगी व दुसरी शुद्धोदनाची आणि महाप्रजापती गोतमीची

---

१. विशाख आणि धम्मदिन्ना ह्यांचा संवाद व हें भगवंताचें भाषण मज्झिमनिकायांतील चूळवेदल्ल सुत्तांत आहे.

मुलगी. दोघींनाहि रूपाचा गर्व होता, व तो खेमेप्रमाणेंच भगवंतानें हरण केला, असें अपदानावरून दिसून येतें. मनोरथपूरणीकारानें सुंदरीनंदेला रूपनंदा म्हटलें आहे, असें दिसून येतें. ह्या दोघांना भगवंतानें उपदेशिलेल्या अशा ज्या गाथा थेरीगाथेंत आहेत, त्यांत पहिली दोन्ही ठिकाणीं सारखीच आहे. ती अशी:—

**आतुरं असुचिं पूतिं पस्स नन्दे समुस्सयं ।**
**असुभाय चित्तं भावेहि एकग्गं सुसमाहितं ॥**

अर्थ :— हे नंदे, हा देह पीडित, अशुचि आणि घाणेरडा आहे, असें जाण; आणि एकाग्रतेनें ह्याच्या घाणेरडेपणाची भावना कर.

## ४८

## सोणा

"उत्साही भिक्षुणीश्राविकांत सोणा श्रेष्ठ आहे,"

ही श्रावस्ती येथें एका कुटुंबांत जन्मली. पुढें वयांत आल्यावर लग्न होऊन तिला पुष्कळ मुलें झालीं; व तीं वयांत आल्यावर आपापला प्रपंच थाटून राहूं लागलीं. पण ह्या म्हातारीला कोणीच पुसत नसे. त्यामुळें वैराग्य उत्पन्न होऊन सोणा भिक्षुणी झाली. पुष्कळ मुलें होतीं म्हणून तिला बहुपुत्रिका सोणा असेंहि म्हणत असत. वृद्धपणीं भिक्षुणी झाली असतांहि तिनें मोठ्या उत्साहानें बुद्धोपदेशाचें अनुकरण करून अर्हत्पद मिळविलें. तिच्या थेरीगाथेंत गाथा आहेत, त्यांपैकीं दोन येथें देतों :—

**दस पुत्ते विजायित्वा अस्मिं रूपसमुस्सये ।**
**ततो हं दुब्बला जिण्णा भिक्खुनिं उपसंकमिं ॥**
**सा मे धम्ममदेसेसि खन्धायतनधातुयो ।**
**तस्सा धम्मं सुणित्वान केसे छेत्वान पब्बजिं ॥**

**अर्थ** :— ह्या जन्मीं दहा मुलांना जन्म देऊन म्हातारी झाली असतां मी भिक्षुणीजवळ आलें. तिनें मला धर्मोपदेश केला; स्कन्ध, आयतन आणि धातु काय आहेत, हें सांगितलें. तिचा धर्म ऐकून केशवपन करून मी भिक्षुणी झालें.

## ४९

## सकुला

" दिव्यचक्षु प्राप्त झालेल्या भिक्षुणीश्राविकांत सकुला श्रेष्ठ आहे."

हिची फारशी माहिती सांपडत नाहीं. श्रावस्तींतील एका कुटुंबांत ती जन्मली व पुढें वयांत आल्यावर भिक्षुणी होऊन ध्यानसमाधीच्या योगें तिनें दिव्यदृष्टि संपादन केली, एवढीच माहिती मनोरथपूरणींत आहे. परंतु थेरीगाथेच्या अट्ठकथेंत ही ब्राह्मणकुळांत जन्मली, असा उल्लेख[1] आहे. खुद्द थेरीगाथेंत स्वतःच्या संबंधानें तिच्या दोन गाथा आहेत त्या अशा :--

> अगारस्मिं वसन्तीहं धम्मं सुत्वान भिक्खुनो ।
> अद्दसं विरजं धम्मं निब्बानं पदमच्चुतं ।।
> साहं पुत्तधीतरञ्च धनधञ्ञं च छड्डिय ।
> केसे छेदापयित्वान पब्बजिं अनगारियं ।।

अर्थः-- मी गृहस्थाश्रमांत रहात असतां एका भिक्षूकडून धर्म ऐकून विशुद्ध अच्युतस्थान निर्वाण जाणलें; आणि मुलामुलींना आणि धनधान्याला सोडून केशवपन करून भिक्षुणी झालें.

## ५०

## भद्दा कुण्डलकेसा

" तत्काळ बोध प्राप्त झालेल्या भिक्षुणीश्राविकांत भद्दा कुण्डलकेसा श्रेष्ठ आहे."

ही राजगृहांत एका श्रेष्ठिकुळांत जन्मली. भद्दा हें तिचें नांव होतें. त्याच दिवशीं राजपुरोहिताला एक मुलगा झाला. त्याच्या जन्माच्या वेळीं नगरांतील आयुधें प्रज्वलित झालीं. त्यामुळें राजा घाबरून गेला, व दुसऱ्या दिवशीं पुरोहिताला म्हणाला, "रात्रीं आयुधें प्रज्वलित झाल्यामुळें माझे लोक भिऊन गेले." पुरोहित म्हणाला, "हें आपल्याच महालांत घडलें असें नाहीं; सर्व नगरांत असाच प्रकार घडला. माझ्या घरीं जो मुलगा जन्मला

---

१ थेरी अपदानांतहि 'पच्छिमे च भवे दानि । जाता विप्पकुले अहं ।।' असें सकुलेचें म्हणणें आहे.

तो सर्वांचा शत्रु होणार, त्याचें हें पूर्वचिन्ह आहे. पण त्यामुळें तुमच्या जिवाला कांहीं धोका नाहीं. जर तुमची इच्छा असेल, तर त्या मुलाला येथून मी बाहेर पाठवून देतों."

आपणाला कांहीं बाधा नाहीं, असें पाहून राजानें त्या मुलाला पुरोहिताच्याच घरीं राहूं दिलें. पुरोहितानें त्याचें नांव शत्रुक हेंच ठेविलें. तो इकडे तिकडे धावण्यापळण्यास समर्थ झाल्याबरोबर चोऱ्या करूं लागला. बापानें त्याचें नियमन करण्याची हद्द करून पाहिली ! पण कांहीं उपाय चालेना ! तेव्हां वयांत आल्याबरोबर काळीं वस्त्रें नेसावयास देऊन, व चोरीला लागणारीं आउतें त्याच्या हवालीं करून बापानें त्याला घरांतून हांकून दिलें. त्या दिवसापासून चोऱ्यांवर तो निर्वाह करूं लागला.

राजा नगरसंचाराला निघाला असतां, ज्या त्या घराच्या भिंतीला पडलेलीं भोकें पाहून, आपल्या सारथ्याला म्हणाला, "भिंतीला भोकें कां पाडण्यांत आलीं असावीं ?" सारथी म्हणाला, "महाराज, शत्रुक नांवाचा एक चोर अशीं भोकें पाडून चोऱ्या करीत असतो." तें ऐकून राजानें कोतवालाला बोलावून आणलें, आणि तो म्हणाला, "आमच्या शहरांत जो चोर चोऱ्या करीत आहे, त्याला तूं कां पकडीत नाहींस ?"

को० :—महाराज, चोरी करतांना तो दिसत नाहीं, म्हणून त्याला आम्ही पकडूं शकत नाहीं.

राजा:—आजच्या आज जर तूं त्या चोराला पकडशील, तरच जगशील, नाहीं तर तुला योग्य शिक्षा करण्यांत येईल.

हा राजाचा प्रयोग लागू पडला. त्याच रात्रीं कोतवालानें जिकडे तिकडे गुप्त हेर ठेवून शत्रुकाला चोरीच्या मालासह पकडलें, व दुसऱ्या दिवशीं राजाजवळ नेलें. त्याला दक्षिणद्वारांतून शहराबाहेर नेऊन ठार करावें, असा राजानें हुकूम केला. शहराच्या प्रत्येक चौकांत त्याची धिंड काढून त्याला घेऊन जात असतां भद्रेनें पाहिलें व ती त्याच्यावर इतकी आसक्त झाली कीं, जर शत्रुक नवरा मिळाला नाहीं तर प्राण देणार, असें तिनें आपल्या आईबापांना स्पष्ट सांगितलें. एकुलती एक मुलगी, तिची पुष्कळ समजूत घालण्यांत आली; परंतु कांहीं इलाज चालेना. तेव्हां बाप धांवत कोतवालापाशीं गेला आणि एक हजार कार्षापण लांच देऊन म्हणाला,

'कसेंहि करून ह्या चोराला माझ्या हवालीं करा.' कोतवालानें शत्रुकाला संध्याकाळ होईपर्यंत इकडे तिकडे फिरविलें, व संध्याकाळीं फांशीची शिक्षा झालेल्या दुसऱ्याच एका चोराला त्याच्या ऐवजीं ठार मारून शत्रुकाला श्रेष्ठीच्या दासांच्या हवालीं करण्यांत आलें. त्यांनीं त्याला घरीं आणलें; तेव्हां श्रेष्ठीनें त्याला गंधोदकानें स्नान घालावयास लावून व सर्व आभरणांनीं मंडित करून भद्देच्या महालांत पाठविलें. तिनें अत्यंत प्रमुदित होऊन त्याचें आगतस्वागत केलें.

परंतु शत्रुकाचें मन त्या महालांत रमेना. कांहीं तरी युक्ति करून भद्देचे अलंकार घेऊन पळून जाण्याची त्याला फार इच्छा झाली, व तो भद्देला म्हणाला, "मला तुला कांहीं सांगावयाचें आहे." जणुं काय आपणाला हजार कार्षापण मिळाले आहेत इतका त्या त्याच्या एका शब्दानें भद्देला आनंद झाला, व ती म्हणाली, "आर्य, तुम्हांला जें सांगावयाचें असेल तें सांगा."

श०—तुझ्यामुळें मी जगलों असें तुला वाटतें. परंतु तें खरें नाहीं. ज्या वेळीं मला पकडण्यांत आलें, त्याच वेळीं चोरांच्या कड्यावर राहणाऱ्या देवतेला मीं नवस केला होता. त्यामुळें मी सुटलों. तेव्हां चल, आपण तो नवस पुरा करूं.

भद्देनें त्याच्या सांगण्याप्रमाणें नवसाची सर्व सिद्धता केली, व सर्व दागदागिने अंगावर घालून ती त्याबरोबर त्या कड्यावर गेली. तेथें पोंचल्यावर तो तिला म्हणाला, "आतां तुझी साडी सोडून सगळे दागिने काढून त्यांचें गांठोडें कर."

भद्दा:—पण आर्य, माझा अपराध तरी कोणता ?

श०—अग, मी नवस फेडण्यासाठीं आलों, हें तुला खरें वाटलें तरी कसें ? मी ह्या देवतेचें काळीजसुद्धां फाडून खाईन. केवळ तुझे दागिने घेऊन निघून जावें येवढ्याच उद्देशानें मी तुला येथें आणलें.

भद्दा:—पण आर्य, हे दागिने आणि मीहि तुमचीच नाहीं काय ?

श०—आम्हांला ही प्रेमाची भाषा समजत नाहीं ! तुझे दागिने हे तुझे दागिने आणि माझे ते माझे !"

भद्दा:—आतां एवढेंच जर करावयाचें असेल तर मला एवढें तरी करूं द्या कीं, अशी अलंकृत असतांनाच तुम्हांला पुढून आणि मागून एकदां आलिंगन देऊं द्या."

शत्रुक म्हणाला, "ठीक आहे!"

तिनें पुढून आलिंगन दिलें व मागून आलिंगन देत असतां एकदम धक्का देऊन त्याला त्या कड्यावरून खालीं लोटलें. खालीं पडतां पडतांच शत्रुकाचा चुराडा झाला. तेव्हां तेथील वनदेवता म्हणाली, "सर्वच ठिकाणीं पुरुष शहाणा होतो, असें नाहीं. त्या त्या प्रसंगीं चाणाक्ष स्त्रीहि आपलें शहाणपण दाखविते.[1]"

भद्दा, अशा स्थितींत घरीं जाणें योग्य नाहीं, असें वाटून एका निर्ग्रंथांच्या[2] आश्रमांत गेली, व तेथें तिनें प्रव्रज्येची याचना केली. त्यांनीं ताडफळाच्या बाठ्यानें केंस उपटून तिला प्रव्रज्या दिली. पुन्हां केंस वाढूं लागले तेव्हां ते कुण्डलाकार झाले. त्यामुळें लोक तिला 'कुंडलकेसा' म्हणूं लागले.

निर्ग्रंथांच्या पंथांत निष्णात होऊन ती वादविवाद करीत फिरत असे. कोणत्याहि गांवाजवळ आल्यावर तेथें एक वाळूची रास करून त्याच्यावर जांभळीची फांदी रोवीत असे; व जो कोणी श्रमण किंवा ब्राह्मण माझ्याशीं वाद करण्यास सिद्ध असेल त्यानें ही फांदी तुडवावी, असें म्हणत असे. श्रावस्ती येथें अशा रितीनें फांदी रोवून ती नगरांत गेली असतां सारिपुत्तानें मुलांकडून ती फांदी तुडवावयास लाविली, व भद्देच्या आव्हानावरून सर्व लोकांसमोर वाद करून तिला वादांत जिंकलें. त्यामुळें निर्ग्रंथांचा पंथ सोडून ती भिक्षुणी झाली.

वरील कथा मनोरथपूरणींत आणि थेरीगाथाअट्ठकथेंत सांपडते. परंतु खुद्द थेरीगाथेंत तिच्या पांच गाथा आहेत. त्यांपैकीं पहिल्या चार अशा,—

---

१ **न सो सब्बेसु ठानेसु पुरिसो होति पण्डितो।**
**इत्थी पि पण्डिता होति, तत्थ तत्थ विचक्खणा॥**

ही गाथा थेरी अपदानांत आहे, व ती मनोरथपूरणींतहि घेतली आहे.

२ जैनसंप्रदायाला पूर्वी निर्ग्रंथसंप्रदाय म्हणत असत.

लूनकेसी पङ्कधरी एकसाटी पुरे चरिं ।
अवज्जे वज्जमतिनी वज्जे चावज्जदस्सिनी ॥ १ ॥
दिवाविहारा निक्खम्म गिज्झकूटम्हि पब्बते ।
अद्दसं विरजं बुद्धं भिक्खुसङ्घपुरक्खतं ॥ २ ॥
निहच्च जानुं वंदित्वा सम्मुखा पञ्जलि अहं ।
एहि भद्देति अवच सा मे आसूपसम्पदा ॥ ३ ॥
चिण्णा अङ्गा च मगधा वज्जी कासी च कोसला ।
अनणा पञ्ञास वस्सानि रट्ठपिण्डं अभुञ्जिहं ॥ ४ ॥

(१) केंस उपटलेली, दांतावर मळ धारण करणारी व एकच वस्त्र वापरणारी अशी मी (निर्ग्रंथभिक्षुणी) होतें. अयोग्य तें मला योग्य वाटत असे, व योग्य तें मी अयोग्य समजत असें. (२) दिवसा गृध्रकूटपर्वतावर गेलें असतां भिक्षुसंघानें पुरस्कृत केलेल्या विमल बुद्धाला मी पाहिलें. (३) गुडघे टेकून नमस्कार करून हात जोडून मी समोर उभी राहिलें; 'भद्दे, ह्या धर्मांत ये,' असें भगवान् म्हणाला व तीच माझी उपसंपदा झाली. (४) अंग, मगध, वज्जी, काशी आणि कोसल ह्या देशांत मी (उपदेश करीत) प्रवास केला आहे. आज पन्नास वर्षें ऋणमुक्त होऊन मी राष्ट्रपिंड खात आहे.[1]

## ५१

## भद्दा कापिलानी[2]

"पूर्वजन्माची आठवण करणाऱ्या भिक्षुणीश्राविकांत भद्दा कापिलानी श्रेष्ठ आहे."

हिची हकिगत महाकाश्यपाच्या गोष्टींत (प्र. ४) आलीच आहे. महाकाश्यपाला उजव्या रस्त्यानें पाठवून भद्दा डाव्या रस्त्यानें थेट भिक्षुणींच्या उपाश्रयांत गेली व भिक्षुणी झाली. थेरीगाथेंत सांपडणाऱ्या तिच्या चार गाथांपैकीं शेवटली गाथा आहे ती अशी:–

---

१ ह्या गाथांचें आणि अपदानांतील भद्देच्या गोष्टीचें जुळतें. परंतु सारिपुत्तानें तिला भिक्षुणी केलें ही गोष्ट अपदानांत सांपडत नाहीं.

२ कपिलानी असाहि पाठ आढळतो.

दिस्वा आदीनवं लोके उभो पब्बजिता मयं ।
त्यम्ह खीणासवा दन्ता सीतिभूतम्ह निब्बुता ॥

अर्थः– ह्या प्रपंचांत दोष दिसून आल्यावरून आम्हीं उभयतांनीं प्रव्रज्या घेतली. आतां आमच्या वासनेचा क्षय झाला आहे; आम्ही दान्त झालों आहों, शांत झालों आहों; आम्ही निर्वाणाप्रत पोंचलों आहों.

## ५२

## भद्दा कच्चाना

अभिज्ञालाभिनी[१] भिक्षुणीश्राविकांत भद्दा कच्चाना श्रेष्ठ आहे."

ही आमच्या बोधिसत्त्वाची पत्नी; राहुलाची आई. महाप्रजापती गोतमी बरोबर हिनेंहि प्रव्रज्या घेतली. थेरी गाथेंत हिच्या गाथा सांपडत नाहींत. पण थेरी अपदानांत यशोधरेचें एक मोठें अपदान आहे. त्यावरून यशोधरा हीच असली पाहिजे, असें वाटतें. तें सर्व अपदान येथें देण्यास सवड नाहीं. हिच्या चरित्राशीं जुळणाऱ्या कांहीं वाक्यांचा सारांश मात्र येथें देतों.

पुष्कळ भिक्षुणींना बरोबर घेऊन ती ऋद्धिमती (यशोधरा) संबुद्धाजवळ आली, व त्याला नमस्कार करून म्हणाली, "आतां माझें वय ७८ वर्षांचें आहे. आतां जीवित थोडें राहिलें आहे. तुम्हांला सोडून मी जाणार आहें, माझा मोक्ष मी मिळविलेला आहे. ह्या संसारांत जर माझ्याकडून तुमचा कांहीं अपराध झाला असेल तर त्याची क्षमा करा... 'उपकार करणारी, सुखदु:खांमध्यें समानतेनें वागणारी, सदर्थ दाखविणारी व अनुकंपा करणारी अशी जी तीच खरी नारी होय,' अशी तुम्हीं जिची स्तुती केली ती मी तुमची पूर्वाश्रमांतील स्त्री आहें."

काळुदायीच्या गोष्टींत (प्र. ३२) राहुलमाता व बोधिसत्त्व एकाच दिवशीं जन्मल्याचें सांगितलें आहे. तें जर गृहीत धरलें, तर भगवंताच्या परिनिर्वाणापूर्वीं दोन वर्षें तिनें हें अपदान म्हटलें असावें, असें म्हणावें लागतें. त्याच वर्षी ती परिनिर्वाण पावली.

---

१ नानातऱ्हेच्या सिद्धि दाखविणें, दिव्यश्रोत्र, दुसऱ्याचें चित्त जाणणें, पूर्वजन्म आठवणें, दिव्यचक्षु व आर्यसत्यांचें ज्ञान अशा सहा अभिज्ञा आहेत.

## ८३

# किसा गोतमी

" रुक्षचीवर धारण करणाऱ्या भिक्षुणीश्राविकांत किसा गोतमी श्रेष्ठ आहे. "

ही श्रावस्ती येथें एका गरीब कुटुंबांत जन्मली. वयांत आल्यावर तिचें लग्न झालें. पण ती गरीब कुळांतील मुलगी म्हणून तिची सासरी अवहेलना होत असे. कांहीं काळानें तिला एक मुलगा झाला, व त्यामुळें तिची प्रतिष्ठा होऊं लागली. मुलगा मोठा होऊन इकडे तिकडे नाचूं उडूं लागला, तोंच एकाएकीं कांहीं रोग होऊन मरण पावला. तेव्हां ती अत्यंत शोकाकुल होऊन, 'ह्याला कांहीं औषध द्या; ह्याला कांहीं औषध द्या,' असें म्हणत इकडे तिकडे फिरूं लागली; व 'मेलेल्याला औषध कोणतें' असें म्हणून लोक तिची थट्टा करूं लागले. पण त्यामुळें ती ताळ्यावर न येतां अधिकाधिकच वेडी होत गेली. तेव्हां एक शहाणा मनुष्य तिला म्हणाला, " ह्या समोरच्या विहारांत भगवान् बुद्ध रहात आहे. त्याजकडे जाऊन तूं तुझ्या मुलाला औषध विचार." तिला तें खरें वाटून ती भगवंतापाशीं गेली व औषध मागूं लागली.

भगवान् म्हणाला, " औषधासाठीं मजपाशीं आलीस, हें तूं चांगलें केलेंस. तूं शहरांत जा, आणि ज्या घरांत कोणाचा आप्तइष्ट मरण पावला नसेल, त्यांच्याकडून थोडे मोहोरीचे दाणे घेऊन ये." ती संतुष्ट होऊन शहरांत गेली, व ज्याच्या त्याच्याकडे मोहोरीचे दाणे मागूं लागली. लोक तिला दाणे देऊं लागले. पण ती म्हणे, "तुमच्या घरच्या माणसांचा कोणी आप्तइष्ट मेला नाहीं ना?" अग गोतमी, हें तूं काय बोलतेस? येथें जिवंतांपेक्षां मेलेलींच माणसें जास्ती, असें लोक म्हणत. तेव्हां ती दाणे न घेतां दुसऱ्या घरीं जाई. ह्याप्रमाणें पुष्कळ घरें फिरल्यावर 'हाच जगाचा नियम आहे' असें जाणून व मुलाचें प्रेत स्मशानांत फेंकून देऊन ती आपणाशींच म्हणाली, " अनित्यता (मरण) हा गांवाचा किंवा शहराचा

स्वभाव नव्हे, किंवा एका कुळाचाहि नव्हे. देवलोकासह सर्व जगताचा हाच धर्म आहे.[१] "

भगवंतापाशीं आल्यावर त्यानें तिला धर्मोपदेश केला, व ती भिक्षुणी झाली.

भिक्खुनीसंयुत्तांत माराबरोबर झालेल्या तिच्या संवादाची हकीकत आहे. तिचा सारांश असा :—

सकाळच्या प्रहरीं किसा गोतमी श्रावस्तींत भिक्षाटन करून जेवण झाल्यावर विश्रांतीसाठी अंधवनांत जाऊन एका झाडाखालीं बसली. तिला भय आणि लोमहर्ष उत्पन्न करण्याच्या उद्देशानें आणि समाधीपासून च्युत करण्याच्या उद्देशानें मार तेथें आला आणि म्हणाला, " काय ग, मेलेल्या पुत्राच्या आईसारखी दिसतेस. तुझें तोंड रडवें दिसतें. येथें अरण्यांत एकटी कशाला बसतेस ? कोणी पुरुषाला कशाला शोधीत नाहींस ? "

किसा गोतमी म्हणाली, " खात्रीनें माझा मुलगा मेला आहे. सर्व पुरुषांची गति हीच होणार आहे. म्हणून मी शोकहि करीत नाहीं आणि रडतहि नाहीं; आणि, वा मारा, तुला घाबरतहि नाहीं. सर्व ठिकाणीं माझ्या तृष्णेचा नाश झाला आहे, अंधकारराशीचा विध्वंस झाला आहे, मृत्यूच्या सेनेवर जय मिळवून मी अर्हत्पद मिळविलें आहे. "

आपणाला किसा गोतमीनें ओळखलें, असें जाणून दुःखित अंतःकरणानें मार तेथेंच अंतर्धान पावला.

## ५४

## सिगाल माता

" श्रद्धाळु भिक्षुणीश्राविकांत सिगालमाता श्रेष्ठ आहे. "

---

१ मूळ गाथा अपदानांत आहे व ती मनोरथपूरणींत घेतली आहे. ती अशी:—

**न गामधम्मो नो निगमस्स धम्मो ।**
**न चापयं एककुलस्स धम्मो ॥**
**सब्बस्स लोकस्स सदेवकस्स ।**
**एसो व धम्मो यदिदं अनिच्चता ॥**

ही राजगृह नगरांत एका श्रेष्ठिकुळांत जन्मली. वयांत आल्यावर समानजाति तरुणाशीं तिचें लग्न झालें. तिला जो मुलगा झाला, त्याचें नांव 'सिगाल' असें ठेवण्यांत आलें, व त्यावरूनच तिला 'सिगालमाता' असें म्हणत. थेरीगाथेंत हिच्या गाथा सांपडत नाहींत. परंतु थेरी-अपदानांत हिचें एक अपदान आहे. त्यावरून असें दिसून येतें कीं, ज्या सिगालाला दिशांची पूजा[1] करीत असतां भगवंतानें उपदेश करून सन्मार्गाला लावलें, त्याचीच ही आई होती. ती म्हणते–

पच्छिमे च भवे दानि गिरिब्बजपुरुत्तमे ।
जाता सेट्ठिकुले फीते महारतनसंचये ॥ १ ॥
पुत्तो सिगालको नाम ममासि विपथे रतो ।
दिट्ठिगहनपक्खन्दो दिसापूजनतप्परो ॥ २ ॥
नानादिसा नमस्सन्तं पिण्डाय नगरं वजं ।
तं दिस्वा ओवदी बुद्धो मग्गे ठत्वा विनायको ॥ ३ ॥

अर्थः— (१) ह्या शेवटल्या जन्मीं मी गिरिव्रज (राजगृह) नांवाच्या श्रेष्ठ नगरांत अत्यंत सधन व भरभराटीला चढलेल्या श्रेष्ठिकुळांत जन्मलें. (२) खोट्या मार्गाला लागलेला, मिथ्यादृष्टीच्या जंगलांत शिरलेला, दिशांच्या पूजेंत तत्पर असा माझा सिगालक नांवाचा मुलगा होता. (३) तो दिशांची पूजा करीत असतां विनायक बुद्धानें नगरांत पिण्डपाताला जाण्याच्या वेळीं त्याला पाहिलें, व मार्गांत थांबून उपदेश केला.

## उपासक

### ५५ आणि ५६

### तपुस्स आणि भल्लिक

"प्रथम शरण गेलेल्या उपासकांत तपुस्स आणि भल्लिक हे पहिले आहेत."

हे उत्कलदेशांत एका कुटुंबिकाच्या घरीं जन्मले. तपुस्स हा वडील भाऊ, आणि भल्लिक धाकटा भाऊ होता. ते वयांत आल्यावर मध्यदेशांत व्यापार करून आपला चरितार्थ चालवीत असत. भगवंताला संबोधिज्ञान

[1] बुद्धलीलासारसंग्रह, भाग ३, प्र. १ लें पहा.

झाल्यानंतर तिसऱ्या आठवड्यांत बोधिवृक्षापासून कांहीं अंतरावर तो राजायतन वृक्षाखालीं बसला असतां हे दोघे भाऊ व्यापारासाठीं त्या मार्गानें चालले होते. तेथें त्यांना एका देवतेनें भगवंताला दान देण्यासाठीं उपदेश केला. त्याप्रमाणें भगवंतापाशीं जाऊन त्यांनीं त्याला साधा सत्तु, व मधुशर्करादि-मिश्रित सत्तु दिला; व ते भगवंताचे उपासक झाले. त्या वेळीं संघाची स्थापना झाली नव्हती. म्हणून 'भगवंताला शरण जातों, धर्माला शरण जातों,' ह्या दोन वचनांनींच ते शरण गेले. यास्तव त्यांना 'द्विवाचिक' उपासक म्हणतात. येथपर्यंतची कथा महावग्गाच्या आरंभीं सांपडते.

ह्यापुढें, भगवंतानें त्या दोघांना आपल्या डोक्याचे आठ केस दिले व स्वदेशीं जाऊन त्यांनीं त्या केसांवर मोठा चैत्य बांधला आणि त्यांतून उपोसथाच्या दिवशीं नीलरश्मि निघत असत, अशी दंत-कथा मनोरथपूरणींत आली आहे. ह्यापैकीं एक केस अशोकाच्या वेळीं मोग्गलिपुत्ततिस्सा महा-स्थविरानें सुवर्णभूमीला पाठविलेल्या सोण आणि उत्तर ह्या दोन स्थविरांनीं ब्रह्मदेशाला नेला व त्याच्यावरच रंगूनला असलेला अत्यंत भव्य सुवर्णचैत्य (स्वे-दगून फया) उभारला आहे, अशी ब्रह्मी लोकांची समजूत आहे.

## ५७

## अनाथपिंडिक

"दायक उपासकांत गृहपति सुदत्त अनाथपिंडिक श्रेष्ठ आहे."

ह्याचा जन्म श्रावस्ती येथें सुमनश्रेष्ठीच्या कुळांत झाला. सुदत्त हें त्याचें नांव. तो गरिबांना पिंड देत असे, म्हणून त्याला अनाथपिंडिक असें म्हणत, व ह्याच नांवानें पुढें तो प्रसिद्धीस आला. राजगृह येथें त्यानें भगवंताची भेट कशी घेतली व पुढें श्रावस्तीला जाऊन जेतवनविहार कसा बांधला, हा सर्व वृत्तांत चुल्लवग्गांत आला आहे. त्याचा सारांश बुद्धलीलासार-संग्रहाच्या दुसऱ्या भागांत (प्र. ९) दिला असल्यामुळें येथें देण्यांत येत नाहीं. भगवंतानें उपदेशाला आरंभ काशीला केला असला तरी त्याची प्रसिद्धि बिंबिसारराजाच्या हयातींत राजगृह येथें विशेष झाली, व तेथूनच अनाथपिंडिकानें त्याला आमंत्रण करून श्रावस्तीला नेलें.

अजातशत्रूनें बिंबिसाराला मारून गादी बळकावल्यावर, व तो देव-दत्ताच्या नादीं लागल्यावर भगवान् बुद्ध बहुधा वर्षावासासाठीं श्रावस्तीलाच

रहात असे. येथें जेतवनाप्रमाणेंच विशाखेनें बांधलेला दुसरा एक प्रासाद होता. या दोन्ही ठिकाणीं भगवान् बुद्ध आळीपाळीनें राही. पसेनदी कोसलराजानें भगवंतासाठीं निराळा विहार बांधला नव्हता; तरी भगवंतावर त्याचें फार प्रेम होतें, व तो वारंवार जेतवनांत जाऊन भगवंताची भेट घेत असे. त्यामुळें भगवंताला श्रावस्ती येथें कोणाचाहि फारसा उपसर्ग पोंचत नसावा, व उत्तरवयांत चातुर्मासासाठीं येथेंच रहाणें, त्याला इष्ट वाटत असावें. अर्थात्, अनाथपिंडिकाच्या आरामांत राहून भगवंतानें केलेल्या उपदेशाची संख्या फारच मोठी आहे.

अनाथपिंडिकोवाद नांवाचें मज्झिमनिकायांत एक सुत्त आहे. त्यावरून व संयुत्तनिकायांतील सोतापत्तिसंयुत्तांतील कांहीं सुत्तांवरून सारिपुत्तानें अंतकाळीं अनाथपिंडिकाला उपदेश केला व त्यायोगें अत्यंत वेदना भोगीत असतांहि शांतपणें त्याला मरण आलें, असें दिसून येतें. म्हणजे बुद्ध भगवंताच्या परिनिर्वाणापूर्वीं बरींच वर्षें अनाथपिंडिक निवर्तला असावा. कारण भगवंताच्या परिनिर्वाणसमयीं सारिपुत्त हयात नव्हता. अनाथपिंडिक मोठा पंडित नव्हता; केवळ दाता होता. तरी बौद्ध वाङ्मयांत त्याचें नांव अजरामर होऊन बसलें आहे.

## ५८

## चित्र (चित्त) गृहपति

"धर्मोपदेश करणाऱ्या उपासकश्रावकांत चित्त गृहपति श्रेष्ठ आहे."

हा मगधराष्ट्रांत मक्षिकाशंड नगरांत एका श्रेष्ठिकुलांत जन्मला, व बापाच्या मरणानंतर स्वतः नगरश्रेष्ठी झाला. पंचवर्गीय भिक्षूंपैकीं महानाम स्थविर मक्षिकाशंडाला आला असतां त्याचा उपदेश ऐकून चित्र प्रसन्न झाला; व या स्थविरासाठीं त्यानें अंबाटकाराम नांवाच्या उद्यानांत विहार बांधून दिला. त्या उद्यानाजवळ चित्राचा मिगपथक नांवाचा एक गांव होता, व तेथें तो वारंवार येत असे, व अशा वेळीं अंबाटकारामांत वस्तीला राहिलेल्या भिक्षूंचीहि भेट घेत असे. सुधर्म नांवाच्या भिक्षूकडून तो इतर भिक्षूंना आमंत्रण पाठवीत असे; परंतु सारिपुत्त-मोग्गल्लनासारख्या प्रसिद्ध भिक्षुंना त्यानें स्वतःच आमंत्रण दिल्याची हकिगत पहिल्या

भागांत (कलम ७५) आलीच आहे. तो उपासक झाला होता तरी पुष्कळ काळपर्यंत बुद्धदर्शनाचा त्याला लाभ झाला नाहीं. नंतर मुद्दाम राजगृहाला जाऊन त्यानें भगवंताची भेट घेतली, असें मनोरथपूरणींत म्हटलें आहे.

संयुत्तनिकायांत चित्तसंयुत्त नांवाचें ह्याच्यासंबंधानें एक प्रकरण आहे. त्यांत दहा सुत्तें आहेत. पैकीं कांहीं सुत्तांत चित्रानें भिक्षूंला विचारलेले प्रश्न आहेत, व कांहींत स्वतःच भगवंताच्या उपदेशाचें त्यानें विवेचन केलें आहे. शेवटल्या तीन सूत्तांचा त्याच्या चरित्राशीं विशेष संबंध दिसतो; म्हणून त्यांचा सारांश येथें देतों.

(१) त्यावेळीं निगण्ठ नाथपुत्त[1] मोठ्या निगण्ठसमुदायासह मक्षिकाशंडाला आला होता. कांहीं उपासकांना बरोबर घेऊन चित्र गृहपति त्याजपाशीं गेला, आणि कुशल प्रश्नादिक विचारून एका बाजूला बसला. तेव्हां नाथपुत्त त्याला म्हणाला, "हे गृहपति, अवितर्कअविचार समाधि आहे, ह्या श्रमण गोतमाच्या म्हणण्यावर तुझा विश्वास आहे काय?"

चित्रः– भदंत, ह्या बाबतींत भगवंतावर श्रद्धा ठेवण्याचें कारण वाटत नाहीं.

हें चित्राचें भाषण ऐकून नाथपुत्त आपल्या समुदायाकडे वळून म्हणाला, "हा चित्र गृहपति किती साधा आणि सरळ आहे पहा! वितर्क विचारांचा निरोध करणारा म्हणजे वाऱ्याला जाळ्यांत बांधूं पहाणारा मनुष्य असला पाहिजे, किंवा गंगेचा ओघ आपल्या मुठीनें थांबवूं पहाणारा मनुष्य असला पाहिजे."

चित्र म्हणाला, "भदंत, तुम्हीं अनुभव-ज्ञानाला महत्त्व देतां कीं श्रद्धेला?"

नाथ०:–– हे गृहपति, श्रद्धेपेक्षां अनुभवज्ञानच श्रेष्ठ आहे.

चित्रः— भदंत, जेव्हां जेव्हां माझी इच्छा असते, तेव्हां तेव्हां सवितर्क सविचार एकांतापासून प्राप्त झालेलें प्रीतिसुख ज्यांत आहे, अशा प्रथम ध्यानांत मी मग्न होतों. जेव्हां इच्छा असेल, तेव्हां वितर्कविचारांची शांति करून वितर्कविचारविरहित द्वितीय ध्यानांत मग्न होतों.... तृतीय .... चतुर्थ

---

१ जैन तीर्थंकर महावीरस्वामीला निगण्ठ नाथपुत्त (निर्ग्रन्थ ज्ञातपुत्र) म्हणत असत.

ध्यानांत मग्न होतों. अर्थात् अवितर्कअविचार समाधि आहे, हें जाणण्याला कोणत्याहि श्रमणावर किंवा ब्राह्मणावर श्रद्धा ठेवण्याची मला गरज नाहीं."

हें ऐकून नाथपुत्त पुन्हां आपल्या शिष्यसमूहाकडे वळून म्हणाला, "हा चित्रगृहपति कसा द्वाड आणि शठ आहे पहा!"

चित्रः— भदंत, इतक्यांत तुम्हीं मला साधा आणि सरळ म्हणत होतां, आणि इतक्यांत द्वाड आणि शठ म्हणतां! एक तर तुमचें पहिलें भाषण खोटें असलें पाहिजे किंवा शेवटचें खोटें असलें पाहिजे. नंतर नाथपुत्ताला दहा[1] प्रश्न विचारून त्यांच्या उत्तरांची वाट न पहातां चित्रगृहपति तेथून निघून गेला.

(२) एके वेळीं चित्राचा पूर्वीचा मित्र अचेल (नग्न) काश्यप मक्षिकाशंडाला आला होता चित्रगृहपति तो होता तेथें जाऊन त्याला कुशल प्रश्नादिक विचारून एका बाजूला बसला, व म्हणाला, "भदंत काश्यप, परिव्राजक होऊन तुला किती वर्षें झालीं?"

का०— हे गृहपति, परिव्राजक होऊन मला तीस वर्षें झालीं.

चित्रः— पण भदंत, ह्या तीस वर्षांत सामान्य लोकांपेक्षां कांही विशेष ज्ञान मिळविलें आहे कीं नाहीं?

का०:— शरीराचा नागवेपणा, शिरोमुंडण आणि केसांची चवरी ह्याशिवाय दुसरें कांहीं प्राप्त झालें नाहीं.

चित्रः—वाहवा रे वाहवा! हा तुमचा पंथ फारच चांगला म्हटला पाहिजे! ज्यांत तीस वर्षें राहून नागवेपणा, शिरोमुंडण आणि चवरी ह्यांशिवाय दुसरें कांहीं प्राप्त होत नाहीं!

का० :— पण गृहपति, हें सांग कीं, तुला बुद्धोपासक होऊन किती वर्षें झालीं?

चित्र :— मलाहि उपासक होऊन तीस वर्षें झालीं.

का० :— बरें ह्या तीस वर्षांत तूं तरी कांहीं मिळविलें आहेस काय?

चित्र :— ह्यांत काय संशय? मी वाटेल तेव्हां चारहि ध्यानें मिळवूं शकतों. (येथें चित्रानें चार ध्यानें कशीं मिळवितां येतात हें सांगितलें.)

---

१ ह्या प्रश्नांचा चित्राच्या चरित्राशीं कांही संबंध नसल्यामुळें ते येथें दिले नाहींत.

चित्र गृहपतीचें भाषण ऐकून अचेल काश्यप प्रसन्न झाला; व बुद्ध-धर्मांत प्रव्रज्या मागूं लागला. चित्रानें त्याला स्थविरभिक्षूंजवळ नेऊन उप-संपदा देवविली. कांहीं काळानें काश्यप अर्हत्पदाला पावला.

( ३ ) चित्रगृहपति पराकाष्ठेचा आजारी होता. तेव्हां पुष्कळ देवता एकत्र जमून त्याला म्हणाल्या, " गृहपति, पुढच्या जन्मीं चक्रवर्ती राजा होईन, अशी इच्छा धर. "

चित्र त्यांना म्हणाला, " तेंहि ( चक्रवर्तिपदहि ) अनित्य आहे, तेंहि टाकून जावें लागतें. "

तो बडबडतो आहे, असें वाटून चित्राचे आप्तइष्ट म्हणाले, " आर्य-पुत्र, ताळ्यावर ये. बडबड करूं नकोस."

चित्र :– असें तुम्ही कां म्हणतां ?

ते :– तूं म्हणतोस कीं, तेंहि अनित्य आहे, तेंहि टाकून जावें लागतें.

जेव्हा चित्रानें आपल्या नातलगांना देवतांशीं झालेलें आपलें संभा-षण समजावून सांगितलें, तेव्हां आपणालाहि उपदेश करण्याची त्यांनीं चित्राला विनंति केली. बुद्ध, धर्म, आणि संघ ह्याच्यावर श्रद्धा ठेवण्यासाठीं व यथाशक्ति सत्पुरुषांना दान देण्यासाठीं सर्वांना उपदेश करून चित्रगृह-पतीनें प्राण सोडला.

५९

## हत्थक आळवक

" चार संग्रहांनीं लोकसंग्रह करणाऱ्या उपासकांत हत्थक आळवक श्रेष्ठ आहे. '

ह्याची चमत्कारिक गोष्ट आहे ती अशी :– आळवक राजा एक दिवस मृगयेला गेला असतां मृगाला मारून धनुष्याला टांगून परत येत होता. मार्गांत थकल्यामुळे तो एका वडाच्या झाडाखालीं बसला. थकवा गेल्यावर तो पुन्हां जाण्याच्या बेतांत होता. इतक्यांत तेथें रहाणाऱ्या यक्षानें त्याला पकडलें. त्याच्या हातांतून सुटण्याचा दुसरा मार्ग नसल्यामुळें रोजचा एक मनुष्य व एक हांडाभर अन्न देण्याचें कबूल करून त्यानें आपली सुटका करून घेतली. त्या दिवसापासून यक्षाला दररोज एक मनुष्य व हांडाभर

अन्न मिळत असे; कांहीं दिवसांनीं बंधनागारांतील कैदी खलास झाले, व आतां पुढें काय करावें, असा प्रश्न उपस्थित झाला. वयांत आलेल्या नागरिकांला पकडून यक्षाकडे पाठविलें तर राष्ट्रक्षोभ होईल असें जाणून नुकत्याच जन्मलेल्या बालकांना यक्षाकडे पाठविण्यास राजानें सुरवात केली. ह्यामुळें नवमास पूर्ण होण्यापूर्वीं गर्भिणी स्त्रिया दुसऱ्या देशांत जात, व प्रसूती–काळानंतर कांहीं महिने तेथेंच रहात. एके दिवशीं दुसरा मुलगा न मिळाल्यामुळें त्याच दिवशीं जन्मलेल्या आपल्या मुलाला राजानें यक्षाकडे पाठवून दिलें.

पूर्वरात्रीं भगवान् बुद्ध आळवक यक्षाच्या वसतिस्थानांत येऊन राहिला होता. आळवक त्याला म्हणाला, "श्रमणा, येथून बाहेर हो." ठीक आहे, असें म्हणून भगवान् तेथून बाहेर निघाला. यक्ष म्हणाला, "श्रमणा, आत ये." 'ठींक आहे' असें म्हणून भगवान् आंत गेला. असा प्रकार तीनदां घडला. चौथ्यांदा जेव्हां यक्षानें भगवंताला बाहेर जाण्यास सांगितलें, तेव्हां भगवान् म्हणाला, "आयुष्मन् , मी येथून बाहेर निघणार नाहीं. तुला जें कर्तव्य असेल तें कर."

यक्ष :– श्रमणा, तुला मी प्रश्न विचारतों. त्याचें जर तूं उत्तर दिलें नाहींस तर तुला मी वेड लावीन, तुझें काळीज फाडून टाकीन किंवा पायांना धरून तुला गंगेच्या पार फेंकीन.

भ० :– आयुष्मन् , मला वेड लावणारा, माझें काळीज फाडणारा किंवा पायांना धरून मला गंगेच्या पार फेंकणारा ह्या सर्व जगांत कोणी नाहीं. तथापि तुझी इच्छा असेल तर तूं खुशाल प्रश्न विचार.

नंतर यक्षानें भगवंताला बरेच प्रश्न विचारले, व त्यांचीं समर्पक उत्तरें मिळाल्यावर तो भगवंताचा उपासक झाला.[1]

दुसऱ्या दिवशीं राजपुरुष राजाच्या मुलाला घेऊन आळवक यक्षाच्या भवनांत आले, आणि त्यांनीं त्या मुलाला त्याच्या पुढें केलें. परंतु आळवक लज्जित होऊन खालीं मान घालून चूप बसला. तेव्हां भगवान्

---

१. 'पूर्वरात्रीं' येथपासून 'उपासक झाला' येथपर्यंत मजकूर सुत्तनिपातांतील आळवक सुत्ताच्या आधारें लिहिला आहे; मनोरथपूरणींत ह्याचा थोडक्यांत उल्लेख करून आळवकसुत्ताच्या अट्ठकथेवर हवाला दिला आहे.

म्हणाला, " आळवका, काळजी नकोस. त्या मुलाला घेऊन माझ्या स्वाधीन कर." त्याप्रमाणें आळवकानें मुलाला आपल्या हातांत घेऊन भगवंताच्या हातीं दिलें. भगवंतानें पुन्हां आळवकाच्या हातावर ठेविलें, व आळवकानें राजपुरुषांच्या हवालीं केलें. ह्याप्रमाणें एकाच्या हातून दुसऱ्याच्या हातीं गेल्यामुळें त्याला हत्थक ( हस्तक ) हेंच नांव देण्यांत आलें.[1]

तो चार संग्रहांनीं लोकसंग्रह कसा करीत होता, ह्याची माहिती अंगुत्तरनिकायाच्या अट्ठक निपाताच्या चोविसाव्या सुत्तांत सांपडते. त्या सुत्ताचा सारांश असा:—

एके काळीं भगवान् आळवी येथें अग्गाळव चैत्यांत रहात होता. त्या समयीं हत्थक आळवक पांचशें उपासकांचा समुदाय बरोबर घेऊन भगवंतापाशीं आला, आणि भगवंताला नमस्कार करून एका बाजूला बसला. तेव्हां भगवान् म्हणाला, " हत्थक, हा तुझा समुदाय मोठा दिसतो. ह्या समुदायाचा संग्रह तूं कसा करतोस ? "

ह०:— भदन्त, आपण चार लोकसंग्रहांचा[2] उपदेश केला आहे. त्यांहींकरून मी ह्या उपासकसमुदायाचा संग्रह करीत असतों. ज्याचा दानानें संग्रह करणें योग्य त्याचा दानानें, ज्याचा प्रियवचनानें करणें योग्य त्याचा प्रियवचनानें, ज्याचा अर्थचर्येनें ( उपयोगी पडण्यानें ) करणें योग्य त्याचा अर्थचर्येनें, व ज्याचा समानात्मतेनें ( आपणासारखें वागण्यानें ) करणें योग्य

---

१. ' हस्तक ' ह्या नांवाची व्युत्पत्ति लावण्यासाठीं अट्ठकथाकारानें आळवकाची दंतकथा येथें घेतली आहे, हें स्पष्ट दिसतें. तथापि या दंतकथेचें महत्त्व फार आहे. महाभारतांतील यक्षप्रश्नाचा आणि बकासूर-आख्यानाचा हिच्याशीं संबंध आहे. बुद्ध भगवान् आळवकाच्या भवनांत गेला, व आपल्या योगसामर्थ्यानें त्याला त्यानें आपला शिष्य केलें, ही गोष्ट अतिप्राचीन असल्याची साक्ष बौद्ध वाङ्मय व कोरीव कामें देत आहेत. ह्यावरून बकासुराची व यक्षप्रश्नाची गोष्ट रचली असावी. आणि बकासुराच्या गोष्टीवरून हस्तकाची गोष्ट रचली असावी.

२. दान प्रियवचन, अर्थचर्या आणि समानात्मता हीं चार लोकसंग्रहाचीं साधनें आहेत. त्यांना पालिभाषेंत संगहवत्थु म्हणतात. येथें लोकसंग्रह असेंच त्यांचे भाषांतर केलें आहे.

त्याचा समानात्मतेनें मी संग्रह करीत असतों. माझ्या घरीं संपत्ति आहे; दरिद्री असतों तर कदाचित् हें मला शक्य झालें नसतें. ”

भ०:—हत्थका, फार चांगलें ! फार चांगलें ! समुदायाचा संग्रह करण्याचा हाच योग्य उपाय आहे. अतीत काळीं, भविष्यत्कालीं व सांप्रत, ज्यांनीं लोकसंग्रह केला असेल, जे करतील किंवा करतात त्या सर्वांनीं ह्याच उपायांनीं लोकसंग्रह केला असेल, ते सर्व ह्याच उपायांनीं करतील, व सांप्रत करतात. ”

एवढा संवाद झाल्यावर हत्थक भगवंताला नमस्कार व प्रदक्षिणा करून तेथून निघून गेला. तेव्हां भगवान् भिक्षूंना म्हणाला, “ भिक्षुहो, हत्थक आळवक, श्रद्धा, शील, ऱ्ही ( लज्जा ), अवत्रप्य ( लोकोपवादभय ), बहुश्रुतता, त्याग, प्रज्ञा आणि अल्पेच्छता ह्या आठ गुणांनीं युक्त आहे. हे उत्तम आठ गुण हत्थकाच्या अंगीं वसत आहेत असें समजा. ”

## ६०

## महानाम शाक्य

“ उत्तम दान देणाऱ्या उपासकांत महानामशाक्य श्रेष्ठ आहे. ”

ह्याची माहिती अनुरुद्धाच्या गोष्टींत ( प्रकरण ५ ) आलीच आहे. भगवान् भिक्षुसंघासह कपिलवस्तूला जात असे, तेव्हां त्याची व भिक्षुसंघाची तरतूद लावण्याच्या कामीं हाच पुढाकार घेत असे. एका चातुर्मासांत त्यानें भिक्षुसंघाला औषधी पदार्थ पुरविण्याची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली होती, ही हकिगत दुसऱ्या भागांत ( कलम ९६ ) आलीच आहे. ह्याला उद्देशून भगवंतानें उपदेशिलेलीं पुष्कळ सुत्तें सुत्तपिटकांत आहेत. उपदेशाच्या दृष्टीनें त्यांचें महत्त्व फार आहे. परंतु त्यामुळें महानामाच्या चरित्रावर विशेष प्रकाश पडत नाहीं.

## ६१

## उग्ग गृहपति वैशालिक

“ आवडते पदार्थ देणाऱ्या उपासकांत उग्ग गृहपति वैशालिक श्रेष्ठ आहे. ”

हा दुसरा उत्तम गुण माझ्या अंगीं आहे. ( ३ ) मला चार कौमारिक स्त्रिया[1] होत्या. मी त्यांजकडे जाऊन त्यांना म्हणालों, " भगिनीनों, मी ब्रह्मचर्या-सह पांच शिक्षापदें अंगीकारिलीं आहेत. तेव्हां तुमच्यापैकीं जिची इच्छा असेल, तिनें येथें राहून धर्माचरण करावें. जिची इच्छा असेल तिनें आपल्या माहेरीं जावें, व पुनर्विवाह करण्याची जिची इच्छा असेल,[2] तिनें आपणाला कोणता पति आवडतो, हें मला सांगावें. तेव्हां जी माझी ज्येष्ठ भार्या होती, ती म्हणाली, " मला अमुक गृहस्थाला द्या. " त्या गृहस्थाला मी बोलावून आणलें, आणि डाव्या हातांत बायकोला व उजव्या हातांत पाण्याची झारी घेऊन तिला त्याच्या स्वाधीन करून त्याच्या हातावर पाणी सोडलें. अशा प्रसंगींही माझ्या चित्तांत यत्किंचित् विकृति उत्पन्न झाली नाहीं. हा माझ्या अंगीं तिसरा उत्तम गुण आहे. ( ४ ) माझ्या घरीं जी संपत्ति आहे, ती केवळ माझीच नव्हे तर साधुसंतांचीहि आहे, असें मी समजतों. हा माझ्या अंगीं चौथा उत्तम गुण आहे. (५) ज्या ज्या भिक्षूची मी उपासना करतों. त्या त्याची मोठ्या आदरानें उपासना करतो. हा माझ्या अंगीं पांचवा उत्तम गुण आहे. ( ६ ) त्या भिक्षूनें जर मला धर्मोप-देश केला तर मी तो आदरानें ऐकतों. त्यानें जर धर्मोपदेश केला नाहीं, तर मी त्याला धर्मोपदेश करतों. हा माझ्या अंगीं सहावा उत्तम गुण आहे. ( ७ ) भगवंतानें उत्तम प्रकारें धर्म उपदेशिला आहे, असें देवता मला सांगतात, ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पण मी त्यांना म्हणतों कीं, तुम्ही असें म्हणा किंवा न म्हणा, भगवंतानें उत्तम प्रकारें धर्म उपदेशिला आहे, ह्यांत मला शंका नाहीं. देवतांशीं माझा संवाद होतो, ह्या कारणास्तव माझ्या मनाला गर्वाची बाधा कधींच झाली[3] नाहीं. हा माझ्या अंगीं सातवा उत्तम गुण आहे. ( ८ ) इहलोकाला आणणारीं जीं पांच संयोजनें[4] भगवंतानें

---

१ कौमारिक स्त्रिया म्हणजे पुर्नविवाहाच्या नव्हेत.

२ **नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ ।**
**पञ्चस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥**
या पराशरस्मृतींतील श्लोकाची येथें आठवण होते.

३ येथें सॉक्रेटिसाबद्दल Oracle of Delphi नें दिलेलें मत व त्यासंबंधी सॉक्रेटिसाचें वर्तन यांची आठवण होते.

४ ' बुद्ध, धर्म आणि संघ ' परिशिष्ट २ पहा.

हा वैशाली येथें श्रेष्ठिकुलांत जन्मला. हा गुणांनीं व शरीरानें उद्गत (उंच) होता, म्हणून त्याला उग्ग असेंच म्हणत असत. त्याची आणि भगवंताची गांठ कशी पडली, व तो कशा प्रकारचा उपासक झाला, ह्याचें वर्णन अंगुत्तर निकायाच्या अट्ठकनिपाताच्या एकविसाव्या सुत्तांत सांपडतें. त्याचा सारांश असा:—

एके समयीं भगवान् बुद्ध वैशाली येथें महावनांत कूटागारशालेंत रहात होता. तेथें तो भिक्षूंना उद्देशून म्हणाला, "भिक्षुहो, वैशालिक उग्ग गृहपति आठ उत्तम गुणांनीं समन्वित आहे, असें समजा." असें बोलून तो विहारांत गेला.

तेथें हजर असलेला एक भिक्षु सकाळच्या प्रहरीं वैशालींत पिंड-पाताला गेला असतां उग्गगृहपतीच्या घरीं येऊन तेथें त्याच्यासाठीं मांड-लेल्या आसनावर बसला, व त्याला नमस्कार करून उग्ग एका बाजूला बसला. तेव्हां त्या भिक्षूनें त्याला प्रश्न केला कीं, तूं आठ गुणांनीं समन्वित आहेस, असें भगवान् म्हणाला, ते आठ गुण कोणते बरें?

उग्ग म्हणाला, "भदन्त, ते आठ गुण कोणते, तें मला माहीत नाहीं. तरी माझ्या अंगीं कोणते कोणते गुण आहेत, हें मी तुम्हाला सांगतों. (१) जेव्हां मीं भगवंताला प्रथमतः पाहिलें, तेव्हांच माझी त्याज-वर भक्ति जडली. हा पहिला उत्तम गुण माझ्यामध्ये आहे. (२) भगवंतानें मला धर्मोपदेश केला, आणि त्याचें तत्त्व मीं जाणलें. आतां मला त्याच्या धर्माविषयीं शंका राहिली नाहीं. बुद्धाला, धर्माला आणि संघाला मी शरण गेलों आहें, आणि ब्रह्मचर्यासहित पांच शिक्षापदें[1] मीं अंगीकारिलीं आहेत.

---

[1] प्राणघात न करणें, चोरी न करणें, व्यभिचार न करणें. खोटें न बोलणें व मादक पदार्थांचें सेवन न करणें, हे पांच नियम (शिक्षापदें) प्रत्येक बौद्ध गृहस्थाला पाळावे लागतात. त्यांत व्यभिचार न करणें, ह्याच्या ऐवजीं पूर्ण ब्रह्मचर्य पालन करणें, असा नियम उग्गगृहपतीनें केला होता. म्हणून ब्रह्मचर्यासहित पांच शिक्षापदें असें म्हटलें आहे. 'ब्रह्मचरियपञ्चमानि च शिक्खापदानि समादियिं' असें मूळ वाक्य आहे. 'अहिंसा सत्यमस्तेयब्रह्मचर्या-परिग्रहा यमाः' ह्या पतंजलीनें सांगितलेल्या यमांत 'अपरिग्रह' ह्याचा अर्थ मादक पदार्थांचें सेवन न करणें, असा जर केला, तर उग्गाच्या शिक्षापदांत आणि पतंजलीच्या यमांत मुळींच फरक रहात नाहीं.

सांगितली त्याचा माझ्या मनांत लेशहि राहिला नाहीं. हा माझ्या अंगीं आठवा उत्तम गुण आहे."

हें उग्ग गृहपतीचें भाषण ऐकून तो भिक्षु तेथून निघाला, व भिक्षाटन आटपून भगवंताजवळ आला. उग्गाची गोष्ट त्यानें भगवंताला सांगितली, तेव्हां भगवान् म्हणाला, "जें उग्ग गृहपति बोलला, तें ठीकच बोलला."

## ६२

## उग्गत गृहपति हस्तिग्रामक

"संघाच्या उपस्थायक उपासकांत उग्गत गृहपति हस्तिग्रामक श्रेष्ठ आहे."

त्याचा जन्म हस्तिग्रामांतील एका श्रेष्ठिकुलांत झाला. उग्गत हें त्याचें नांव. ह्याच्या आणि वैशालिक उग्ग[1] गृहपतीच्या गोष्टींत फार थोडा फरक आहे. ह्याची गोष्ट अट्ठकनिपाताच्या बाविसाव्या सुत्तांत आली आहे. त्या सुत्ताचा सारांश असा:—

भगवान् वज्जींच्या देशांत प्रवास करीत हस्तिग्रामाला आला. तेथें भिक्षूंना उद्देशून तो म्हणाला. "भिक्षुहो, उग्ग गृहपति हस्तिग्रामक आठ उत्तम गुणांनीं समन्वित आहे." एवढें बोलून भगवंतानें विहारांत प्रवेश केला. एका भिक्षूनें उग्गाच्या घरीं जाऊन त्याला हें वर्तमान सांगितलें व तो कोणत्या आठ गुणांनीं समन्वित आहे. ह्याची चौकशी केली. उग्ग म्हणाला, "भगवंतानें कोणते गुण सांगितले असतील, हें मला माहित नाहीं. तरी माझ्या अंगीं असलेले आठ चांगले गुण सांगतों. (१) मी जेव्हां भगवंताला नागवनांत[2] प्रथमतः पाहिलें. तेव्हा एकदम माझी त्याच्या-वर श्रद्धा जडली, व माझी दारूची धुंदी उतरली. हा पहिला चांगला गुण माझ्यामध्यें आहे. (२ ते ५ गुण वरच्या सुत्तांतल्या प्रमाणेंच आहेत.) (६) मी जेव्हां संघाला आमंत्रण करतों, तेव्हां अमूक भिक्षु समाधिप्रज्ञा-

१ येथें उग्गतालाच उग्ग म्हटलें आहे, असें मनोरथपूरणीवरून दिसून येतें.

२ हें उद्यान त्याच्या स्वतःच्या मालकीचें होतें, असें अट्ठकथाकाराचें म्हणणें आहे.

पारंगत, अमुकप्रज्ञाविमुक्त, अमुक समाधिकुशल, अमुक दृष्टिप्राप्त, अमुक श्रद्धाविमुक्त, अमुक धर्मानुसारी, अमुक श्रद्धानुसारी, अमुक शीलवान् व अमुक दुःशील, पापी आहे[१] असें देवता मला सांगतात. पण संघाला अन्नदान देत असतां त्यांच्या मध्यें मी भेदभाव ठेवीत नाहीं. सगळ्यांना समानतेनें वागवितों. हा माझा सहावा उत्तम गुण आहे. (७ वा पूर्वी प्रमाणेंच.) (८) जर मी भगवंतापूर्वी मरण पावलों, तर 'उग्ग गृहपति हस्तिग्रामक पुन्हां या लोकाला येणार नाहीं,' असें भगवंतानें म्हटल्यास नवल नाहीं. हा माझा आठवा उत्तम गुण आहे."

नंतर तो भिक्षु भगवंताजवळ गेला व उग्गाचें म्हणणें त्यानें भगवंताला कळविलें. तेव्हां भगवान् म्हणाला, "जें उग्ग गृहपति बोलला तें ठीकच बोलला."

उग्ग वैशालिक आणि उग्ग हस्तिग्रामक हे दोन निराळे गृहस्थ होते, यांत शंका नाहीं. परंतु ह्या दोन सूत्रांत सांगितलेले त्यांच्या आंगचें गुण जवळ जवळ एकसारखेच आहेत. तेव्हां ते यांपैकीं दोघांच्याहि अंगीं होते किंवा एकाच्याच अंगीं होते हें सांगणें कठीण आहे. कोणी ह्या उग्गासंबंधानें तर कोणी त्या उग्गासंबंधानें ही गोष्ट थोड्याबहुत फेरफारानें ऐकिली असावी; व दोघांच्या बोलण्यांत फरक झाल्याकारणानें पहिल्याला पहिली गोष्ट, व दुसऱ्याला दुसरी गोष्ट लागू करण्यांत आली असल्याचाहि संभव आहे.

## ६३

## शूर अंबट्ठ

"ज्ञानयुक्त श्रद्धा ठेवणाऱ्या उपासकांत शूर अंबट्ठ श्रेष्ठ आहे."

ह्याचा जन्म श्रावस्तींतील एका श्रेष्ठिकुलांत झाला. वयांत आल्यावर

---

१ येथें नऊ प्रकारचे भिक्षु सांगितले आहेत. त्यात शीलवान् व दुःशील (दुराचारी) हें स्पष्टच आहेत, श्रद्धानुसारी येथपर्यंत पहिल्या सातांची सविस्तर माहिती मज्झिमनिकायांतील कीटागिरिसुत्तांत सांपडते. Call the labourers and give them their hire, beginning from the last unto the first (Matthew. 20. 8.) ह्या बायबलांतील गोष्टीची येथें आठवण होते.

तो दुसऱ्या पंथांच्या श्रमणाच्या नादीं लागला होता; पण पुढें भगवंताचा धर्म ऐकून बुद्धोपासक झाला. तेव्हां हा आपल्या हातचा सुटून जातो, असें वाटून बुद्धाचें रूप घेऊन मार तेथें आला. बुद्ध भगवान् परत आला असें वाटून शूरानें त्याचा आदरसत्कार केला, व येण्याचें कारण विचारलें. बुद्धरूपी मार म्हणाला, "मी तुला पंचस्कंध अनित्य आहेत असें सांगितलें. पण तें बरोबर नाहीं. हें माझ्या लक्ष्यांत आल्यामुळें मी पुन्हां येथें आलों. कांही स्कंध अनित्य आहेत, हें खरें; पण कांहीं स्कंध नित्यहि आहेत, हें विसरतां कामा नये."

बुद्धवचनांत असा फेरफार होणें शक्य नाहीं, हें जाणून शूर म्हणाला, "तूं बुद्ध नाहींस, पण मार आहेस."

आर्यश्रावकाचे हे शब्द कानीं पडतांच माराला आपणावर जणूं काय पशुप्रहार झाल्यासारखें वाटलें. आणि भयभीत होऊन तो म्हणाला, "होय, मी मार आहें."

शूर:– अरे मारा, तुझ्यासारखे शेकडो आणि हजारो मार आले तरी माझें मन चलबिचल करूं शकणार नाहींत. तेव्हां तूं येथें उभा राहूं नकोस.

असें म्हणून अंबट्ठानें चिटकी वाजविली, व मार स्तब्ध होऊन तेथेंच अन्तर्धान पावला.

ही गोष्ट केवळ मनोरथपूरणींत सांपडते. ही काल्पनिक असली तरी मनोवेधक आहे, एवढ्याचसाठीं येथें दिली आहे.

## ६४

## जीवक कौमारभृत्य

"वैयक्तिक श्रद्धा ठेवणाऱ्या उपासकांत जीवक कौमारभृत्य श्रेष्ठ आहे."

ह्याची समग्र गोष्ट पहिल्या भागांत (कलम ६०–६२) आलीच आहे. राजगृह येथें यानें एक आम्रवन बुद्ध भगवंताला आणि भिक्षुसंघाला राहण्यासाठीं दिलें होतें. परिनिर्वाणापूर्वीं भगवान् राजगृहाला आला असतां अजातशत्रु राजाला त्याच्या भेटीला आणण्याचा प्रयत्न जीवकानेंच केल्याचें सामञ्ञफलसुत्तावरून दिसून येतें. परंतु जीवकाची सारी श्रद्धा व्यक्तिगत

होती, म्हणजे धर्म किंवा संघ ह्याविषयीं त्याचें निस्सीम प्रेम नव्हतें. म्हणून वैयक्तिक श्रद्धा ठेवणाऱ्या उपासकांत त्याला अग्रस्थान देण्यांत आलें.

## ६८

## नकुलपिता गृहपति

"दुसऱ्याचें समाधान करणाऱ्या उपासकांत नकुलपिता गृहपति श्रेष्ठ आहे."

याचा जन्म भर्गदेशांत सुंसुमार नगरांत एका श्रेष्ठीच्या कुळांत झाला. भगवान् त्या नगराला गेला असतां नकुलपित्याची आणि त्याच्या स्त्रीची त्यावर अत्यंत श्रद्धा जडली. तीं दोघें भगवंताला आपला पुत्र म्हणत असत, व तसेंच त्याच्यावर प्रेम करीत असत. तरी बुद्ध भगवंतानें आरंभीं धर्मोपदेश करून त्यांचा स्नेह नष्ट करण्याचा प्रयत्न केला नाहीं. हळु हळु त्यांच्या त्यानांच विचार करूं देऊन ताळ्यावर येऊं दिलें; व नंतर धर्मोपदेशानें त्यांना स्रोतआपत्तिफल मिळवून देण्यास मदत केली.

नकुलपिता आणि नकुलमाता ह्या दोघांचें परस्परांवर इतकें प्रेम होतें कीं, त्यांचीं चरित्रें अलगअलग लिहितां येणें शक्य नाहीं. त्यांचीं शरीरें भिन्न होतीं, तरी प्रपंचांतील राहणी एक होती, असें म्हटलें पाहिजे. अंगुत्तरनिकायाच्या चतुक्क निपातांत त्यांच्या संबंधानें एक सुत्त (नं. ५५) आहे, त्याचा सारांश असाः—

एके समयीं भगवान् भर्गदेशांत सुंसुमारगिर येथें भेसकलावनांत रहात होता. एके दिवशीं सकाळीं भगवान् नकुलपित्याच्या घरीं जाऊन तेथें त्याच्यासाठीं मांडलेल्या आसनावर बसला. नकुलपिता आणि नकुलमाता हीं दोघें भगवंताला नमस्कार करून एका बाजूला बसलीं. आणि नकुलपिता भगवंताला म्हणाला, "भदंत, नकुलमातेचें लग्न माझ्याबरोबर अत्यंत तरुणपणीं झालें; आणि तेव्हांपासून तिला सोडून माझें मन कधींहि दुसऱ्या ठिकाणीं गेल्याचें मला आठवत नाहीं. मग शरीरानें व्यभिचार घडल्याची गोष्ट सांगावयासच नको. आतां आमची अशी इच्छा आहे कीं, याच जन्मीं नव्हे, तर पुढल्या जन्मींहि आमचें असेंच सख्य कायम रहावें."

नकुलमाता ह्मणाली, "भदंत, माझें नकुलपित्यांशीं अत्यंत तरुणपणीं लग्न झालें; आणि तेव्हांपासून त्याला सोडून माझें मन कधींहि दुसऱ्या ठिकाणीं गेल्याचें मला आठवत नाहीं. मग शरीरानें व्यभिचार घडल्याची गोष्टच सांगावयास नको. आतां आमची अशी इच्छा आहे कीं, याच जन्मीं नव्हे तर पुढल्या जन्मींहि आमचें असेंच सख्य कायम रहावें."

भगवान् ह्मणाला, "अशी जर तुमची इच्छा आहे, तर तुम्हीं दोघांनी समानश्रद्ध, समानशील, समानत्याग व समानप्रज्ञ होण्याचा प्रयत्न केला पाहिजे. असें केल्यास इहलोकीं आणि परलोकीं तुमचें सख्य कायम राहील."

दुसऱ्या एका वेळीं बुद्ध भगवान् सुंसुमारगिर येथें रहात असतां नकुलपिता फार आजारी पडला. तेव्हां नकुलमाता त्याला ह्मणाली, "बा गृहपति, तुला जर मरण यावयाचें असेल तर तें प्रपंचासक्त होऊन येऊं देऊं नकोस. अशा रितीनें मरण येणें निंद्य आहे, असें भगवंतानें म्हटलें आहे. कदाचित् तुला अशी शंका येईल कीं, तुझ्या पश्चात् मी मुलांचें संगोपन करूं शकणार नाहीं, प्रपंचाचा गाडा हांकूं शकणार नाहीं. पण तूं असें समजूं नकोस. मला सूत कांततां येतें व लोंकर तयार करतां येते. ह्यायोगें मी आमच्या मुलांचें पालन करूं शकेन. म्हणून प्रपंचाच्या तळमळीनें तुला मरण येऊं देऊं नकोस.

"दुसरी तुला अशी शंका येईल कीं, तुझ्या पश्चात् मी पुनर्विवाह करीन. परंतु तीहि ठीक नाहीं. आज सोळा वर्षें मी गृहस्थब्रम्हचर्य[1] पाळीत आहें, हें तुला ठाऊक आहेच. तेव्हां ही शंका सोडून शांतपणें तुला मरण येऊं दे.

"तिसरी शंका तुला येण्याचा संभव आहे कीं, तुझ्या मरणानंतर भगवंताचें आणि भिक्षुसंघाचें मी दर्शन घेणार नाहीं. पण तूं हें पक्कें लक्ष्यांत ठेव कीं, मी तुझ्या पश्चात् भगवंताची आणि भिक्षुसंघाची भेट घेण्यांत विशेष तत्परता दाखवीन. तेव्हां मनांतली ही शंका दूर करून तुला शांतीनें मरण येऊं दे.

---

१. गृहस्थब्रह्मचर्य म्हणजे उपोसथाच्या दिवशीं ब्रह्मचर्यव्रतानें राहून सर्व नियम पाळणें.

"चवथी एक तुला अशी शंका येईल कीं, नकुलमाता आपल्या पश्चात् परिपूर्णपणें शील पाळणार नाहीं. पण हें तूं ध्यानांत ठेव कीं, भगवंताच्या ज्या श्वेतवस्त्र धारण करणाऱ्या व परिपूर्णपणें शील पाळणाऱ्या गृहिणी श्राविका आहेत; त्यांपैकीं मी एक आहें. तेव्हां हीहि शंका सोडून तुझा अंतकाळ शांतीनें होऊं दे.

"पांचवी तुला अशी शंका येईल कीं, नकुलमातेला अद्यापि समाधि मिळाली नाहीं. पण तें असें नाहीं. भगवंताच्या गृहिणीश्राविकांत ज्या ध्यान-लाभिनी आहेत, त्यांपैकीं मी एक आहें. ह्याविषयीं ज्या कोणाला शंका असेल त्यानें पाहिजे तर भगवंताला विचारावें. तेव्हां हीहि शंका सोडून तुला शांतपणें मरण येऊं दे.

"आणखी एक तुला शंका येण्याचा संभव आहे, ती ही कीं, नकुलमाता भगवंताच्या धर्मविनयांत अद्यापि स्थिर झाली नाहीं, तिला ह्या धर्माचें तत्त्व समजलें नाहीं. परंतु तूं हें लक्ष्यात ठेव कीं, ज्या भगवंताच्या तत्त्ववेत्त्या गृहिणीश्राविका आहेत, त्यांपैकीं मी एक आहें. ह्याविषयीं कोणाला संशय वाटत असल्यास त्यानें भगवंताला विचारावें. तेव्हां ही शंका सोडून देऊन प्रपंचाच्या तळमळीवांचून तुला शांतपणें मरण येऊं दे."

या नकुलमातेच्या उपदेशानें नकुलपित्याचा आजार औषधावांचून ताबडतोब बरा झाला. कांहीं काळानें त्याच्या अंगांत थोडें बळ आल्यावर तो भगवान् रहात होता. तेथें--भेसकलावनांत--आला; आणि भगवंताला अभिवंदन करून एका बाजूला बसला. तेव्हां भगवान् त्याला म्हणाला, "हे गृहपति, तूं मोठा भाग्यवान् आहेस. नकुलमातेसारखी प्रेम करणारी, अनुकम्पा करणारी, व उपदेश करणारी भार्या तुला मिळाली आहे. सफेत वस्त्र धारण करणाऱ्या माझ्या गृहिणीश्राविकांत ज्या शीलसंपन्न, समाधिसंपन्न आणि तत्त्वज्ञानी श्राविका आहेत, त्यांपैकीं नकुलमाता ही एक आहे. अशी पत्नी तुला मिळाली, हें तुझें भाग्य होय."

नकुलमाता आणि नकुलपिता हीं नांवें त्यांच्या पहिल्या मुलावरून पडलीं असावीं. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं नवऱ्याचें समाधान करण्यांत जर नकुलमातेनें एवढें कौशल्य दाखविलें, तर तिचा समानशील पतीहि

त्या कामीं तसाच कुशल असला पाहिजे. तेव्हां इतरांचें समाधान करणाऱ्या उपासकांत त्याला अग्रस्थान मिळालें, ह्यांत नवल नाहीं.

## उपासिका

### ६६

### सुजाता सेनानीदुहिता

"प्रथम शरण गेलेल्या उपासिकांत सुजाता सेनानीदुहिता पहिली आहे."

ही उरुवेलाप्रदेशांत सेनानीच्या घरीं जन्मली. तरुणपणीं एका वडाच्या झाडावर रहाणाऱ्या देवतेला तिनें असा नवस केला होता कीं, जर आपणाला योग्य वर मिळून पहिल्यानें मुलगा झाला तर त्या देवतेला दरवर्षी योग्य उपहार देण्यांत येईल. तिचा संकल्प परिपूर्ण झाला. तेव्हां आपला नवस फेडण्यासाठीं तिनें निवळ दुधाचा पायस तयार केला, व त्या वडाच्या झाडाखालीं साफसूफ करण्यास आपल्या दासीला तेथें पाठविली. आमचा बोधिसत्त्व त्या दिवशीं सकाळीं त्या झाडाखालीं बसला होता. त्याला पाहून दासीला वाटलें कीं, सुजातेचा नवस स्वीकारण्यासाठीं साक्षात् वृक्ष-देवता अवतरली असावी. तिनें धांवत जाऊन ही गोष्ट आपल्या मालकिणीला सांगितली. ती दासीबरोबर दुधाचा पायस घेऊन तेथें आली, व वृक्षाखालीं बसलेली देवता नसून परमतपस्वी बोधिसत्त्व आहे, हें तिला समजलें. तरी मोठ्या भक्तिभावानें तिनें बोधिसत्त्वाला दुधाचा पायस अर्पण केला. ही भिक्षा ग्रहण करून बोधिसत्त्व त्याच रात्रीं बुद्धपदाला पावला. त्यामुळें बौद्ध वाङ्मयांत आणि चित्रकलेंत सुजातेच्या दानाला फार महत्त्व आलें आहे, व तिचें नांव अजरामर होऊन बसलें आहे.

### ६७

### विशाखा मिगारमाता

"दायिका उपासिकांत विशाखा मिगारमाता श्रेष्ठ आहे."

हिची समग्र गोष्ट बुद्धलीलासारसंग्रहाच्या दुसऱ्या भागांत (प्र० १०) दिलीच आहे. तेथें ती धम्मपदअट्ठकथेच्या आधारें लिहिली आहे. तरी

मनोरथपूरणीच्या गोष्टींत आणि त्या गोष्टींत फरक नाहीं. अनाथपिंडिक जसा दायकउपासकांत श्रेष्ठ, तशी ही दायिकाउपासिकांत होती, याचें एक उदाहरण पहिल्या भागांत ( कलम ६४ ) आलेंच आहे.

## ६८ आणि ६९

## खुज्जुत्तरा आणि सामावती

"बहुश्रुत उपासिकांत खुज्जुतरा श्रेष्ठ आहे."

"मैत्रीध्यान करणाऱ्या उपासिकांत सामावती श्रेष्ठ आहे."

ह्यांपैकीं पहिली घोसित श्रेष्ठीच्या दासीच्या पोटीं जन्मली. तिचें नांव उत्तरा होतें. परंतु ती जरा कुब्जा[1] असल्यामुळें तिला खुज्जुत्तरा म्हणत. सामावती[2] भद्दियनगरांत भद्दवतिय श्रेष्ठीच्या घरीं जन्मली. ह्या दोघीहि एका ठिकाणीं कशा आल्या, हें खालील गोष्टीवरून दिसून येईल.

एके वेळीं भद्दिय नगराच्या आसपास भयंकर दुष्काळ पडला. भुकेच्या भयानें लोक व्याकुळ होऊन इतस्ततः जाऊं लागले. तेव्हां भद्दवतिय श्रेष्ठी आपल्या पत्नीला म्हणाला, "भद्रे, ह्या दुष्काळाचा अंत दिसत नाहीं. कौशांबी येथें आमचा घोसित श्रेष्ठी हा एक मित्र रहातो. तिकडे गेलों तर तो आम्हांला विसरणार नाहीं."

घोसित श्रेष्ठीची आणि त्याची भेट झाली होती, असें नाहीं. तरी परस्परांचा व्यवहार चालू असल्यामुळें त्यांची मैत्री जडली होती. भद्दवातिय श्रेष्ठी आपल्या बायकोला आणि एकुलत्या एक मुलीला घेऊन कौशांबीला जाण्यास निघाला. जिकडे तिकडे दुष्काळ असल्यामुळें वाटेंत त्यांचे फार हाल झाले. मोठ्या प्रयासानें कौशांबी गांठून तीं तिघेंहि एका धर्मशाळेंत उतरलीं. 'अशा मलिन वेशानें घोसित श्रेष्ठीची भेट घेणें योग्य नाहीं, एक दोन दिवस विश्रांति घेऊन मग तिकडे जावें,' अशा विचारानें भद्दवातिय तेथेंच राहिला; पण जेवणाचें कसें करणार ?

त्या वेळीं घोसित श्रेष्ठीनें दुष्काळपीडित लोकांसाठीं अन्नछत्र सुरू केलें होतें. आपल्या बायकोला तिकडे न पाठवितां भद्दवतियानें पिंड आणण्या-

---

१ 'कुब्जा' शब्दाचें 'खुज्जा' असें पालिरूप होतें.

२ सामवती असाहि पाठ सांपडतो.

साठीं मुलीला पाठविलें. ती एक भांडें घेऊन अन्नछत्राजवळ जाऊन भिडेनें एका बाजूला उभी राहिली. तिला पाहून छत्राच्या व्यवस्थापकाच्या मनांत असा विचार आला कीं, दुसरीं स्त्रीपुरुषें मासे पकडणाऱ्या कोळ्यांसारखी मोठमोठ्यानें आरडाओरड करून पुढेंपुढें होण्याचा प्रयत्न करतात. पण ही मुलगी खालीं मान घालून मुकाट्यानें उभी आहे. ही कोणी तरी कुलीन मुलगी असली पाहिजे. तो तिला म्हणाला, "मुली, तूं पुढें कां येत नाहींस ?" ती म्हणाली, "गर्दींत माझ्यासारख्या मुलीनें कसें घुसावें ?"

तो:—बरें मुली, तुझ्या घरीं किती माणसें आहेत ?

ती:—आम्ही तीन माणसें आहोंत.

त्यानें तिला ताबडतोब तीन पिंड दिले; व ते घेऊन ती धर्मशाळेंत आली. मार्गांतील श्रमांनीं आणि उपवासांनीं भद्दवतिय अत्यंत अशक्त झाला होता. त्यांत हें अन्न त्यानें प्रमाणाबाहेर खाल्लें, व त्यामुळें तो त्याच रात्रीं मरण पावला, दुसऱ्या दिवशीं सामावतीनें अन्नछत्रांत येऊन दोनच पिंड मागून घेतले. पण पतिशोकामुळें आणि शरीराला अत्यंत क्लेश झाल्यामुळें तिची आईहि त्या दिवशीं मरण पावली. तरी भूक राहीना, म्हणून तिसऱ्या दिवशीं अन्नछत्राच्या व्यवस्थापकाकडे जाऊन तिनें एकच पिंड मागितला. तेव्हां तो म्हणाला, "पहिल्या दिवशीं तीन, काल दोन, व आज एकच पिंड मागतेस हें काय ?" तिनें त्याला इत्थंभूत वर्तमान सांगितलें. तेव्हां तो म्हणाला, "असें आहे तर तूं माझ्या मालकाचीच मुलगी आहेस, असें समजलें पाहिजे. मलाहि मुलगी नाहीं. चल, आजपासून तूं माझी मुलगी हो."

पोरक्या सामावतीला कोणीतरी वडील पाहिजेच होता. तेव्हां तिनें ही गोष्ट ताबडतोब कबूल केली, व त्या दिवसापासून ती आपल्या दत्तक बापाच्या घरीं राहूं लागली. दुसऱ्याच दिवशीं ती त्याला म्हणाली. "ह्या अन्नछत्राच्या जागीं एवढी गडबड आणि आरडाओरड होत आहे, ती तुम्हाला बंद करतां येत नाहीं काय ?"

तो :– अग मुली, एवढा मोठा जमाव असतो, तेथें गडबड आणि आरडाओरड बंद करणें कसें शक्य आहे ?

सा०– मी तुम्हांला एक उपाय सांगतें. ह्या जागीं एक मोठें कुंपण तयार करा, व त्याला दोनच दरवाजे ठेवा. मध्यें वाढणाऱ्यांनीं अन्नाचीं

भांडीं भरून ठेवावीं, व तेथें उभें रहावें. जे पिंडासाठीं येतील, त्यांपैकीं प्रत्येकाला एका दरवाजांतून आंत सोडावें, व पिंड घेऊन दुसऱ्या दरवाजानें बाहेर जाण्यास सांगावें. असें केलें असतां आरडाओरड आणि मारामारी न होतां सर्व काम पार पडेल.

व्यवस्थापकाला तिची कल्पना फार आवडली, व ती त्यानें दुसऱ्याच दिवशीं अमलांत आणली. तेव्हांपासून आरडाओरड आणि मारामारी होईनाशी झाली. कांहीं दिवसांनीं घोसित श्रेष्ठीनें त्या व्यवस्थापकाला बोलावून विचारलें कीं, 'अलिकडे अन्नछत्र चालू आहे कीं नाहीं.' तो म्हणाला, "सर्व कांहीं पूर्वीप्रमाणें चालू आहे." घोसित म्हणाला, "मग पूर्वीप्रमाणें गडबड आणि आरडाओरड ऐकूं येत नाहीं, हें कसें ?"

तो :— आर्य, माझी एक मुलगी आहे. तिनें मला ही युक्ती सुचविली. त्याप्रमाणें व्यवस्था केल्यामुळें आज अन्नछत्राच्या जागीं शांतता नांदत आहे.

घोसित :— अरे, पण तुला मुलगी कुठली ?

मालकाला ठकविणें शक्य नसल्यामुळें आपणाला मुलगी कशी मिळाली, हें सांगणें व्यवस्थापकाला भाग पडलें. तेव्हां घोसित म्हणाला, "हा तुझा मोठा अपराध समजला पाहिजे. इतके दिवस माझ्या मुलीला तूं आपल्या घरीं ठेवून घेतलेंस, आणि हें वर्तमान मला कळूं दिलें नाहींस. तेव्हां त्वरेनें जाऊन तिला इकडे घेऊन ये."

तिला सोडण्याची व्यवस्थापकाची इच्छा नव्हती. परंतु धन्याच्या मर्जीखातर सामावतीला त्यानें धन्याच्या घरीं नेलें. त्या दिवसापासून घोसित श्रेष्ठीनें तिचें आपल्या एकुलत्या एका मुलीप्रमाणें संगोपन केलें. शहरांतील पांचशें कुमारिका तिच्याबरोबर क्रीडा करण्यासाठीं देण्यांत आल्या होत्या; व एखाद्या राजकुमारीप्रमाणें तिची बरदास्त ठेवण्यांत येत असे.

कौशांबीच्या उदयनराजानें सामावतीला सखींसह क्रीडा करीत असतां पाहिलें, व घोसित श्रेष्ठीजवळ तिच्याबद्दल मागणी केली. 'माझ्या मुलीला सापत्न कुळांत देण्याची माझी इच्छा नाहीं, असें म्हणून श्रेष्ठीनें राजाची मागणी नाकारली. तेव्हां एके दिवशीं सामावती आपल्या सखींसह उद्यानांत गेली असतां उदयनानें श्रेष्ठीच्या घरीं येऊन त्याला, त्याच्या बायकोला व नोकरचाकरांना घरांतून बाहेर काढवून, दरवाजे बंद करून

त्यावर मोहोर ( राजमुद्रा ) करविली; व खडा पहारा ठेवून तो निघून गेला. सामावती उद्यानक्रीडा करून घरीं येऊन पहाते तो आपले आईबाप बाहेर बसलेले ! ती म्हणाली, "हें काय बरें ?" त्यांनीं घडलेलें सर्व वर्तमान सांगितलें. तेव्हां ती म्हणाली, "तुम्हीं असें कां केलें ? जर माझ्या परिवारासह राजा मला राणी करण्यास तयार असला, तर माझी कांही हरकत नाहीं, असें तुम्हीं सांगावें कीं नाहीं ?"

"अग मुली, तुला राणी होणें आवडेल, हें आम्हांला कसें ठाऊक ?"

नंतर श्रेष्ठीनें राजाला तसा निरोप कळविला. त्यानें सामावतीसाठीं मोठा महाल बांधून त्यांत तिच्या सखींचीहि सोय करविली, व तिला पट्टराणीपद दिलें.

घोसित श्रेष्ठीचे कुक्कुट श्रेष्ठी आणि पावारिक श्रेष्ठी असे दोघे सधन मित्र कौशांबी येथें रहात असत. बुद्ध भगवंताची कीर्ति ऐकून हे तिघेजण त्याच्या दर्शनाला श्रावस्तीला गेले; आणि आपल्या शहरीं येण्यास त्यांनीं भगवंताला आमंत्रण केलें. तथागत गांवांत राहात नसतात, असें भगवंतानें त्यांना सांगितलें. ही सूचना त्यांना पुरे झाली; व कौशांबीला येऊन त्यांनीं शहराबाहेर फार दूर किंवा फार जवळ नव्हत, अशा रम्य ठिकाणीं तीन आराम ( विहार ) बांधले. घोसिताराम, कुक्कुटाराम आणि पावारिकाराम अशीं त्या आरामांचीं नांवें होतीं.

'आपणाला आणि भिक्षुसंघाला रहाण्यासाठीं आराम तयार झाले आहेत,' हें वर्तमान कळवून श्रेष्ठींनीं भगवंताला कौशांबीला येण्यास आमंत्रण पाठविलें. परंतु भगवान् त्या वेळीं उपदेश करीत कुरुदेशांत फिरत होता. प्रवास करीत तो कम्मासदम्म ( कल्माषदम्य ) शहरीं आला. तेथें मागंदिय ब्राह्मणानें त्याला पाहिलें, आणि त्याची लक्षणसंपत्ति पाहून आपल्या अद्वितीय सुंदर कन्येला हाच वर योग्य आहे अशी त्याची खात्री झाली; व ताबडतोब घरीं जाऊन तो आपल्या पत्नीला म्हणाला, "भद्रे मुलीला शृंगारून तयार कर; आज तिच्यासाठीं मीं योग्य वर पाहिला आहे."

ब्राह्मणाच्या घरीं ही गडबड चालली असतां भगवान् बुद्ध त्या घरावरून गांवांत भिक्षेला गेला. लवकर मुलीला शृंगारून तयार केली

नाहीं, म्हणून ब्राह्मण बायकोवर रागावूं लागला. तो म्हणाला, "हें पहा, तो या रस्त्यानें नुकताच निघून गेला. हीं येथें त्याचीं पावलें उमटलीं आहेत." ब्राह्मणी बुद्धाच्या उमटलेल्या पावलांकडे पाहून हंसत हंसत म्हणाली, "तुम्ही अगदीं वेडे दिसतां! हीं कामी मनुष्याचीं पावलें दिसत नाहींत. हीं अत्यंत विरक्त, सर्वज्ञ मनुष्याचीं पावलें आहेत. अशा मनुष्याला मुलगी देऊं पहातां, हा शुद्ध वेडेपणा आहे." तिचें बोलणें लक्ष्यांत न घेतां ब्राह्मण म्हणाला, "अग तूं मोठी तोंडाळ आहेस!"

असा त्या दोघांचा वादविवाद चालला असतां बुद्ध भगवान् भिक्षाटन करून जेवण झाल्यावर पुन्हां त्या बाजूनें चालला. त्याला दुरून पाहून ब्राह्मण आपल्या मुलीला घेऊन त्याच्याजवळ आला आणि म्हणाला, "भो प्रव्रजित, सकाळपासून मी तुमच्या शोधांत आहें. सर्वलक्षणसंपन्न अशा माझ्या मुलीला वर तूंच योग्य आहेस. तेव्हां आजपासून तूं हिचा सांभाळ कर."

भ०:— बा ब्राह्मणा, तृष्णा, असंतोष आणि कामविकार पाहून स्त्रियांच्या संगतींत मला सुख वाटत नाहीं. हें अमेध्य पदार्थांनीं भरलेलें शरीर पायानेंहि स्पर्श करण्यास योग्य नाहीं, असें मला वाटतें.

हें बुद्धाचें भाषण ऐकून मागंदियेला (मागंदिय ब्राह्मणाच्या कन्येला) अत्यंत त्वेष आला. ती आपल्याशींच म्हणाली, "याला जर मी नको असेन, तर नको असें सरळपणें बोलावें. पण 'अमेध्य पदार्थांनीं भरलेलें शरीर' असें बोलून माझा अपमान कां करावा?" तेव्हांपासून तिनें बुद्धाचा सूड उगविण्याचा निश्चय केला; भगवंताचा धर्मोपदेश ऐकून तिची आई भिक्षुणी झाली व बाप भिक्षु झाला. आणि त्यानें मुलीला आपल्या धाकट्या भावाच्या स्वाधीन केलें.

मागंदियेच्या सौंदर्याची कीर्ति ऐकून उदयनराजानें तिच्या चुलत्याची समजूत घातली व तिच्याशीं लग्न केलें. सामावतीप्रमाणेंच तिलाहि एक महाल बांधून दिला होता; व तिचा मानमरातबहि तसाच ठेवण्यांत आला होता. बुद्ध भगवान् कौशांबीला आला, तेव्हां त्याचा सूड उगविण्याची ही संधि चांगली आहे असें जाणून मागंदियेनें आपल्या चुलत्यामार्फत गांवांतील टवाळ लोकांना एकत्र करून त्यांच्याकडून बुद्धाला

शिव्यागाळी देवविल्या. तेव्हां आनंद म्हणाला, " भदंत, या शहरांतील लोक असे दुष्ट आहेत. तेव्हां आपण येथून दुसरीकडे जाऊं. " भगवान् म्हणाला, " अशा प्रसंगीं तथागत घाबरत नसतात. एक आठवडाभर हे लोक शिव्यागाळी देतील; मग स्वस्थ बसतील. त्यांची शिवीगाळ त्यांजपाशींच राहील. तूं आपल्या जीवाला विनाकारण त्रास घेऊं नकोस. "

अर्थात् मागंदियेचा हा प्रयोग साधला नाहीं, व दुसऱ्या कोणत्या मार्गानें सूड उगवितां येईल या विचारांत ती पडली.

एके दिवशीं भगवंताला कौशांबी नगरांतील मुख्य माळ्याच्या घरीं आमंत्रण होतें. सामावतीच्या परिवारांत खुज्जुत्तरा दासीहि होती, व ती रोज त्या माळ्याकडून आठ कार्षापणांचीं फुलें घेऊन जात असे. नियमाप्रमाणें फुलांसाठीं आली असतां माळी तिला म्हणाला, " अग उत्तरे, आज तुला फुलें देण्यास मला अवकाश नाहीं. भगवंताला आणि भिक्षुसंघाला मला वाढावयाचें आहे. तूंहि वाढण्याच्या कामीं जरा मदत कर. " त्याप्रमाणें खुज्जुत्तरेनें माळ्याला मदत केली. भोजनोत्तर भगवंतानें केलेला उपदेश तिनें ऐकला, व माळ्याकडून फुलें घेऊन ती सामावतीकडे गेली. फुलें पाहून सामावती तिला म्हणाली, " अग हीं तर फुलें दुप्पट दिसतात. राजानें प्रसन्न होऊन फुलांचे पैसे दुप्पट तर केले नाहींत ना ? " खुज्जुत्तरा म्हणाली, " बाईसाहेब, खरें सांगूं, मी रोज चार कार्षापणांचीं फुलें आणीत असें व चार कार्षापण पदरीं ठेवीत असे; पण आज आठहि कार्षापणांचीं आणलीं. "

सा०— अग, पण आजच असें कां केलेंस ?

उ०— बाईसाहेब, आज मी अमृतप्राय धर्म जाणला; आणि यापुढें माझ्याकडून असत्य कर्म होणें शक्य नाहीं.

सा०— अग उत्तरे, जो तूं अमृतधर्म जाणलास, तो आम्हांलाहि दे ना ?

असें म्हणून सामावतीनें आणि तिच्या सखींनीं हात पुढें केले.

खुज्जुत्तरा म्हणाली, " बाईसाहेब, हा धर्म आपल्या हातावर ठेवतां येत नाहीं. बुद्धगुरूनें सांगितल्याप्रमाणें त्याचा मी तुम्हांस उपदेश करीन. पण तुमच्या कर्मांत असेल, तरच तुम्हांला त्याचा लाभ होईल. "

खुज्जुत्तरेच्या सांगण्याप्रमाणें तिला बसण्यासाठीं एक उत्तम आसन देण्यांत आलें, आणि सामावती आणि तिच्या सख्या हलक्या आसनांवर बसून धर्मोपदेश ऐकूं लागल्या. त्यांना तो इतका आवडला कीं, त्या दिवसापासून खुज्जुत्तरेला पाठवून बुद्धाचा नवा नवा उपदेश त्या ऐकावयास लावीत, व तिच्याकडून आपण स्वतः ऐकत. त्याशिवाय खुज्जुत्तरेला महालांत दुसरें कोणतेंहि काम सांगण्यांत येत नसे.

सामावतीच्या सख्या बुद्ध भगवंताच्या धर्मावर अत्यंत प्रसन्न झाल्या होत्या खऱ्या; तरी राजाच्या भयामुळें भगवंताची भेट घेणें त्यांना शक्य नव्हतें. पण जेव्हां भगवान् रस्त्यांतून जाई, तेव्हां त्याला पहाण्यासाठीं महालाच्या खिडक्यांतून त्यांची एकच गर्दी होत असे. खिडक्या पुरत नसल्यामुळें त्या तोडून मोठ्या कराव्या लागल्या. त्यांची श्रद्धा पाहून मागंदियेचा मत्सर आणखीहि वाढला, व तिखटमीठ लावून हें वर्तमान तिनें राजाला सांगितलें. राजानें सामावतीच्या महालाच्या खिडक्या बुजवावयास लावून वरच्या बाजूला खिडक्या करविल्या ज्यांतून महालांत प्रकाश येई, पण रस्त्यांतील कोणतीच वस्तू दिसत नसे.

परंतु एवढ्यानें मागंदियेची तृप्ति झाली नाहीं. राजा आपण सांगितलेलें ऐकतो, असें पाहून तिनें आणखीहि तरकटें रचण्यास सुरवात केली. राजा तिच्या महालांत गेला असतां ती त्याला म्हणाली, “ महाराज, सामावतीचें तुमच्यावर प्रेम आहे, असें तुम्हांला वाटतें पण तें अगदीं खोटें आहे ! याचा तुम्हांला अनुभव घ्यावयाचा असेल तर हे आठ कोंबडे तिच्याकडे पाठवा, व त्यांचें मांस तयार करून आणावयास सांगा. ”

राजानें त्याप्रमाणें केलें. पण सामावती म्हणाली, “ भगवंताचा धर्म जाणल्यामुळें ह्या जिवंत प्राण्यांला मारणें मला शक्य नाहीं.” अर्थात् तो मनुष्य परत कोंबडे घेऊन मागंदियेच्या महालांत आला. तेव्हां मागंदिया म्हणाली, “ पाहिलेंत ना सामावतीचें आपल्यावरचें प्रेम ! आतां हेच कोंबडे मारून भिक्षुसंघाला मांस तयार करून पाठवा, असें मी तुमच्यातर्फे तिला सांगून पाठवितें; आणि मला खात्री आहे कीं, हें काम ती तेव्हांच करील. ”

मागंदियेनें राजाला न कळत ते कोंबडे आपल्या माणसाकडून मारविले व त्यांचें मांस तयार करून भिक्षुसंघाला द्यावें, असा सामावतीला

निरोप पाठविला. त्याप्रमाणें सामावतीनें केलें. मागंदियेनें आल्हाळपाल्हाळ करून ही गोष्ट राजाला सांगितली; तरी राजाच्या मनावर तिच्या बोलण्याचा फारसा परिणाम झाला नाहीं.

एके दिवशीं सामावतीच्या महालांतून राजा थेट मागंदियेच्या महालांत आला. उदयन राजा आपणाबरोबर एक लहानसा वीणा ठेवीत असे. हा वीणा त्याला हत्ती पकडण्याच्या कामीं फार उपयोगी पडे, आणि हा घेतल्याशिवाय तो कोठेंहि जात नसे. संधि साधून मागंदियेनें त्या विण्याला नाजूक शस्त्रानें भोंक पाडलें, व कांहीं दिवसांपूर्वीं महालांत आणून वेळूच्या नळकांड्यांत ठेवलेलें कृष्णसर्पाचें पिलूं हळूच त्या भोकांत सोडून देऊन तें भोंक बंद करविलें. नंतर राजापाशीं येऊन ती त्याला म्हणाली, "महाराज, सामावती तुमचा कधीं घात करील, याचा नेम नाहीं. ह्यासाठीं तुम्ही सावध असा." राजा आपला वीणा वाजविण्याच्या बेतांत होता, तो लाडीगोडीनें त्याच्या हातांतून घेऊन मागंदिया स्वतः वाजवूं लागली, आणि एकाएकीं तें भोंक खुलें करून म्हणाली, "महाराज, येथें कांहीं तरी भयंकर आहे, आणि वीणा खालीं टाकून ती पळत सुटली. इतक्यांत तो सर्प त्या भोंकावाटे बाहेर पडला. त्याला पाहून राजाचा क्रोध गगनांत मावेना. त्यानें एकदम सामावतीला आणि तिच्या सख्यांना आपणासमोर आणण्याचा हुकूम केला.

राजपुरुष जेव्हां सामावतीला आणण्यास गेले होते तेव्हांच, राजा अत्यंत संतप्त झाला आहे, हें सामावतीनें ताडलें, व ती सख्यांना म्हणाली, "आज राजा आम्हांला मारूं इच्छीत आहे. तेव्हां त्यावर निस्सीम मैत्रीभावना करणें आमचें कर्तव्य आहे."

राजपुरुषांनीं त्या सर्वांना आणून राजासमोर रांगेनें उभें केलें. राजानें विषारी बाण धनुष्याला लावून आकर्ण दोरी ओढली. पण सामावतीच्या आणि तिच्या सखींच्या मैत्रीभावनेचा प्रभाव एवढा झाला कीं, राजाचा हात दोरीला आणि बाणाला चिकटून राहिला, अंगांतून घामाच्या धारा वाहूं लागल्या, शरीर कांपूं लागलें, तोंडांतून लाळ गळूं लागली, डोळे भ्रमूं लागले. तेव्हां सामावती म्हणाली, "महाराज, आपणाला त्रास होत आहे काय?"

राजा:—होय देवी, मी अगदीं भ्रान्त झालों आहें. मला मदत कर.

सा०—असें जर आहे तर महाराज, बाण जमिनीवर धरा.

राजानें तसें केल्यावर बाण त्याच्या हातून आपोआप खालीं पडला. राजा त्याच वेळीं सचेल स्नान करून आला, व सामावतीच्या पायां पडला, आणि म्हणाला, "देवी, माझ्या अपराधाची मला क्षमा कर."

सा०—देव, मीं तुम्हांला क्षमा केली आहे.

राजा:—देवी, तूं मला क्षमा करतेस, हें फार चांगलें. आजपासून बुद्धदर्शनाला जाण्याला मी तुम्हांला मोकळीक देतों.

एवढें मोठें कुभांड रचूनहि कांहीं फलनिष्पत्ति झाली नाहीं, असें पाहून मागंदिया अत्यंत खिन्न झाली, व तिच्या मत्सराग्नीनें आणखीहि पेट घेतला. एके दिवशीं मोठ्या शिताफीनें राजाला घेऊन ती उद्यानक्रीडेला गेली; व इकडे आपल्या चुलत्याकडून सामावतीच्या महालाचे सर्व दरवाजे बंद करून त्याला आग लावून देवविली. सामावती आणि तिच्या सख्या त्या आगींत जळून मेल्या. चौकशी अंतीं मागंदियेच्या चुलत्याचें हें कृत्य राजाला समजलें, व त्यांत मागंदियेचें अंग असावयास पाहिजे, अशी त्याची खात्री झाली. पण तिला कांहीं संशय येऊं न देतां तो म्हणाला, "हें फार चांगलें झालें! माझ्या वधासाठीं ती जेव्हां तेव्हां खटपट करीत होती! ती आणि तिच्या सख्या जळून मेल्या, हें उत्तम झालें!" मागंदिया म्हणाली, "महाराज, हें काम माझ्याशिवाय झालें नाहीं."

राजानें, 'आपण प्रसन्न झालों आहें,' असें म्हणून तिच्या सर्व आप्तेष्टांस गोळा केलें, आणि तिच्यासमोर त्यांचा, व नंतर तिचाहि वध करविला.

उदयन राजाच्या अंत:पुराला (झनानखान्याला) आग लागून सामावती आणि तिच्या पांचशें सख्या जळून मेल्याची हकीगत उदानाच्या सातव्या वर्गाच्या दहाव्या सुत्तांत आली आहे. 'त्यांची गति काय झाली,' असा भिक्षूंनीं प्रश्न केला असतां भगवान् म्हणाला, "त्यांपैकीं कांहीं स्रोतआपन्न, कांहीं सकृदागामी व कांहीं अनागामी होत्या. त्यांचें मरण निष्फळ नव्हे." ह्यावरून असें दिसून येतें कीं पिंडोल भारद्वाजानें[1] उदयनाला

[1] या भागाचें आठवें प्रकरण पहा.

बुद्धोपासक करण्यापूर्वी पुष्कळ वर्षे त्याच्या अंतःपुरांतील स्त्रियांत बौद्ध धर्माचा चांगला प्रसार झाला होता.

बुद्धानें कन्यादान घेण्याचें नाकारलें, ह्याचा उल्लेख सुत्तनिपातांतील मागंदिय सुत्तांत आला आहे. उदानांतील सुत्ताच्या आणि मागंदिय सुत्ताच्या अट्ठकथांच्या आधारें मनोरथपूरणीकारानें वरील गोष्ट रचली असावी. तींत इतिहासाचा अंश बराच असला पाहिजे. हीच गोष्ट धम्मपदअट्ठकथेंत खुलवून लिहिली आहे; पण मनोरथपूरणीची गोष्ट तिच्याहून प्राचीनतर असली पाहिजे.

## ७०

## उत्तरा नंदमाता

"ध्यानरत उपासिकांत उत्तरा नंदमाता श्रेष्ठ आहे."

राजगृह येथें सुमनश्रेष्ठी नांवाचा एक धनाढ्य व्यापारी होता. पूर्ण नांवाचा एक त्याच्या पदरीं नोकर असे, त्याची ही मुलगी. एके दिवशीं राजगृहांत उत्सव चालला होता. त्या वेळीं सुमनश्रेष्ठी पूर्णाला म्हणाला, "पूर्णा, आज तूं उत्सवांत मजा करणार, कीं चांगले बैल आणि नांगर घेऊन शेत नांगरावयास जाणार?" पूर्ण म्हणाला, "आर्य, मी माझ्या बायकोला विचारून काय तें सांगतों." त्यानें आपल्या बायकोला विचारलें, तेव्हां ती म्हणाली, "हें काय! मला काय विचारतां? मालकाची इच्छा तुम्हीं शेत नांगरावें, अशी दिसते, तेव्हां तें काम सोडून उत्सवांत जाऊं नका." बायकोचें बोलणें ऐकून पूर्ण शेतीचीं आउतें घेऊन शेत नांगरावयास गेला.

त्याच दिवशीं सारिपुत्त निरोधसमाधीपासून उठून त्याच मार्गानें येत होता. पूर्णाला पाहून, 'येथें पाणी कोठें मिळेल,' असा त्यानें प्रश्न केला. पूर्णानें त्याला दंतकाष्ठ व तोंड धुण्यासाठीं पाणी आणून दिलें; आणि त्याच्या मनांत असा विचार आला कीं, आज अशा सत्पुरुषाला कांहीं भिक्षा देतां आली असती तर बरें झालें असतें. पूर्णाची बायको नवऱ्यासाठीं त्या उत्सवाच्या दिवशीं पक्वान्न तयार करून तें घेऊन त्या मार्गानें येत होती. सारिपुत्ताला पाहून तिनें मनांत विचार केला कीं, आमच्या सारख्या दरिद्र्यांच्या घरीं अशा सत्पुरुषाला देण्यास भिक्षा कोठून असणार? आज

हें अन्न याला देऊन पुन्हां घरीं जाऊन नवऱ्यासाठीं आणखी आणतां येणें शक्य आहे. अशा विचारानें तें सर्व अन्न सारिपुत्ताच्या पात्रांत ओतून ती म्हणाली, "भदन्त, अशा ह्या दारिद्र्यापासून आम्हांला मुक्त होऊं द्या." सारिपुत्तानें, 'तुझे मनोरथ पूर्ण होवोत' असा आशीर्वाद दिला, व तो तेथूनच विहारांत गेला.

पूर्णाची बायको परत घरीं गेली; व नवऱ्यासाठीं तिनें आणखी पक्वान्न तयार केलें व तें पूर्ण नांगरीत होता तेथें नेलें. आपणाला उशीर झाला असल्यामुळें पूर्णाला राग आला असला पाहिजे, असें तिला वाटलें व ती म्हणाली, "स्वामी, आज एक दिवस मला क्षमा करा. तुमच्यासाठीं तयार केलेलें पक्वान्न वाटेंत मी स्थविराला दिलें, आणि हें दुसरें तयार करून घेऊन आलें. ह्याच कारणास्तव मला उशीर झाला."

पूर्ण—भद्रे, हें तूं फार चांगलें केलेंस. आज सकाळीं मी स्थविराला दंतकाष्ठ व तोंड धुण्यास पाणी दिलें, आणि त्याच वेळीं माझ्या मनांत त्याला कांहीं भिक्षा द्यावी असा विचार आला होता. जणूं काय माझें मन जाणूनच तूं हें वर्तन केलेंस.

बायकोनें आणलेलें पक्वान्न खाऊन तिच्या मांडीवर डोकें ठेवून पूर्ण थोडा वेळ निजला, व उठून पहातो तों नांगराला एके ठिकाणीं त्याला सोन्याचीच माती दिसली. तो म्हणाला, "भद्रे, आज मी नांगरलेल्या ठिकाणीं हें सोनें दिसत आहे, पाहिलेंस काय?"

ती—आर्य, आज तुम्हांला फार मेहनत पडल्यामुळें तुमचे डोळे बिघडले असले पाहिजेत.

पूर्ण—अग, जर तुझा माझ्यावर विश्वास नाहीं, तर तूं स्वतःच जाऊन पहा.

तें सोनेंच आहे, अशी तिचीहि खात्री झाली. तेव्हां पूर्ण म्हणाला, "हें आपण चोरून नेलें तर अपराधी ठरूं. तूं येथेंच रहा. मी राजाला ह्याची वर्दी देतों."

एका ताटांत तेथील सोन्याची माती भरून पूर्ण राजद्वारीं गेला, व राजाला घडलेलें सर्व वर्तमान त्यानें निवेदित केलें. तें सर्व सोनें राजवाड्यांत आणलें, व पूर्णाला 'धनश्रेष्ठी' हें नांव देऊन श्रेष्ठिपदाला चढविलें.

उत्तरा सुस्वरूप होतीच. त्यांत तिच्या बापाची मोठी योग्यता झाल्यामुळें खुद्द पूर्णाच्या मालकानें—सुमन श्रेष्ठीनें—आपल्या मुलासाठीं तिची मागणी केली. पण पूर्ण म्हणाला, " मला तुमच्या घरीं मुलगी द्यावयाची नाहीं. " तें ऐकून सुमन श्रेष्ठीला वाईट वाटलें व त्यानें सांगून पाठविलें कीं, ' इतकीं वर्षें माझ्या पदरीं राहून अधिकार मिळाल्याबरोबर मला विसरलास कीं काय ? ' तेव्हां पूर्ण म्हणाला, " मी तुम्हांला विसरलों नाहीं, तुमच्या कुळाची आणि गोत्राची मला पर्वा नाहीं. पण तुम्ही पडलां इतर पंथाचे, आणि माझी मुलगी बुद्धानुयायिनी ! तेव्हां तिचें तुमच्या घरीं कसें जमणार ? " त्यावर सुमन श्रेष्ठीनें लिहिलें कीं, 'आमचा जुना संबंध तोडणें चांगलें नाहीं. मी जरी अन्यपंथी असलों, तरी माझ्या सुनेच्या वहिवाटींत कांहीं अंतर पडूं देणार नाहीं. बुद्धाचा सत्कार करण्यासाठीं[1] जो तिला खर्च येईल, तो देण्यांत येईल. '

त्यानंतर उत्तरेचें सुमनश्रेष्ठीच्या मुलाशीं लग्न करण्यात आलें. कांहीं काळानें ती आपल्या नवऱ्याला म्हणाली, "मी माझ्या माहेरी असतां दरमहिन्याला आठ दिवस उपोसथव्रत पाळीत असें. तेव्हां येथेंहि तसें करण्यास परवानगी द्या." पण त्याला ही गोष्ट पसंत पडली नाहीं. चातुर्मास आला तरी उत्तरेला उपोसथ करण्याला परवानगी मिळेना. चातुर्मासाचा शेवटचा पंधरवडा येण्यापूर्वीं तिनें आपल्या बापास पत्र लिहिलें कीं, ' तुम्हीं येथें मला तुरुंगांत टाकून दिलें आहे. इतक्या काळांत मला एक दिवसहि उपोसथ पाळतां आला नाहीं. तेव्हां आतां माझ्यासाठीं एकदम पंधरा हजार कार्षापण पाठवा. '

तिच्या आईबापांनीं ही एवढे पैसे कां मागते ह्याची चौकशी करण्याच्या भरीस न पडतां एकदम पंधरा हजार कार्षापण पाठवून दिले. त्या वेळीं राजगृहांत सिरिमा नांवाची एक गणिका असे. तिला बोलावून आणून उत्तरा म्हणाली, " सिरिमाबाई, मी पंधरा दिवस उपोसथव्रत पाळूं इच्छित

१ ती बुद्धपूजेसाठीं एका कार्षापणाचीं फुलें पाठवीत असे, असें मनोरथपूरणींत आहे. पण विहारांत रोज फुलें पाठविण्याची चाल बुद्धाच्या वेळची नसून बुद्धघोषाच्या वेळची होती. म्हणून मूळच्या वाक्याचें रूपांतर करतांना थोडा फेरफार केला आहे.

आहे. तेव्हां हे पंधरा हजार कार्षापण घेऊन ह्या पंधरवड्यांत माझ्या जागीं तूं माझ्या नवऱ्याची सेवा कर."

सिरिमेनें ही गोष्ट कबूल केली. तिच्या बरोबर मजा करण्यास मिळणार आहे, हें पाहून उत्तरेच्या नवऱ्यानें उत्तरेला उपोसथ पाळण्यास तेव्हांच परवानगी दिली. त्या दिवसापासून उत्तरा दासींना बरोबर घेऊन खाण्यापिण्याचें पदार्थ तयार करून संघाला दान देत असे, राहिलेला वेळ धर्मचिंतनांत घालवीत असे. ह्याप्रमाणें पंधरवडा संपत आला.

पंधराव्या दिवशीं सकाळीं उत्तरा स्वयंपाकांत गुंतली होती. आणि तिचा नवरा सिरिमेबरोबर गप्पागोष्टी करीत गच्चीवर बसला होता. उत्तरेनें खिडकींतून त्याच्याकडे पाहिलें. 'अशा संपत्तीचा त्याग करून स्वयंपाकाच्या धुरानें आपलें तोंड काळें करून घेणारी व दासींबरोबर काम करणारी ही स्त्री मोठी अभागी असली पाहिजे,' असा विचार मनांत येऊन तिचा नवरा जरासा हंसला. 'हा आपल्या संपत्तिमदानें मत्त होऊन राहिला आहे,' हें पाहून उत्तराहि हांसली. तें पाहून 'ही चेटिका मी येथें असतांना माझ्या पतीबरोबर हंसते खिदळते काय.' असें म्हणत कोपानें आणि त्वरेनें सिरिमा खालीं उतरली! तिच्या त्या चालीवरूनच उत्तरेनें ताडलें कीं, ह्या पंधरवड्यांत हिला, 'आपण मालकीणच आहें' असें वाटूं लागलें असलें पाहिजे! आणि त्याच वेळीं सिरिमेवर मैत्रीचें ध्यान करून ती तेथें उभी राहिली.

दासीगणांत शिरून मोठ्या पळयानें कढईंतील तापलेलें तेल घेऊन सिरिमेनें तें उत्तरेच्या डोक्यावर ओतलें! परंतु मैत्रीध्यानाच्या प्रभावानें उत्तरेला त्याची बाधा न होतां पद्मपत्रावरील पाण्याच्या बिंदूप्रमाणें तें निसटून खालीं पडलें. तेव्हां जवळ असलेल्या दासी सिरिमेला म्हणाल्या, "वा ग वा! आमच्या मालकिणीकडून पैसे घेऊन ह्या घरांत आलीस, आणि आतां स्वतःच मालकीण होऊं पहातेस काय?"

असें म्हणत एका मागून एकीनें येऊन त्यांनीं सिरिमेवर यथेच्छ प्रहार चालविले. त्या वेळीं सिरिमेनें आपला दर्जा ओळखला, व जाऊन उत्तरेच्या पायाशीं उडी टाकली, व पायां पडून तिची क्षमा मागितली. उत्तरा म्हणाली, "सिरिमाबाई, ह्या बाबतींत मी तुला क्षमा करणार नाहीं.

मी कुलीन स्त्री आहें, हें तूं लक्षांत ठेव. जर भगवंतानें तुला क्षमा केली तर मी करीन."

इतक्यांत भगवान् भिक्षुसंघासह भिक्षेसाठीं तेथें आला. त्याच्या पायां पडून सिरिमेनें घडलेली हकीगत त्याला निवेदित केली, व त्याची क्षमा मागितली. त्यानें क्षमा केल्यावर उत्तरेनेंहि तिच्या अपराधांची क्षमा केली. तेव्हां भगवान् म्हणाला, "क्षमेनें क्रोधाला जिंकावें; दुर्जनाला साधुत्वानें जिंकावें; कृपणाला दानानें जिंकावें, व सत्यानें लबाडाला जिंकावें."[१]

दुसरी एक वेळुकंटक शहरांत रहाणारी वेळुकंटकी नंदमाता नांवाची ऋद्धिमती उपासिका होती, असें अंगुत्तर निकायांतील कित्येक सुत्तांवरून दिसून येतें. तिला आणि खुज्जुत्तरेला उपासिका वर्गांत भगवंतानें अग्रस्थान दिलें आहे. तेव्हां ती व उत्तरा नंदमाता ह्या दोघी एकच असाव्या, अशी बळकट शंका येते. अट्ठकथांच्या वेळीं मूळ गोष्टींत बरेच फेरफार होऊन वरील गोष्ट रचण्यांत आली असावी.

७१

## सुप्पवासा कोलियदुहिता

"उत्तम अन्न देणाऱ्या उपासिकांत सुप्पवासा कोलियदुहिता श्रेष्ठ आहे."

ही सीवलि स्थविराची आई. हिची गोष्ट ह्या भागाच्या अठराव्या प्रकरणांत आलीच आहे. तेव्हा ती तेथें पहावी.

७२

## सुप्पिया उपासिका

"आजाऱ्यांची शुश्रूषा करणाऱ्या उपासिकांत सुप्पिया श्रेष्ठ आहे."

ही वाराणसींत जन्मली, आणि तिचें लग्नहि त्याच शहरांतील एका तरुणाशीं झालें. एके दिवशीं धर्मश्रवणासाठीं विहारांत गेली असतां, तेथें अत्यंत आजारी पडलेल्या एका भिक्षूला तिनें पाहिलें, व त्याला औषधासाठीं

१ मूळ गाथा धम्मपदांत आहे ती अशी :-

**अक्कोधेन जिने कोधं, असाधुं साधुना जिने ।**
**जिने कदरियं दानेन, सच्चमालिकवादिनं ॥**

काय पाहिजे आहे ह्याची चौकशी केली. त्याच्या रोगाला मांसाचा काढा पाहिजे होता. तिनें मांस आणण्याचा प्रयत्न केला. पण अशा अवेळीं मांस मिळणें शक्य नव्हतें. ती बुद्धोपासिका असल्यामुळें प्राण्याला मारून मांस तयार करणेंहि तिला पसंत नव्हतें. तेव्हां आपल्या खोलींत जाऊन शस्त्रानें आपल्या मांडीचें मांस कापून त्याचा आपल्या दासीकडून काढा बनवून तिनें तो त्या भिक्षूकडे पाठविला; व ती त्यायोगें आजारी पडली.

सुप्पियेच्या नवऱ्याचें नांव सुप्पिय असें होतें. तोहि अत्यंत श्रद्धाळु उपासक होता. घरीं येऊन चौकशी केल्यावर तिच्या आजाराचें कारण जेव्हां समजलें, तेव्हां त्याला सानंद आश्चर्य वाटलें. आजारी भिक्षूला गुण पाडण्यासाठीं आपल्या मांडीचेंहि मांस कापून देण्यास ही तयार झाली, हें हिचें औदार्य फारच थोर आहे, असें तो आपल्या मनाशींच म्हणाला. त्या दिवशीं विहारांत जाऊन भगवंताला त्यानें आमंत्रण केलें. दुसऱ्या दिवशीं ठरलेल्या वेळीं भगवान् भिक्षुसंघासह त्याच्या घरीं येऊन तेथें मांडलेल्या आसनावर बसला. सुप्पिय भगवंताला नमस्कार करून एका बाजूला उभा राहिला. तेव्हां भगवंतानें सुप्पियेची चौकशी केली. सुप्पियानें, 'ती आजारी आहे,' असें सांगितलें. भगवान् म्हणाला, "तिला इकडे बोलवा."

सु० :— पण भदन्त, तिच्यानें उठवत नाहीं.

भ० :— जर उठवत नसेल, तर तिला उचलून आणा.

त्याप्रमाणें तिला उचलून भगवंतासमोर आणून बसविलें. तेव्हां तिची जखम आपोआप बरी झाली. भोजनोत्तर भगवंतानें विहारांत जाऊन, विचार न करतां मनुष्यमांसाचा काढा घेतल्याबद्दल त्या भिक्षूचा निषेध केला, व तेव्हांपासून औषधासाठींहि मनुष्यमांसाचा उपयोग करतां कामा नये, असा नियम केला[1].

ह्या गोष्टीवरून सुप्पियेची आजाऱ्यांविषयीं अत्यंत कळकळ स्पष्टच दिसून येत आहे.

---

१ मूळ गोष्ट महावग्गाच्या सहाव्या भागांत आहे, व तीच कांहीं फेरफार करून मनोरथपूरणीकारानें घेतली आहे.

# ७३

# कातियानि

" ज्ञानयुक्त श्रद्धा ठेवणाऱ्या उपासिकांत कातियानी श्रेष्ठ आहे."

ही अवंती राष्ट्रांत कुररघर शहरांत जन्मली, व तेथेंच ती रहात असे. वयांत आल्यावर तिची आणि सोण कुटिकर्णाची आई काळी उपासिका हिची दृढ मैत्री जडली. कुररघराहून सोण श्रावस्तीला गेला, व तेथून भगवंताचा धर्म उत्तमप्रकारें शिकून परत आला; तेव्हां काळीनें त्याला आपल्या घरीं उपदेश करण्यास बोलाविलें. त्याचा उपदेश ऐकण्यास पुष्कळ लोक आले होते. त्यांत कातियानीहि होती.

कातियानीच्या घरीं दरवडा घालण्यासाठीं शहराच्या भिंतीबाहेरून चोरांनीं भुयार खणण्यास आरंभ केला होता, व तें त्याच रात्रीं पुरें झालें. चोरांच्या पुढाऱ्यानें शेजारीं चाललेला धर्मोपदेश ऐकला, आणि तेथें जाऊन तो कातियानीच्या मागें उभा राहिला. त्याच वेळीं दिव्यासाठीं तेल आणण्यास कातियानीनें आपल्या दासीस घरीं पाठविलें. ती दासी तेल न घेतांच, चोर आल्याची बातमी घेऊन आली. त्या वेळीं चोरांच्या पुढाऱ्यानें असा विचार केला कीं, जर ह्या गडबडीनें कातियानी येथून उठून जाऊं लागली, तर तिचे येथल्या येथेंच दोन तुकडे करीन. पण कातियानी दासीला म्हणाली, " अग, गडबड करूं नकोस. चोरांच्या हाताला लागेल तें चोर घेऊन जातील. पण मी जो आज उपदेश ऐकत आहें, तो कोणाच्या हाताला लागण्यासारखा नाहीं. अशा कामीं तूं विघ्न करूं नकोस."

तिचें हें भाषण ऐकून चोरांचा पुढारी अत्यंत खजील झाला, व आपल्या मनाशींच म्हणाला, " अशा बाईच्या घरीं दरवडा घालणाऱ्या आम्हांला ह्या महापृथ्वीनें दुभंग होऊन आपल्या पोटांत गडप करून टाकणेंच योग्य होईल. " तो तडक कातियानीच्या घरीं गेला व आपल्या साथ्यांना तिची चीजवस्त जागच्या जागीं ठेवण्यास लावून त्यांना घेऊन काळीच्या घरीं आला. ते सर्व चोर तेथें जमलेल्या लोकांच्या मागें उभे राहिले होते. जेव्हां उपदेश संपला, तेव्हां कातियानीच्या पायां पडून त्या पुढाऱ्यानें आपणास व आपल्या साथ्यांस क्षमा करण्यास विनंति केली. 'तो क्षमा कां मागतो,' हें कातियानीला समजेना. ती म्हणाली, " तुम्हीं माझा कोणता अपराध

केलात ?" त्यानें घडलेलें सर्व वर्तमान तिला सांगितलें. तेव्हां तिनें त्यांच्या अपराधांची क्षमा केली. पण तेवढ्यानें त्यांचें समाधान झालें नाहीं. तिच्याच मार्फत आपणांला प्रव्रज्या देण्यासाठीं त्यांनीं सोणाला विनंति केली, व ते सर्व भिक्षु झाले.

७४

## नकुलमाता गृहपत्नी

"दुसऱ्याचें समाधान करणाऱ्या उपासिकांत नकुलमाता गृहपत्नी श्रेष्ठ आहे."

हिची सर्व गोष्ट नकुलपित्याच्या गोष्टींत (प्र. ६५) आलीच आहे. ती तेथें पहावी.

७५

## काळी उपासिका कुररघरिका

"केवळ ऐकून (न भेटतां) भक्त झालेल्या उपासिकांत काळी श्रेष्ठ आहे."

ही राजगृह येथें एका चांगल्या कुळांत जन्मली. तिचें लग्न अवंती राष्ट्रांतील कुररघर शहरीं एका कुटुंबांत झालें होतें. गरोदरावस्थेंत असतांना ती माहेरीं आली व तेथेंच तिनें प्रथमतः भगवंताची कीर्ति ऐकली. आणि तेव्हां-पासून ती उपासिका झाली. तिला जो मुलगा झाला, त्याचें नांव सोण असें ठेवलें होतें. त्याची कथा ह्या भागाच्या सतराव्या प्रकरणांत आलीच आहे. भगवंताची कीर्ति तिनें सातागिर व हेमवत ह्या दोन यक्षांच्या संवादावरून ऐकली, असें मनोरथपूरणींत म्हटलें आहे. कांहीं कां असेना, भगवंताचें दर्शन झाल्यावांचून इतरांकडून त्याची कीर्ति आणि धर्मोपदेश ऐकून ही उपासिका झाली, एवढी गोष्ट खरी आहे.

---

[ बुद्धाच्या भिक्षुसंघांत अंत्यज जातीचेहि भिक्षु असत. पण त्यांपैकीं कोणाचाहि वरील यादींत समावेश झालेला नाहीं. म्हणून नमुन्यादाखल सोपाक (श्वपाक) व सुनीत ह्या दोन अंत्यज जातीच्या स्थविरांचीं चरित्रें थेरगाथाअट्ठकथेच्या आधारें येथें देतों. ]

## ७६

# सोपाक ( श्वपाक )

हा राजगृहांत श्वपाककुळांत जन्मला व त्याच नांवानें पुढें प्रसिद्धीला आला. चार महिन्यांचा असतांनाच त्याचा बाप मरण पावला, व त्याच्या पालनपोषणाचा भार त्याच्या चुलत्यावर पडला. तो सात वर्षांचा झाला तेव्हां 'हा आपल्या मुलांबरोबर भांडत असतो,' असें म्हणून त्याच्या चुलत्यानें त्याला स्मशानांत नेलें, व त्याचे दोन्ही हात पाठीशीं बांधून त्याच दोरीनें त्याला तेथें पडलेल्या एका प्रेताशीं जखडून टाकलें. आणि 'कोल्हे ह्याला खावोत' असें म्हणून तो तेथून निघून गेला. तेव्हां सोपाक, 'माझी येथें गति काय होणार, माझा येथें बांधव कोण, मला ह्या भयापासून कोण तारील?' असें म्हणून मोठमोठ्यानें आक्रोश करूं लागला. रात्रिसमयीं सोपाकाचा आक्रोश ऐकून भगवान् तेथें आला, व बंधनापासून मुक्त करून त्यानें त्याला आपणाबरोबर नेलें. सोपाकाच्या आईनें दिराला मुलाची प्रवृत्ति विचारली; पण त्यानें कांहीं दाद लागूं न दिल्यामुळें दुसऱ्या दिवशीं शोध करीत करीत ती भगवंतापाशीं आली, व तिनें आपल्या मुलाची बातमी विचारली. भगवंतानें तिला धर्मोपदेश केला. तो ऐकून ती स्रोतआपन्न झाली, व मुलाला विहारांत नेल्याबद्दल तिला वाईट न वाटतां आनंदच झाला. पुढें सोपाक अर्हत्पदाला पावला. थेर गाथेंत त्याच्या ज्या सात गाथा आहेत त्या अशाः—

दिस्वा पासादछायायं चंकमन्तं नरुत्तमं।
तत्थ नं उपसंकम्म वन्दिस्सं पुरिसत्तमं॥ १॥
एकंसं चीवरं कत्वा संहरित्वान पाणियो।
अनुचंकमिस्सं विरजं सब्बसत्तानमुत्तमं॥ २॥
ततो पञ्हे अपुच्छि मं पञ्हानं कोविदो विदू।
अच्छम्भी च अभीतो च ब्याकासिं सत्थुनो अहं॥ ३॥
विसज्जितेसु पञ्हेसु अनुमोदि तथागतो।
भिक्खुसंघं विलोकेत्वा इममत्थं अभासथ॥ ४॥

लाभा अङ्गान मगधानं येसायं परिभुञ्जति ।
चीवरं पिण्डपातञ्च पच्चयं सयनासनं ।
पच्चुट्ठानञ्च सामीचिं, तेसं लाभा ति चब्रवी ॥ ५ ॥
अज्जदग्गे मं सोपाक दस्सनायोपसंकम ।
एसा चेव ते सोपाक भवतु उपसम्पदा ॥ ६ ॥
जातिया सत्तवस्सोहं लद्धान उपसम्पदं ।
धारेमि अन्तिमं देहं अहो धम्मसुधम्मता ॥ ७ ॥

( १ ) प्रासादाच्या छायेंत चंक्रमण करीत असतांना नरोत्तमाला पाहून मी तिकडे गेलों, आणि त्याला वंदन केलें. ( २ ) चीवर एका खांद्यावर करून व हात जोडून त्या विशुद्ध, सर्वसत्त्वोत्तमाच्या मागोमाग मीहि चंक्रमण करूं लागलों. ( ३ ) तेव्हां त्या कुशल प्रश्न विचारणाऱ्यानें मला प्रश्न विचारले आणि न घाबरतां आणि न भितां मी त्या गुरूला उत्तरें दिलीं. ( ४ ) प्रश्नांचीं उत्तरें दिल्याबद्दल तथागतानें माझें अभिनंदन केलें, व भिक्षुसंघाकडे वळून तो म्हणाला, ( ५ ) "ज्या अंगाचें आणि मगधांचें चीवर, पिण्डिपात, भैषज्य आणि शयनासन हा स्वीकारतो, तो त्यांचा मोठाच फायदा समजला पाहिजे. जे याचा मानमरातब राखतात, त्यांनांहि फायदा होतो. ( ६ ) सोपाक, तूं आजपासून माझ्या भेटीला येत जा; व हीच तुझी उपसंपदा झाली असें समज." ( ७ ) सात वर्षांचा असतांना मला उपसंपदा मिळाली. आणि आतां मी हें अंतिम शरीर धारण करीत आहें. धन्य धर्माचें सामर्थ्य !

७७

## सुनीत

हा भंग्याच्या कुळांत जन्मला. थेर गाथेच्या बाराव्या निपातांत ह्याच्या गाथा आहेत, त्यांतच ह्याचें चरित्र आलें आहे. त्या गाथा अशाः—

नीचे कुलम्हि जातो हं, दलिद्दो अप्पभोजनो ।
हीनं कम्मं ममं आसि अहोसिं पुप्फछड्डको ॥ १ ॥
जिगुच्छितो मनुस्सानं परिभूतो च वम्भितो ।
नीचं मनं करित्वान वन्दिसं बहुकं जनं ॥ २ ॥

अथद्दसासिं सम्बुद्धं भिक्खुसंघपुरक्खतं ।
पविसन्तं महावीरं मगधानं पुरुत्तमं ॥ ३ ॥
निक्खिपित्वान ब्यामङ्गि वन्दितुं उपसंकमिं ।
ममेव अनुकम्पाय अट्ठासि पुरिसुत्तमो ॥ ४ ॥
वन्दित्वा सत्थुनो पादे एकमन्तं ठितो तदा ।
पब्बज्जं अहमायाचिं सब्बसत्तानमुत्तमं ॥ ५ ॥
ततो कारुणिको सत्था सब्बलोकानुकम्पको ।
एहि भिक्खूति मं आह सा मे आसूपसम्पदा ॥ ६ ॥
सोहं एको अरञ्ञस्मिं विहरन्तो अतन्दितो ।
अकासिं सत्थु वचनं यथा मं ओवदी जिनो ॥ ७ ॥
रत्तिया पठमं यामं पुब्बजातिं अनुस्सरिं ।
रत्तिया मज्झिमं यामं दिब्बचक्खुं विसोधितं ।
रत्तिया पच्छिमे यामे तमोखन्धं पदालयिं ॥ ८ ॥
ततो रत्या विवसने सुरियस्सुग्गमनं पति ।
इन्दो ब्रह्मा च आगन्त्वा मं नमस्सिंसु पञ्जली ॥ ९ ॥
नमो ते पुरीसाजञ्ञ, नमो ते पुरिसुत्तम ।
यस्स ते आसवा खीणा दक्खिणेय्योसि मारिस ॥ १० ॥
ततो दिस्वान मं सत्था देवसंघपुरक्खतं ।
सितं पातुकरित्वान इमं अत्थं अभासथ ॥ ११ ॥
तपेन ब्रह्मचरियेन संयमेन दमेन च ।
एतेन ब्राह्मणो होति एतं ब्राह्मणमुत्तमं ॥ १२ ॥

( १ ) मी नीच कुळांत जन्मलों, मी दरिद्री होतों आणि खाण्यापिण्याचे माझे हाल होत असत. माझा धंदा हलकट होता; मी भंगी होतों. ( २ ) लोक माझा कंटाळा करीत, तिरस्कार करीत व निंदा करीत. तरी मीं नम्र मनानें कितीतरी लोकांना नमस्कार करीत असें. ( ३ ) अशा स्थितींत भिक्षुसंघासहवर्तमान मगधांच्या श्रेष्ठ नगरांत प्रवेश करणाऱ्या

महावीर संबुद्धाला मीं पाहिलें. (४) मी कांवड[1] खालीं टाकली, आणि नमस्कार करण्यास पुढें सरसावलों. केवळ माझ्या अनुकंपेनें तो पुरुषश्रेष्ठ उभा राहिला. (५) त्या गुरूच्या पायां पडून एका बाजूला उभा राहून त्या सर्व सत्त्वोत्तमाजवळ मी प्रव्रज्या मागितली. (६) तेव्हां सर्व लोकांवर अनुकंपा करणारा तो कारुणिक गुरु 'भिक्षु इकडे ये,' असें मला म्हणाला, तीच माझी उपसंपदा झाली. (७) तो मी एकाकी सावधानपणें अरण्यांत राहिलों, व जसा त्या जिनानें मला उपदेश केला, त्याप्रमाणें त्या गुरूच्या वचनाला अनुसरून वागलों. (८) रात्रीच्या पहिल्या यामांत पूर्वजन्माची आठवण करण्यास मी समर्थ झालों. रात्रीच्या मध्यमयामांत मला दिव्यदृष्टि प्राप्त झाली, व रात्रीच्या पश्चिमयामांत मीं तमोराशीचा (अविद्येचा) नाश केला. (९) तदनंतर रात्र संपत आली असतां व सूर्योदय जवळ आला असतां इंद्र आणि ब्रह्मा येऊन मला नमस्कार करून हात जोडून उभे राहिले. (१०) (ते म्हणाले,) "हे दान्त पुरुषा, तुला नमस्कार असो. हे पुरुषोत्तमा, तुला नमस्कार असो. ज्या तुझे आसव क्षीण झाले आहेत, तो तूं, हे मित्रा, दक्षिणार्ह आहेस. (११) नंतर देवसंघानें माझा आदरसत्कार केलेला त्या गुरूनें पाहिला, आणि स्मित करून तो असें बोलला. (१२) "तपानें, ब्रह्मचर्यानें, संयमानें आणि दमानें–ह्यायोगें ब्राह्मण होतो, हेंच ब्राह्मण्य उत्तम आहे.

---

१ प्राचीन काळीं शहरांतील घाण भंगी लोक कावडींत भरून नेत असत. ही पद्धत अद्यापि नेपाळांत चालू आहे. चिनी लोकहि मैला नेण्यासाठीं कावडीचाच उपयोग करतात.

# प्रस्तावना

समाधिमार्ग फार प्राचीन आहे. आळार कालाम आणि उद्दक रामपुत्त हे दोघे समाधिमार्गाचे पुरस्कर्ते होते, व त्यांचा पंथ कोसल देशात बुद्धसमकाली अस्तित्वात होता. लहानपणी बोधिसत्त्व कालामाच्या आश्रमात जाऊन समाधीचा अभ्यास करीत असण्याचा बळकट संभव आहे. हा जुना समाधिमार्ग कशा प्रकारचा होता, याचे विस्तृत वर्णन कोठेही सापडत नाही; तथापि त्याचाच एकदेश सध्याच्या योगसूत्रांत आला आहे, असे समजण्यास हरकत दिसत नाही. कालामादिक योगी केवळ ध्यानाला महत्त्व देत असत; त्या ध्यानाच्यायोगे चित्ताची एकाग्रता स्थापित करणे हेच त्याचे ध्येय होते. ध्यानप्राप्तीसाठी ते कोणत्या उपायांची योजना करीत हे कोठे स्पष्ट सांगितले नाही. पण सध्याच्या योगसूत्रावरून असे अनुमान करता येते की, या कामी ते प्राणायामालाच महत्त्व देत असावे; परंतु त्यांत पूरक, कुंभक, रेचक वगैरे प्रकार नव्हते. या पुस्तकात सांगितलेल्या आनापानस्मृतीसारखाच कालामादिकांचा प्राणायाम होता असे दिसते.

कोसल देशात जसे कालमाच्या पंथाला महत्त्व आले होते, तसे ते मगध देशात अनेक तपस्वी पंथांला होते. या पंथांपैकी एक पंथ श्वासोच्छ्वास दाबून ध्यान करणे हा तपश्चर्येचा प्रकार समजत असे. आळार कालाम आणि उद्दक रामपुत्त यांचा पंथ सोडून बोधिसत्त्व मगध देशात आला, आणि तेथे त्याने अनेकविध तपश्चर्या चालविली. त्या वेळी तो आश्वासप्रश्वास दाबून अशा प्रकारचे ध्यान करीत असल्याचा दाखला महासच्चकसुत्तात सापडतो. त्यात सच्चकाला उद्देशून भगवान् म्हणतो, " हे अग्गिवेस्सन, माझ्या मनात असा विचार आला की, मी आश्वासप्रश्वास दाबून ( अप्राणक ) ध्यान करावे. तो मी मुखातून, आणि नाकातून निघणारे आश्वासप्रश्वास दाबीत असे; तेव्हा अंतर्वात माझ्या कानांतून निघण्याचा प्रयत्न करीत, व त्यामुळे लोहाराच्या भात्यातून शब्द निघावा त्या प्रकारचा विलक्षण शब्द निघत

असे ...कानांतूनही मी आश्वासप्रश्वास दाबीत होतो, व त्यामुळे तलवारीच्या टोकाने माथा फोडून टाकल्याप्रमाणे माझ्या डोक्यात वाताभिघात (वेदना) होत असत."

परंतु आळार कालमाचा राजयोग किंवा अशा प्रकारचा हठयोग हे दोन्ही बुद्धाला सारखेच त्याज्य वाटले; का की, त्यांच्यायोगे जगाचे दुःख कमी होण्याचा संभव नव्हता. बुद्धाच्या धर्ममार्गात समाधीला स्थान नाही असे नाही, पण ते केवळ गौण आहे. अष्टांगिक मार्गांत समाधि शेवटची पायरी आहे; व सम्यक् दृष्टि सर्वांत पहिली आहे. जगात दुःख ओतप्रोत भरलेले आहे, व ते कमी करण्यासाठी आपली आणि इतरांची तृष्णा नष्ट करण्याचा सतत प्रयत्न केला पाहिजे, हे सम्यक् दृष्टीचे सार आहे. तेव्हा आपलेच दुःख वाढविणारी हठयोगी समाधि, किंवा केवळ आपल्याच सुखावर भार देणारी कालामादिकांची समाधि, या दोन्हीही बोधिसत्त्वाला त्याज्य वाटल्या यात नवल नाही. या दोहोंच्या मधला मार्ग म्हटला म्हणजे ज्या समाधीच्यायोगे आपल्या कुशल मनोवृत्ति वृद्धिंगत करून व तृष्णेचा नाश करून सामान्य जनसमूहाचे हित साधण्यास आपण समर्थ होतो, ती समाधि होय. याच समाधीचा भगवंताने अष्टांगिक मार्गांत समावेश केला आहे.

प्राणायामाची प्राचीन पद्धति भगवंताने कायम ठेवली खरी, पण त्यांत आपल्या तत्त्वज्ञानाला अनुकूल असे पुष्कळ फेरफार केले आहेत. मैत्री, करुणा, मुदिता, उपेक्षा, यांना तर भगवंतानेच महत्त्व आणले असे म्हणण्यास हरकत नाही. अभिभ्वायतनांच्यायोगे (प्रकरण ७ पहा.) सृष्टिसौंदर्यावर ध्यान करण्याचा प्रकारही बुद्धानेच प्रचलित केला, आणि समाधिमार्गांत विविधता आणली. याशिवाय जगताच्या अनित्यतेवर ध्यान करण्याचा व तद्द्वारा समाधि साधण्याचा प्रकार केवळ बौद्ध वाङ्मयांतच सापडतो. इतर समाधि क्षणभर विश्रांति मिळण्यासाठी आहेत; परन्तु अनित्यतेवर ध्यान करून मिळविलेली समाधि तत्त्वबोध करून देणारी आहे; आणि इतर समाधींची मदत याच कार्यासाठी करून घ्यावयाची असते.

पालि भाषेतील विशुद्धिमार्ग ग्रंथांत या सर्व समाधींचा विस्तारपूर्वक विचार केला आहे, पण त्या ग्रंथाचे समग्र भाषांतर करणे शक्य नसल्यामुळे त्याचा सारांश मूळ सुत्तपिटकाला अनुसरून या पुस्तकांत आणण्याचा प्रयत्न

केला आहे. जेथे सुत्ताचा आणि विशुद्धिमार्गाचा विरोध दिसला तेथे सुत्ताचा सिद्धांतच स्वीकारण्यात आला आहे.

हिंदुस्थान योगमार्गाविषयी फार प्रसिद्ध आहे, व सध्या या देशात त्याचे थोडेबहुत पुनर्जीवन होऊ पहात आहे. ब्राह्मणवर्गात मौंजीबंधनाच्या दिवसापासूनच प्राणायाम करण्यास शिकविण्याची वहिवाट अद्यापि चालू आहे. पण तिच्यात एवढे शैथिल्य आले आहे की, त्या प्राणायामापासून एक क्षणभर देखील कोणाला शांति मिळत असेल असें वाटत नाही. परन्तु पाश्चात्य देशांत या प्राणायामाचा निराळ्या रीतीने विकास होत आहे. प्राणायाम ( Breathing Exercise ) हा एक तिकडे उत्कृष्ट व्यायामाचा प्रकार होऊन राहिला आहे. अभिभ्वायतनाच्याद्वारे सृष्टिसौंदर्यावर ध्यान करणे याला पाश्चात्य देशांत विशेष महत्त्व मिळालेले नाही, तरी वर्डस्वर्थसारख्या कवीच्या काव्यांतून मधून मधून त्याची थोडीशी झुळूक दिसून येते. उदाहरणार्थ, त्याची डाफोडिल ही कविता पहा. या कवितेत* कवि डाफोडिल नावाच्या फुलांचे वर्णन करीत आहे. एकाकी

---

* I wandered lonely as a cloud
That floats on high o'er vales and hills,
When all at once I saw a crowd,
A host of golden daffodils,
Beside the lake, beneath the trees,
Fluttering and dancing in the breeze.
Continuous as the stars that shine
And twinkle on the milky way,
They stretched in never-ending line
Along the margin of a bay :
Ten thousand saw I at a glance
Tossing their heads in sprightly dance.
The waves beside them danced, but they
Out-did the sparkling waves in glee :—
A poet could not but be gay
In such a jocund company !
I gazed-and gazed-but little thought

फिरत असताना अशा फुलांकडे पाहून त्याचे मन एकाग्र होते, एवढेच नव्हे, तर या पुस्तकाच्या सातव्या प्रकरणात वर्णिलेले प्रतिभागनिमित्त त्याला मिळत, आणि घरी आल्यावर जेव्हा जेव्हा त्याचे मन नीरस किंवा विषण्ण होऊन जाते, तेव्हा तेव्हा हे प्रतिभागनिमित्त त्याला उपयोगी पडते.

अनित्यतेवर ध्यान करण्याचा प्रकार सर्वांना सारखाच नवीन वाटण्याचा संभव आहे. परन्तु त्याचाही विकास पाश्चात्त्य देशात बॅर्गसोंच्या (Bergson) तत्त्वज्ञानात आणि ईट्स (Yeats) सारख्या कवीच्या काव्यात होत चालला आहे.

In all her foolish things that live a day,
Eternal Beauty wandering on her way.

यात ईट्सने अनित्यतेचे सरस वर्णन केले आहे. आता तिच्यावर ध्यान करून व अष्टांगिक मार्गाचे रहस्य जाणून आत्मपरहिताला तत्पर होणे, हा केवळ बुद्धाचाच मार्ग आहे. पण कालांतराने त्याचाही विकास पाश्चात्य देशात होईल अशी चिन्हे स्पष्ट दिसत आहेत.

सामान्य लोकांना उपयोगी पडण्यासारखे बौद्ध वाङ्मय देशी भाषांतून तयार करण्याचा माझा हेतु पुष्कळ दिवसांचा होता; परन्तु समाधीचा मार्ग सामान्य लोकांसाठी नाही असे मला वाटत होते. येथे आल्यावर सत्याग्रहाश्रमवासी एक गृहस्थ सात आठ महिने एकान्तात राहिले होते, असे माझ्या ऐकण्यात आले. अर्थात या गृहस्थाला पहाण्याची मला उत्सुकता झाली. पुढे यांनीच आमच्या विद्यापीठाच्या महामात्राची जागा पुन्हा स्वीकारली, व सुदैवाने त्यांचा परिचय होण्यास विशेष संधी सापडली. विद्यापीठ सामान्य लोकांसाठी आहे, व त्यात काम करणाऱ्या सर्व लोकांनी

---

What wealth the show to me had brought;
For oft, when on my couch I lie
In vacant or in pensive mood,
They flash upon that inward eye
Which is the bliss of solitude;
And then my heart with pleasure fills,
And dances with the daffodils.

—Palgraves Golden Treasury, Book IV. p. 86

सामान्य लोक सुसंस्कृत होतील याजकडे विशेष लक्ष पुरवले पाहिजे, असे ते वारंवार म्हणत असतात. एकान्ताची आवड आणि सामान्य जनसमूहाच्या उन्नतीसाठी उत्सुकता, या त्यांच्या दोन गुणांमुळे प्रस्तुत पुस्तक लिहिण्यास मला उत्तेजन मिळाले, आणि म्हणूनच ते मी त्यांना अर्पण केले आहे.

सुधारणेच्या नवीन साधनांच्यायोगे जगाची अशांतता कमी न होता वाढली आहे. सिनेमा, नाटके, यांच्यापासून तहत स्वदेशाभिमाना-पर्यंत सर्व राष्ट्रात सारखी धावपळ चालली आहे; जणू काय जगात एक प्रकारचा भयंकर ज्वर उत्पन्न झाला आहे ! अशा प्रसंगी शांत चित्ताने विचार करून आपले आणि जगाचे धोरण ठरवणाऱ्या माणसांची वाण भासू लागली आहे, आणि जे कोणी थोडे सत्पुरुष शांत चित्ताने विचार करून जगाचे धोरण ठरवू पहात आहेत, त्यांचा मार्ग जाणण्याचे सामर्थ्य सामान्य लोकांत नसल्यामुळे त्यांच्या प्रयत्नांचा व्हावा तसा फायदा होत नाही. अशा वेळी हा समाधीचा– समाधानाचा– प्राचीन मार्ग वाचकांला दाखवून देण्यात येत आहे. त्याचा ते आत्मपरहितासाठी उत्तम उपयोग करून घेतील, व अशान्त जगात शांतीची स्थापना करतील अशी आशा आहे.



# समाधिमार्ग

इति खो भिक्खवे समाधि मग्गो असमाधि कुमग्गो ति ॥

— अंगुत्तर० छक्कनिपात.

## १

## समाधिकार्य

सन्मनोवृत्तींत समाधान ठेवणें हें समाधीचें कार्य होय. सदोष असून दुःखोत्पादक मनोवृत्ति असन्मनोवृत्ति; आणि निर्दोष असून ज्या सुखोत्पादक त्या सन्मनोवृत्ति होत. यांला बौद्धवाङ्मयांत अनुक्रमें अकुशलधर्म आणि कुशल-धर्म म्हणतात. अकुशल कायप्रवृत्ति, वाक्प्रवृत्ति आणि मनःप्रवृत्ति कोणत्या ? असा पसेनदि कोसलराजानें प्रश्न केला असतां आनन्द म्हणाला, 'महाराज, ज्या सदोष त्या.' प०— पण सदोष कोणत्या ? आ०— ज्या सामय त्या. प०— सामय कोणत्या ? आ०— ज्या दुःखोत्पादक त्या. प०—दुःखो-त्पादक कोणत्या ? आ०— महाराज, ज्यांहीं करून आपणाला दुःख होतें, परक्याला दुःख होतें, किंवा उभयतांला दुःख होतें, त्या प्रवृत्ति दुःखकारक होत. प०— आणि भदंत, कोणत्या कायप्रवृत्ति, वाक्प्रवृत्ति आणि मनः-प्रवृत्ति कुशल समजाव्या ? आ०— ज्या निर्दोष त्या. प०— आणि निर्दोष कोणत्या ? आ०— ज्या अनामय त्या. प०—अनामय कोणत्या ? आ०— सुखोत्पादक त्या. प०— सुखोत्पादक कोणत्या ? आ०— महाराज, ज्यांहीं करून आपणाला दुःख होत नाहीं; परक्याला दुःख होत नाहीं, किंवा उभयतांला दुःख होत नाहीं, त्या प्रवृत्ति सुखकारक होत.'[१]

हाच अर्थ दुसऱ्या रीतीनें सांगावयाचा म्हटला म्हणजे लोभमूलक, द्वेषमूलक आणि मोहमूलक प्रवृत्ति अकुशल, व परोपकारमूलक, प्रेममूलक आणि ज्ञानमूलक प्रवृत्ति कुशल समजाव्या. अकुशल आणि कुशल यांजमध्यें

---

१ मूळ संवाद मज्झिमनिकायांतील बाहितिकसुत्तांत (८८) आहे. तो बराच विस्तृत आहे. येथें केवळ सारांश दिला आहे.

मोठा फरक हा कीं, अकुशलप्रवर्तक लोभ, द्वेष आणि मोह या तिघांत एकवाक्यता नाहीं, व ती कुशलप्रवर्तक परोपकार (अलोभ), प्रेम (अद्वेष) आणि ज्ञान (अमोह) या तिघांत पूर्णपणें आढळते; किंबहुना, अशा एकवाक्यतेनेंच यांचा उत्कर्ष होत असतो. उदाहरणादाखल लोभ आणि द्वेष घ्या. या दोन अकुशल मनोवृत्तींचें कधींहि पटत नाहीं. ज्या वेळीं मनुष्य लोभाभिभूत होतो, त्या वेळीं त्याला क्रोध येणें शक्य नाहीं, व ज्या वेळीं तो क्रोधाविष्ट होतो त्या वेळीं परार्थाप्रमाणें स्वार्थावरहि पाणी सोडण्यास तयार असतो. लोभ आणि द्वेष या दोघांबरोबरहि मोह राहूं शकतो, पण त्याचें पर्यवसान आळसांतच होत असल्यामुळें तो या मनोवृत्तीला साधक न होतां बाधकच होतो. याच्या उलट कुशलप्रवर्तक परोपकार आणि प्रेम हे परस्परांला अत्यन्त पोषक होतात, आणि त्यांना ज्ञानाची मदत मिळाली तर त्यांचा आणि ज्ञानाचा सारखाच विकास होतो.

अकुशल मनोवृत्तींचा पूर्ण निरोध करून कुशल मनोवृत्तींचा अत्यन्त विकास करणें, व त्यांतहि लिप्त न होणें, हें बौद्धधर्माचें ध्येय आहे[1] परन्तु जर समाधीनें समाधान ठेवण्याचें किंवा स्मृतीनें पहारेकऱ्याचें काम केलें नाहीं, तर अकुशल मनोवृत्तींना आंत घुसण्यास अवकाश मिळतो, व तेणेंकरून कुशल मनोवृत्ति विस्कळित होतात. कुशल मनोवृत्तींचें एकीकरण कशा प्रकारें केलें पाहिजे यासंबंधी त्रिपिटक ग्रंथांत बऱ्याच उपमा सांपडतात; त्यांपैकीं एकदोन येथें देतों.

अंगुत्तरनिकायाच्या सत्तकनिपाताच्या ६३ व्या सुत्तांत बुद्ध भगवान् भिक्षूंला उद्देशून म्हणतो, "भिक्षुहो, राजाच्या सरहद्दीवरील नगरद्वारासमोर जसा बळकट स्तंभ असतो तसा आर्यश्रावक श्रद्धेनें समन्वित असतो. त्या नगराभोंवतीं जसा खंदक असतो तसा आर्यश्रावक ऱ्हीमान् होतो. त्या नगराभोंवतालच्या प्राकारावरून फिरण्याचा जसा रस्ता असतो तसा आर्यश्रावक लोकापवादभय बाळगणारा होतो. तेथें जसा पुष्कळ आयुधांचा

---

१. **सब्बपापस्स अकरणं कुसलस्स उपसंपदा।**
**सचित्तपरियोदपनं एतं बुद्धान सासनं॥**

या गाथेंत हेंच ध्येय वर्णिलें आहे– बुद्ध, धर्म आणि संघ, (आवृत्ति २) पृष्ठ २० पहा.

संग्रह असतो तसा आर्यश्रावक बहुश्रुत होतो. तेथें जशी सैन्याची तयारी असते तसा आर्यश्रावक पूर्ण उत्साही होतो. तेथें जसा हुशार द्वारपाल असतो तसा आर्यश्रावक स्मृतिमान् होतो. जसा त्या नगराचा प्राकार तसा आर्यश्रावक प्रज्ञावान् होतो. तेथें गवतपाण्याची जशी समृद्धि असते तसा आर्यश्रावक प्रथमध्यानानें युक्त होतो. तेथें जसा तांदुळांचा आणि यवांचा संग्रह करण्यांत येतो तसा आर्यश्रावक द्वितीयध्यानानें युक्त होतो. तेथें तीळ, मूग वगैरे धान्यांचा जसा संग्रह करण्यांत येतो तसा आर्यश्रावक तृतीयध्यानानें युक्त होतो. तेथें घृतनवनीतादिक पौष्टिक आणि औषधि-पदार्थांचा संग्रह करण्यांत येतो तसा आर्यश्रावक चतुर्थध्यानानें युक्त होतो." [१]

प्राचीनकाळीं, हत्तीला दरवाज्यावर समोरून टक्कर मारतां येऊं नये म्हणून नगरद्वारासमोर एक मोठा दगडी, विटांचा किंवा लांकडी खांब गाडीत असत. वरील सुत्तांत याची तुलना श्रद्धेशीं केली आहे. हा खांब जसा अत्यन्त सुदृढ असे तशी कुशलधर्मांत श्रद्धा दृढ असावयास पाहिजे. श्रद्धा जर नाहीं तर कोणतेंहि सत्कार्य पार पाडण्याची आशा करावयास नको. आत्मलज्जा खंदकासारखी आहे. खंदक ओलांडून नगरांत शिरणें जसें शत्रूला कठीण जातें तसें आत्मलज्जेला ओलांडून पलीकडे जाणें अकुशलविचारांना कठीण जातें. लोकापवादभय हें प्राकारावरच्या रस्त्या-प्रमाणें आहे. तेथून जसा शत्रूला अटकाव करण्यांत येतो तसा लोकापवाद-भयानें अकुशलधर्माला अटकाव होतो. बहुश्रुतता शस्त्रास्त्रांप्रमाणें आहे. त्या त्या प्रसंगीं त्या त्या सद्वाक्यांचा उपयोग करून अकुशल वृत्तींवर आपणास जय मिळवितां येतो. वीर्य किंवा उत्साह सैन्याप्रमाणें समजावा. सैन्याची जशी जय्यत तयारी असावी लागते तसा आर्यश्रावकाचा उत्साह सतत कायम पाहिजे. प्रज्ञा प्राकाराप्रमाणें आहे. तेथून जसा दूरचा शत्रु दिसतो त्याप्रमाणें प्रज्ञेच्यायोगें लोभादिक शत्रु आर्यश्रावकाला ओळखतां येतात. चार ध्यानें या समाधीच्या चार पायऱ्या आहेत. यांची तुलना निर-निराळ्या प्रकारच्या अन्नांशीं केली आहे. शहरांत जर अन्नपाण्याचा दुष्काळ पडला तर तेथील रहिवाश्यांत समाधान राहणें शक्य नाहीं, व तें शहर

१ हा केवळ सारांश आहे.

शत्रूच्या ताब्यांत जाण्यास उशीर लागणार नाहीं. ‘ सैन्य अन्नावर चालतें ’ असें जें नेपोलियन बोनापार्टचें म्हणणें होतें त्याचाहि अर्थ हाच आहे. अर्थात् कुशल मनोवृत्तींत समाधीची तुलना सरहद्दीवरील नगरांतील अन्नापाण्याशीं केली आहे ती यथार्थ आहे.

दुसरी उपमा आहे ती अशी :– सत्तिमे भिक्खवे समाधिपरिक्खारा। कतमे सत्त ? सम्मादिट्ठि, सम्मासंकप्पो, सम्मावाचा, सम्माकम्मन्तो, सम्माआजीवो, सम्मावायामो, सम्मासति। या खो भिक्खवे इमेहि सत्तहंगेहि चित्तस्सेकग्गता परिक्खता, अयं वुच्चति भिक्खवे अरियो सम्मासमाधि स उपनिसो इति पि सपरिक्खारो इति पी ति। येथें समाधीला विशेष प्राधान्य देण्यांत आले आहे. किल्ल्यांत राहणाऱ्या अधिकाऱ्याच्या किंवा लोकांच्या रक्षणासाठीं जशीं परिखा, प्राकार, इत्यादिक साधनें लागतात, तशीं समाधीच्या रक्षणासाठीं आर्य अष्टांगिक मार्गाचीं सात अंगें आवश्यक आहेत. आणि किल्ल्याची व्यवस्था ठेवण्यासाठीं जशी अधिकाऱ्याची किंवा तेथील रहिवाश्यांत ऐक्याची जरूरी असते तशी आर्य अष्टांगिक मार्गाच्या सात अंगांत समाधान ( ऐक्य ) ठेवण्यासाठीं समाधीची आवश्यकता आहे.

वर दिलेल्या दोन उपमांवरून आधुनिक लोकांत समाधिसंबंधानें प्रचलित असलेल्या कित्येक गैरसमजुती नष्ट होतील अशी आशा बाळगणें अस्थानीं होणार नाहीं. ‘ योगश्चित्तवृत्तिनिरोधः।’ या सूत्रावरून आणि दुसऱ्या अशाच कित्येक वाक्यांवरून लोकांना असें वाटतें कीं, योग किंवा समाधि म्हणजे चित्ताचे व्यापार नष्ट करून कैवल्य किंवा जागृत निद्रा प्राप्त करून घेणें ही समजूत बुद्धसमकालींहि प्रचारांत होतीच. आपण कशा प्रकारचा योगाभ्यास करीत होतों हें सच्चक निर्ग्रंथपुत्राला सांगत असतांना बुद्ध भगवान् म्हणतो, “ हे अग्गिवेस्सन, तेव्हां माझ्या मनांत असा विचार आला कीं, श्वासोच्छ्वासांचा निरोध होईल असें ध्यान मला प्राप्त व्हावें. मी माझ्या मुखावाटे, नाकांतून आणि कानांतून निघणारे आश्वासप्रश्वास बंद करून ठेवीत असें. तेणेंकरून माझ्या अंगीं दाह उत्पन्न होई. एखाद्या दुर्बल माणसाला दोन बळकट माणसांनीं पकडून ज्याप्रमाणें आगीच्या

खाईवर,[1] तापवावें त्याप्रमाणें माझ्या आंगचा दाह होई. " परंतु बुद्ध झाल्यावर अशा ध्यानाची त्यानें देहदंडनांत गणना केली; कारण त्यायोगें आर्य अष्टांगिक मार्गाच्या सात अंगांचा विकास होणें शक्य नव्हतें. श्वासोच्छ्वास दाबून देहाला पीडा देणें हा एक अंत, व जेणेंकरून कामविकार उद्दीपित होतील अशा विषयांचें ध्यान करणें हा दुसरा अंत. या दोहोंच्या मधली समाधि म्हणजे आर्य अष्टांगिक मार्गांत समाविष्ट झालेली समाधि होय; आणि तीच कुशल मनोवृत्तींला पोषक होते.

या सम्यक् समाधीच्या, प्रथम, द्वितीय, तृतीय आणि चतुर्थ ध्यान, अशा चार पायऱ्या आहेत. वितर्क, विचार, प्रीति, सुख आणि एकाग्रता, या पांच चित्तवृत्तींचें पहिल्या ध्यानांत प्राधान्य असतें. दुसऱ्या ध्यानांत वितर्क, विचार रहात नाहींत; प्रीति, सुख आणि एकाग्रता या तीनच मनोवृत्तींचें प्राधान्य असतें. तिसऱ्या ध्यानांत प्रीति रहात नाहीं; केवळ सुख आणि एकाग्रता यांचें प्राधान्य असतें. चवथ्या ध्यानांत सुख रहात नाहीं; उपेक्षा आणि एकाग्रता यांचें प्राधान्य असतें.

येथें वितर्कविचारादिकांचें थोडेसें स्पष्टीकरण करणें योग्य आहे. समाधीच्या विषयांत जो चित्ताचा प्रथम प्रवेश त्याला वितर्क म्हणतात; त्या विषयांत अनुमज्जन करण्याला विचार म्हणतात; त्यापासून जो आनन्द होतो ती प्रीति; त्याच्यायोगें जें शरीराला समाधान वाटतें तें सुख; व त्या विषयांत जो चित्ताची एकवाक्यता ती एकाग्रता; आणि त्या विषयाच्या अत्यंत परिचयानें उत्पन्न होणारा जो निर्धास्तपणा किंवा निष्कंपता ती उपेक्षा समजावी. या सर्व अंगांचा क्रमशः अनुभव कसा येत असतो हें सायकलीवर बसणाऱ्याला उत्तम रीतीनें समजण्यासारखें आहे. जेव्हां आम्ही प्रथम सायकलीवर बसण्याचा प्रयत्न करतों, तेव्हां समतोलपणा साधणेंच फार कठीण जातें. या समतोलपणाला वितर्काची उपमा यथार्थ आहे. किंबहुना हाच वितर्क आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. एकदां समतोलपणा साधला म्हणजे सायकल कशी चालते याजकडे आपलें लक्ष्य वळतें.

१. यापूर्वीं मूळ सूत्रांत आलेल्या उपमापैकीं लोहाराच्या भात्याची, व तलवारीच्या टोंकानें मस्तक फोडण्याची, अशा दोन उपमा प्रस्तावनेंत आल्याच आहेत.

सायकलीच्या गतींत आपलें चित्त अनुमज्जन करीत असतें. हाच विचार आहे. वितर्क आणि विचार यांच्यायोगें सायकलीवर प्रभुत्व संपादन केल्या-बरोबर आपल्या मनाला एक प्रकारचा विलक्षण आनंद होत असतो; हीच प्रीति समजावी. हळूहळू शरीराला समाधान वाटूं लागतें, हें सुख. व एक प्रकारची तन्मयता येते, ही एकाग्रता. सायकलीचा अभ्यास जसजसा वाढत जातो, तसतशी समतोलपणा राखण्याची किंवा सायकलीच्या गतीचें निरीक्षण करण्याची आवश्यकता रहात नाहीं. म्हणजे वितर्क आणि विचार निघून जातात; केवळ प्रीति, सुख आणि एकाग्रता याच वृत्तींचें प्राधान्य राहतें. पुढें त्यांत मोठासा आनंदहि रहात नाहीं, पण शारीरिक सुख राहतें; व शेवटीं तें सुद्धां जाऊन केवळ निर्धास्तपणा किंवा उपेक्षा आणि एकाग्रता या दोनच वृत्तींचें प्राधान्य टिकतें. प्राणिमात्रांवर मैत्रीचें ध्यान करणें, एखादा प्रकाशासारखा सर्वव्यापी विषय घेऊन त्यावर ध्यान करणें, किंवा आपल्याच श्वासोच्छ्वासांवर ध्यान करणें, यांत योग्याला जे क्रमाक्रमानें अनुभव येत असतात, तेच सायकलीवर प्रभुत्व संपादणाऱ्यालाहि येतात.

एथपर्यंत समाधि किती महत्त्वाची आहे व तिचे विभाग कोणते याचें संक्षेपानें वर्णन करण्यांत आलें आहे. परंतु वाचकांनीं ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, समाधि फार महत्त्वाची असली तरी तिचा अतिरेक होऊं देतां कामा नये. राज्यव्यवस्था सुरळीत चालण्यासाठीं राजाची किंवा अध्यक्षाची अत्यंत आवश्यकता आहे. परंतु त्याची सत्ता अपरिमित वाढली, तर तेणेंकरून देशाचें कल्याण न होतां विलक्षण क्रांति मात्र घडून येईल, व लोकांचे हाल होतील. म्हणून समाधीची सत्ता मर्यादेबाहेर जाऊं नये यास्तव उत्साहाच्यायोगें तिला कह्यांत ठेवलें पाहिजे. पाश्चात्य देशांत राजाची किंवा अध्यक्षाची सत्ता अपायकारक होऊं नये म्हणून पार्लमेंटासारख्या संस्थांचा त्यांच्यावर दाब ठेवण्यांत येतो. त्याप्रमाणें समाधीवर उत्साहाचा दाब ठेवला असतां समाधि अपायकारक होऊं शकत नाहीं.

श्रद्धा, वीर्य, स्मृति, समाधि आणि प्रज्ञा, या पांच मानसिकशक्ति आहेत. यांचा उल्लेख 'श्रद्धावीर्यस्मृतिसमाधिप्रज्ञापूर्वक इतरेषाम्' (१–२४) या योगसूत्रांतहि सांपडतो. परंतु त्यांत समतोलपणा कसा ठेवावा याचें विवेचन विशुद्धिमार्गादिक बौद्ध ग्रंथांत फारच चांगलें केलें आहे. आचार्यांचें म्हणणें

हें कीं, श्रद्धेचा अतिरेक झाला आणि प्रज्ञा मंदावली तर मनुष्य भलत्याच गोष्टीवर श्रद्धा ठेऊन फसतो. प्रज्ञा बळावली व श्रद्धा मंद झाली तर तो स्वार्थसाधु होतो. यांत काय, त्यांत काय, असें म्हणून परोपकारादिक धार्मिक कृत्यांत त्याचा विश्वास नसतो, व तो उदरंभरमार्गाकडे वळतो. अर्थात् या दोन्ही मनोवृत्तींत समतोलपणा असणें जरूर आहे. समाधि मंदावली आणि उत्साह बळावला, तर मनुष्य भ्रांतचित्त होतो. एक अमेरिकन प्रोफेसर म्हणत असत कीं, आमच्या लोकांनां तासाला ८० मैल चालणाऱ्या आगगाड्या पाहिजेत, परंतु इच्छित स्थळीं पोंचल्यावर कर्तव्य काय त्याचा विचार करण्यास फारच थोड्यांनां अवकाश असतो. याचा अर्थ हा कीं समाधीशिवाय केवळ उत्साहानें मनुष्याला सुख प्राप्त होत नसतें. याच्या उलट जर समाधि बळावली व उत्साह मंद पडला तर माणूस आळशी बनतो, नीजेंत सुख मानतो, व तेणेंकरून त्याच्याकडून कोणतेंही इष्टकार्य सिद्धीस जात नाहीं. यासाठीं समाधि आणि उत्साह या दोन मनोवृत्तींत समतोलपणा ठेवणें अत्यन्त आवश्यक आहे. स्मृति म्हणजे जागृति, ही सर्वत्र असावयास पाहिजे. उत्साह वाढला आहे आणि समाधि मंदावली आहे इत्यादि गोष्टींची जाणीव ठेवण्यासाठीं स्मृतीची फारच आवश्यकता आहे.

संयुत्तनिकायांतील बोज्झंग ( बोध्यंग ) संयुत्तांत बोध्यंगांच्या भावनेचा अयोग्य काल आणि योग्य काल सांगितला आहे. तेणेंकरूनहि समाधि-पक्षीय आणि उत्साहपक्षीय बोध्यंगांत समत्व राखणें किती आवश्यक आहे हें स्पष्ट होतें. स्मृति, धर्मप्रविचय, वीर्य, प्रीति, प्रस्रब्ध[1], समाधि आणि उपेक्षा, या सात कुशल मनोवृत्तींनां बोध्यंगें म्हणतात. स्मृतीचा अर्थ वर सांगितलाच आहे. धर्मप्रविचय म्हणजे विवेचकबुद्धि; वीर्य म्हणजे उत्साह; प्रस्रब्धि म्हणजे शांति; बाकीच्यांचे अर्थ स्पष्टच आहेत. यांच्या भावनेच्या अयोग्य आणि योग्य कालासंबंधानें भगवान् बुद्ध म्हणतो:— "भिक्षुहो, ज्या वेळीं चित्त जड झालेलें असतें, त्या वेळीं प्रस्रब्धि, समाधि आणि उपेक्षा, या तीन बोध्यंगांची भावना करणें योग्य होणार नाहीं. एखाद्या माणसाला आग पेटवावयाची असेल, आणि तो जर ओलीं लांकडें, गोवऱ्या

---

१ संस्कृत कोशांत 'प्रश्रब्धि' असा शब्द सांपडतो. परन्तु 'महाव्युत्पत्ति' ग्रंथांत पस्सद्धि शब्दाचें प्रस्रब्धि हेंच भाषांतर आढळतें.

व ओलें गवत घालून आग फुंकूं लागला, तर ती पेटेल काय ? त्याचप्रमाणें ज्याचें चित्त जड झालें असेल, तो जर प्रस्रब्धि, समाधि आणि उपेक्षा, या तीन संबोध्यंगांची भावना करूं लागला, तर त्याच्या चित्ताला उत्तेजन मिळणार नाहीं. आधींच चित्त जड झालेलें असतें, व तें या तीन बोध्यंगांच्यायोगें आवरतां येणें शक्य नसतें. पण त्या वेळीं धर्मप्रविचय, वीर्य आणि प्रीति, या तीन संबोध्यंगांची भावना फारच उपयोगी आहे. कां कीं, यामुळें जड झालेल्या चित्ताला उत्तेजन मिळतें. एखाद्या माणसाला आग पेटवावयाची असेल, व जर त्यानें सुकीं लांकडें, गोवऱ्या व सुकें गवत घालून ती पेटविण्याचा प्रयत्न केला, तर ती पेटण्यास विलंब लागणार नाहीं. त्याचप्रमाणें ज्याचें चित्त जड झालें असेल, त्यानें धर्मप्रविचय, वीर्य आणि प्रीति, या तीन संबोध्यंगांची भावना केली, तर त्याचें जाड्य निघून जाऊन त्याच्या चित्ताला उत्तेजन मिळाल्यावांचून रहाणार नाहीं.

"पण भिक्षुहो ! ज्या वेळीं चित्त भ्रांत झालें असेल, त्या वेळीं धर्मप्रविचय, वीर्य आणि प्रीति, या तीन संबोध्यंगांची भावना करणें योग्य नाहीं. कां कीं, यांच्या भावनेमुळें चित्ताच्या भ्रांततेचा उपशम न होतां, ते विशेष भ्रांत होईल. एखाद्या माणसाला पेटलेली आग विझवावयाची असली व ती विझविण्यासाठीं जर त्यानें वाळलेल्या लांकडांचा, गोवऱ्यांचा आणि गवताचा उपयोग केला, तर ती आग न विझतां अधिकच भडकेल. त्याप्रमाणें ज्याचें चित्त भ्रांत झालें असेल, त्यानें धर्मप्रविचय, वीर्य आणि प्रीति, या तीन संबोध्यंगांची भावना केली असतां तें प्रशांत न होतां अधिकच भडकेल. अशा वेळीं प्रस्रब्धि, समाधि आणि उपेक्षा, या तीन संबोध्यंगांची भावना करणें योग्य आहे. कां कीं, या संबोध्यंगांमुळें भडकलेलें चित्त प्रशांत होत असतें. एखाद्या माणसाला पेटलेली आग कमी करावयाची असेल, व त्यानें जर ओलीं लांकडें, ओल्या गोवऱ्या व ओलें गवत यांचा उपयोग केला, तर ती खात्रीनें कमी होईल. त्याचप्रमाणें ज्याचें चित्त भडकलें असेल, त्यानें जर प्रस्रब्धि, समाधि आणि उपेक्षा, या तीन संबोध्यंगांची भावना केली, तर तें खात्रीनें प्रशांत होईल.

"आतां राहिलें स्मृतिसंबोध्यंग. भिक्षुहो, या संबोध्यंगांचा आपण सर्वत्र उपयोग केला पाहिजे."

तात्पर्य, समाधि जरी कितीही उपयोगी असली तरी तिलाच सर्वथैव प्राधान्य मिळणे अपायकारक आहे. देशांत तंटे बखेडे न होण्यासाठीं राजाची फार आवश्यकता आहे. परन्तु प्रजेच्या हिताकडे लक्ष न देता तो जर सत्तेचा दुरुपयोग करूं लागला, तर त्यापासून तंटेबखेड्यांपेक्षांही अधिक अपाय होतो. त्याचप्रमाणे कुशल मनोवृत्तीत केवळ समाधीलाच प्राधान्य देण्यात आले तर आलस्यादिक शत्रु अंतःकरणांत शिरून मनुष्याच्या नाशाला कारणीभूत होतात. तेव्हा अशोकादिक राजे जसे आपली चैन आणि सत्तेची हांव बाजूस ठेवून प्रजेच्या सुखसमाधानांत अत्यंत दक्ष रहात असत. त्याप्रमाणे उत्साहादिकांच्या मदतीने सर्व कुशल मनोवृत्तीत समाधान राखण्यास तत्पर असणे हे समाधीचे खरे कर्तव्य होय.



## समाधीला प्रतिबंधकारक गोष्टी

कुशल चित्तवृत्तीत ऐक्य राखण्याचे सामर्थ्य समाधींत यावयास समाधीला प्रतिबंधक गोष्टी कोणत्या आहेत, हे समजून घेतले पाहिजे. व्यसनाधीनता ही समाधीचा सर्वांत मोठा शत्रू आहे. दारूबाजी, रंडीबाजी, किंवा जुगार इत्यादिक महाव्यसने बाजूला राहू द्या. पण माणूस विडीसारख्या लहानसहान व्यसनात सापडला, तरी त्याच्या चित्ताला समाधि लागणे शक्य नाही. मनाची एकाग्रता साधतो, न साधतो तोंच त्याचे मन आपल्या व्यसनाकडे धांवेल, व त्याची एकाग्रता तेव्हाच नष्ट होईल. यासाठी पहिल्या प्रथम निर्व्यसनी होण्याचा योग्याने प्रयत्न केला पाहिजे. कमीतकमी, प्राणघातापासून निवृत्ति, अदत्तादानापासून (चोरीपासून) निवृत्ति, अब्रह्मचर्यापासून निवृत्ति, खोटें बोलण्यापासून निवृत्ति, आणि मादक पदार्थापासून निवृत्ति, या पांच गोष्टी त्याने संभाळल्या पाहिजेत.

अहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः । हे जे पांच यम योगसूत्रांत सांगितले आहेत त्यांत आणि वरील गोष्टीत फारसा फरक नाही; अपरिग्रहा-बद्दल मादक पदार्थांचे सेवन न करणे एवढाच काय तो फरक आहे. बौद्ध वाङ्मयांत या पांच गोष्टीला शील म्हणतात. ज्याला समाधि साध्य करायची असेल त्याला शीलाचे रक्षण करणे अत्यंत आवश्यक आहे. प्राणघातापासून निवृत्त झाला म्हणजे त्याचे मन शिकारीसारख्या व्यसनात दंग होणे शक्य नाही. अदत्तादानापासून निवृत्त झाला म्हणजे लांचलुचपत, जुगार, सट्टेबाजी इत्यादिक व्यसनांतून तो आपोआप मुक्त होईल. ब्रह्मचर्य पाळण्याचे सामर्थ्य आले म्हणजे स्त्रीव्यसनांत सांपडण्याचे त्याला भय नाही. सत्य बोलण्याचे अंगी धैर्य आले म्हणजे त्याची तेजस्विता आपोआप वाढत जाईल आणि मादक पदार्थापासून तो दूर राहिला म्हणजे त्याच्या हातून सत्कृत्यांत प्रमाद होणार नाही. अर्थात् व्यसनाधीनतेचे महासंकट टाळण्याविषयी शीलाचे सांगोपांग पालन करणे हे योग्याचे पहिले कर्तव्य होय.

शीलाचे सर्व नियम बरोबर पाळण्यात आले पण योग्य स्थळी किंवा योग्य परिस्थितीत राहण्यास सांपडले नाही तर समाधि साध्य होणे मुश्किल होईल. त्यासाठी विशुद्धिमार्ग ग्रंथात,

**आवासो च कुलं लाभो गणो कम्मं च पंचमं ।**
**अद्धानं ञाति आबाधो गन्थो इद्धीति ते दस ।।**

या दहा गोष्टी समाधीला अपायकारक होत असल्या, तर त्या योग्यानें तात्काळ वर्ज कराव्या, असे सांगितले आहे. **आवास** म्हणजे राहण्याची जागा. ती अपायकारक कशी होते ? याबद्दल सूत्ररूपी गाथा आहेत, त्या अशाः—

**महावासं नवावासं जरावासञ्च पन्थनिं ।**
**सोण्डिं पण्णञ्च पुप्फञ्च फलं पत्थितमेव च ।।**
**नगरं दारुना खेत्तं विसभागेन पट्टनं ।**
**पच्चन्तसीमासप्पायं यत्थ मित्तो न लब्भति ।।**
**अट्ठारसेतानि ठानानि इति विञ्ञाय पण्डितो ।**
**आरका परिवज्जेय्य मग्गं पटिभयं यथा ।।**

या गाथांचा अर्थ विशुद्धिमार्गात भिक्षूंला उपयोगी असाच केला आहे. तरी त्यांतील मुद्दा सर्व प्रकारच्या योगसाधकांला सारखाच उपयोगी पडण्याचा संभव असल्यामुळे येथे सर्वसामान्य असाच अर्थ लावण्याचा माझा प्रयत्न आहे.

**महावास** म्हणजे ज्या ठिकाणी समानकार्मिकांची मोठी वस्ती असेल तो. आपण एखाद्या मोठ्या आश्रमांत किंवा कॉलेजच्या बोर्डिंगासारख्या ठिकाणी राहू लागलो, तर तेथे नानाप्रकारची माणसे एकत्र झाल्यामुळे त्यांपासून आपल्या समाधीला उपसर्ग पोंचतो. आपल्या खोलीच्या दरवाज्यात कोणी घाण केली, तर ती जागा आपणास साफ करावी लागते. दुसरे लोक जवळपास मोठमोठ्याने बोलू लागले किंवा गाऊ लागले, तर आपले मन विक्षिप्त होते. आपण समाधिस्थ होऊन बसलो, आणि इतक्यात जेवणाची घंटा झाली, तर ती आपणास ऐकू येत नाही; व पुढे जेवणगृहात जाऊन पाहतो, तो सर्व मंडळी जेवून गेलेली आढळते, व उरले सुरलेले अन्न खाण्याची पाळी येते. अशा अनेक अडचणीमुळे महावास समाधीला प्रतिबंधक होत असतो.

**नवावास** म्हणजे जेथे नवीन काम चालू असते. तेथे सुतार, गवंडी वगैरे लोकांकडून उपसर्ग होत असतो. खालच्या मजल्यावर आपण रहात असलो, आणि वरच्या मजल्यावर जर काम चालू असले तर दगड, विटा इत्यादिक पदार्थ खाली पडून त्यांच्या आवाजाने समाधीचा क्षणोक्षणी भंग होतो. आजूबाजूला इमारतीचे सामान पसरले असल्याकारणाने शांतपणे इकडून तिकडे चंक्रमण करण्यासही अवकाश रहात नाही. अशा अनेक कारणांनी नवावास समाधीला प्रतिबंधक होत असतो.

**जरावास** म्हणजे जीर्णशाला. आपण एखाद्या पडक्या ठिकाणी राहू लागलो म्हणजे तेथे अनेक अडचणी उपस्थित होतात. वरचे छत बरोबर नसल्यामुळे पावसाळ्यात पाणी आत शिरते; भिंतीचा गिलावा फाटून खाली पडतो; जमिनीतून वाळवी निघते; उंदिराला बिळे करण्यास अवकाश मिळतो. अशा घराची डागडुजी करता करता पुरेवाट होऊन जाते, मग समाधीला अवकाश कोठून सापडणार?

**पन्थनी** म्हणजे मोठ्या सडकेच्या जवळची जागा. अशा ठिकाणी गाडीवाले गाड्या उभ्या करून पाणी मागण्यासाठी येतात; पांथस्थ विश्रांतीसाठी येऊन बसतात, व गप्पागोष्टी करतात. अलीकडे तर इकडून तिकडून जाणाऱ्या मोटारींचाही त्रास होण्याचा बराच संभव आहे. अर्थात् समाधीला अशी जागा योग्य नव्हे.

**सोण्डी** म्हणजे हौद. जेथे हौद किंवा दुसरा अशाच प्रकारचा जलाशय असतो तेथे पाणी पिण्यासाठी अगर स्नान करण्यासाठी अनेक लोक येतात, व अशा स्थानी योगाभ्यास करण्यास कठीण जाते.

**पण्ण** किंवा पर्ण म्हणजे शाकभाजीत उपयोगात येणारी पाने. अशा ठिकाणी बायकामुले पाने गोळा करण्यासाठी येतात, गोष्टी करतात, गातात, व त्यामुळे समाधीला प्रतिबंध होतो.

**पुप्फ** किंवा पुष्प म्हणजे फुलांचा मळा. येथेही फुले एकत्र करण्यासाठी बायकामुले येत असतात व त्यामुळे योगाभ्यासाला उपसर्ग पोंचतो.

**फल** म्हणजे फळांची बाग. तेथेही वरच्याप्रमाणेच उपद्रव होतो.

**पत्थित** किंवा प्रार्थित म्हणजे प्रार्थनेची जागा. कार्लीच्या गुहा, किंवा अबूचा पहाड, ही स्थाने अत्यंत रम्य आहेत खरी; परंतु तेथे प्रार्थने-

साठी यात्रेकरू येत असल्यामुळे तीं योगाभ्यासाला योग्य नाहीत. हा कोणीतरी सत्पुरुष असावा, अशा समजुतीने यात्रेकरू योगाभ्यास करणाऱ्या माणसापाशी येऊन त्याला अनेक प्रश्न विचारतील, किंवा आदरसत्कार करून त्याचे स्तोम माजवतील, आणि तेणेंकरून त्याच्या समाधीत मोठें विघ्न उपस्थित करतील.

**नगर** म्हणजे नगराच्या जवळ असलेली जागा. येथे गाडी-घोड्यांचा आणि मनुष्यांचा वारंवार त्रास पोचल्यावाचून रहात नाही.

**दारु** म्हणजे इमारतीला उपयोगी पडणाऱ्या लाकडांचे जंगल. अशा ठिकाणी लांकुडतोडे येऊन उपद्रव करतात.

**खेत्त** किंवा क्षेत्र म्हणजे शेतीची जागा. अशा ठिकाणी नांगरण्याच्या वेळी शेतकरी येऊन गडबड करतात; पेरणीच्या वेळीही गडबड होते; पाखरे राखण्यासाठी क्षेत्ररक्षक आरडाओरड करीत असतात. अशा रीतीने अनेक प्रसंगी समाधीला उपसर्ग पोचतो.

**विसभाग** म्हणजे जेथे परस्परविरोधी लोक राहतात. ज्या गांवांत किंवा ज्या निवासस्थानांत कोणत्याही कारणास्तव दोन तट पडून भांडणे झालेली असतात, त्या गावाजवळ किंवा त्या निवासस्थानात राहून समाधि साध्य होणे शक्य नाही. अशा ठिकाणी कधी या पक्षाकडून तर कधी त्या पक्षाकडून उपसर्ग पोचल्यामुळे मन अस्वस्थ होते.

**पट्टन** म्हणजे बाजार भरण्याची जागा. समुद्रकिनाऱ्यावर किंवा इतर ठिकाणी जागा शांत असली, परंतु तेथे आठवड्यातून एकदा किंवा दोनदा बाजार भरत असला, तर दोनचार दिवसांत संपादलेली शांति एकाएकी नष्ट होण्याचा फार संभव असतो.

**पच्चन्त** किंवा प्रत्यन्त म्हणजे जंगली लोक राहतात अशी जागा. तेथे लोकांना योगाभ्यासाची किंमत माहीत नसल्यामुळे ते योग्याच्या निवासस्थानाच्या आसपास शिकार करून किंवा अशाच अन्य प्रकाराने समाधीला पुष्कळ अडचणी आणीत असतात.

**सीमा** म्हणजे राज्याची सीमा. अशा ठिकाणी हा कोणीतरी गुप्तहेर असेल असे वाटून दोन्ही राज्यांतील अधिकाऱ्यांकडून योग्याला उपद्रव होतो.

असप्पाय म्हणजे अपथ्यकारक जागा. ज्या ठिकाणी राहिल्याने बरोबर जेवणखाण मिळत नाही, किंवा जेथून कामोद्दीपक विषय अवलोकनात व ऐकण्यांत येतात; अशा ठिकाणी राहिल्याने चित्त स्थिर होणे कठीण जाते.

मित्त किंवा मित्र म्हणजे समाधिमार्गात उपयोगी पडणारा मित्र. ज्याने प्रयत्नाने समाधि साध्य केली असेल, ज्याला समाधिमार्गांतील अडचणी माहीत असतील असा मित्र ज्या ठिकाणी नसेल, त्या ठिकाणीं समाधि साध्य करण्यास फार प्रयास पडतात.

याप्रमाणें ही अठरा स्थाने सदोष समजली जातात. परंतु ती सर्वांनाच बाधक आहेत असे नाही. असामान्य व्यक्तींना विषम परिस्थितीतही समाधि साधते. यासंबंधाने विशुद्धिमार्गात एक गोष्ट आहे ती अशी:—

सिंहलद्वीपांत अनुराधपुर नगराबाहेर स्तूपाराम नावाचा एक मोठा विहार होता. तेथे मोठा भिक्षुसमुदाय रहात असे. दोन तरुण मित्रांनी गृहत्याग करून स्तूपारामातील भिक्षुसंघात प्रवेश केला. भिक्षूंच्या नियमांप्रमाणे पांच वर्षेपर्यंत विनयाचे अध्ययन करून झाल्यावर त्या दोघांपैकी जो थोडासा वयाने लहान होता तो प्राचीनखंडराजी नावाच्या एका दूरच्या गावी राहण्यास गेला; व तेथे पाचसहा वर्षे राहिल्यानंतर पुन्हा आपल्या मित्राला भेटण्यासाठी स्तूपारामात आला. ज्येष्ठ भिक्षूने त्याचे यथायोग्य आदरातिथ्य केले. संध्याकाळची वेळ होती. बारा वाजून गेल्यानंतर भिक्षु जेवीत नसतात पण आंबा, लिंबु वगैरे फळांचे पानक (पन्हे) करून घेतात. कनिष्ठ भिक्षु प्रवासात थकून आला असल्यामुळे संध्याकाळच्या वेळी विहारात कसलेतरी पन्हे पिण्यास मिळेल असे त्याला वाटत होते. परंतु रात्री पाण्याशिवाय दुसरे काही मिळाले नाही. तेव्हा त्याच्या मनात असा विचार आला कीं, माझ्या मित्राचे दायक विहारात आणून दान देत नसावे; पण उद्या जेव्हा अनुराधपुरात भिक्षेसाठी जाऊ, तेव्हा तेथे चांगले चांगले पदार्थ खात्रीने मिळतील.

दुसऱ्या दिवशी सकाळी दोघेही मित्र शहरात भिक्षेला गेले. सकाळच्या प्रहरी दोघांलाही थोडीशी पेज (यवागू) मिळाली. एका धर्मशाळेत बसून त्यांनी ती पिऊन टाकली. त्या प्रसंगी कनिष्ठाच्या मनात

विचार आला कीं, सकाळी देणारा कोणी दायक नसावा; पण दुपारी खात्रीने चांगले जेवण देणारे कोणी तरी उपासक असतीलच. परंतु दुपारीही भिक्षाटनात फारसे स्वादु अन्न मिळाले नाही. दोघांनीही शहरांतील एका धर्मशाळेंत बसून भिक्षा ग्रहण केली; व दोघे पुन्हा स्तूपारामात येण्यास निघाले.

वाटेत कनिष्ठ म्हणाला, 'भदंत, सर्वकाल अशाच भिक्षेवर निर्वाह करता काय ?' ज्येष्ठ म्हणाला, 'माझा नित्याचा क्रम असाच चालला आहे.' क०— 'तर मग तुम्ही प्राचीनखंडराजीला का येत नाही ? तेथे राहण्याला एकांत आहे; व लोकही फार श्रद्धाळू आहेत.' एवढा संवाद झाल्यावर ज्येष्ठ भिक्षु अनुराधपुराचा मार्ग सोडून कुंभकार ग्रामाच्या मार्गाला लागला. तेव्हा कनिष्ठ म्हणाला, 'आपण अनुराधपुराचा मार्ग सोडून या मार्गाने का जाता ?' ज्ये०— 'प्राचीनखंडराजी फार सुखावह आहे असे म्हणालास, तिकडे जाण्याचा हाच रस्ता आहे.' क०— 'भदंत, स्तूपारामात तुमचे कांही सामानसुमान असेलच की नाहीं ? ज्ये०— 'माझी एक खाट तेवढी माझ्या खोलीत आहे; पण ती माझी स्वतःची नसून संघाची आहे. रोज भिक्षेला निघण्यापूर्वी ती मी व्यवस्थितपणे ठेवीत असतोच. तेव्हा विहारात जाऊन करण्यासारखे काही राहिले नाही.' क०— 'पण भदंत, माझी हातातील काठी, वहाणाची पिशवी व तेलाची बाटली,[१] विहारातच राहिली आहे.' ज्ये०— 'वा: तू तर एका रात्रीत एवढे पदार्थ विहारांत ठेवलेस !' कनिष्ठ फारच शरमला; व ज्येष्ठाला नमस्कार करून म्हणाला, 'आपणाला प्राचीनखंडराजीला जाण्याची गरज नाही, स्तूपारामासारख्या ठिकाणीही आपणाला एकान्तच आहे. याशिवाय येथे अनेक धर्मोपदेशकांचा धर्मोपदेश ऐकण्यास मिळतो हा विशेष फायदा आहे.' दुसऱ्या दिवशी आपले पात्रचीवर घेऊन कनिष्ठ भिक्षु तेथून निघून गेला.

तात्पर्य, वर सांगितलेले निरनिराळे आवास सर्वांनाच बाधक होतात असे नाही. ज्याने त्याने एकेकाठिकाणी दोन तीन दिवस राहून अनुभव घेऊन पहावा. वनप्पत्थसुत्तात म्हटले आहे की, 'जेथे चित्ताची समाधि

१. ही बहुधा वेळूच्या नळकांड्याची बनवीत असत. तिच्यात तेल भरून ते पायांला चोळण्यासाठी भिक्षु बरोबर ठेवीत असत.

मिळत नाही आणि जेथे खाण्यापिण्याचेही हाल होतात, त्या ठिकाणी योग्याने क्षणमात्रही राहू नये; जेथे खाण्यापिण्याला यथेच्छ मिळते पण चित्ताला समाधि मिळत नाही तेथेही राहू नये; जेथे खाण्यापिण्याचे हाल होतात पण चित्ताची समाधि यथेच्छ मिळते तेथे शारीरिक कष्टांची पर्वा न करता रहावे; जेथे समाधीही मिळते आणि खाण्यापिण्याचेही हाल होत नाहीत ती जागा योगाभ्यासाला सर्वांत उत्कृष्ट समजावी. [१]

आता आपण मूळच्या गाथेकडे वळू. त्यांत कुल हा दुसरा प्रतिबन्ध म्हटला आहे. कुल म्हणजे गृहस्थाचे आईबाप, भाऊबंद वगैरे, भिक्षूचे विहारात आचार्य, उपाध्याय, सहाध्यायी वगैरे, व पूर्वाश्रमातील आईबाप, भाऊ आणि बहिणी, यांपैकी कोणी आजारी झाला किंवा कोणाचे कांही विशेष काम असले, तर त्यामुळे समान-सुखदु:खी माणसाला उपद्रव पोचतो, व समाधि मिळत नाहीं. हाही प्रतिबंध सर्वांनाच होतो असे नाही. जनक किंवा अशोक यांसारखे पराक्रमी राजेही प्रपंचात राहून मुक्त असत; आणि काही भिक्षु, ' घर छोडकर मठ बनाया कहता मैं बैरागी ' या कबीराच्या म्हणण्याप्रमाणे आपल्या विहारादिक निवासस्थानात बद्ध होऊन राहतात. एका भिक्षूच्या निरपेक्षतेची गोष्ट विशुद्धिमार्गात दिली आहे, ती येथे देणे अप्रासंगिक होणार नाही.

अनुराधपुराजवळ कोरण्डक नावाचा गाव होता. त्या गावाच्या शेजारी असलेल्या विहारालाही कोरण्डकविहार म्हणत असत. तेथे जो स्थविर भिक्षु रहात असे त्याच्या भाच्याने त्याजपाशी प्रव्रज्या घेतली, व तो पांच वर्षेपर्यंत अध्ययन करून पुढे अभ्यास करण्यासाठी दक्षिणभागांत ( याला रोहणप्रदेश म्हणत ) गेला, व तेथे कांही वर्षे राहिला. त्याची आईबापे कोरण्डक गावात रहात असत. आई आपल्या भावाला ( विहारातील स्थविर भिक्षूला ) वारंवार त्याची प्रवृत्ती विचारीत असे. कांही वर्षांनंतर पावसाळ्यापूर्वी भाचा काय करतो हे जाणण्यासाठी स्थविर रोहणप्रदेशाला जाण्यास निघाला. इकडे तरुण भिक्षुही आचार्याला भेटण्याच्या उद्देशाने रोहणप्रदेशातून

---

१ हे सुत्त मज्झिमनिकायांत ( १७ ) आहे याचा सारांश मात्र येथे दिला आहे.

कोरण्डकग्रामाला जाण्यास निघाला होता. महागंगेच्या[१] कांठी त्या दोघांची गाठ पडली. तेथे एका झाडाखाली तरुण भिक्षूने स्थविरांचें आदरातिथ्य केले. तेव्हा स्थविर त्याला म्हणाला, 'तुझी आई वारंवार आठवण करीत असते. तेवढ्याचसाठी मी रोहणास जाण्यास निघालो होतो. पण आता ज्याअर्थी मी निघालो त्याअर्थी हा वर्षाकाल रोहणप्रदेशातच घालवीन; व तू कोरण्डक-विहारात जाऊन रहा.' त्याप्रमाणे तरुण भिक्षु कोरण्डकविहारात आला. बरीच वर्षे इतर ठिकाणीं राहिल्यामुळे त्याला कोणी ओळखले नाही. त्याच्या बापाने तयार केलेल्या खोलीतच त्याला जागा देण्यात आली. दुसरा दिवस म्हणजे चातुर्मास्याचा पहिला दिवस होता. त्या दिवशीं त्याच्या बापाने विहा-रात येऊन आपल्या जागी कोण राहतो याची चवकशी केली. आणि कोणी एक आगंतुक तरुण भिक्षु रहात आहे असे समजल्यावर त्याजपाशी येऊन तो त्याला म्हणाला, 'भदन्त, माझ्या जागेत चातुर्मास्यासाठी जो भिक्षु राहतो त्याला एक कर्तव्य आहे.' ते कोणते ? असा प्रश्न केल्यावर तो म्हणाला, 'त्याने चातुर्मास्यांत रोज माझ्याच घरीं भिक्षा घेतली पाहिजे व चातुर्मास्य संपल्यावर जाण्याच्यापूर्वी आम्हाला कळवले पाहिजे.' तरुण भिक्षु मुकाट्याने राहिला म्हणजे त्या गृहस्थाची विनंति त्याने मान्य केली. चातुर्मास्य आई-बापांच्या घरी भिक्षा ग्रहण करून तेथून जाण्यापूर्वी त्याने आपला बेत त्याना कळवला. दुसऱ्या दिवशीं त्याला आमंत्रण करून आईबापांनी चांगले जेवण दिले; व वाटेत उपयोगासाठी एक गुळाचा तुकडा आणि चीवर बनविण्यासाठी नव हात लांबीचे एक वस्त्र देऊन त्याची रवानगी केली. कोरण्डक गावातून निघून तो रोहणप्रदेशाकडे वळला. वर्षाकाल संपल्यावर त्याचा मामाही कोरण्डकगावाला जाण्यास निघाला होता. त्या दोघांची पूर्वीच्याच ठिकाणीं गाठ पडली. तरुण भिक्षूने स्थविराचे स्वागत करून गुळाचे पानक करून दिले; व ते वस्त्रही त्यालाच देऊन टाकले. तो म्हणाला, 'मी माझ्या आहाला पाहून आलो. मला कोरण्डकगावापेक्षा रोहणप्रदेशच अधिक आवडतो, तेव्हा मी तिकडेच जातो."

१. सिंहलद्वीपांत नदीला गंगाच म्हणतात; व त्यांपैकीं सर्वांत मोठ्या नदीला महागंगा किंवा नुसती गंगा असें म्हणतात ही नदी क्यांडी शहरावरून वहात जाऊन पूर्वसमुद्राला मिळते.

इकडे आपला भाऊ मुलाला घेऊन येईल अशा विचाराने त्याची आई सारखी मार्गप्रतीक्षा करीत होती. स्थविर कोरण्डकविहारात पोचल्यावर दुसऱ्या दिवशी भिक्षेसाठी गांवात गेला. त्याला एकट्यालाच पाहून, आपला मुलगा निवर्तला असावा, अशा समजुतीने ती बाई कंठ मोकळा करून रडू लागली. तेव्हा स्थविर म्हणाला, 'तूं रडतेस कां !' ती म्हणाली, 'माझ्या मुलाला आणण्यासाठी तुम्ही गेला होता. पण त्याला न आणता एकाकीच आलात यावरून त्याचे काय झाले हे समजत नाही.' स्थविर म्हणाला, 'अग तुझा मुलगा तीन महिने येथेच होता; व रोज तुझ्याच घरी भिक्षेला येत होता. असे असता त्याने जर तुला आई म्हटले नाही तर ते केवळ निःस्पृहतेमुळे असले पाहिजे.' थोड्या विचाराअंती तोच आपला मुलगा होता हे त्या बाईला समजले, व सानंदाश्चर्याने ती उद्गारली, 'आज जर बुद्ध भगवान् हयात असता, तर त्याने निःस्पृहतेच्या कमालीबद्दल माझ्या मुलाचे खात्रीने अभिनन्दन केले असते !'

अशा माणसाला आपली आईबापेही प्रतिबंधक होत नसतात, मग कुलगोत्राची गोष्ट सांगावयासच नको. तथापि सामान्य माणसाला आपल्या कुलगोत्रापासून जरा दूर अंतरावर राहिल्याने समाधि साधणे सुलभ जाते.

तिसरा प्रतिबंध **लाभ.** भिक्षु प्रसिद्ध असला तर बड्या बड्या लोकांकडून त्याला आमंत्रणे येतात; व त्यामुळे तो सदोदित व्यावृत होतो. डाक्टरी किंवा वकीली करणारा गृहस्थ आपल्या धंद्यांत गढून गेल्यामुळे व्यावृत होतो. म्हणजे अशा प्रकारे लोकांकडून मिळणारा मान किंवा लाभ समाधीला अंतराय करतो. तेव्हा काही काल त्या सर्व भानगडी सोडून देऊन जेथे आपणास सामान्य लोक ओळखत नाहीत अशा ठिकाणी एकांतवासांत जाऊन राहणे योग्य आहे.

**गण** म्हणजे शिष्यगण आपणाला कांही शिष्यांला शिकवायचे असेल, तर त्यामुळेही चित्तविक्षेप होण्याचा संभव असतो. त्यासाठी शिष्यशाखेला दुसऱ्या गुरूच्या हवाली करून आपण मुक्त व्हावे; व एकान्तवास पत्करावा.

**कम्म** किंवा कर्म म्हणजे बांधकाम किंवा इतर कोणतेही नवीन काम. त्याला सुरुवात केली असता ते संपेपर्यंत आपणाला चैन पडत नाहीं

तेव्हा ते जर अल्पावकाशात संपण्यासारखे असेल, तर पुरे करावे; जर संपण्यासारखे नसेल, तर दुसऱ्या कोणातरी आप्तमित्राच्या स्वाधीन करून आपण मोकळे व्हावे.

**अद्धान** (अध्वा) म्हणजे प्रवास. आपल्या मनातून कोणत्याही ठिकाणी प्रवास करण्याचे असले, किंवा इतर ठिकाणी काही काम असले, तर ते केल्यावाचून आपणाला चैन पडत नाही. म्हणून ते एकदाचे आटपून मोकळे व्हावे, व समाधिमार्गाला लागावे.

**ञाति** ( ज्ञाति ) म्हणजे आपले जवळचे आप्त. त्यांपैकी कोणी आजारी असला व त्यांची शुश्रूषा करण्याला दुसरा कोणी नसला तर योगाभ्यास करू इच्छिणाऱ्या माणसाने समाधिमार्गात त्वरा न करता त्यांची आमरण सेवा करावी. त्यांना सोडून जाणे म्हणजे आपल्या कर्तव्याला मुकणे होय. पण दुसरा कोणी शुश्रूषक असला, तर आपण रजा घेऊन एकांतवासात जावे.

**आबाध** म्हणजे रोग. तो जर औषधाने बरा होण्यासारखा असला, तर बरा करावा; बरा होण्यासारखा नसला, तर त्याला म्हणावे की, 'बा रोगा, मी तुझा काही दास नाही. तुझ्या ताब्यात माझे शरीर आहे पण आत्मा नाही. तेव्हा आत्म्यावर विजय मिळवून मी आता समाधिमार्गाला लागतो.'

**गन्थ** ( ग्रन्थ ) म्हणजे कोणतेही पाठ्य पुस्तक. ते जर आपणास शिकावयाचे किंवा पाठ करावयाचे असेल, तर त्यामुळे समाधीला विक्षेप होतो. तेव्हा, समाधि साध्य झाल्यावर अशा पुस्तकांचा अभ्यास त्वरेने होणे शक्य आहे, हे जाणून तेवढ्या वेळेपुरती पुस्तके बाजूला ठेवावी, व समाधीकडे वळावे.

**इद्धि** ( ऋद्धि ) म्हणजे योगसिद्धि. अशा योगसिद्धीच्या नादाला कधीच लागू नये. त्या खऱ्या समाधीला अंतरायकारक आहेत; आणि प्राप्त झाल्या तरी एखाद्या जादुगारापेक्षां विशेष फायदा होणे शक्य नाहीं. म्हणून अशा खोट्या मार्गांत न शिरता सरळ मार्गाने समाधि साधण्याचा प्रयत्न करावा.

याप्रमाणे,

**आवासो च कुलं लाभो गणो कम्मं च पंचमं ।**
**अद्धानं ञाति आबाधो गन्थो इद्धीति ते दस ॥**

या दहा अंतरायकारक गोष्टींचा नीट विचार करून चित्त एकाग्र होईल अशा परिस्थितीत समाधीला आरंभ करावा. परिस्थिती अनुकूल असली तरी जोपर्यंत बुद्धीची पांच आवरणे नष्ट झाली नाहीत तोपर्यंत समाधिमार्गांत एकही पाऊल पुढे पडणे शक्य नाही.

एकदां संगारव नावाच्या ब्राह्मणाने हा प्रश्न विचारला, "भो गौतम, एखाद्या वेळी पुष्कळ कालपर्यंत परिचित असलेले देखील वेदमंत्र मला आठवत नाहीत; मग तोंडपाठ येत नसलेल्या मंत्रांची गोष्ट काय सांगावी ! पण असे होण्याचे कारण कोणते, ते आपण सांगाल काय ?"

तेव्हां भगवान् म्हणाला, "हे ब्राह्मण, ज्या वेळीं कामविकाराने मनुष्याचे चित्त व्यग्र होऊन जाते, व कामविकाराच्या उपशमाचा मार्ग त्याला माहीत नसतो, त्या वेळीं त्याला आत्मार्थ काय हें समजत नाहीं, परार्थ काय हे समजत नाही, आणि पुष्कळ दिवस परिचित असलेले मंत्र देखील त्याला आठवत नाहीत ज्यावेळी त्याचे चित्त क्रोधाने पराभूत झाले असते, किंवा आळसाने मंदावले असते, अथवा इतस्ततः भ्रांत झाले असते, किंवा संशयग्रस्त झाले असते, तेव्हा आपले किंवा परक्याचे हित कशात आहे हें तो यथार्थतया जाणत नाही, आणि चिरकाल परिचित असलेले मंत्र देखील त्याला आठवत नाहीत.

"हे ब्राह्मणा, भांड्यातील पाण्यामध्ये निळा किंवा काळा रंग टाकला असता त्यांत आपली पडच्छाया दिसत नाही, त्याचप्रमाणे ज्याचे चित्त कामविकाराने व्यग्र झाले असेल, त्याला आपल्या हिताहिताचे ज्ञान होत नाही. स्वच्छ पाण्याचे भांडे संतप्त झाले असता त्यातून वाफा निघतात, व पाणी उकळू लागते. अशा वेळी मनुष्याला आपले प्रतिबिंब त्या पाण्यामध्ये दिसणे शक्य नाही. त्याचप्रमाणे मनुष्य क्रोधाभिभूत झाला असता त्याला आत्महित कशात आहे, हे समजणे शक्य नाही. त्या भांड्यातील पाणी जर शेवाळाने भरले असले, तर देखील माणसांना आपले प्रतिबिंब त्यात दिसणार नाही. त्याप्रमाणे ज्याच्या मनाला आळसाने ग्रासले, त्याला आपले

हित समजण्यासारखे नाही, मग परक्याचे हित समजणे तर बाजूलाच राहिले! तें पाणी जर वाऱ्याने हालूं लागले, तर देखील त्यात आपले प्रतिबिंब दिसणार नाही. त्याचप्रमाणे ज्याचे चित्त भ्रांत झाले असेल त्याला, आत्म-परहित कशात आहे हे समजणार नाही. तेंच पाणी जर गढूळ झाले असले, तरी त्यांत देखील आपले प्रतिबिंब नीट दिसणार नाही. त्याचप्रमाणे ज्याचे चित्त संशयग्रस्त झाले असेल, त्याला आपले किंवा परक्याचे हिताहित समजणार नाही. तेच पाणी जर स्वच्छ व शांत असले, तर त्यात मनुष्याला आपले प्रतिबिंब स्पष्टपणे पहाता येते. त्याचप्रमाणे ज्याचे चित्त कामच्छंद, व्यापाद ( क्रोध ), आळस, भ्रांतता आणि संशयग्रस्तता; या पांच आवरणांपासून विमुक्त झाले असेल, त्यालाच आत्मपरहित यथार्थतया समजते.[१] ”

या आवरणांना पालि भाषेत **नीवरणें** म्हणतात. ती विद्याभ्यासात देखील अपायकारक आहेत, मग समाधीला घातक आहेत हे सांगण्याची गरजच रहात नाही. एकांतात जाऊन आपण समाधि साध्य करण्याच्या प्रयत्नाला लागलो, आणि इतक्यात **कामच्छंद** उद्भवला तर ऱ्ही (आत्मलज्जा) आणि अवत्रपा ( लोकापवादभय ), या दोन मनोवृत्ती वाढवून त्याचे दमन करावे. ‘ अरे, तूं चांगल्या कुळात जन्मलास, सर्व इंद्रियात संपन्नता तुला मिळाली, पण आता मनाचा भयंकर दोष कमी करण्यासाठी एकांत स्वीकारला असता कामच्छंदाने तुझे मन व्यग्र होऊन जावे, हे तुला शोभते काय? आणि दुसरे सुज्ञ लोक तुला काय म्हणतील? मोठ्या उत्साहाने याने एकांत पत्करला, पण तेथे सारा दिवस कामोपभोगांचेच चिंतन करीत बसला असे ते म्हणणार नाहीत काय?’ अशा रीतीने मनास बोध करावा. चवथ्या प्रकरणांत सांगितलेल्या कायगतास्मृति आणि अशुभभावनाही कामच्छंदाचे निवारण करण्यास फार उपयोगी पडतात. तेव्हा ज्याच्या मनांत कामच्छंदाचा जोर फार असेल, त्यानें त्या भावनांची माहिती अगाऊ करून घ्यावी.

**व्यापादाच्या** शमनासाठी ऱ्ही आणि अवत्रप्य यांचा उपयोग होतोच होतो. ‘ रे, भल्या माणसा, तू आप्तइष्टांला सोडून या एकांतात येऊन राहिलास, तरी क्रोधासारख्या भयंकर शत्रूला उराशी घट्ट धरून बसलास,

१ बुद्धलीलासारसंग्रह, भाग ३ रा. प्र० १०.

याबद्दल खरोखरच तुला लाज वाटावयास पाहिजे. आणखी साधुपुरुष तुला काय म्हणतील ? हा इतके सारे शिकला, पण आपला क्रोध आवरण्यास शिकला नाही, असे म्हणून ते तुझा उपहास करणार नाहीत काय ?' याशिवाय पांचव्या प्रकरणात वर्णिलेली मैत्रीभावना क्रोधोपशमाला फार उपयोगी आहे. तेव्हा ज्याच्या मनांत क्रोधाचे प्राधान्य असेल, त्याने ती भावना प्रथम संपादावी.

**थीनमिद्ध** किंवा आळस हे तिसरे नीवरण होय. त्याचेही दमन ऱ्ही आणि अवत्रप्य यांच्यायोगे करता येतेच. 'रे, तू या एकांतवासांत नंदिबैलासारखा रवथ करून स्वस्थ पडून रहाण्यासाठी आला नाहींस. प्रापंचिक लोकांत जो उत्साह असतो, त्याच्या शतपटीने तुझ्या मनात उत्साह असावयास पाहिजे. तरच या एकांतवासात राहिल्याचे श्रेय आहे. आणखी दुसरे उत्साही सज्जन तुला काय म्हणतील ? प्रपंचाचा भार घ्यावयास नको म्हणून योग्याचे ढोंग करून हा खुशाल झोपून राहिला, असे ते म्हणणार नाहीत काय ?' याशिवाय वारंवार ईर्यापथांच्या परिवर्तनानेही आळस दूर करता येतो. अंथरुणावर पडून राहणे, बसणे, उभा राहणें व चंक्रमण करणे या चार शरीराच्या अवस्थांना **ईर्यापथ** म्हणतात. आपण अंथरुणावर पडून असलो, व त्या स्थितीत आळस उद्भवला, तर झटदिशी उठून बसावे; बसलो असता आळस उद्भवला तर उभे रहावे; आणि उभा असता आळस उद्भवला तर चंक्रमण करावे. या प्रमाणे विचारपूर्वक ईर्यापथांचे परिवर्तन केले असता आळस जाऊन अंगी हुषारी येते. सहाव्या प्रकरणात वर्णिलेली मरणस्मृतिही आलस्योपशमाला कारणीभूत होते, तेव्हा ज्याच्या मनात आळसाचे प्राधान्य असेल त्याने ती भावना प्रथमतः संपादावी

**उद्धच्च** किंवा भ्रांतता या दोषाचे निवारण समाधीनेच होत असते. तरी ज्या ज्या बाजूला मन धांवत असेल तेथून तेथून त्याचे आकलन करून समाधीचा जो विषय असेल त्या विषयांत मग्न होऊन जाईल, असा प्रयत्न करावा. विशेषतः तिसऱ्या प्रकरणात वर्णिलेली आनापानस्मृतिभावना उद्भ्रांततेपासून चित्ताचे रक्षण करण्यास फार उपयोगी पडते. तेव्हा ज्याचे चित्त वारंवार विक्षिप्त होत असेल त्याने प्रथमतः ती भावना संपादावी.

**विचिकिच्छा** किंवा संशयग्रस्तता. ही बहुधा आळसामुळेच उत्पन्न होत असते. आळश्याला संशय फार म्हणतात ते काही खोटे नाही. संशय-ग्रस्ततेला दूर करण्यासाठी थोर पुरुषांची चरित्रे अवलोकन करावी. केवळ श्रद्धेच्या बळावर कोलम्बसाने अमेरिकेचा शोध लावला. केवळ श्रद्धेच्या बळावर वाशिंग्टनने आणि त्याच्या अनुयायांनी एका अपूर्व प्रजासत्ताक राज्याची स्थापना केली. केवळ श्रद्धेच्या बळावर अनेक शास्त्रज्ञांनी भौतिक शास्त्रांत कल्पनातीत शोध लावले. अशा थोर व्यक्तींची चरित्रे अव-लोकन केली असता सन्मार्गाविषयी आपली श्रद्धा वृद्धिंगत होते, व संशय-ग्रस्ततेचे निवारण होते. याशिवाय बुद्ध, धर्म आणि संघ यांच्या अनुस्मृतींची भावनाही श्रद्धोत्पादाला कारणीभूत होते. ती कशी करावी हे सहाव्या प्रकरणांत सांगण्यात येईल.

याप्रमाणे नीवरणाचे दमन करून आपण समाधीकडे वळलो तरी कधी कधी खालील गाथेत सांगितलेल्या सात अडचणी उपस्थित होत असतात.

**आवासो, गोचरो, भस्सं, पुग्गलो, भोजनं, उतु ।**
**इरियापथो ति सत्तेते असप्पाये विवज्जये ॥**

आवासासंबंधाने विस्तृत माहिती वर दिलीच आहे. तिचा नीट विचार करून आपल्या प्रकृतीला मानवेल असाच आवास पसंत करावा.

**गोचर** म्हणजे भिक्षूला भिक्षेसाठी जाण्याचा गांव, आणि गृहस्थाला निवासस्थानाच्या आजूबाजूची वस्ती. हा गोचर जर अनुकूल नसला तर समाधीला वारंवार बाध येतो. ज्या गांवात भिक्षु भिक्षेला जातो तेथील लोक श्रद्धाविहीन असले व त्याला उपद्रव करू लागले तर त्या पासून चित्त विक्षेप पावते. त्याचप्रमाणे गृहस्थाचा ज्या गांवाशी व्यवहार असेल त्या गांवच्या लोकांना समाधि म्हणजे काय हे जर मुळीच माहीत नसले, तर ते त्याला अनेक प्रकारे उपद्रव देतील. म्हणून गोचरग्राम योग्य मिळेल यासाठी खबरदारी घ्यावी.

**भस्स** ( भाष्य ) म्हणजे संभाषण योगारंभी भाषण परिमित आणि तेही केवळ धार्मिक असावयास पाहिजे. कामोद्दीपन करणाऱ्या किंवा युद्धाच्या आणि चोरांच्या कथा फार विघातक आहेत. तेव्हा अशा गप्पा-

गोष्टी जेथे चालल्या असतील, तेथे योग्याने क्षणभरही राहता कामा नये. समाधीला अनुकूळ अशा कथा ऐकण्यास मिळाल्या तर त्या खुशाल ऐकाव्या.

**पुग्गल** ( पुद्‌गल ) म्हणजे व्यक्ति. योगारंभी स्त्रीने पुरुषाचा किंवा पुरुषाने स्त्रीचा विशेष सहवास करता कामा नये, हे येथे सांगण्याची गरजच नाहीं. येथे व्यक्ति म्हणजे पुरुषाबरोबर राहणारा पुरुष, किंवा स्त्रीबरोबर राहणारी स्त्री. ती जर भलत्यासलत्या गप्पागोष्टी करणारी असली, किंवा शरीर धष्टपुष्ट करण्याच्या कामीं लागलेली असली, तर तशा व्यक्तीच्या सहवासात समाधि सुखकर होत नाही. ज्या व्यक्तीने समाधी साध्य केली असेल, अशा व्यक्तीचा सहवास फारच फायदेशीर आहे. पण तशी व्यक्ति मिळत नसली, तर निदान विघातक व्यक्तीशी आपला संबंध येणार नाहीं याविषयी खबरदारी घेतली पाहिजे.

**भोजन** कोणाला गोड तर कोणाला आंबट किंवा तिखट मानवते. ते ज्याच्या त्याच्या प्रकृतीप्रमाणे मिळाले असता समाधिमार्ग सुलभ होतो. तेव्हा तसे भोजन मिळविण्याचा प्रयत्न करावा, आणि ते अगदी परिमितपणे ग्रहण करावे.

**उतु** ( ऋतु ) हा कोणाला हिंवाळा, कोणाला उन्हाळा तर कोणाला पावसाळा मानवत असतो. तेव्हा समाधीच्या आरंभी ज्याच्या त्याच्या प्रकृतीप्रमाणे त्या त्या ऋतूंत समाधिभावनेला आरंभ केला असता समाधी सुलभ होते.

**इरियापथ** ( ईर्यापथ ) वर दिलेच आहेत. त्यांपैकी एखादा विशेष सोईवार असतो. कोणाला इकडे तिकडे फिरत राहिले असता चित्त एकाग्र करणे सुलभ जाते. कोणाला स्तब्धपणे उभा राहून विचार करणे पसंत असते. कोणाला आसनावर बसून तर कोणाला बिछान्यावर पडून चिंतन करणे आवडते. तेव्हा ज्याने त्याने आपल्या प्रकृतीला मानवेल अशा ईर्यापथाचे विशेष सेवन करावे. ज्याला चंक्रमण करणे सोईवार पडत असेल त्याने आपल्या निवासस्थानाजवळ एक चंक्रम तयार करावा. हा साठ हातांपेक्षा लांब नसावा, आणि तीस हातांपेक्षा कमी नसावा, रुंदीला पांचसहा हातां-पेक्षा जास्त नसावा, व अडीच हातांपेक्षा कमी नसावा. त्याच्यावर गवत वाढलेले नसावे. त्याच्या आजूबाजूला घनदाट वृक्ष नसावे, व पाणी किंवा

चिखल नसावा. तो जवळच्या जमिनीपेक्षा एक वितीहून जास्त उंच नसावा किंवा त्या जमिनीहून खोल नसावा, वाळू वगैरे घालून अशा रीतीने तयार केलेले पुष्कळ चंक्रम ब्रह्मदेशांतील अनेक विहारांत आढळतात उभा राहण्याची, बसण्याची आणि पडून राहण्याची जागाही तशीच अनुकूल असावी. जेथून आजूबाजूचा रम्य प्रदेश दिसेल अशी जागा बहुधा योगाभ्यासाला अनुकूल असते. तेव्हा तशा जागी बसून ध्यान करणे योग्य आहे. उभा राहण्याची जागाही मोकळी आणि स्वच्छ असावी; म्हणजे तेथें एकाग्र मनाने निर्भयपणे उभे राहणे सुलभ जाते. पडून राहण्याच्या जागीही डांसांचा आणि अन्य प्राण्यांचा उपद्रव असता कामा नये, याप्रमाणे ईर्यापथातील दोष जाणून ते दूर करून अनुकूल ईर्यापथ मिळतील अशी व्यवस्था करावी.

---

३

# आनापानस्मृतिभावना

कुशलसमाधीला साधनीभूत चाळीस पदार्थ विशुद्धिमार्गात सांगितले आहेत. त्यांना पालि भाषेत कम्मट्ठाने (कर्मस्थाने) म्हणतात. ती एणेप्रमाणे:—

पठवीकसिण, आपोकसिण, तेजोकसिण, वायोकसिण, नीलकसिण, पीतकसिण, लोहितकसिण, ओदातकसिण, आलोककसिण, परिच्छिन्नाकासकसिण। ही दहा कसिणे, किंवा मंडळे.

उद्धुमातक, विनीलक, विपुब्बक, विच्छिद्दक, विक्खायितक, विक्खित्तक, हतविक्खित्तक, लोहितक, पुळवक, अट्ठिक। ही दहा अशुभ.

बुद्धानुस्सति, धम्मानुस्सति, संघानुस्सति, सीलानुस्सति, चागानुस्सति, देवतानुस्सति, मरणानुस्सति, कायगतासति, आनापानसति, उपसमानुस्सति। या दहा अनुस्मृति.

मेत्ता, करुणा, मुदिता, उपेक्खा। हे चार ब्रह्मविहार.

आकासानञ्चायतन, विञ्ञाणञ्चायतन, आकिञ्चञ्ञायतन, नेवसञ्ञानासञ्ञायतन। ही चार आरूप्ये.

आहारे पटिकूलसञ्ञा। ही एक संज्ञा.

चतुधातुववत्थान। हे एक ववत्थान किंवा व्यवस्थान, मिळून चाळीस.

या यादीत कसिणांला अग्रस्थान देण्यात आले आहे. त्याचा अर्थ एवढाच की, बुद्धघोषाचार्याच्या वेळी कसिणांला विशेष महत्त्व आले होते. परंतु सुत्तपिटकात यांचा दोन तीन ठिकाणीच काय तो उल्लेख सांपडतो.[१] परंतु त्यात आलोककसिणाच्या ऐवजी विञ्ञाणकसिण आहे. धम्मसंगणीत (अभिधर्माच्या पहिल्या प्रकरणात) कसिणांला अग्रस्थान दिले आहे. पण

---

१. मज्झिमनिकाय, महासकुलदायिसुत्त (नं. ७७) आणि अंगुत्तरनिकाय, एककनिपात व दसकनिपात यात यांचा उल्लेख आढळतो.

त्यांत शेवटली दोन कसिणे गाळून बाकीची आठच ठेवली आहेत. यावरून असे दिसून येते की, ज्या वेळी धम्मसंगणि रचली गेली त्या वेळी कसिणांला विशेष महत्त्व येत चालले होते, आणि बुद्धघोषाचार्याच्या वेळी ते दृढ झाले. परंतु सुत्तपिटकाचे ज्याने परिशीलन केले असेल त्याला, सर्व कर्मस्थानांत आनापानस्मृतीला[१] फार महत्त्व दिल्याचे दिसून येईल. मज्झिमनिकायात आनापानसति नावाचे एक स्वतंत्र सुत्त आहे. संयुत्तनिकायात आनापान-संयुत्त नावाचे एक मोठे प्रकरण आहे. आणि इतर निकायांतूनही या आनापानस्मृतीचा अनेक ठिकाणी उल्लेख आला आहे. त्या सर्वांवरून बुद्धसमकाली आणि त्यानंतर काही काळपर्यंत हे कर्मस्थान प्रधानभूत गणले जात होते यात शंका नाही.[२] म्हणून याच कर्मस्थानाचा येथे प्रथमतः विचार करण्यात येत आहे.

आनापानसतिसुत्तात याचे विधान आहे ते येणेप्रमाणेः—

बुद्ध भगवान् म्हणतो, "भिक्षुहो, एखादा भिक्षु अरण्यात, झाडाखाली किंवा एकान्तस्थळी जाऊन देह सरळ ठेवून मोठ्या सावधगिरीने बसतो. तो सावधानपणे आश्वास घेतो व सावधानपणे प्रश्वास सोडतो. दीर्घ आश्वास घेत असला तर दीर्घ आश्वास घेत आहे असे जाणतो; दीर्घ प्रश्वास सोडीत असला तर दीर्घ प्रश्वास सोडीत आहे असे जाणतो; ऱ्हस्व आश्वास घेत असला तर ऱ्हस्व आश्वास घेत आहे असे जाणतो; ऱ्हस्व प्रश्वास सोडीत असला तर ऱ्हस्व प्रश्वास सोडीत आहे असे जाणतो; सर्व देहाची स्मृति ठेवून आश्वास करण्याचा व प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो; कायसंस्कार शांत करून आश्वास करण्याचा व प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो. प्रीतीचा अनुभव घेऊन आश्वास करण्याचा व प्रश्वास करण्याचा

---

१. आन म्हणजे आश्वास, व अपान म्हणजे प्रश्वास. ह्यांच्या स्मृतीला आनापानस्मृति म्हणतात. तिचे विधान पुढे आलेच आहे.

२. बुद्धघोषाचार्यानेही 'इदं कम्मट्ठानप्पभेदे मुद्धभूतं सब्बञ्ञुबुद्ध-पच्चेकबुद्ध-बुद्धसावकानं विसेसाधिगमदिट्ठधम्मसुखविहारपदट्ठानं आनापानसति-कम्मट्ठानं' असे म्हटले आहे. यावरून त्या काळीही या कर्मस्थानाला बरेच महत्त्व राहिले होते; तरी कसिणे अग्रभागी आली होती, असे दिसते.

अभ्यास करतो; सुखाचा अनुभव घेऊन आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो; चित्तसंस्कार जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो; चित्तसंस्कार शांत करून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो. चित्त जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो; चित्ताला प्रमुदित करून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो; चित्ताचे समाधान करून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो; चित्ताला विमुक्त करून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो. अनित्यता जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो; वैराग्य जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो; निरोध जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो; त्याग जाणून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो. भिक्षुहो, याप्रमाणे आनापान-स्मृतीची भावना केली असता ती महत्फलदायक आणि महद्धितकारक होते. "

पहिल्या प्रथम सावधानपणे आश्वास घेणे व प्रश्वास सोडणे याचें विधान आहे. आणि हेच काम फार कठीण जाते. श्वासोच्छ्वासांवर मन ठेवण्याचा प्रयत्न केल्याबरोबर ते इकडे तिकडे धांवावयास लागते. त्यासाठी अनेक युक्त्या कराव्या लागतात. ब्रह्मदेशात सध्या जे एक दोन योगाचार्य आहेत ते आश्वासप्रश्वासांवर चित्त एकाग्र करण्यासाठी प्रथमतः डोळ्यांसमोर नासिकाग्रावर अरहं असा शब्द कल्पून त्यावर ध्यान करावयास सांगतात. त्याच्याबरोबरच आश्वासप्रश्वासांचेही अवलोकन करावयाचे असते. अशा रीतीने ध्यानाला सुरुवात केली असता काही विपरीत पदार्थ डोळ्यांसमोर येऊ लागले, तर योग्याचे चित्त अद्यापि रुग्णावस्थेत आहे, असे समजले जाते; व त्याच्या मनात वर सांगितलेल्या नीवरणांपैकी कोणत्या नीवरणाचा प्रादुर्भाव आहे, हे विचारून घेऊन, त्याचा प्रतिकार कोणत्या भावनेने करावा, हे सांगण्यात येते. अशा रीतीने चित्तदोषांचे दमन करून शान्तपणे आणि निर्भयपणे आश्वासप्रश्वासांवर चित्त आणले असता डोळ्यांसमोर समाधीला साधक पदार्थ दिसू लागतात. एखाद्याला रम्य वनप्रदेश दिसतो, तर दुसऱ्याला एखादी उत्तम नदी वाहात आहे, असा भास होतो. इतरांना कमले, सूर्यमंडल, चंद्रमंडल किंवा असेच कामविकारविरहित रम्य देखावे दिसू लागतात. परन्तु त्यांत आसक्त न

होता आश्वासप्रश्वासांवर ध्यान करण्याचा प्रयत्न त्याने तसाच चालू ठेवला पाहिजे.

सावधानपणे आश्वास प्रश्वास कसे करता येतात याचे विवरण या सूत्रात ज्या [१] चार चौकड्या आहेत त्यांपैकी पहिल्या चौकडीत केले आहे. त्यांत दीर्घ आश्वास आणि दीर्घ प्रश्वास म्हणजे लांब आश्वास व लांब प्रश्वास, किंवा अधिक काळ टिकणारा आश्वास प्रश्वास; आणि ऱ्हस्व आश्वास प्रश्वास म्हणजे कमी काळ टिकणारा आश्वास प्रश्वास. अर्थात् हे परस्परावलंबी आहेत. धांवणाऱ्या मनुष्याचे आश्वासप्रश्वास फार दीर्घ चालतात; पण तोच जर उभा राहिला, तर ते हळू हळू ऱ्हस्व होत जातात. दमून येऊन उभ्या राहिलेल्या माणसापेक्षा शांतपणे बसलेल्या माणसाचे आश्वासप्रश्वास ऱ्हस्व असतात. बहुधा ध्यानारंभी आश्वास प्रश्वास दीर्घ असतात, आणि मग हळूहळू ऱ्हस्व होत जातात. म्हणून प्रथमतः दीर्घ आणि मग

---

१. वरील विधानात सावधानपणे आश्वास घेणे व सावधानपणे प्रश्वास सोडणे येथपर्यंत आनापानस्मृतीला आरम्भ कसा करावा हे सांगण्यात आले आहे. त्यानंतर या चार चौकड्या दिल्या आहेत. पहिल्या चौकडीत आनापानस्मृतीच्या योगे शरीराचे आणि शरीरसंस्काराचे आकलन करण्याचा उपाय सांगितला आहे. या चौकडीला 'दीर्घ आश्वास' येथपासून सुरुवात होते, व ती 'कायसंस्कार शांत करून आश्वास करण्याचा व प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो' येथे पुरी होते. 'प्रीतीचा अनुभव घेऊन' या वाक्यापासून दुसऱ्या चौकडीला आरम्भ होतो, व ती 'चित्तसंस्कार शान्त करून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो' येथे पुरी होते. या चौकडीत वेदनाचे आकलन करण्याचा उपाय सांगितला आहे. 'चित्त जाणून' एथपासून तिसऱ्या चौकडीला आरम्भ होतो, व ती 'चित्ताला विमुक्त करून आश्वासप्रश्वास करण्याचा अभ्यास करतो,' येथे पुरी होते. इच्यात चित्ताचे आकलन करण्याचा उपाय सांगितला आहे. 'अनित्यता जाणून' एथपासून चवथी चौकडी आहे, आणि तिच्यात निर्वाणप्रापक पदार्थांचे आकलन करण्याचा उपाय सांगितला आहे. काये कायानुपस्सना, वेदनासु वेदनानुपस्सना, चित्ते चित्तानुपस्सना, धम्मेसु धम्मानुपस्सना, ही जी चार सतिपट्ठाने (स्मृत्युपस्थाने) सुत्तपिटकात वारंवार येतात, त्यांचाच खुलासा या चार चौकड्यांत आहे, असे म्हणण्यास हरकत नाही. चौकडींतील तुकडे दाखविण्यासाठी अर्धविरामाची व जेथे ती पुरी होते तेथे पूर्णविरामाची योजना केली आहे.

ऱ्हस्व या विशेषणांचा उपयोग करण्यात आला आहे. या आश्वासप्रश्वासांचें एकदा आकलन झाले, म्हणजे आपल्या सर्व देहाची स्मृति ठेवून आश्वास-प्रश्वास करण्याचा अभ्यास करावा लागतो. तो जर साध्य झाला, तर सर्व शरीरावर एक प्रकारच्या आनंदलहरी उठू लागतात, व त्यायोगे शरीर कंपित होत आहे असे वाटू लागते. पण असे सुखकारक कायसंस्कारही प्रशांत करून आश्वास प्रश्वास करावयाचा असतो.

केवळ अरहं शब्दावर चित्त ठेवले असता श्वासोच्छ्वासांचे आकलन सुखाने झाले तर ठीकच आहे, नाहीतर विशुद्धिमार्गात सांगितलेल्या, गणना, अनुबंधना, स्पर्श आणि स्थापना, यांचाही प्रयोग करून पहावा. **गणना** म्हणजे दीर्घ किंवा ऱ्हस्व आश्वास प्रश्वास मोजणे. ते दहापेक्षा जास्त किंवा पाचापेक्षा कमी मोजू नयेत. दहापेक्षा जास्त मोजले, तर केवळ मोजण्यावरच चित्त जाते; पाचापेक्षा कमी मोजले, तर चित्त गडबडते. म्हणून पाच आणि दहा यांच्या दरम्यान सोईवार आकडा घेऊन सावधानपणे गणना करीत राहावे. गणनेने थोडेसे चित्ताला स्थैर्य आल्याबरोबर मोजणे सोडून देऊन केवळ श्वासोच्छ्वासांबरोबर चित्त आतबाहेर चालत राहील असे करावे. यालाच **अनुबंधना** असे म्हणतात. **स्पर्श** ( पालि=फुसना ) म्हणजे नासिकाग्रावर ज्या ठिकाणी आश्वास आणि प्रश्वास येऊन आदळतात त्याच ठिकाणी चित्त एकाग्र करणे. नगरद्वारपाल जसा नगरद्वारावर बसूनच जाणायेणाऱ्यांचा पत्ता टिपून घेतो, त्याप्रमाणे स्मृतियुक्त चित्ताने आश्वास-प्रश्वासांचा नासिकाग्रावरच पत्ता लावला असता चित्ताची एकाग्रता सुलभ होते. अशा रीतीने श्वासोच्छ्वासांवर चित्ताची एकाग्रता करणे याला **स्थापना** म्हणतात.

मुद्याची गोष्ट ही की, कोणत्याही प्रकारे चित्ताची एकाग्रता आश्वासप्रश्वासांवर झाली पाहिजे. आणि ही गोष्ट प्रयत्नांवाचून शक्य नाही. पोहण्यावर व्याख्यान देऊन जसे पोहण्यास शिकविता येत नाही, त्याचप्रमाणे प्राणापानावर एकाग्रता करण्याचा सतत प्रयत्न केल्यावाचून आनापानस्मृति साध्य होत नाही. पाण्यात तरंगावे कसे हे नीटपणे ऐकून घेतल्यावर स्वतः पाण्यात शिरून आपल्या अडचणी काय आहेत याचा अनुभव घेतला पाहिजे, आणि मोठ्या शिताफीने त्या दूर केल्या पाहिजेत. त्याचप्रमाणे

योगारंभ करणाऱ्याने पूर्वाचार्यांचे अनुभव समजून घेऊन, व आपल्या अड-चणी काय आहेत, हे जाणून त्या मोठ्या कौशल्याने दूर केल्या पाहिजेत.

दीर्घ आश्वास प्रश्वास किंवा ऱ्हस्व आश्वास प्रश्वास यांचे एकदा आकलन झाले म्हणजे आपण समाधीच्या मार्गांत उतरलो असे समजावे. पण तेवढ्याने कृतकृत्य न होता किंवा पुढल्या चौकडींच्या अभ्यासास न लागता पहिल्याच चौकडीचा अभ्यास दृढ करावा, तो इतका की, भय, हर्ष किंवा अशाच एकाद्या संभ्रमकारक प्रसंगी आपले चित्त विभ्रांत न होता एकदम आश्वासप्रश्वासांवर यावे. ज्याला एवढे सिद्ध झाले त्याला, पुढल्या चौकडींचा अभ्यास न करता चारही ध्याने साध्य होणे शक्य आहे, असे आचार्य म्हणतात. याला सुत्तपिटकांत आधार सांपडला नाही. जेव्हा जेव्हा आनापानस्मृतिभावना कशी करावी हे भगवंताने सांगितले आहे, तेव्हा तेव्हा या चारही चौकड्या दिल्या आहेत. म्हणून पुढल्या तीन चौकड्यांची उपेक्षा न करता त्यांचाही अभ्यास पुरा करावा.

दुसऱ्या चौकडीत प्रीतीला अग्रस्थान दिले आहे. प्रीती म्हणजे निष्काम प्रेम. ते पहिल्या चौकडीच्या अभ्यासाने आपोआप उदित होते; आणि त्याचा अनुभव घेऊन आश्वास प्रश्वास चालविले असता लवकरच मनाला समाधानकारक सुख वाटत असते. रोगादिकांच्या कारणाने अंगी वेदना उत्पन्न झालेल्या असल्या, आणि अशा प्रसंगी देखील योग्याने आनापानस्मृतीची भावना चालविली, तर त्याला अप्रतिम प्रीतिसुख अनुभव-ण्यास मिळाल्यावाचून राहात नाही. त्यानंतर असे आनंदकारक आणि सुखकारक चित्तसंस्कार जाणून घेऊन आश्वासप्रश्वास करावयाचा असतो; आणि अखेरीस ते शांत कसे होतील, आणि मनाचा सूक्ष्म कंपही कसा थांबेल याविषयी प्रयत्न करावयाचा असतो. म्हणूनच, 'चित्तसंस्कार शांत करून आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो,' असे वरील उताऱ्यात म्हटले आहे.

परंतु या प्रयत्नाने चित्त मंदावत जाण्याचा संभव असतो. त्यासाठी चित्त जाणून आश्वास प्रश्वास करावा लागतो. नंतर चित्ताला प्रमुदित करून, चित्ताचे समाधान करून आणि चित्ताला विमुक्त करून

आश्वास प्रश्वास करण्याचा अभ्यास करावयाचा असतो. येथे 'विमुक्त करून' याचा अर्थ हा की, आश्वासप्रश्वासांत मनाला आसक्त करून ठेवावयाचे नाही. त्यांच्या आकलनाने एवढी शांती आणि एवढे सुख मिळत असले, तरी त्यांत बद्ध होऊन बसावयाचे नाही. घोडागाडी आपल्या सुखसमाधानाला साधनीभूत असली, तरी त्यांत बद्ध होणाऱ्यांना ती सुखकारक होण्यापेक्षा दुःखकारकच होते. तिच्यासाठी बडे लोकाची हांजी हांजी किंवा असेच काहीतरी आपणास न आवडणारे कृत्य करण्याची पाळी येते; आणि त्यामुळे मनाला तळमळ लागून राहते. त्याचप्रमाणे इतक्या प्रयत्नाने आटोक्यात आणलेल्या आश्वासप्रश्वासांवर जर योगी मोहित होऊन गेला तर कोणत्याही कारणाने त्याच्या समाधीत विघ्न आले असता त्याच्या मनाला शांति मिळण्याऐवजी कष्ट मात्र होतात. म्हणून आपले चित्त विमुक्त ठेवण्यासाठी खबरदारी घेतली पाहिजे.

याच्या पुढली शेवटली चौकडी योग्याला निर्वाणमार्गांत प्रविष्ट करणारी आहे. तिचा स्वतंत्रपणे अभ्यास करता येतो, तरी आश्वासप्रश्वासांवर मन ठेवल्याने तो अधिक सुकर होतो. ज्याला जगाची अनित्यता पहावयाची असेल त्याला ती ध्यानाच्यायोगे अत्यंत सूक्ष्म झालेल्या आपल्याच आश्वास-प्रश्वासांत विशदपणे दिसून येणार आहे. फूल फुलून ते कोमेजून जाण्यास एक दोन दिवस लागतात; पिकलेले फळ किंवा पान देठापासून गळून पडण्यास काही काळ जातो; परंतु आपल्या आश्वासप्रश्वासांची घडामोड क्षणोक्षणी चाललेली असते; आणि ती जर आपणास आकलन करता आली, तर अनित्यतेचा अनुभव घेण्यास मुळीच उशीर लागणार नाही. अनित्यतेच्या योगे वैराग्याचा अनुभव घेण्यास सांपडतो. त्यायोगे सर्व मनो-वृत्तींचा लय कसा होतो याचे ज्ञान होते; आणि मग सर्वत्याग कसा असतो हे समजते. या सर्वांचा अनुभव घेऊन आश्वास प्रश्वास चालविला असता योग्याला निर्वाणप्राप्ती होण्यास विलंब लागत नाही.

आनापानस्मृतिभावनेचा सर्वांत मोठा फायदा हा की, तिचा अल्पा-भ्यासही हितकारक होत असतो; तिच्यामुळे हानि होण्याचा मुळीच संभव नसतो. पहिल्या चौकडीचा तेवढा अभ्यास पुरा झाला असे जरी धरले, तरी त्याचा व्यवहारांत वारंवार चांगला उपयोग होतो. ज्या ज्या वेळी

आपले मन कामक्रोधादिक मनोवृत्तींनी बहकले जाते, भयाने किंवा कुशंकेने व्यग्र होते, त्या त्या वेळीं प्राणापानाचे आलंबन मिळाल्यामुळे ते एकदम ताळ्यावर येते. अंधाऱ्या रात्री खांचखळग्यांतून जात असता जसा काठीचा आपणास उपयोग होतो, तसा प्रपंचात चित्ताला या आलंबनाचा उपयोग होत असतो. मेसिडोनियाच्या फिलिप बादशाहाने आपण बहकून जाऊ नये म्हणून आपणाला स्मरण देण्यासाठी एक मनुष्य ठेवला होता; व तो 'फिलिप, तूं मनुष्य आहेस, तूं मनुष्य आहेस' असे वारंवार म्हणत असे. परंतु प्रत्येक माणसाला अशा रीतीने आपणाला स्मरण देण्यासाठीं दुसरा मनुष्य ठेवता येणे शक्य नाही; आणि आनापानस्मृतीची भावना केली असता त्याची गरजही नाही. उच्छृंखल मनाला आवरण्याचे काम आनापान-स्मृति आपोआपच करीत असते.

या स्मृतीचा दुसरा गुण हा की, ती सर्व कर्मस्थानांत उपयोगी पडते. थोडीबहुत आनापानस्मृतीची भावना केल्यावाचून कायगतास्मृति, मैत्री, करुणा इत्यादिक कर्मस्थानांचा मार्ग आक्रमण करणे कठीण जाते. कायगतास्मृति तर आनापानस्मृतीवाचून अपायकारक होण्याचा संभव असतो. हे कसे ते पुढल्या प्रकरणात दाखविण्यात येईलच, तिसरा गुण हा की, आनापानस्मृति ज्याला साध्य झाली असेल, तो मरणकाल आसन्न आला तरी मुग्ध होत नाही; त्याचे श्वासोच्छ्वास तो जागृत असताच निरोध पावतात. या संबंधाने मज्झिमनिकायांतील महाराहुलोवाद सुत्तांत (नं. ६२) भगवंताने म्हटले आहे की,– एवंभाविताय खो राहुल आनापानसतिया एवंबहुलीकताय ये पि ते चरिमका अस्सासपस्सासा ते पि विदिता व निरुज्झन्ति नो अविदिता ति। (हे, राहुल, याप्रमाणे आनापानस्मृतीची भावना केली असता व ती प्रगुणित केली असता मरणासन्न आश्वासप्रश्वासही सावध असताच निरोध पावतात. बेसावध असता निरोध पावत नाहीत.) या वाक्याच्या स्पष्टीकरणार्थ विशुद्धिमार्गांत गोष्ट दिली आहे ती अशी :—

सिंहलद्वीपांत चित्रल (चित्तल) पर्वतावर दोन सहोदर भिक्षु रहात होते. त्यांपैकी एक जण पौर्णिमेच्या दिवशी भिक्षुसंघासह आपल्या निवास-स्थानी बसला असता, आपले मरण आसन्न आहे, असे जाणून भिक्षु-संघाला म्हणाला, 'तुम्ही, अरहंतांचे परिनिर्वाण कशा प्रकारचे पाहिले

आहे ?' कोणी म्हणाले, 'आसनावर बसून समाधिस्थ झालेल्या अरहंतांला आम्ही पाहिले आहे.' दुसरे म्हणाले 'आसनमांडी ठोकून परिनिर्वाण पावलेल्यांला आम्ही पाहिले आहे.' त्यावर तो स्थविर म्हणाला, आता तुम्हाला मी चंक्रमण करीत असताच कसे परिनिर्वाण पावता येते हे दाखवितो.' त्यानंतर चंक्रमावर एक आडवी रेघ मारून तो म्हणाला, 'येथून, चंक्रमाच्या दुसऱ्या टोकाला जाऊन तेथून या रेषेवर परत आल्याबरोबर माझे परिनिर्वाण होणार आहे.' त्याने म्हटल्याप्रमाणेच त्या रेघेवर पोचल्याबरोबर तो परिनिर्वाण पावला.

---

४

# कायगतास्मृति आणि अशुभें

आनापानस्मृतीच्या खालोखाल सुत्तपिटकात कायगतास्मृतीचे महत्त्व दिसून येते. अंगुत्तरनिकायाच्या पहिल्याच निपातात, अमतं ते भिक्खवे न परिभुञ्जन्ति ये कायगतासतिं न परिभुञ्जन्ति। अमतन्ते भिक्खवे परिभुञ्जन्ति ये कायगतासतिं परिभुञ्जन्ति। (भिक्षुहो, त्यांनी अमृताचा उपभोग घेतला नाही, ज्यांनी कायगता स्मृतीचा उपभोग घेतला नाही; पण त्यांनी अमृताचा उपभोग घेतला, ज्यांनी कायगतास्मृतीचा उपभोग घेतला.) अशा अर्थाची कायगतास्मृतीच्या स्तुतीची अनेक सुत्तें आहेत. तेव्हा त्या स्मृतीला येथे दुसरे स्थान देण्यात आले आहे.

कायगतास्मृति म्हणजे आपल्या शरीरातील केशलोमादिक बाह्य, किंवा मांसलोहितादिक अभ्यन्तर पदार्थांचे सूक्ष्म बुद्धीने निरीक्षण करून व त्यांची अशुभता जाणून त्यांच्यावर ध्यान करणे. या स्मृतीचे विधान मज्झिमनिकायातील कायगतासतिसुत्तांत (नं. ११९) दिले आहे, ते येणे प्रमाणे:—

भगवान् म्हणतो, "(१) भिक्षुहो, एकादा भिक्षु अरण्यात, वृक्षाखाली किंवा दुसऱ्या एकाद्या एकांत स्थळी आसनमांडी ठोकून आणि स्मृति जागृत ठेवून बसतो. तो सावधानपणे आश्वास घेतो व सावधानपणे प्रश्वास सोडतो; दीर्घ आश्वास घेत असला तर दीर्घ आश्वास घेत आहे असे जाणतो; दीर्घ प्रश्वास सोडीत असला, तर दीर्घ प्रश्वास सोडीत आहे असे जाणतो; ऱ्हस्व आश्वास घेत असला, तर ऱ्हस्व आश्वास घेत आहे असे जाणतो; ऱ्हस्व प्रश्वास सोडीत असला, तर ऱ्हस्व प्रश्वास सोडीत आहे असे जाणतो; सर्व देहाची स्मृति ठेवून आश्वास करण्याचा व प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो; कायसंस्कार शांत करून आश्वास करण्याचा व प्रश्वास करण्याचा अभ्यास करतो. याप्रमाणे सावधपणे आणि लक्ष्यपूर्वक

वागत असता त्याचे प्रपंचाकडे धावणारे संकल्प नष्ट होतात व चित्त एकाग्र होते.

" ( २ ) आणखी तो जात असता जात आहे हे जाणतो, उभा असता उभा आहे हे जाणतो; बसला असता बसलो आहे हे जाणतो; बिछान्यावर पडला असता पडलो आहे हे जाणतो; शरीर ज्या ज्या अवस्थेत असेल त्या त्या अवस्थेत ते आहे हे जाणतो. या प्रमाणे सावधानपणे इत्यादि.......

" ( ३ ) आणखी तो जात येत असता, इकडे तिकडे पहात असता, पात्रचीवर धारण करीत असता, खात पीत असता, मळमूत्रांचा उत्सर्ग करीत असता, चालत असता, उभा असता, बसला असता, अंथरुणावर पडला असता, बोलत असता, मुकाट्याने राहिला असता – या सर्व अवस्थांत विचारपूर्वक वागतो. याप्रमाणे सावधानपणे इ०...

" ( ४ ) आणखी भिक्षुहो, तो भिक्षु पादतलांच्यावर, डोक्याच्या केसांखाली आणि त्वचेने वेढलला हा देह अनेक अशुचि पदार्थांनी भरला आहे असे जाणतो; या देहांत केस, लोम, नखे, दांत, त्वचा, मांस, स्नायू, हाडें, अस्थिमज्जा, वृक्क ( मूत्राशय ), हृदय, यकृत, क्लोम, प्लीहा, फुप्फुस, आंतडे, आंतड्याची दोरी, औदर्य, विष्ठा, पित्त, कफ, पूं, रक्त, स्वेद, मेद, आसवें, वसा, थुंकी, शेंबूड, लस, मूत्र, हे पदार्थ आहेत, हे पहातो.

" ( ५ ) आणखी तो या शरीराचे चार महाभूतांप्रमाणे चार विभाग पाडतो. या देहात पृथ्वीधातु, आपोधातु, तेजोधातु आणि वायुधातु या चार धातु आहेत याचा तो विचार करतो.

" ( ६ ) आणखी तो स्मशानभूमीत, एक, दोन किंवा तीन दिवस पडलेले सुजलेले प्रेत, किंवा नीलवर्ण झालेले प्रेत, किंवा पूं उत्पन्न झालेले प्रेत ... कावळे, गिधाड, कोल्हे किंवा असेच अन्य प्राणी ज्याचें लचके तोडून खात आहेत असे प्रेत ... हाडांचा सांगाडा मांसाने आणि रक्ताने माखलेला, किंवा निव्वळ हाडांचा सांगाडा, किंवा हाडे इतस्ततः पसरलेली ... किंवा एक वर्ष कायम होऊन गेलेली चूर्णविचूर्ण झालेली हाडे पाहतो, आणि असा विचार करतो की, हे जे शरीराचे भिन्न भिन्न विकार यांपासून

माझे शरीर मुक्त नाही. त्याचीही हीच गत होणार आहे. याप्रमाणे सावधपणे आणि लक्षपूर्वक वागत असता त्याचे प्रपंचाकडे धावणारे संकल्प नष्ट होतात व चित्त एकाग्र होते. ”

येथे एकंदर सहा कलमे आहेत, पैकी शेवटच्या कलमात सर्व अशुभांचा समावेश केला आहे; त्यासाठी निराळी कलमे केली नाहीत. पहिल्या कलमात आनापानस्मृति सांगितली आहे. ती एवढ्याचसाठी की, तेवढी एकाग्रता तरी कायगतास्मृतीला जरूर आहे. बाहेरच्या पदार्थांकडे धावणाऱ्या ज्ञानेंद्रियांना आवरून जर अंतर्मुख करावयाचे असेल, तर प्रथमतः आश्वासप्रश्वासांचे आकलन केले पाहिजे, हाच त्या कलमाचा अर्थ आहे. जातायेताना, उभा असता, बसला असता, किंवा बिछान्यावर पडला असता शरीराचे प्रत्यवेक्षण करणे आणि सर्व शारीरिक क्रियांत सावधपणे वागणे हा दुसऱ्या आणि तिसऱ्या कलमाचा सारांश आहे. अशा रीतीने वागल्याने कायगतास्मृतीलाच नव्हे तर इतर सर्व कर्मस्थानांला फारच मदत होते. रस्त्यातून जात असताना कांही लोक आपणाशीच बोलत असतात, कांही हातचाळे करतात, व कांही भ्रांत मृगाप्रमाणे इतस्ततः पहात राहतात. या सर्वांचे चित्त समाधीपासून फारफार दूर आहे असे समजावे; आणि अशा अव्यापारेषु व्यापारांपासून आपण मुक्त होऊन आपल्या शारीरिक क्रियांवर आपणाला पूर्ण ताबा मिळविता यावा यासाठी नेहमी काळजी घ्यावी.

कायगतास्मृतीचे खरे विधान चवथ्या कलमात आहे. केशलोमादिक एकतीस पदार्थांत डोक्यातील मेंदूची भर घातली म्हणजे ते बत्तीस होतात. ते पृथक् करून आपल्या डोळ्यांसमोर आणता येऊ लागले म्हणजे कायगतास्मृति साध्य होत चालली असे समजावे. हे सर्व पदार्थ डोळ्यांसमोर आणण्याचा प्रयत्न केल्याने ज्यांचे चित्त विक्षिप्त होत असेल, त्याने तसे न करता जो भाग डोळ्यांसमोर येईल त्यावरच आपले चित्त स्थिर करावे. एखाद्याला केशांपासून त्वचेपर्यंत पाच पदार्थांचा भाग शरीरापासून भिन्न होऊन उकिरड्यावर पडलेला स्पष्ट दिसत असला, तर त्याचे त्याच भागावर चित्त स्थिर करावे, दुसऱ्याला मांसाचा भाग, आंतड्यांचा भाग, किंवा निव्वळ हाडांचा सांगाडा दिसत असला, तर त्याने त्याच भागावर ध्यान करावे, बाकी विभागांचा विचार करू नये.

पाचव्या कलमात सांगितलेले शरीराचे चार विभाग चतुधातु-वत्थान या कर्मस्थानाखाली येतात. ते कायगतास्मृतीला साधक आहेत एवढ्याचसाठी येथे दिले आहेत. सहाव्या कलमांत दहा अशुभांचा समावेश झाला आहे. त्यांचा उपयोग असा होतो की, मेलेल्या प्रेताचा तो तो भाग पाहून तोच आपल्या शरीरात आहे अशा रीतीने ध्यान करणे सुलभ जाते. यासाठी स्मशानातच जावयास पाहिजे असे नाही. सध्याच्या काळी हास्पिटलासारख्या ठिकाणी जेथे प्रेते चिरण्यात येतात तेथे जाऊन, जो भाग पाहिला असता आपणाला विशेष वैराग्य उत्पन्न होईल, त्या भागाचे नीट अवलोकन करून परत आपल्या निवासस्थानात येऊन, तोच भाग आपल्या शरीरात आहे, याचे अंतर्दृष्टीने अवलोकन करावे. यात एवढीच खबरदारी घेतली पाहिजे की, कायगतास्मृतीला आरंभ करणाऱ्या व्यक्तीने विसदृश प्रेत पाहू नये. स्त्रीला पुरुषांचे व पुरुषाला स्त्रीचे प्रेत विसदृश होय. तेव्हा पुरुषाने पुरुषाचेच प्रेत पहावे, आणि स्त्रीने स्त्रीचेच प्रेत पहावे.

अशा प्रकारे बराच काळ चिंतन चालविल्यावर चित्त स्थिर होऊन योग्याला प्रथम ध्यान साध्य होते. कायगतास्मृतीवर किंवा अशुभांवर प्रथम ध्यानापलीकडील ध्याने साध्य होणे शक्य नाही, असे आभिधर्मिकांचे म्हणणे आहे. याचे कारण ते असे देतात की, चित्तांतील अशुभ वितर्क नष्ट न झाल्यामुळे वरच्या ध्यानावर जाता येत नाही; आणि रक्त किंवा हाडे यांवर ध्यान करीत असता जर अशुभ वितर्क निघून गेला, तर त्यांचा समावेश काय-गतास्मृतीत किंवा अशुभांत न होता अनुक्रमे लोहित आणि अवदात (पांढरे) या दोन कसिणांत होतो. वर दिलेल्या कायगतासति सुत्तांत चारही ध्याने दिली आहेत. आभिधर्मिकांच्या मते त्यांचा अर्थ लावावयाचा म्हणजे पहिल्या ध्यानापर्यंत योग्याचा अशुभ वितर्क कायम असतो; पण या वितर्काचा जेव्हा त्याला कंटाळा येतो तेव्हा त्या शरीरावयवाचा जो वर्ण असेल तोच काय तो त्याच्या डोळ्यांसमोर राहतो; व त्यालाच विश्वव्यापक स्वरूप देऊन तो पुढली ध्याने साध्य करतो. नीलपीतादिक कसिणांचे ध्यान कसे साध्य होते याचे वर्णन सातव्या भागात येणारच आहे, ते तेथे पहावे.

कायगतास्मृतीची भावना करणाऱ्या योग्याने आनापानस्मृतीची भावना मुळीच केली नसली तर फायदा न होता नुकसान होण्याचा संभव

असतो; आपल्या देहाचा कंटाळा आल्यामुळे तो आत्महत्त्येला प्रवृत्त होतो. यासंबंधाने आनापानसंयुत्तात (सुत्त नं० ९) गोष्ट आहे ती अशी:--

एके समयी भगवान् वैशालीजवळ महावनात कूटागारशालेत रहात होता. त्या समयी भगवान् अनेक पर्यायांनी अशुभ भावनेची स्तुति करीत होता. एके दिवशी भगवान् भिक्षूंना म्हणाला, " मी पंधरा दिवसपर्यंत एकांतात राहणार आहे. तेथे मजपाशी अन्न घेऊन येणाऱ्या भिक्षूशिवाय दुसऱ्या कोणत्याही भिक्षूने येता कामा नये." त्याप्रमाणे भगवान् एकांतात राहता झाला. इकडे अशुभाची भावना करून भिक्षु आत्महत्या करू लागले. पंधरा दिवसांनंतर भगवान् एकांतातून बाहेर आला, आणि आनंदाला म्हणाला, " भिक्षुसंघ कमी दिसतो याचे कारण काय ?"

आनंद म्हणाला, " भदंत, आपण अनेक पर्यायांनी अशुभ भावनेची स्तुति केलीत, त्यामुळे पुष्कळ भिक्षूंना शरीराचा कंटाळा आला, व त्यांनी आत्महत्या केली." भगवान् म्हणाला, " असे जर आहे तर तू वैशालीच्या आसपास जेवढे भिक्षु असतील तेवढयाला उपस्थानशालेत (जमण्याच्या जागी) एकत्र कर." भगवंताच्या सांगण्याप्रमाणे आनंदाने सर्व भिक्षूंना तेथे गोळा केले. तेव्हा भगवान् तेथे जाऊन बसला आणि म्हणाला, " भिक्षुहो, आनापानस्मृति समाधि देखील भावित आणि प्रगुणित केली असता शांतिदायक आणि निष्काम सुखदायक होते; आणि पापकारक विचार उत्पन्न झाले असता त्यांना ताबडतोब दाबून टाकते. उन्हाळ्याच्या शेवटी उडत असलेल्या धुळीला जसा महामेघ दाबून टाकतो, तशी ही समाधि पापविचारांना दाबून टाकते, (यानंतर भावनेचे विधान आहे. ते तिसऱ्या प्रकरणांत दिलेच आहे.)"

याचसाठी आनापानस्मृति कायगतास्मृतीच्या आरंभी घालण्यात आली असावी. अशा रीतीने वैराग्य विकोपाला जाऊ न देता जर ही समाधि साध्य झाली, तर त्यामुळे अनेक फायदे होतात. अत्यंत सुंदर रूप देखील आपणाला मोहित करू शकत नाही. हा सर्वात पहिला फायदा-समजावयास पाहिजे. यासंबंधाने 'बुद्ध, धर्म आणि संघ' याच पुस्तकात (पृष्ठ ३१) दिलेली महातिष्य भिक्षूची गोष्ट अवश्य वाचावी.

बाह्य सौंदर्याचा आपणावर परिणाम झाला नाही म्हणजे आपले चित्त कामविकारांपासून आपोआप मुक्त होते.

कायगतास्मृतिपासून दुसरा मोठा फायदा म्हटला म्हणजे ती ज्याला साध्य झाली असेल त्याजकडून सहसा दुसऱ्याचा उपमर्द होत नाही. या संबंधाने अंगुत्तरनिकायाच्या नवकनिपातात ( सुत्त[१] नं. ११ ) सारिपुत्ताची गोष्ट आहे ती अशी:---

एके वेळी भगवान् श्रावस्ती येथे जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामात रहात होता. तेव्हा सारिपुत्त त्याजपाशी येऊन म्हणाला, "भदंत वर्षाकाळ मी येथे राहिलो. आता गांवोगावी प्रवासास जाण्याची माझी इच्छा आहे." भगवंताने त्याला परवानगी दिली, आणि तो प्रवासास जाण्याला निघाला. इतक्यात दुसरा एक भिक्षु भगवंतापाशी येऊन म्हणाला, "सारिपुत्ताने माझा अपराध केला असून माझी क्षमा न मागतां तो प्रवासाला जात आहे." ते ऐकून भगवंताने ताबडतोब एका भिक्षूला पाठवून सारिपुत्ताला माघारे बोलाविले. सारिपुत्ताच्या अपराधी चवकशी होणार आहे, आणि तो त्यातून उत्तम रीतीने मुक्त होणार आहे,[२] हे जाणून मोग्गल्लानाने आणि आनंदाने सर्व भिक्षूंला भगवंतापाशी बोलावले. 'तू आपला अपराध करून क्षमा न मागता निघून गेलास असा एका सब्रह्मचाऱ्याचा तुझ्यावर आरोप आहे,' असे जेव्हा भगवंताने सांगितले तेव्हा सारिपुत्त म्हणाला, "ज्याची कायगतास्मृति जागृत नसेल तोच आपल्या साथ्याचा अपराध करून क्षमा न मागता निघून जाईल. भदंत, या पृथ्वीवर नानातऱ्हेचे अशुचि पदार्थ लोक फेकीत असतात; पण त्यामुळे पृथ्वी कंटाळत नाही. अशा पृथ्वीसमान मनाने मी वागत असतो. भदंत, पाण्यात लोक नानातऱ्हेचे अशुचि पदार्थ फेकीत असतात; पण त्यामुळे पाणी कंटाळत नाही. अशा उदकसमान चित्ताने मी रहात असतो. अग्नि सर्व अशुचिपदार्थांना जाळून टाकतो. अशा अग्निसमान मनाने मी वागतो. वायु सर्व पदार्थांवरून वाहतो. अशा वायुसमान

---

१. या सुत्ताला अट्ठकथाचार्यांनी थेरसीहनादसुत्त हे नाव दिले आहे.

२. 'सारिपुत्तो भगवतो सम्मुखा सीहनादं नदिस्सती ति' या वाक्याचे शब्दशः भाषांतर केल्याने अर्थ समजणे कठीण जाईल म्हणून वरील रूपांतर केले आहे.

चित्तानें मी वागतों ... भगवान् याप्रमाणे ज्याची कायगतास्मृति जागृत नसेल तोच दुसऱ्याचा अपराध करील, व क्षमा न मागता प्रवासाला जाईल.''

हे सारिपुत्ताचे भाषण ऐकून ज्याने त्याजवर आळ आणला होता, तो भिक्षु आपल्या आसनावरून उठला, आणि भगवंताच्या पायां पडून म्हणाला, "भदंत, माझ्या हातून मोठा अपराध घडला. तो हा की, सारिपुत्तावर मी खोटा आळ आणला. त्या अपराधाची मला क्षमा करा. यापुढे असे कृत्य माझ्या हातून होणार नाही." भगवान् म्हणाला, "तुझा अपराध तू कबूल केलास हे फार चांगले. त्याची आम्ही तुला क्षमा करतो. जो आपला अपराध दिसून आल्याबरोबर क्षमा मागतो, व पुनरपि तसे कृत्य करीत नाही, त्याची आर्यांच्या विनयात अभिवृद्धीच होत असते." नंतर भगवंताने सारिपुत्तालाही त्या भिक्षूच्या अपराधाची क्षमा करावयास लावले.

× × × ×

**उद्धुमातक** म्हणजे सुजून फुगलेले प्रेत. **विनीलक** म्हणजे निळे झालेले प्रेत. **विपुब्बक** म्हणजे ज्यात पू उत्पन्न झाला आहे असे प्रेत. **विच्छिद्दक** म्हणजे छिद्रे पडलेले प्रेत. **विक्खायितक** म्हणजे निरनिराळ्या प्राण्यांनी अर्धवट खाल्लेले प्रेत. **विक्खित्तक** म्हणजे ज्याचे अवयव अस्ताव्यस्त पडले आहेत असे प्रेत. **हतविक्खित्तक** म्हणजे भिन्न भिन्न प्राण्यांनी किंवा शस्त्रांनी कापून ज्याचे अवयव इतस्ततः पसरले आहेत असे प्रेत. **लोहितक** म्हणजे ज्यातून रक्त स्रवत आहे असे प्रेत. **पुळवक** म्हणजे किडे पडलेले प्रेत. **अट्ठिक** म्हणजे हाडांचा सांगाडा किंवा त्याचा कोणताही भाग. याप्रमाणे ही दहा अशुभे म्हणजे दुसरे काही नसून मृतशरीराच्या भिन्न भिन्न अवस्था आहेत. त्यांच्यावर ध्यान करणे याला अशुभभावना म्हणतात. अशा शरीरांपैकी एखादे शरीर दिसले असता ते नीट पाहून घेऊन व पुढे तोच देखावा डोळ्यांसमोर ठेवून चिंतन केले असता हे ध्यान साध्य होते. स्त्रीला पुरुषाचे आणि पुरुषाला स्त्रीचे मृत शरीर पाहून ध्यान साध्य होणे शक्य नाही. म्हणून असे शरीर वर्ज करावे. सजातीय प्रेतावर ध्यान करीत असता जर ते डोळ्यांसमोर येत नसले, तर त्याचा जो भाग विशदपणे डोळ्यांसमोर येईल त्यावरच ध्यान करून ही समाधि साधावी.

कायगतास्मृतीने जसे पहिलेच ध्यान साध्य होते तसे ते अशुभांच्या-योगानेही होते. काकी, अशुभालाही अशुभवितर्काची आवश्यकता असल्यामुळे त्यांची गति पहिल्या ध्यानापलीकडे जात नाही. कायगतास्मृति आणि अशुभ यांत एवढाच फरक आहे की, पहिल्याचे आलंबन जिवंत स्वशरीर असते, व दुसऱ्याचे मृत परशरीर असते. विशुद्धिमार्गात कायगतास्मृतीचा विभाग भिन्न आहे, आणि अशुभांचा विभाग भिन्न आहे. तरी त्यांच्यांत फार साम्य असल्याकारणाने तीं येथे या एकाच प्रकरणात दाखल केलीं आहेत.



# ५

# ब्रह्मविहार

मैत्री ( मेत्ता ), करुणा, मुदिता आणि उपेक्षा या चार मनोवृत्तींना ब्रह्मविहार म्हणतात. ब्रह्मविहार म्हणजे श्रेष्ठ विहार, किंवा ब्रह्मदेव—ज्याला लोकपिता म्हणतात—जसा प्राणिमात्रांविषयी अत्यंत अनुकंपेने वागतो, तशा रीतीने वागणे. यांचे विधान सुत्तपिटकात अनेक ठिकाणी आढळते, आणि ते बहुतेक एकाच पद्धतीचे आहे. तरी प्रसंगाला अनुकूल असा हा अंगुत्तर-निकायातील[१] उतारा येथे देण्यात येत आहे.

कथं च भिक्खवे भिक्खु ब्रह्मप्पत्तो होति ? इध भिक्खवे भिक्खु मेत्ता-सहगतेन चेतसा... करुणासहगतेन चेतसा.... मुदितासहगतेन चेतसा.... उपेक्खासहगतेन चेतसा एकं दिसं फरित्वा विहरति तथा दुतियं तथा ततियं तथा चतुत्थिं, इति उद्धमधो तिरियं सब्बधि सब्बत्तताय सब्बावन्तं लोकं, उपेक्खासहगतेन चेतसा विपुलेन महग्गतेन अप्पमाणेन अवेरेन अव्यापज्झेन फरित्वा विहरति । एवं खो भिक्खवे भिक्खु ब्रह्मप्पत्तो होति ।

अर्थ—भिक्षुहो, एखादा भिक्षु ब्रह्मप्राप्त कसा होतो ? भिक्षु मैत्रीसहगत-चित्ताने... करुणासहगतचित्ताने ... मुदितासहगतचित्ताने... उपेक्षासह-गतचित्ताने एक दिशा, त्याप्रमाणे दुसरी, तिसरी आणि चवथी दिशा भरून टाकतो. याप्रमाणे वर, खाली, आजूबाजूला, सर्वत्र सर्वांचा आत्मा होऊन सर्व जग विपुल, महद्गत, अप्रमाण, अवैर, अद्वेषमय अशा उपेक्षासहगत-चित्ताने भरून टाकतो. याप्रमाणे तो भिक्षु ब्रह्मप्राप्त होतो.

या उताऱ्यात फार जुने मैत्रीकरुणादिकांचे विधान दिले आहे. परन्तु त्यात मैत्रीला आरंभ कसा करावा हे सांगितले नाही. विभंग प्रकरणात, 'सेय्यथा पि नाम एकं पुग्गलं पियं मनापं दिस्वा मेत्तायेय्य, एवमेव सब्बे

---

१ अगुत्तंरनिकाय चतुक्कनिपात (P.T.S) भाग २, पृ. १८४.

सत्ते मेत्ताय फरति। [१] ( जसा एखाद्या प्रिय मनुष्याला पाहून त्यावर मैत्री करतो, त्याप्रमाणे सर्व सत्त्वांवर मैत्री करावी )' असे म्हटले आहे. म्हणजे विभंगाच्या म्हणण्याप्रमाणे एका आवडत्या मनुष्यावर मैत्रीभावनेला आरंभ करून मग ती हळूहळू सर्व प्राणिमात्रांवर पसरावी असे होते. परंतु विशुद्धि-मार्गाचे विधान याहून भिन्न आहे. त्यात सांगितले आहे की, मैत्रीला आरंभ स्वतःवरच करावा, त्यानंतर प्रियसख्यावर, नंतर मध्यस्थावर, आणि नंतर शत्रूवर मैत्रीची भावना करावी. कोणत्याही प्रकारे सर्व प्राणिमात्रांविषयी मनात आत्यंतिक आणि निस्सीम प्रेम उत्पन्न करणे हा या भावनेचा मुख्य मुद्दा आहे. ज्याला आपणापासूनच भावनेला सुरुवात केली असता मैत्री साधणे सुलभ जाते, त्याने तसे करावे. ज्याला प्रिय मनुष्यापासून आरंभ केला असता सुलभ जाते त्याने तसे करावे. मात्र ज्याने नुकताच मैत्रीला आरंभ केला असेल, त्याने एकदम शत्रूवर मैत्रीची भावना करू नये. त्याचप्रमाणे विसदृश व्यक्तीवर आणि मृतावर भावनेला आरंभ करू नये.

आरंभी शत्रूवर प्रेम करण्याचा प्रयत्न केला असता चित्ताला आघात पोचतो, व शत्रूचे अपराध अधिकाधिक डोळ्यांसमोर येऊ लागल्यामुळे मन उद्विग्न होऊन जाते. स्त्रीने पुरुषावर किंवा पुरुषाने स्त्रीवर मैत्रीभावनेला आरंभ केला असता चित्तात कामविकार उत्पन्न होऊन समाधीला भयंकर विघ्न करतो. मृतावर मैत्रीभावनेला आरंभ केला तर समाधि साध्यच होत नाही. तेव्हा अशा रीतीने आरंभ न करता प्रथमतः स्वतःवर किंवा सदृश दोस्त माणसावर आरंभ करून मग शत्रूवरही मैत्री करण्यास शिकावे. नंतर या गांवचे लोक सुखी होवोत, नंतर या देशांतील, नंतर सर्व पृथ्वीवरील लोक सुखी होवोत, असा विचार करावा. नंतर सर्व स्त्रीजाति सुखी होवो, नंतर सर्व पुरुषजाति सुखी होवो, आर्य सुखी होवोत, अनार्य सुखी होवोत, देव सुखी होवोत, दुर्गतीला गेलेले प्राणी सुखी होवोत, दशदिशांला सर्वत्र सर्व प्राणी सुखी होवोत, अशा पद्धतीने हळूहळू सर्व प्राणिमात्रांवर अगाध प्रेम करण्यास शिकावे. येणेकरून चित्तातील कामक्रोध दबून जातात आणि मन एकाग्र होते.

---

१. विभंग ( P. T. S. ) पृष्ठ २७२

करुणेला प्रारंभ शत्रु आणि मित्र यांजपासून न करता मध्यस्थ मनुष्यापासून करावा. रस्त्यावर बसणारे भिकारी, रुग्णालयात असलेले रोगी, किंवा असेच अन्य सदृश मनुष्य पाहून त्यावर करुणेला आरंभ करावा. नंतर आवडत्या मनुष्यावर, नंतर शत्रूवर आणि नंतर स्वतःवर करुणा करावी. यांपैकी सध्या जरी कोणी दुःखी नसला, तरी दुःख हे सर्वांच्या मागे लागलेलेच आहे, कधीनाकधी व्याधिजरामरणाच्या योगे सर्व प्राणी करुणाजनक स्थितीत येतातच येतात, असा विचार करून सर्वांवर सारखीच करुणा उत्पन्न करावी.

मुदितेला आरंभ सदृश अतिप्रिय माणसापासून करावा. ज्याला पाहिल्याबरोबर आपणाला हर्ष होतो, आणि आपणाला पाहिल्याबरोबर ज्याला हर्ष होतो, अशा मनुष्यावर मुदितेला आरंभ करून नंतर क्रमशः मध्यस्थ आणि शत्रु यांवर मुदिता करून हळूहळू सर्व प्राणिमात्रांवर मुदिता करण्यास शिकावे. काही मनुष्य सध्या दुःखात पडलेले असले तरी कधीना कधी असा एक काळ होता की, ज्या वेळी ते अत्यन्त प्रमुदित स्थितीत होते, आणि असा एक काळ येण्याचा संभव आहे की, त्यावेळी आज विपन्नावस्थेत असलेले प्राणी अत्यंत आनंदित होतील, अशा रीतीने विचार करून सर्व प्राणिमात्रांवर मुदिता उत्पन्न करावी. सर्व प्राणी आपल्याप्रमाणेच प्रमुदित अंतःकरणाने परस्परांकडे पहात आहेत. आणि परस्परांशी वागत आहेत, असा सुन्दर देखावा डोळ्यासमोर उभा करून त्यांतच चित्त एकाग्र करावे व समाधि साधावी.

उपेक्षेला मध्यस्थ सदृश व्यक्तीपासून आरंभ करावा. नंतर प्रिय मनुष्यावर, नंतर शत्रूवर आणि नंतर स्वतःवर उपेक्षाभावना करावी. मुलगा एकटाच खेळत असता किंवा गाढ झोपला असता आई जशी त्याची उपेक्षा करते, त्याप्रमाणे सर्व प्राणिमात्रांविषयी जागृत उपेक्षा उत्पन्न करून समाधि साध्य करावी.

याप्रमाणे थोडक्यात या चार ब्रह्मविहारांचे विधान आहे. यासंबंधाने विशुद्धिमार्गांत फार विस्तार केला आहे. त्यांत मुख्य गोष्ट शत्रूवर या भावना कशा करता येतील ही आहे. आपणावर, मित्रावर किंवा मध्यस्थावर या भावना करण्यास विशेष परिश्रम पडत नाहीत, पण शत्रू डोळ्यासमोर

आल्याबरोबर चित्त चलबिचल होते. त्याला आवरून धरण्यासाठी बुद्धाच्या आणि साधुसंतांच्या उपदेशाचे आणि वर्तणुकीचे वारंवार मनन करावे. अशी उदाहरणे आणि उपदेश विशुद्धिमार्गात पुष्कळ दिले आहेत. त्याशिवाय ख्रिस्तासारख्याची उदाहरणे जगाच्या इतिहासात आहेतच. त्या सर्वांचे पुनः पुनः परिशीलन करून शत्रूविषयी या सर्व भावना करण्यास शिकावे.

मैत्रीभावनेचा जवळचा शत्रू म्हटला म्हणजे वैयक्तिक स्नेह होय. विवेकपूर्वक मैत्रीभावना न केल्यास एकाच व्यक्तीवर फाजील स्नेह जडण्याचा संभव असतो, आणि तसे झाले तर या भावनेपासून फायदा न होता हानीच होते. व्यक्ती अनित्य आहे आणि काही कारणाने ती आपल्या विरुद्ध गेली, आपणापासून विभक्त झाली, किंवा नाश पावली, म्हणजे आपणाला अतोनात दुःख होते. म्हणून मैत्रीचे पर्यवसान व्यक्तिगत स्नेहात होऊ नये यासाठी अत्यंत खबरदारी घेतली पाहिजे. द्वेष मैत्रीचा दूरचा शत्रू आहे. त्याला भिण्याचे कारण नाही. ज्याच्या चित्तांत मैत्रीचे अधिष्ठान झाले त्याला त्याच वेळी राग येण्याचा संभव नाही. म्हणून द्वेषापासून निर्भय राहून मैत्रीभावना करावी.

शोक हा करुणेचा आसन्न शत्रू आहे. करुणेचा अतिरेक झाला तर शोक उत्पन्न होतो. एका ख्रिस्तीपंथात अशी चाल आहे की, ज्या दिवशी ख्रिस्ताला क्रॉसवर खिळले, त्या दिवशी प्रार्थनेच्या वेळी सर्व समुदाय मोठमोठ्याने रडून जगासंबंधाने शोक करीत असतो; म्हणजे त्याच्या करुणेचे पर्यवसान शोकांत झाले आहे, हे स्पष्ट दिसून येते. अशा रीतीने करुणेचे पर्यवसान शोकांत होणे, ही तिची विपन्नावस्था आहे, असे जाणून शोकापासून करुणा मुक्त असावी याविषयी अत्यंत खबरदारी घ्यावी. दुसऱ्याला उपद्रव देण्याची बुद्धि हा करुणेचा फार दूरचा शत्रु आहे. ज्याच्या मनात करुणा उद्भवली तो मनुष्य त्याच वेळी जाणूनबुजून दुसऱ्या प्राण्याला त्रास देईल, हे संभवत नाही. म्हणून अशा त्रासदायक बुद्धीपासून निर्भय राहून करुणाभावना पुढे चालवावी.

हास्य मुदितेचा आसन्न शत्रु आहे. मुदिता विचारपूर्वक केली नाही तर भलत्याच प्रसंगी हास्य उत्पन्न होण्याचा संभव असतो, आणि असे झाले म्हणजे त्याची वेड्यांत गणना होण्यास उशीर लागत नाही. म्हणून

मुदिताभावना करणाऱ्याने मुदितेचे पर्यवसान हास्यात न होऊ देण्याविषयी खबरदारी घ्यावी. अरति किंवा असंतोष हा मुदितेचा फार दूरचा शत्रु आहे. ज्याच्या मनात मुदिता उद्भवली, तो त्याच वेळी असंतुष्ट होईल, हे संभवत नाही. म्हणून असंतुष्टीपासून निर्भय होऊन मुदिताभावना करावी.

अडाणी (अज्ञान) उपेक्षा उपेक्षाभावनेचा आसन्न शत्रु आहे. इकडे घराला आग लागली आहे आणि तिकडे काही लोक गप्पा मारीत बसले आहेत, अशा प्रकारच्या उपेक्षेला अडाणी उपेक्षा म्हणतात. ती खरी उपेक्षा नव्हे. व्यवहारात तिला आपण निष्काळजीपणा म्हणतो, आणि उपेक्षाभावनेचे अशा निष्काळजीपणात पर्यवसान होऊ देणे म्हणजे तिला विपन्नावस्थेत ढकलून देण्यासारखे आहे. म्हणून उपेक्षाभावना करणाऱ्याने निष्काळजीपणापासून अत्यंत सावध राहिले पाहिजे. व्यक्तिगतस्नेह उपेक्षेचा फार दूरचा शत्रु आहे. ज्याला थोडीशी उपेक्षा साधली, त्याचे मन व्यक्तिगत स्नेहात बद्ध व्हावयाचे नाही, मग ज्याला उपेक्षा पूर्णपणे साधली, तो स्नेहजाळात सांपडेल, हे अगदी अशक्य आहे. म्हणून स्नेहापासून निर्भय राहून उपेक्षाभावना करावी.

थोडक्यात सांगावयाचे म्हटले म्हणजे, द्वेषाचे उपशमन होणे ही मैत्रीची संपत्ति, आणि व्यक्तिगत स्नेहात बद्ध होणे ही विपत्ति. त्रासदायक बुद्धि नष्ट होणे ही करुणेची संपत्ति, व शोक उत्पन्न होणे ही विपत्ति. असंतोष नाश पावणे ही मुदितेची संपत्ति, आणि हास्यात पर्यवसान होणे ही विपत्ति. स्नेहापासून मुक्त होणे ही उपेक्षेची संपत्ति, आणि निष्काळजी-पणात पर्यवसान होणे ही विपत्ति. हे यथोचित जाणून आपले चित्त त्या त्या भावनेने संपन्न होईल असा प्रयत्न करावा.

या चार भावना पूर्णत्वाला पोचल्या की नाही हे जाणण्याची कसोटी ही की त्यांच्यात शत्रु, मित्र, उदासीन आणि आपण स्वतः या चार व्यक्तीत भेदभाव रहाता कामा नये. याला पालिभाषेत **सीमसंभेद** (सीमा मोडणे) असे म्हणतात. त्याचे उदाहरण विशुद्धिमार्गांत दिले आहे. ते असे :– समजा, आपण, आपला शत्रु, आपला मित्र आणि एक मध्यस्थ असे चार असामी एकत्र बसलो आहोत, आणि इतक्यात चोर येऊन त्यांपैकी एकाला बलिदानासाठी मागू लागले, आणि त्या प्रसंगी, आपणाला

घेऊन जा, शत्रूला घेऊन जा, मित्राला घेऊन जा, किंवा मध्यस्थाला घेऊन जा, असे आपण म्हणालो, तर आपणाकडून सीमसंभेद झाला नाही, असे समजावे. ह्याच अर्थ खालील गाथात सांगितला आहे:--

> अत्तनि हितमज्झत्ते अहिते च चतुब्बिधे ।
> यदा पस्सति नानत्तं हितचित्तो व पाणिनं ॥
> न निकाम लाभी मेत्ताय कुसली ति पवुच्चति ।
> यदा चतस्सो सीमायो संभिन्ना होन्ति भिक्खुनो ॥
> समं फरति मेत्ताय, सब्बं लोकं सदेवकं ।
> महाविसेसो पुरिमेन यस्स सीमा न ञायती ति ॥

प्राण्याच्या हितबुद्धीनेच आपणामध्ये, मित्रांमध्ये, मध्यस्थांमध्ये आणि शत्रूंमध्ये-- या चारात-- जोपर्यंत भेद पहातो आहे, तोपर्यंत त्याला मैत्रीचा पूर्ण लाभ झाला नाही; तो चांगला माणूस आहे एवढे म्हणता येईल. परंतु जेव्हां भिक्षूच्या या चारही सीमा मोडल्या जातात, तेव्हाच तो सदेवक सर्व जगावर समानभावाने मैत्रीभावना करतो, पहिल्यामध्ये आणि याच्यामध्ये हा मोठा विशेष आहे की, याच्या मैत्रीला मर्यादा दिसत नाही.

या चार भावनांपासून अनेक फायदे आहेत. त्यांचा थोडक्यात उल्लेख एकादसकनिपातांतील मेत्तसुत्तांत [१] आढळतो. त्या सुत्ताचे भाषांतर येणेप्रमाणे:--

असे मी ऐकले आहे. एके समयी भगवान् श्रावस्ती येथे जेतवनात अनाथपिण्डिकाच्या आरामात रहात होता. तेथे भगवान् भिक्षूंला उद्देशून म्हणाला की, "हे भिक्षुहो." 'भदन्त', असे त्या भिक्षूंनी भगवंताला उत्तर दिले. भगवान् म्हणाला, "भिक्षुहो, मैत्री या चित्तविमुक्तीची गोडी धरली, भावना केली, अभिवृद्धि केली, ती मार्गाला लावली, तिची स्थापना केली, तिचे अनुष्ठान केले, तिचा परिचय केला, उत्साहाने तिचा अंगीकार केला तर अकरा फायदे होतात. ते कोणते ? तो मनुष्य सुखाने निजतो; सुखाने उठतो; दुष्ट स्वप्न पहात नाही; मनुष्यांला प्रिय होतो; भूतपिशाच्यांना प्रिय होतो; देवता त्याचे रक्षण करतात; अग्नि, विष किंवा शस्त्र यांची त्यास

१. अंगुत्तरनिकाय ( P. T. S. ) भाग ५ पृष्ठ ३४२.

बाधा होत नाही. त्वरित चित्ताचे समाधान होते; मुखकांति प्रसन्न होते; शांतपणे मरण येते; निर्वाण नच मिळाले तर निदान मरणोत्तर ब्रह्मलोकाला जातो. भिक्षुहो, मैत्री या चित्तविमुक्तीची गोडी धरली, भावना केली, अभिवृद्धि केली, ती मार्गाला लावली, तिची स्थापना केली, तिचे अनुष्ठान केले, तिचा परिचय केला, उत्साहाने तिचा अंगीकार केला, तर हे अकरा फ़ायदे होतात." असे भगवान् बोलला. मुदित मनाने त्या भिक्षूंनी भगवंताच्या भाषणाचे अभिनंदन केले.

या सुत्तांत सांगितलेले फायदे जसे मैत्रीभावनेला लागू पडतात तसे ते करुणा, मुदिता आणि उपेक्षा, या तीन भावनांलाही लागू पडतात. या चार भावनांच्या फायद्यांसंबंधाने अंगुत्तरनिकायाच्या दसकनिपातात एक महत्त्वाचे सुत्त (नं. २०८) आहे. त्याचा सारांश असा:—

भगवान् म्हणाला, " विचारपूर्वक केलेल्या कर्मांचे फळ अनुभवल्याशिवाय त्यांचा अंत होत नाही; इहलोकी किंवा परलोकी त्यांचे फळ भोगावे लागते. आणखी, भिक्षुहो, ही कर्मे जाणल्याशिवाय दुःखाचा अंत होत नाही. भिक्षुहो, आर्यश्रावक अभिध्येपासून (लोभापासून), द्वेषापासून आणि मोहापासून मुक्त होऊन मोठ्या जागृत अंतःकरणाने मैत्रीसहगतचित्ताने .... करुणासहगतचित्ताने ... मुदितासहगतचित्ताने... उपेक्षासहगतचित्ताने एक दिशा, त्याचप्रमाणे दुसरी, तिसरी, चवथी दिशा, वर, खाली, चारी बाजू, सर्व भरून टाकतो; सर्व जग विपुल, महद्गत, अप्रमाण, अवैर, द्वेषरहित मैत्रीसहगतचित्ताने भरून टाकतो. तो जाणतो की, पूर्वी हे माझे चित्त भावना न केल्यामुळे आकुंचित होते, पण ते आता उत्तम रीतीने भावना केल्यामुळे अमर्यादित (अनंत) झाले आहे. जे काही मर्यादित कर्म माझ्या हातून घडले असेल, ते या अमर्यादित भावनेमुळे आता शिल्लक रहाणे शक्य नाही; ते या भावनेसमोर राहू शकणार नाही. भिक्षुहो, लहानपणापासून जर मनुष्याने मैत्रीचित्तविमुक्तीची...करुणा...मुदिता...उपेक्षाचित्तविमुक्तीची भावना केली तर त्याच्या हातून पाप होईल काय ? आणि जर पाप झाले नाही तर त्याला दुःख भोगावे लागेल काय ?"

भिक्षु म्हणाले, " भदंत, जर पापकर्म मुळीच केले नाही, तर दुःख कोठून उत्पन्न होणार ?"

भगवान् म्हणाला, "भिक्षुहो, या मैत्रीचित्तविमुक्तीची...... करुणा ...मुदिता... उपेक्षाचित्तविमुक्तीची स्त्रीने किंवा पुरुषाने अवश्य भावना करावी. स्त्रीने किंवा पुरुषाने असा विचार केला पाहिजे की, हा देह बरोबर घेऊन जाता येत नाही; चित्त तेवढे मर्त्य मनुष्याचे राहणार आहे."

मैत्री, करुणा आणि मुदिता या तीन भावनांमुळे पहिली तीनच ध्याने साध्य होतात, व उपेक्षाभावनेमुळे केवळ चवथे ध्यान मिळते, असे अभिधर्माचे म्हणणे आहे, आणि तेच बुद्धघोषाचार्याने पत्करले आहे. त्याच्या म्हणण्याप्रमाणे पहिली तीन ध्याने पहिल्या तीन भावनांपैकी एका भावनेने प्राप्त करून घेतल्यावर मग उपेक्षाभावनेला आरंभ करावयाचा असतो; व तिच्यामुळे केवळ चवथे ध्यान प्राप्त होते. पहिल्या तीन ध्यानात सुख असल्यामुळे उपेक्षावेदना राहणे शक्य नाही; व चवथ्या ध्यानात उपेक्षा असल्यामुळे सुख रहात नाही. उपेक्षाभावना आणि उपेक्षावेदना यांचे तादात्म्य केल्यामुळे अभिधर्मकाराने (किंवा–कारांनी) वरील विधान केले असावे. परंतु ते सुत्तपिटकाला, आणि व्यवहारालाही अनुसरून नाही. बोध्यंगसंयुत्ताच्या एका सुत्तात (नं. ५४) सातही बोध्यंगे या चार भावनांशी जोडली आहेत, भगवान् म्हणतो, "भिक्षुहो, एखादा भिक्षु मैत्री-सहगत स्मृतिसंबोध्यंग, धर्मप्रविचयसंबोध्यंग, वीर्य, प्रीति, प्रस्रब्धि, समाधि, उपेक्षासंबोध्यंग, यांची भावना करतो... करुणासहगत स्मृतिसंबोध्यंग... उपेक्षासंबोध्यंग यांची भावना करतो.... मुदितासहगत स्मृतिसंबोध्यंग.... उपेक्षासंबोध्यग, यांची भावना करतो... उपेक्षासहगत स्मृतिसंबोध्यंग.... उपेक्षासंबोध्यंग यांची भावना करतो."

या सुत्तावरून स्पष्ट होत आहे की, मैत्रीभावनेबरोबर उपेक्षा, व उपेक्षाभावनेबरोबर प्रीति राहू शकते. दुसरेही सुत्तपिटकांतील पुष्कळ उतारे देऊन हीच गोष्ट सिद्ध करता येणे शक्य आहे. परंतु विस्तारभयास्तव ते देण्यात येत नाहीत.

व्यावहारिकदृष्ट्या पाहिले तरी असे दिसून येते की, उपेक्षाभावने-बरोबर प्रीति रहाणे शक्य आहे. मूल धुळीत रांगत असताना आई त्याची प्रीतिपूर्वक उपेक्षा करीत नाही काय ? अर्थात या ज्या चार भावना आहेत त्या जगावर प्रेम करण्याचे चार उपाय आहेत; आणि त्या चार भावनांनी

चारही ध्याने मिळवता येणे शक्य आहे. दूध पिणाऱ्या मुलावर आई अत्यंत प्रेम किंवा मैत्री करते, आजारी मुलावर करुणा करते, तोच नाचू उडू लागला किंवा चांगला अभ्यास करू लागला म्हणजे त्यावर मुदिता करते, आणि स्वतंत्रपणे संसार करू लागला म्हणजे त्यावर उपेक्षा करते. या सर्वांवर तिचे कमीजास्त प्रेम असते असे नाही; परंतु त्या त्या अवस्थेत त्या प्रेमाचा विकास भिन्न भिन्न प्रकारे होत असतो. त्याचप्रमाणे जगाला बालक-तुल्य समजणाऱ्या योग्याचे मन भिन्न भिन्न प्रसंगी या चार भिन्न भावनांनी विकसित होत असते.

---

# ६

# अनुस्मृति, संज्ञा आणि व्यवस्थान

या पुस्तकाच्या तिसऱ्या प्रकरणात दिलेल्या विशुद्धिमार्गाच्या उताऱ्यात दहा अनुस्मृति एकत्र आल्या आहेत. पैकी आनापानस्मृति आणि कायगतास्मृति यांचा विचार अनुक्रमे तिसऱ्या आणि चवथ्या प्रकरणात केला गेल्यामुळे बाकी आठच अनुस्मृति राहतात. त्यांचा विचार या प्रकरणात करावयाचा आहे. या स्मृतींपैकी पहिल्या सहा सुत्तपिटकात अनेक ठिकाणी एकत्र सांपडतात. त्या उपासक आणि उपासिका यास उद्देशून सांगितल्या आहेत. सर्वांत प्रथम अर्थातच बुद्धानुस्मृति येते. तिचे आणि इतर पांचांचेही विधान मूळ पालि शब्दांसह येथे देत आहे.

**बुद्धानुस्मृतीचे** विधान असेः— इति पि सो भगवा अरहं सम्मासंबुद्धो विज्जाचरणसम्पन्नो सुगतो लोकविदू अनुत्तरो पुरिसदम्मसारथि सत्था देवमनुस्सानं बुद्धो भगवा ति ।

—याप्रमाणे तो भगवान् अरहन् सम्यक् संबुद्ध, विद्याचरणसंपन्न, लोकवित्, श्रेष्ठ, दमन करण्यास योग्य पुरुषांचा सारथि, देवांचा आणि मनुष्यांचा गुरु बुद्ध भगवान् आहे.

अशा रीतीने बुद्धगुणांचे ध्यान केले असता चित्ताला शांति मिळून ते एकाग्र होते. परंतु ही एकाग्रता प्रथमध्यानापर्यंत जाऊ शकत नसल्यामुळे तिला उपचारसमाधि म्हणतात. गावच्या किंवा नगराच्या आसन्न प्रदेशाला ग्रामोपचार किंवा नगरोपचार म्हणतात; त्याप्रमाणे ही समाधि ध्यानाच्या जवळ असल्याकारणाने हिला उपचारसमाधि म्हणतात. पण पहिल्या प्रकरणात आलेल्या चार ध्यानांना अर्पणा (अप्पना) समाधि म्हणतात. लहान मूल चालण्याचा प्रयत्न करीत असता जसे पुनः पुनः पडते तशी उपचारसमाधि फार वेळ टिकू शकत नाही; परंतु बळकट मनुष्य जसा दीर्घ काळ चालू शकतो, तशी अर्पणा समाधि पुष्कळ वेळ टिकते. तरी लहान मुलाचा

चालण्याचा प्रयत्न जसा त्याला चालण्याला समर्थ करतो, तसा योगी उपचारसमाधीच्या योगाने अर्पणा समाधि प्राप्त करून घेतो.

या भागात सांगितलेल्या सर्व कर्मस्थानांवर केवळ उपचारसमाधि साधता येते; कोणतेही ध्यान साधता येत नाही. याचे कारण हेच की, तन्मयता होण्याइतका दृश्य किंवा व्यापक विषय या कर्मस्थानात नाही. बुद्धाचे गुण निरनिराळे असल्यामुळे त्यांच्यावर ध्यान साधता येणे शक्य नाही. त्याचप्रमाणे इतर सात कर्मस्थानांची गोष्ट आहे. मरणस्मृति थोडीशी भिन्न आहे खरी, तरी मरण हा दृश्य किंवा व्यापक विषय नाही. अर्थात् त्याच्यात तन्मयता होणे शक्य नाही. इतरांप्रमाणे मरणस्मृतीमुळेही केवळ उपचारसमाधि साध्य होते. व्यवस्थान म्हणजे आभ्यंतरच्या पृथ्वी, आप्, तेज आणि वायु या चार धातूंचे व्यवस्थान. तेही असेच बिकट असल्यामुळे त्यावर उपचारसमाधि तेवढी मिळवता येते. संज्ञा म्हणजे आहार प्रतिकूल आहे अशी संज्ञा. हीही गोष्ट दृश्य किंवा व्यापक नाही. म्हणून तिची मजल उपचारसमाधीपलीकडे जात नाही.

**धर्मानुस्मृतीचे** विधान येणेप्रमाणे :— स्वाक्खातो भगवता धम्मो संदिट्ठिको अकालिको एहिपस्सिको ओपनयिको पच्चत्तं वेदितब्बो विञ्ञूही ति। —भगवंताचा धर्म उत्तम रीतीने प्रतिपादिलेला, ज्याच्यात सम्यक् दर्शन आहे, जो अकाल फलद, 'या आणि पहा' असे ज्यासंबंधाने म्हणता येईल, विचार करण्याला योग्य, सुज्ञांनी आभ्यंतरी अनुभविण्याला योग्य, असा आहे.

**संघानुस्मृतीचे** विधान येणेप्रमाणे:— सुपटिपन्नो भगवतो सावकसंघो, उजुपटिपन्नो भगवतो सावकसंघो, ञायपटिपन्नो भगवतो सावकसंघो, सामीचिपटिपन्नो भगवतो सावकसंघो, यदिदं चत्तारि पुरिसयुगानि अट्ठ पुरिसपुग्गला, एस भगवतो सावकसंघो आहुनेय्यो पाहुनेय्यो दक्खिणेय्यो अञ्जलिकरणीयो अनुत्तरं पुञ्ञक्खेत्तं लोकस्सा ति।

—भगवंताचा श्रावकसंघ उत्तम मार्गाने चालणारा, सरळ मार्गाने चालणारा, न्याय्य मार्गाने चालणारा व योग्य मार्गाने चालणारा आहे. त्यांच्यात व्यक्तींच्या (सोतापन्नादिक) चार जोड्या आहेत, आणि एकंदरीत आठ व्यक्ती आहेत. भगवंताचा श्रावकसंघ आवहनीय, पाहुणचाराला योग्य, दक्षिणेला योग्य, आणि अंजलि करण्याला योग्य आहे; हे जगाचे श्रेष्ठ पुण्यक्षेत्र आहे.

व्यक्तींच्या चार जोड्या म्हणजे स्रोतआपत्तिमार्गावर असलेली व स्रोतआपत्तिफल प्राप्त करून घेतलेली, या दोन व्यक्तींची एक जोडी; सकृदागामिमार्गावर असलेली व सकृदागामिफल प्राप्त करून घेतलेली, या दोन व्यक्तींची एक जोडी; अनागामिमार्गावर असलेली व अनागामिफल प्राप्त करून घेतलेली, या दोन व्यक्तींची एक जोडी; आणि अर्हन्मार्गावर असलेली व अर्हत्फल प्राप्त करून घेतलेली, या दोन व्यक्तींची एक जोडी. अशा या चार जोड्या व एकंदरीत आठ व्यक्ती होतात. विशेष माहितीसाठी 'बुद्ध, धर्म आणि संघ' परिशिष्ट २ पहा.

**शीलानुस्मृतीचे** विधान येणेप्रमाणेः—अरियसावको अत्तनो सीलानि अनुस्सरति अखण्डानि अच्छिद्दानि असबलानि अकम्मासानि भुजिस्सानि विञ्ञुपसट्ठानि अपरामट्ठानि समाधिसंवत्तनिकानि ।
—आर्यश्रावण आपली अखण्ड, अच्छिद्र, डाग नसलेली, कबरी न झालेली, स्वतंत्र, सुज्ञानी वर्णिलेली, अपरामृष्ट आणि समाधि उत्पन्न करणारी शीले अनुस्मरतो.

अखंड आणि अच्छिद्र यांचा अर्थ स्पष्टच आहे. असबल याचा अर्थ डाग नसलेली असा केला आहे. एखाद्या तांबड्या गाईवर मध्येच मोठा पांढरा डाग असावा, किंवा पांढऱ्या गाईवर तांबडा डाग असावा, त्या गाईला सबल ( शबल ) म्हणतात; त्याप्रमाणे ज्या आर्य श्रावकाच्या शीलांत मध्येच एखाद्या शीलाचे पालन नीट न झाल्यामुळे खंड पडला आहे, त्याच्या शीलाला शबल म्हणतात. ज्याची शीले मध्ये मध्ये भिन्न झाली आहेत त्याच्या शीलाला कल्माष किंवा कबरी शीले म्हणतात. भुजिष्य किंवा स्वतंत्र शीले म्हणजे ज्या शीलांच्यायोगे मनुष्य इहलोकींच्या किंवा परलोकींच्या भोगांची प्रार्थना करीत नसतो. जी तृष्णेच्या दास्यापासून मुक्त आहेत ( तण्हादासव्यतो मोचेत्वा भुजिस्सभावकरणेन भुजिस्सानि ). परामृष्ट म्हणजे अपवित्र किंवा निंद्य. तृष्णा आणि मिथ्यादृष्टि यांच्या योगाने अपवित्र झाली नाहीत, अथवा, तुझे शील असे तसे बिघडले आहे असे कोणी म्हणू शकणार नाही, अशा प्रकारची जी शीले ती अपरामृष्ट होत.

या शीलांच्या अनुस्मृतीचा फायदा हा की, प्रथमतः आपले शील अत्यंत परिशुद्ध ठेवण्याचा सावधानपणा ठेवला पाहिजे. आणि त्याच्यावर

ध्यान केले असता उपचारसमाधी प्राप्त होते. एवढेच नव्हे, तर आमरण आपले शील शुद्ध ठेवण्याचा दृढ निश्चय वृद्धिंगत होतो.

**त्यागानुस्मृतीचे** विधान येणेप्रमाणे:— अरियसावको अत्तनो चागं अनुस्सरति लाभा वत मे सुलद्धं वत मे योऽहं मच्छेरमलपरियुट्ठिताय पजाय विगतमलमच्छेरेन चेतसा अगारं मज्झावसामि मुत्तचागो पयतपाणि वोस्सग्गरतो याचयोगो दानसंविभागरतो ति।
—आर्यश्रावक आपला त्याग अनुस्मरतो:— हा मला अलभ्य लाभ आहे, जो मी मात्सर्यमलाने भरलेल्या जगात मात्सर्यापासून मुक्त झालेल्या चित्ताने मुक्तत्याग, सिद्धहस्त, दानरत, याचकप्रिय आणि दानसंविभागरत होऊन गृहस्थाश्रमात रहातो.

'चेतसा अगारं अज्झावसामि' याच्याबद्दल विशुद्धिमार्गात 'चेतसा विहरामि' असा फरक केला आहे. त्याचे कारण ही स्मृति भिक्षूंनाही उपयोगी पडावी असा ग्रंथकाराचा हेतु आहे. आरंभी या स्मृती केवळ उपासक आणि उपासिका यांच्यासाठीच असत. परंतु बुद्धघोषाचार्यांच्या वेळी त्या भिक्षूंनाही लागू करण्यात आल्या, व त्यामुळे वरील फरक करावा लागला.

त्यागानुस्मृतीचा फायदा हा की, प्रथमतः मात्सर्यविरहित शुद्ध मनाने आर्यश्रावकाने दानधर्म करण्यास शिकले पाहिजे. यायोगे त्याचा अहंकार कमी होऊन मनुष्यजातीवर निष्काम प्रेम करण्याचे सामर्थ्य वाढत जाते; आणि ज्या ज्या वेळी तो अशा शुद्ध आत्मयज्ञाचे स्मरण करतो त्या त्या वेळी त्याला उपचारसमाधि मिळते, एवढेच नव्हे, तर सत्कार्यासाठी देहत्याग करण्यालाही त्याच्या मनाची तयारी होत जाते.

**देवतानुस्मृतीचे** विधान येणेप्रमाणे:— अरियसावको देवतानुस्सतिं भावेति— सन्ति देवा चातुम्महाराजिका, सन्ति देवा तावतिंसा, सन्ति देवा यामा, सन्ति देवा तुसिता, सन्ति देवा निम्मानरतिनो, सन्ति देवा परनिम्मितवसवत्तिनो, सन्ति देवा ब्रह्मकायिका, सन्ति देवा तदुत्तरि। यथारूपाय सद्धाय समन्नागता ता देवता इतो चुता तत्थ उपपन्ना, मय्हम्पि तथारूपा सद्धा संविज्जति,। यथारूपेन सीलेन समन्नागता ता देवता इतो चुता तत्थ उपपन्ना, मय्हम्पि तथारूपं सीलं संविज्जति,। यथारूपेन सुतेन समन्नागता ता देवता इतो चुता तत्थ उपपन्ना, मय्हम्पि तथारूपं सुतं संविज्जति।

यथारूपेन चागेन समन्नागता ता देवता इतो चुता तत्थ उपपन्ना, मय्हम्पि तथारूपो चागो संविज्जति । यथारूपाय पञ्ञाय समन्नागता ता देवता इतो चुता तत्थ उपपन्ना, मय्हम्पि तथारूपा पञ्ञा संविज्जती ति ।

—आर्यश्रावक देवतानुस्मृतीची भावना करतो—चतुर्माहाराजिक देवता आहेत, तावत्रिंशत् देवता आहेत, याम देवता आहेत, तुषित देवता आहेत, निर्माणरति देवता आहेत, परनिर्मितवशवर्ती देवता आहेत, ब्रह्मकायिक देवता आहेत, आणि त्याहूनही वरच्या पायरीच्या देवता आहेत; ज्या प्रकारच्या श्रद्धेने युक्त होऊन त्या देवता त्या त्या लोकीं उत्पन्न झाल्या त्या प्रकारची श्रद्धा माझ्या अंगी आहे; ज्या प्रकारच्या शीलाच्यायोगे त्या देवता त्या त्या लोकी उत्पन्न झाल्या तशा प्रकारचे शील माझ्या अंगी आहे; ज्या प्रकारच्या श्रुताच्यायोगे... ज्या प्रकारच्या त्यागाच्यायोगे...ज्या प्रकारच्या प्रज्ञेच्या-योगे त्या देवता त्या त्या लोकी उत्पन्न झाल्या तशा प्रकारची प्रज्ञा माझ्या अंगी आहे.

श्रद्धा, शील, श्रुत, त्याग, आणि प्रज्ञा हे पाच गुण देवतानुस्मृतीत मुख्य आहेत; ही त्या स्मृतीची कसोटी आहे. बुद्धधर्म नास्तिक आहे, अशी कित्येकांची समजूत आहे. 'कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम्' अशा तऱ्हेची सर्वशक्तिमान् व्यक्ती हे जग चालवीत आहे ही समजूत बौद्धांला पसंत नाही. हे जग नियमाप्रमाणे चालले आहे. आगीत हात घातला तर तो जळणारच; त्याप्रमाणे पापकर्मे केली असता केवळ देवाच्या प्रार्थनेने त्यांपासून मुक्तता होणे शक्य नाही. त्यांच्या निराकरणार्थ अष्टांगिक मार्गाचाच अवलंब केला पाहिजे. तरीपण बौद्धांच्या दृष्टीने इष्ट देवतेचे स्मरण त्याज्य नाही. पण ते ऐहिक लाभासाठी असता कामा नये. अशा देवतेला समोर ठेवून तिचे चिंतन केले असता जर आपली श्रद्धा, आपले शील, श्रुत, आपला त्याग आणि आपली प्रज्ञा वृद्धिंगत होत असली, तर त्या देवतेचे चिंतन किंवा अनुस्मरण गृहस्थाने अवश्यमेव करावे.

या सहा अनुस्मृती आरंभी केवळ गृहस्थाश्रमी लोकांसाठी होत्या, हे वरील विवेचनावरून स्पष्टच दिसून येईल. पण हळू हळू आनापानस्मृति, कायगतास्मृति किंवा मैत्रीकरुणादिक भावना मागे पडून या अनुस्मृतींलाच महत्त्व येत चालले. विशेषतः पहिली बुद्धानुस्मृति आणि शेवटली देवतानु-

स्मृति या दोहोंला फारच महत्त्व आले. महायान पंथांत तर त्यांचा अतिरेक झाला असे म्हणण्यास हरकत नाही. बुद्धाच्या आणि भिन्न भिन्न देवतांच्या नांवाचा जप, मंत्र तंत्र, देवतांवर ध्यान, या सर्वांचा उगम आरंभी अत्यंत सरळ दिसणाऱ्या या अनुस्मृतीपासून झाला आहे. होता होता श्रद्धाशीलादिक सद्‌गुण संपादण्याऐवजी जारणमारणादिक आसुरी शक्ति उत्पन्न करण्याच्या कामीही अशा अनुस्मृतींचा उपयोग होऊ लागला. मंत्रतंत्रांचा उगम अथर्ववेदांत आहे. तरी आधुनिक मंत्रप्रयोगांना जे निराळेच वळण लागले त्याचा उगम या साध्या अनुस्मृतींत असावा अशी माझी समजूत आहे.

   

**मरणस्मृतीचे** विधान अंगुत्तरनिकायाच्या छक्कनिपातांत (सुत्त नं. २०) सापडते. त्या सुत्ताचा सारांश असा :—

भगवान् म्हणाला, " भिक्षुहो, मरणस्मृतीची भावना केली असता महत्फलदायक आणि निर्वाणाला नेणारी होते : ती कशी ? एखादा भिक्षु दिवस संपल्यानंतर रात्रीला आरंभ झाला असता असा विचार करतो की, पुष्कळ कारणांनी मला मरण येणे शक्य आहे. मला एखादा साप, विंचू, किंवा शतपदी चावेल आणि त्यायोगें मरण येईल. आणि (धर्ममार्गात) अंतराय घडेल. कदाचित् मी ठेंच लागून पडेन, मला अजीर्ण होईल, पित्त, कफ आणि वात यांचा प्रकोप होईल, व या कारणांनी मला मरण येईल, आणि अंतराय घडेल. त्याने असा विचार करावा की माझ्या अंतःकरणांत पापकारक अकुशल मनोवृत्ती अद्यापि आहेत की काय, ज्यांच्यायोगे आजच्या रात्री मरण आले असता मला अंतराय घडेल. जर त्याला अशा मनोवृत्ती अंतःकरणात आहेत असे दिसून आले, तर त्यांच्या नाशासाठीं त्याने अत्यंत प्रयत्न करावा, अत्यंत उत्साह बाळगावा, सावधपणे वागावे. एखाद्या माणसाच्या वस्त्राने पेट घेतला किंवा त्याच्या डोक्यावर आग लागली, तर ती विझविण्यासाठी तो जसा अत्यंत प्रयत्न करील, अत्यंत उत्साह बाळगील, सावधपणे वागेल, त्याप्रमाणे या भिक्षूने वागावे. पण जर त्याच्या अंतःकरणात अशा मनोवृत्ती नसतील तर त्याने आनंदित व्हावे आणि

कुशल मनोवृत्ती संपादण्याविषयी सदोदित दक्ष असावे. रात्र संपल्यानंतर दिवसाला आरंभ झाला असता त्याने अशाच रीतीने मरणस्मृतीची भावना करावी. याप्रमाणे भावना केली असतां ती महत्फलदायक आणि निर्वाणाला पोंचविणारी होते. ”

या स्मृतीची तीव्रता कोठपर्यंत वाढवावी हे याच छक्कनिपाताच्या एकोणिसाव्या सुत्तात दर्शविले आहे. एके प्रसंगी भगवंताने मरणस्मृतीची स्तुती केली असता एक भिक्षु म्हणाला, “ भदंत, मी मरणस्मृतीची भावना करीत असतो.” “ ती कशा प्रकारे ? ” असा भगवंतानें प्रश्न केला, तेव्हा तो म्हणाला, “ मी जर सबंध दिवसरात्र जगलो, आणि भगवंताच्या धर्माचे चिंतन करूं शकलो तर पुष्कळच झाले, असा मी विचार करतो, व याप्रमाणें मरणस्मृतीची भावना करतो.” त्यावर दुसरा भिक्षु म्हणाला, “ भदंत, मी दिवसभर जगलो आणि भगवंताच्या धर्माचे चिंतन करू शकलो तर पुष्कळ झाले, असा विचार करतो, व याप्रमाणे मरणस्मृतीची भावना करतो. ” तिसरा म्हणाला, “ मी जेवण्याच्या काळापर्यंत जगलों आणि भगवंताच्या धर्माचे चिंतन करू शकलो तर पुष्कळ झाले, असा विचार करतो, व याप्रमाणे मरणस्मृतीची भावना करतो. ” चवथा म्हणाला, “ भदंत, चार पाच घास खाण्याला लागणाऱ्या काळापर्यंत मी जगलो, व भगवंताच्या धर्माचे चिंतन करू शकलो तर पुष्कळ झाले, असा विचार करतो, व याप्रमाणे मरणस्मृतीची भावना करतो. ” पाचवा म्हणाला, “ भदंत, मी एक घास खाईपर्यंत जगलो, व भगवंताच्या धर्माचे .... इत्यादि. ” सहावा म्हणाला, भदंत, मी आश्वास घेऊन प्रश्वास सोडीपर्यंत किंवा प्रश्वास सोडून आश्वास घेईपर्यंत जगलो व भगवंताच्या धर्माचे...इत्यादि. ” त्यावर भगवान् म्हणाला, “ पूर्वीचे चार भिक्षु निष्काळजीपणे वागतात असे म्हटले पाहिजे. पण हे शेवटले दोन अप्रमत्तपणे वागत असून मरणस्मृतीची तीव्र भावना करीत आहेत असे समजावे. ”

बुद्धघोषाचार्याने या मरणस्मृतीवर बराच विस्तार केला आहे. तरी मुद्याच्या सर्व गोष्टी वरील दोन सूत्रांत आल्याच आहेत. या स्मृतीने केवळ उपचारसमाधि साध्य होते. तिच्यापासून मोठा फायदा हा की, मनुष्य अत्यंत कार्यदक्ष बनतो. क्षणोक्षणी आपणाला मरण येण्याचा संभव आहे

अशी स्मृति जागृत असली, तर कोणता सुज्ञ मनुष्य आळसात संतोष मानील ? किंवा आपल्या मनातील पापमळ धुऊन काढण्यास दक्ष रहाणार नाही.

**उपशमानुस्मृतीचे** विधान सुत्तपिटकात सांपडत नाही. तिचा उल्लेख तेवढा सापडतो. अर्थात् येथे बुद्धघोषाचार्याच्या अनुरोधानेच या अनुस्मृतीचे विधान सांगणे प्राप्त आहे. आचार्यांचे म्हणणे की, उपशम म्हणजे निर्वाण आणि त्याचे गुण स्मरण करावयाचे; ते येणेप्रमाणे:– यावता भिक्खवे, धम्मा संखता वा असंखता वा विरागो तेसं धम्मानं अग्गमक्खायति यदिदं मदनिम्मदनो पिपासविनयो आलयसमुग्धातो वट्टुपच्छेदो तण्हाक्खयो विरागो निरोधो निब्बानं ति। भिक्षुहो, मिश्रित किंवा अमिश्रित धर्मात (पदार्थांत) मदाचे निर्मदन करणारा, तहान भागविणारा, आसक्तीचा घात करणारा, पुनर्जन्माचा नाश करणारा, तृष्णेचा क्षय करणारा असा विराग, असा निरोध–निर्वाण–श्रेष्ठ आहे.

अशा रीतीने निर्वाणगुणाचे चिंतन केले असता मनाला शांति मिळून उपचारसमाधि प्राप्त होते. वात, पित्त आणि कफ या त्रिदोषांनी जशी शरीराची प्रकृति बिघडते तद्वत् लोभ, द्वेष आणि मोह, या त्रिदोषांनी मनाची बिघडत असते त्या त्रिदोषांपासून मुक्त अशी जी स्थिती, तिचे सतत चिंतन केले असता मनाला शांति मिळणे साहजिक आहे. या भावनेचा फायदा हा की, ज्या ज्या वेळी मनुष्य प्रापंचिक संतापाने संतप्त होतो, त्या त्या वेळी, या संतापाला शांत करणारी अशी एक श्रेष्ठ शक्ति जगामध्ये आहे, या भावनेने त्याचे मन निवते, व ती स्थिती प्राप्त करून घेण्याचा उत्साह वृद्धिंगत होतो.

   

**संज्ञा** म्हणजे आहाराविषयी प्रतिकूल संज्ञा, हे वर सांगितलेच आहे. हिचेही विधान सुत्तपिटकात सापडत नाही. बुद्धघोषाचार्याने जे काही लिहिले आहे त्याचा सारांश एवढाच की, आहाराविषयी मनुष्याला अनेक खटपटी कराव्या लागतात, आणि तो आहार एकदाचा या शरीरात गेल्याबरोबर अत्यंत गलिच्छ होऊन जातो. अशा रीतीने आहारात प्रति-

कूलता पाहिली म्हणजे तो मनुष्य जिह्वालोलुप होत नाही; आहाराविषयी निःस्पृह रहातो; व या चिंतनाने त्याच्या मनाला उपचारसमाधि मिळते.

   

**व्यवस्थान** म्हणजे शरीरांतर्गत चार महाभूताचे पृथक्करण याचा अंतर्भाव कायगतास्मृतीत (पांचव्या कलमात) झालाच आहे. तरी पण विशुद्धिमार्गात हे एक निराळेच कर्मस्थान सांगितले आहे. त्याचें विधान असे की, शरीरातील अस्थिचर्मादिक जे कठीण भाग आहेत, ते पृथ्वी समजून त्यांचा एक विभाग करावा. पित्तश्लेष्मादिक विभागात पाण्याचा अंश जास्त आहे, म्हणून त्यांचा आपोधातूत अंतर्भाव करावा. अंगातील उष्णता तेजोधातु समजावी; व आश्वासप्रश्वासादिकांना वायुधातूत घालावे. येणेप्रमाणे चार विभाग करून शरीराचे निरीक्षण केले असता हे कर्मस्थान साध्य होते. पण याचा विषय दृश्य किंवा व्यापक नसल्याकारणाने व पुनःपुन्हा चार विभागांकडे लक्ष गेल्याकारणाने, याच्यायोगे ध्यान प्राप्त होत नाही; केवळ उपचारसमाधि साध्य होते. याचा मुख्य फायदा असा की, मनुष्याला इतर प्राण्यासंबंधी जी आसक्ति किंवा भय उत्पन्न होते ते होत नसते. सगळे प्राणी जर या चार महाभूतांचेच बनलेले आहेत, तर त्यांविषयी आसक्ति तरी कशाला? किंवा त्यांचे भय तरी बाळगा कशाला? अशा रीतीने अनासक्त आणि निर्भय होऊन लोकांत संचार करणाऱ्या माणसाच्या हातून स्वपरकल्याण विशेष घडेल यांत शंका कोणती?

   

तिसऱ्या प्रकरणाच्या आरंभी दिलेल्या यादीत एक संज्ञा व एक व्यवस्थान ही दोन कर्मस्थाने अगदी शेवटी आली आहेत, ती या प्रकरणात देण्याचे कारण हे की, येथे दिलेल्या आठ अनुस्मृतींच्यायोगे जशी केवळ उपचारसमाधि साधते, तशी ती यांच्याही योगे साधते. त्या दृष्टीने पहाता यांना या प्रकरणात घालणे योग्य दिसले. ही दहाही कर्मस्थाने ध्यान साध्य करू शकत नाहीत. तरी पण व्यावहारिक माणसाला त्यांजपासून बरेच फायदे आहेत. ते त्या त्या प्रसंगी वर्णिलेच आहेत.

---

# ७

## कसिणें

**कसिण** हा पालि शब्द कृत्स्न या शब्दापासून आला आहे. संस्कृत अत्यंत बिकट व त्या मानाने पालि सोपा वाटल्यावरून या भागांत कसिण हाच शब्द वापरण्यात येत आहे. कसिणांची उत्पत्ति महापरिनिब्बानसुत्तांत सांगितलेल्या आठ अभिभायतनांपासून झाली असावी. ही आयतने दीघ-निकायात तीन ठिकाणी व अंगुत्तरनिकायांत तीन ठिकाणी सांपडतात;[१] त्यावरून एका काळी या आयतनांना फार महत्त्व होते असे वाटते. धम्म-संगणीच्या कर्त्याने कसिणे प्रथमतः घातली आहेत, तरी ही आठ आयतने वगळली नाहीत. कसिणांमागोमाग त्याने यांचाही निर्देश केला आहे. बुद्धघोषाचार्यांच्या वेळी मात्र ही आयतने मागे पडून कसिणे पुढे आली असावी. असा प्रकार का घडला याचा विचार करण्यापूर्वी अभिभायतने कोणती व त्यांचे विधान काय याचा निर्देश करणे योग्य आहे.

१. अज्झत्तं रूपसञ्ञी एको बहिद्धा रूपानि पस्सति परित्तानि सुवण्ण–दुब्बण्णानि, तानि अभिभुय्य जानामि पस्सामीति एवंसञ्ञी होति, इदं पठमं अभिभायतनं ।

— आभ्यंतरी रूप आहे असा विचार करून एखादा मनुष्य बाह्यसृष्टीतील सुवर्ण किंवा दुर्वर्ण परिमित रूपें पहातो, आणि त्यांचे अभिभवन करून मी जाणतो आणि पहातो अशा बुद्धीने वागतो. हे पहिले अभिभ्वायतन होय.

२. अज्झत्तं रूपसञ्ञी एको बहिद्धा रूपानि पस्सति अप्पमाणानि सुवण्ण–दुब्बण्णानि, तानि अभिभुय्य जानामि पस्सामीति एवंसञ्ञी होति, इदं दुतियं अभिभायतनं ।

---

१. दीघनिकायत महापरिनिब्बानसुत्त, संगीतिसुत्त, व दसुत्तरसुत्त या तीन सुत्तांत, आणि अंगुत्तर निकायांत एककनिपात, अट्ठकनिपात व दसकनिपात या तीन निपातांत ही आठ आयतने सांपडतात.

—आभ्यंतरी रूप आहे असा विचार करून एखादा मनुष्य बाह्यसृष्टीतील सुवर्ण किंवा दुर्वर्ण अपरिमित रूपें पहातो, आणि त्यांचे अभिभवन करून मी जाणतो आणि पहातो अशा बुद्धीने वागतो. हे दुसरे अभिभ्वायतन होय.

३. अज्झत्तं अरूपसञ्ञी एको बहिद्धा रूपानि पस्सति परित्तानि सुवण्णदुब्बण्णानि, तानि अभिभुय्य जानामि पस्सामीति एवंसञ्ञी होति, इदं ततियं अभिभायतनं ।

—आभ्यंतरी रूपाचा विचार न करता एखादा मनुष्य बाह्यसृष्टींतील सुवर्ण किंवा दुर्वर्ण परिमित रूपें पहातो, आणि त्यांचे अभिभवन करून मी जाणतो आणि पहातो अशा बुद्धीने वागतो. हे तिसरे अभिभ्वायतन होय.

४. अज्झत्तं अरूपसञ्ञी एको बहिद्धा रूपानि पस्सति अप्पमाणानि सुवण्ण-दुब्बण्णानि, तानि अभिभुय्य जानामि पस्सामीति एवंसञ्ञी होति, इदं चतुत्थं अभिभायतनं ।

—आभ्यंतरी रूपाचा विचार न करतां एखादा मनुष्य बाह्यसृष्टींतील सुवर्ण किंवा दुर्वर्ण अपरिमित रूपें पहातो; आणि त्यांचे अभिभवन करून मी जाणतो आणि पहातो अशा बुद्धीने वागतो. हे चवथे अभिभ्वायतन होय.

५. अज्झत्तं अरूपसञ्ञी एको बहिद्धा रूपानि पस्सति नीलानि नीलवण्णानि नीलदस्सनानि नीलनिभासानि—सेय्यथा पि नाम उम्मापुप्फं नीलं नीलवण्णं नीलनिदस्सनं नीलनिभासं—सेय्यथा वा पन तं वत्थं बाराणसेय्यकं उभतोभागविमट्ठं नीलं नीलवण्णं नीलनिदस्सनं नीलनिभासं—एवमेव अज्झत्तं अरूपसञ्ञी एको बहिद्धा रूपानि पस्सति नीलानि नीलवण्णानि नीलनिदस्सनानि नीलनिभासानि, तानि अभिभुय्य जानामि पस्सामीति एवसञ्ञी होति, इदं पञ्चमं अभिभायतनं ।

—आभ्यंतरी रूपाचा विचार न करता एखादा मनुष्य बाह्यसृष्टींतील नीलवर्ण रूपें पहातो——उदाहरणार्थ उमापुष्प[१] किंवा दोन्ही बाजूला इस्तरी केलेले

१. उम्मापुप्फ याचे हे भाषांतर आहे. अमरकोशांत 'अतसी स्यादुमा क्षुमा' असे म्हटले आहे. टीकाकार महेश्वर भट्ट ही तीन नांवे 'जवस इति ख्यातस्य धान्यभेदस्य' असे म्हणतो. जवसाचे फूल निळे असते की नाही हे मला ठाऊक नाही.

वाराणसीचे निळे वस्त्र—-याप्रमाणे आभ्यंतरी रूपाचा विचार न करता बाह्य-सृष्टीतील नीलवर्ण ( सुंदर ) रूपें पहातो; आणि त्यांचे अभिभवन करून मी जाणतो आणि पहातो अशा बुद्धीने वागतो. हे पांचवे अभिभ्वायतन होय.

६. अज्झत्तं अरूपसञ्ञी एको बहिद्धा रूपानि पस्सति पीतानि पीतवण्णानि पीतनिदस्सनानि पीतनिभासानि—सेय्यथा पि नाम कणिकारपुप्फ पीतं पीतवण्णं पीतनिदस्सनं पीतनिभासं—सेय्यथा वा पन तं वत्थं बाराण-सेय्यकं उभतोभागविमट्ठं पीतं... एवमेव अज्झत्तं अरूपसञ्ञी एको बहिद्धा रूपानि पस्सति पीतानि पीतवण्णानि पीतनिदस्सनानि पीतनिभासानि, तानि अभिभुय्य जानामि पस्सामीति एवंसञ्ञी होति, इदं छट्ठं अभिभायतनं। —आभ्यंतरी रूपाचा विचार न करता एखादा मनुष्य बाह्यसृष्टीतील पीतवर्ण रूपे पहातो — उदाहरणार्थ कर्णिकारपुष्प किंवा दोन्ही बाजूला इस्तरी केलेले वाराणसीचे पिवळे वस्त्र — याप्रमाणे आभ्यंतरी रूपाचा विचार न करता बाह्यसृष्टीतील पीतवर्ण ( सुंदर ) रूपे पहातो; आणि त्याचे अभिभवन करून मी जाणतो आणि पहातो अशा बुद्धीने वागतो. हे सहावे अभिभ्वा-यतन होय.

७. अज्झत्त अरूपसञ्ञी एको बहिद्धा रूपानि पस्सति लोहितकानि लोहितकवण्णानि लोहितकनिदस्सनानि लोहितकनिभासानि-- सेय्यथा पि नाम बन्धुजीवकपुप्फं लोहितकं लोहितकवण्णं लोहितकनिदस्सनं लोहितक-निभासं—सेय्यथा वा पन तं वत्थं बाराणसेय्यकं उभतोभागविमट्ठं लोहितकं लोहितकवण्णं लोहितकनिदस्सनं लोहितकनिभासं—एवमेव अज्झत्तं अरूप-सञ्ञी एको बहिद्धा रूपानि पस्सति लोहितकानि लोहितकवण्णानि लोहितकनिदस्सनानि लोहितकनिभासानि, तानि अभिभुय्य जानामि पस्सा-मीति एवंसञ्ञी होति, इदं सत्तमं अभिभायतनं।
—आभ्यंतरी स्वरूपाचा विचार न करता एखादा मनुष्य बाह्यसृष्टीतील रक्तवर्ण रूपे पहातो— उदाहरणार्थ बन्धुजीवकपुष्प किंवा दोन्ही बाजूला इस्तरी केलेले वाराणसीचे तांबडे वस्त्र—याप्रमाणे आभ्यंतरी रूपाचा विचार न करता एखादा मनुष्य बाह्यसृष्टीतील रक्तवर्ण ( सुंदर ) रूपे पहातो; आणि त्यांचे अभिभवन करून मी जाणतो आणि पहातो. अशा बुद्धीने वागतो, हे सातवे अभिभ्वायतन होय.

८. अज्झत्तं अरूपसञ्ञी एको बहिद्धा रूपानि पस्सति ओदातानि ओदातवण्णानि ओदातनिदस्सनानि ओदातनिभासानि–सेय्यथा पि नाम ओसधितारका ओदाता ओदातवण्णा ओदातनिदस्सना ओदातनिभासा–सेय्यथा वा पन तं वत्थं बाराणसेय्यकं उभतोभागाविमट्ठं ओदातं ओदातवण्णं ओदातनिदस्सनं ओदातनिभासं– एवमेव अज्झत्तं अरूपसञ्ञी एको बहिद्धा रूपानि पस्सति ओदातानि ओदातवण्णानि ओदातनिदस्सनानी ओदातनिभासानि, तानि अभिभुय्य जानामि पस्सामीति, एवंसञ्ञी होति, इदं अट्ठमं अभिभायतनं ।

–आभ्यंतरी रूपाचा विचार न करता एखादा मनुष्य बाह्यसृष्टीतील शुभ्रवर्ण रूपे पहातो–उदाहरणार्थ ओषधितारका* किंवा दोन्ही बाजूला इस्तरी केलेले वाराणसीचे पांढरे वस्त्र–याप्रमाणे आभ्यंतरी रूपाचा विचार न करता एखादा मनुष्य बाह्यसृष्टीतील शुभ्रवर्ण ( सुंदर ) रूपे पहातो. आणि त्याचे अभिभवन करून मी जाणतो आणि पहातो अशा बुद्धीने वागतो. हे आठवे अभिभ्वायतन होय.

बौद्ध धर्माची स्थापना झाल्यानंतर बऱ्याच वर्षांपर्यंत भिक्षूला रहाण्यास विहार नसत. ते कोठे तरी एखाद्या उपवनात किंवा जंगलात पर्णकुटिकेत रहात असत. अनाथपिण्डिकाच्या आरामासारखे जे थोडे बहुत विहार बुद्धाच्या हयातीत अस्तित्वात आले होते, त्यांतही भिक्षु चातुर्मास्याचे तेवढे चार महिने रहात असत; बाकी आठ महिने इतस्ततः संचार करून धर्मोपदेश करीत असत. अशा वेळी विशुद्धिमार्गांत सांगितलेली कृत्रिम कसिणे करण्याची पद्धति अस्तित्वात येणे शक्य नव्हते. बौद्धांचे प्राचीन विहार खोदताना काही वर्तुळाकार पाषाणाची कसिणे सांपडली आहेत. त्यांवरून असे दिसून येते की, कृत्रिम कसिणे करण्याची पद्धति अशोक-

---

* या तारकेचा उल्लेख सुत्तपिटकात बऱ्याच ठिकाणी आला आहे. परंतु अठ्ठकथाकाराने त्याचा स्पष्ट अर्थ केलेला नाही. खालील वर्णनावरून हा शुक्राचा तारा असावा असे वाटते:––सेय्यथा पि नाम सरदसमये विद्धे विगतवलाहके देवे रत्तिया पच्चूससमये ओसधितारका भासते च तपते च विरोचति च। ( देवपुत्तसंयुत्त)

कालानंतर प्रचारात आली. त्यापूर्वी वरील अभिभ्वायतनांचीच भावना भिक्षु करीत असावे. त्यांचे विधानही वरील उताऱ्यातच आले आहे.

एखादा भिक्षु एकांत स्थळी जाऊन बसला, आणि 'मी रूपी आहे म्हणजे चतुर्भूतांचा बनलेलों आहे आणि बाह्यसृष्टीत दिसणारे ते रूप तेही चतुर्भूतात्मक आहे,' असा विचार करून थोड्याशा परिमित बाह्य देखाव्यावर ध्यान करून तन्मय होऊ शकला व त्यावर ताबा मिळवू शकला, तर त्याला पहिले अभिभ्वायतन साध्य झाले, असे म्हटले पाहिजे. या भिक्षूला विविक्षित रूप पाहिजे असे नाही. एखादी गवताची गंजी, एखादे चित्रविचित्र फुलांनी आणि पानांनी भरलेले झाड, कमलांनी भरलेला हौद, किंवा असाच काहीतरी मर्यादित देखावा त्याच्यासमोर असला म्हणजे पुरे आहे. परन्तु दुसरे अभिभ्वायतन साध्य करणाऱ्याला असा मर्यादित देखावा कामाचा नाही. विस्तीर्ण वनराजि, अफाट समुद्र, अमर्याद पर्वतांच्या रांगा, भव्य आकाश, असा काही तरी मोठा अपरिमित देखावा त्याच्यासमोर असावयास पाहिजे. पहिल्या आणि तिसऱ्या आयतनात फरक एवढाच की पहिल्याला आपण रूपी आहे ही जाणीव असते, व तिसरा केवळ बाह्यसृष्टीत तन्मय होऊन जातो. हीच गोष्ट बाकीच्या सर्वांना लागू आहे. शेवटली चार अभिभ्वायतने आणि या नावाची चार कसिणें एकच आहेत. परन्तु कसिणांचे जे कृत्रिम विधान सांगण्यात आले आहे, ते त्यांच्यात नाही. निळ्या, पिंवळ्या, तांबडया किंवा पांढऱ्या फुलांचा विस्तीर्ण मळा पाहून किंवा अशाच तऱ्हेचे दुसरे रम्य देखावे पाहून त्यांजवर ध्यान करून ही अभिभ्वायतने साध्य करता येतात. अशा देखाव्यांवर कसिणेही साध्य होतात, असे अट्ठकथाकारांनी म्हटले आहे. तरी पण बुद्धघोषाचार्याच्या वेळी कृत्रिम कसिणे तयार करण्याकडेच विशेष लक्ष होते असे दिसते.

प्राचीन अट्ठकथांतून पृथ्वीकसिणादिकांचे जे विधान बुद्धघोषाचार्याने विशुद्धिमार्गांत घेतले आहे, ते येणेप्रमाणेः– पठवीकसिणं उग्गण्हन्तो पठविंयं निमित्तं गण्हाति कते वा अकते वा, सन्तके, नो अनन्तके, सकोटिये, नो अकोटिये, सवटुमे, नो अवटुमे, सपरियन्ते, नो अपरियन्ते, सुप्पमत्ते वा सरावमत्ते वा ।

—पृथ्वीकसिणाचे चिंतन करणारा, कृत्रिम[१] किंवा अकृत्रिम, अमर्यादित नव्हे पण मर्यादित, अकोटिक (अपरिमित) नव्हे पण सकोटिक (परिमित), अवर्तुळ नव्हे पण सवर्तुळ, अपर्यंत नव्हे पण सपर्यंत, सुपाएवढ्या किंवा मातीच्या कटोऱ्याएवढ्या पृथ्वीचे निमित्त ग्रहण करतो.

पृथ्वीकसिणांच्या जागी इतर कसिणांचे नांव घातले असता त्याचे विधानही असेच आहे. यात आणि अभिभायतनात पहिला मोठा फरक हा की, यांचा आरंभ अगदी आकुंचित स्वरूपापासून व्हावयाचा. फार झाले तर यांची मर्यादा सुपाएवढीच असावयास पाहिजे. मात्र ती मातीच्या कटोऱ्याहून लहान नसली म्हणजे झाले. दुसरा फरक हा कीं, ही कसिणे कृत्रिम रीतीने बनवता येतात. ती कशी करावी व त्याचे निमित्त कसे ग्रहण करावे यासंबंधाने विशुद्धिमार्गात विस्तृत वर्णन आहे. त्याचा सारांश तेवढा येथे देतो.

अकृत्रिम पृथ्वीचे निमित्त घ्यावयाचे म्हणजे एखाद्या नांगरलेल्या जागी किंवा अशाच दुसऱ्या जागी वर्तुळकार पृथ्वीकसिणाचे निमित्त लक्षात घेऊन त्याचे वारंवार चिंतन करावयाचे. हे ज्याला साध्य नसेल त्याने कृत्रिम पृथ्वीमंडळ तयार करावे. निळी, पिवळी, तांबडी, किंवा पांढरी माती न घेता अरुणवर्ण माती घेऊन तिचे एक वीत आणि चार आंगळे व्यासाचे मंडळ बनवावे. जर हे मंडळ घेऊन दुसऱ्या ठिकाणी जावयाचे असेल, तर ते चटईच्या किंवा फळ्याच्या तुकड्यावर बनवावे, व दगडाने घासून साफसूफ करावे. त्याच्यात गवताच्या काड्या किंवा कंकर राहू देऊ नये.

आपोकसिण करणाऱ्याने शुद्ध पाणी घेऊन ते एक वीत चार आंगळे व्यासाच्या भांड्यात काठापर्यंत भरावे, व ते स्थिर झाल्यावर त्यावर भावना करावी.

तेजोकसिण करणाऱ्याने चांगली वाळलेली लाकडे घेऊन त्याची आग करावी, व त्याच्यासमोर दोन खुंटांला मध्यंतरी एक वीत चार

---

१. कृत्रिम पृथ्वी म्हणजे जिचे मंडळ तयार करण्यात आले आहे अशी माती; व अकृत्रिम म्हणजे जिचे (शेत नांगरल्या ठिकाणी वगैरे) मंडळ आपोआप तयार झाले आहे अशी माती.

आंगळे व्यासाचे वर्तुळाकार भोक असलेला चटईचा किंवा कपड्याचा तुकडा बांधावा. त्या भोकातून वरचे ज्वालाग्र व खालची लाकडे न दिसता केवळ ज्वालेचा मध्य भाग तेवढा दिसावा असा बंदोबस्त करावा, व योग्य अंतरावर बसून त्या तेजोकसिणाची भावना करावी.

वायुकसिणात कृत्रिमता आणणे शक्य नाही. त्याची भावना करणाऱ्याने वाऱ्याने हालणारी झाडाची फांदी किंवा असाच दुसरा पदार्थ पाहून त्यावर भावना करावी.

नीलकसिण करणाऱ्याने एक वीत चार आंगळे व्यासाचे भांडे घेऊन त्यात निळ्या रंगाची फुले भरावी, व त्यांच्या भोवताली दुसऱ्या कोणत्या तरी रंगाची फुले लावावी; अथवा भिंतीवर किंवा कपड्यावर एक वीत चार आंगळे व्यासाचे निळे मंडळ तयार करावे व ते दुसऱ्या कोणत्या तरी रंगाने परिच्छिन्न करून त्यावर भावना करावी. हाच प्रकार पीत, लोहित, आणि अवदात ( शुभ्र ) कसिणांचा समजावा.

खिडकीच्या फटीतून किंवा वृक्षाच्या सांद्र छायेतून जेथे वर्तुळाकार किरण पडला असेल त्याला आलोककसिण समजून त्याची भावना करावी.

परिच्छिन्नाकासकसिणावर भावना करू इच्छिणाऱ्याने भिंतीला किंवा मंडपादिकाला एक वीत चार आंगळे व्यासाचे वर्तुळाकार भोक पाडून त्याने व्यापलेली जागा आकाश आहे, असे चिंतन करावे.

याप्रमाणे या दहा कसिणांची विधाने झाली. आता त्यांची निमित्ते कशी प्राप्त होतात याचे थोडक्यात विवेचन करतो. परिकर्मनिमित्त, उद्ग्रह-निमित्त, आणि प्रतिभागनिमित्त अशी तीन निमित्ते आहेत. परिकर्मनिमित्त म्हणजे डोळ्यासमोर असलेले कसिणमंडळ. हे अर्थातच भौतिक असते. पण जेव्हा तेच निमित्त डोळे मिटले तरी डोळ्यांसमोर उभे रहाते तेव्हा त्याला उद्ग्रहनिमित्त म्हणतात. या निमित्तात जडनिमित्ताचे दोष स्पष्ट दिसतात. पण जेव्हा त्याच्याचसारखे पण निर्दोष आणि दिव्य असे मंडळ डोळ्यासमोर येते तेव्हा त्याला प्रतिभागनिमित्त म्हणतात. उदाहरणार्थ पृथ्वीचे जे जडमंडळ भावनेसाठी समोर ठेविले जाते ते परिकर्मनिमित्त समजावे. त्यानंतर बराच काळ चिंतन केल्याने तेच मंडळ डोळ्यांसमोर येऊ लागते. पण त्याबरोबरच पृथ्वीचा उंचसखलपणा किंवा असेच दुसरे दोष

त्यात दिसू लागतात. परंतु भावनेच्यायोगे जेव्हा मन स्थिर होत जाते, तेव्हा तेच मंडळ पिशवीतून बाहेर काढलेल्या निर्मळ आरशाप्रमाणे अत्यंत शुद्ध आणि देदीप्यमान दिसू लागते. यालाच प्रतिभागनिमित्त म्हणतात. इतर कसिणांतही ही तीन निमित्ते यथायोग्यपणे लागू पडतात. परंतु त्यांचा विस्तारपूर्वक विचार करण्याची जरूरी दिसत नाही.

या कसिणांवर चारही ध्याने प्राप्त होतात, एवढेच नव्हे तर आकाश-आनंत्यादिक जी चार अरूपावचर आयतने सांगितली आहेत, ती साध्य करण्याला यांची फार मदत होते. परंतु त्यासाठी ही कसिणे मर्यादित न ठेवता अमर्यादित करावी लागतात. आरंभ जरी कटोऱ्याएवढ्या किंवा सुपाएवढ्या कसिणापासून केला, तरी प्रतिभागनिमित्त प्राप्त झाल्यावर किंवा ध्यान प्राप्त झाल्यावर त्यांची मर्यादा क्रमाक्रमाने वाढवून ती विश्वमर्यादेपर्यंत नेऊन पोचवायची असते. अशा रीतीने अमर्यादित केलेल्या कसिणावर जेव्हा चार ध्याने साध्य होतात तेव्हाच योग्याच्या अंगी अरूपावचर आयतनांचे ध्यान करण्याची योग्यता येते.

---

८

# अरूपावचर आयतनें

आकाशानन्त्य आयतन, विज्ञानानन्त्य आयतन, अकिंचन्य आयतन आणि नैवसंज्ञानासंज्ञा आयतन, ही चार अरूपावचर आयतने होत. त्यांची भावना चार ध्याने प्राप्त झाल्याशिवाय करता येणे शक्य नाही, हे वर सांगितलेच आहे. अप्रमाण अभिभ्वायतनावर किंवा कसिणांवर ज्याला ही ध्याने साध्य झाली असतील, त्याने प्रथमतः आकाशानन्त्य आयतन मिळवण्याचा प्रयत्न करावा. त्याचे विधान सुत्तपिटकात पुष्कळ ठिकाणी आले आहे. ते असे :–

सब्बसो रूपसञ्ञानं समतिक्कमा पटिघसञ्ञानं अत्थंगमा नानत्तसञ्ञानं अमनसिकारा अनन्तो आकासा ति आकासानञ्चायतनं उपसंपज्ज विहरति ।

–सर्वप्रकारे रूपसंज्ञांचा समतिक्रम करून प्रत्याघातसंज्ञांचा अस्त करून आणि नानात्वसंज्ञांचा विचार न करता अनन्त आकाश या भावनेने आकाशानन्त्य आयतन प्राप्त करून घेतो.

रूपसंज्ञा म्हणजे जड सृष्टीबद्दल विचार. त्यांच्या पलीकडे गेल्यानेच हे ध्यान प्राप्त होते. जड सृष्टीचे विचार जोपर्यंत चालले आहेत तोपर्यंत विषयांचा इंद्रियांवर प्रत्याघात म्हणजे काहीतरी परिणाम व्हावयाचा. पण जेव्हा योगी जडसृष्टीच्या पलीकडे आपल्या चिंतनाची मर्यादा नेतो, तेव्हां असा प्रत्याघात त्याला बाधू शकत नाही त्या प्रत्याघाताचा अस्त होतो; आणि त्या प्रसंगी जड सृष्टीतील चित्रविचित्र देखावे किंवा भिन्न स्वर अशा विविध विषयांपासून तो निवृत्त होतो. यालाच ‘नानात्वसंज्ञांचा विचार न करणे’ असे म्हणतात. अशा स्थितीत अनन्त आकाश हेच कायते त्याच्या चित्ताचे आलंबन होऊन रहाते, आणि तो तदाकार होऊन जातो.

परिच्छिन्न आकासकसिण खेरीज करून बाकी कोणत्याही कसिणावर चार ध्याने साध्य केल्यानंतर मग या आयतनाची भावना करावयाची असते. कसिणावर चतुर्थ ध्यान साध्य होण्यापूर्वी त्या कसिणाची मर्यादा अनन्त करावी लागते. प्रथमतः कटोऱ्याएवढया किंवा सुपाएवढया कसिणापासून सुरुवात करावयाची हे मागल्या प्रकरणात सांगितलेच आहे. नंतर तीच वर्तुळाकार आकृति खोलीएवढी, घराएवढी, गावाएवढी, देशाएवढी, पृथ्वीएवढी आणि होता होता विश्वाएवढी वाढवावयाची असते. त्या आकृतीवर चतुर्थ ध्यान साध्य झाल्यावर मग योगी बुद्धिप्रभावाने ती बाजूला सारून तेवढया सर्व विश्वात एकच आकाश भरला आहे हे पहातो. पूर्वीचे जे रूपात्मक आलंबन ते सोडून देऊन तो हे अरूपात्मक आलंबन स्वीकारतो. आणि हाच काय तो इतर चतुर्थ ध्यानात आणि या ध्यानात फरक असतो. कसिणांवर किंवा मैत्री इत्यादिकांवर केलेल्या ध्यानाचा विषय दृश्य व जड असतो, आणि म्हणूनच त्या ध्यानाला रूपावचर ध्याने म्हणतात. आकाशादिक आयतने दृश्य नाहीत व जडही नाहीत. तेव्हा त्यांच्यावर जे चतुर्थ ध्यान प्राप्त होते त्याला अरूप किंवा अरूपावचर ध्यान म्हणतात.

येथे असा प्रश्न उपस्थित होतो की, इतर कर्मस्थानांवर जशी प्रथमादिक ध्याने प्राप्त होतात तशी ती या रूपावचर कर्मस्थानांवर का प्राप्त होत नाहीत ? वितर्कविचारादिक प्रथम ध्यानाची अंगे अस्तित्वात यावयाला त्याचा विषयही आकुंचित व प्रमुदित करणारा असावयास पाहिजे. परंतु आकाशासारख्या अनन्त आणि व्यापक विषयाला आकुंचित स्वरूप दिल्याशिवाय वितर्कविचारादिक उत्पन्न होणे शक्य नाही. पण अशा आकुंचित आकाशाला आकाशानन्त्य आयतन म्हणता यावयाचे नाही; त्याला परिच्छिन्न आकासकसिण असे म्हणतात. अर्थात् आकाशादिक जी चार आयतने आहेत त्यांवर पहिली तीन ध्याने साधता येत नाहीत. कसिणांवर चार ध्याने साधल्यावरच मग ही आयतने क्रमाने प्राप्त करून घ्यावी लागतात.

विज्ञानानंत्य आयतनाचे विधान येणेप्रमाणेः— सब्बसो आकासानञ्चायतनं समतिक्कम्म अनन्तं विञ्ञाणं ति विञ्ञाणञ्चायतनं उपसंपज्ज विहरति ।

–सर्वप्रकारे आकाशानन्त्य आयतनाचा समतिक्रम करून अनन्त विज्ञान या भावनेने विज्ञानानन्त्य आयतन प्राप्त करून घेतो.

आकाशाची कल्पनाही विज्ञानमयच आहे, आकाशाची जी अनंत मर्यादा तीच विज्ञानाची आहे, अशा भावनेने आकाशाचा विचार सोडून देऊन विज्ञानात तल्लीन झाल्यावर योग्याला या आयतनाचा लाभ होतो. एवढाच कायतो फरक. बाकी सर्व वरीलप्रमाणे समजावे.

आकिंचन्य आयतनाचे विधान:– सब्बसो विञ्ञाणञ्चायतनं समतिक्कम्म नत्थि किञ्ची ति आकिञ्ञायतनं उपसंपज्ज विहरति।

–सर्व प्रकारे विज्ञानानंत्य आयतनाचा समतिक्रम करून काही नाही या भावनेने आकिंचन्य आयतन प्राप्त करून घेतो.

अभाव विज्ञानापेक्षाहि बलवान् आहे. जेथपर्यंत विज्ञानाची गति तेथपर्यंत अभावाचीही असावयाचीच. असा अभाव सर्व विश्वांत भरला आहे. या कल्पनेने योगी जेव्हा विज्ञानावर जय मिळवतो, तेव्हा त्याला या आयतनाचा लाभ होतो.

नैवसंज्ञानासंज्ञा आयतनाचे विधान येणेप्रमाणे:–सब्बसो आकिञ्चञ्ञायतनं समतिक्कम्म नेवसञ्ञानासञ्ञायतनं उपसम्पज्ज विहरति।

–सर्व प्रकारे आकिंचन्य आयतनाचा समतिक्रम करून नैवसंज्ञानासंज्ञा आयतन प्राप्त करून घेतो.

अभावाची तरी बळकट कल्पना किंवा संज्ञा असतेच. परन्तु त्याच्या वरची पायरी म्हणजे संज्ञा नाही किंवा असंज्ञाही नाही, अशा तऱ्हेचे हे आयतन होय. संज्ञा आहे असेही नाही आणि नाही असेही नाही, हे कस होऊ शकते ? याबद्दल विशुद्धिमार्गांत दोन उपमा दिल्या आहेत.

शिष्याने लोहपात्राला तेल लावून ठेवले होते. यवागू (पेज) पिण्याच्या वेळी गुरूने ते मागितले तेव्हा शिष्य म्हणाला, "भदंत, पात्रात तेल आहे." गुरु म्हणाला, "तर मग घेऊन ये. आपण ते नळकांड्यात भरू." शिष्य म्हणाला, "तसे करण्याला तेल नाही." ज्याप्रमाणे यवागू मलिन करण्यापुरते तेल आहे, पण नळकांडे भरण्यापुरते नाही, त्याप्रमाणे या चवथ्या आयतनात संज्ञावशेष शिल्लक रहातो; परंतु तो संज्ञेचा कार्यभाग करू शकत नाही.

दुसरी उपमा पाण्याची आहे. गुरु आणि शिष्य रस्त्यातून चालले होते. वाटेत थोडेसे पाणी होते. शिष्य म्हणाला, "गुरुजी, पाणी आहे, वहाणा काढा." गुरु म्हणाला, "तर मग स्नानाचा पंचा दे, मी स्नान करतो." शिष्य म्हणाला, "स्नानाला पाणी नाही." जसे वहाणा भिजण्यापुरते पाणी आहे, पण स्नानाला नाही, तसा या चवथ्या आयतनात संज्ञेचा अंश आहे, परंतु तो संज्ञेचे कार्य करण्यापुरता नाही.

हे आयतन प्राप्त झाल्यावर योग्याला निरोधसमापत्ति मिळवता येते. निरोधसमापत्ति म्हणजे मनोवृत्तींचा आत्यंतिक निरोध. अशा स्थितीत योगी सात दिवसपर्यंत राहू शकतो.

---

## ९

# विपश्यनाभावना

हा शब्द केवळ बौद्ध संस्कृत वाङ्मयात सापडतो. उदाहरणार्थ,

**शमथेन विपश्यनासुयुक्तः**

**कुरुते क्लेशविनाशमित्यवेत्य ।**

**शमथः प्रथमं गवेषणीयः**

**स च लोके निरपेक्षयाभिरत्या ॥**

या शांतिदेवाचार्यांच्या श्लोकात हा शब्द सापडतो. परंतु तो पालि **विपस्सना** या प्रसिद्ध शब्दापासून साधला आहे. जगातील अनित्यतेच्या भावनेने विपश्यनेला आरंभ होतो. अनित्यताभावनेचे विधान येणेप्रमाणेः—

रूपं भिक्खवे अनिच्चं .... वेदना अनिच्चा ... सञ्ञा अनिच्चा.... संखारा अनिच्चा ... विञ्ञाणं अनिच्चं । यदनिच्चं तं दुक्खं, यं दुक्खं तदनत्ता, यदनत्ता तं नेतं मम, नेसो हमस्मि, न मेसो अत्ता ति ॥ एवमेतं यथाभूतं सम्मप्पञ्ञाय दट्ठब्बं ॥

(खन्दसंयुत्त, वग्ग २, सुत्त ४.)

—भिक्षुहो, रूप अनित्य आहे...वेदना अनित्य आहेत...संज्ञा अनित्य आहे...संस्कार अनित्य आहेत... विज्ञान अनित्य आहे. जे अनित्य ते दुःखकर, जे दुःखकर ते अनात्मक, जे अनात्मक ते माझे नव्हे, तो मी नव्हे, तो माझा आत्मा नव्हे. याप्रमाणे हे यथार्थतया सम्यक् प्रज्ञेने पहावे.

या विधानाप्रमाणे रूप, वेदना, संज्ञा, संस्कार आणि विज्ञान या पांच स्कंधांवर अनित्यतेची भावना करावयाची आहे. ती कशी याचा थोडक्यात विचार करू. रूपस्कंध चार महाभूतांचा बनला आहे. त्यात पहिले महाभूत पृथ्वी. धरणीकंपादिकाच्या योगाने पृथ्वीच्या स्थिर भागातही

भयंकर अदलाबदल होत असते; नद्यांचे जेथे स्रोत असतील तेथे वाळवंट बनते, व नदीचा प्रवाह भलत्याच बाजूला वहात असतो. पण असे विलक्षण फेरफार सर्वांनाच पहावयास मिळत नसतात. त्यांनी पृथ्वीच्या पृष्ठभागावर उगवणाऱ्या—आणि ज्यांत पृथ्वीचाच अंश जास्ती आहे अशा—वनस्पतिवर्गाचे निरीक्षण करावे. पावसाळा सुरू झाल्यावर काही काळाने जिकडे तिकडे सर्व प्रदेश हिरवागार झालेला दिसतो. आश्विन महिन्याच्या सुमाराला धान्ये पिकास आल्याने शेते पिवळी दिसू लागतात. पण पुढे त्यांची कापणी होऊन धान्य गोळा केल्यावर केवळ गवत शिल्लक रहाते. थंडीचे दिवस जाऊन वसंत ऋतूला सुरुवात होते न होते तों वृक्षाला पालवी फुटते, आंब्याला मोहोर येतात, व सृष्टीमध्ये एक अभिनव चैतन्य उत्पन्न झाल्यासारखे दिसते. इतक्यात उन्हाळा येतो, शेते उध्वस्त झाल्यासारखी दिसू लागतात, आणि दुपारच्या वेळी त्याकडे पाहिले असता डोळ्याला त्रास होतो. अशा रीतीने दृश्य सृष्टीत बाराही महिने सारखी घडामोड चाललेली असते. तिचा विचार करता करता जर आपण परमाणूपर्यंत जाऊन पोचलो तर त्यातही अस्खलित क्रांती चालू असल्याचे आपणास दिसून येईल.

आपोधातूचे फेरफार अधिक दृश्य आहेत. पावसाळ्यापूर्वी नद्या वाळून गेल्या आहेत, तलाव कोरडे पडले आहेत. इतक्यात आकाशात अभ्र दिसू लागतात, मेघगर्जनेला सुरुवात होते, विजा चमकतात आणि पाऊस पडतो. नदीनाले आणि तलाव भरून जातात, आणि जिकडे तिकडे पाणीच पाणी होऊन जाते. जी नदी काही दिवसापूर्वी अत्यंत शांत दिसत होती ती बेफामपणे वाहू लागते, मोठाला धोंडा टाकला तरी वाहून नेते, मग माणसाची गोष्ट काय? पण पावसाळा संपल्याबरोबर ती पूर्वस्थितीवर येते आणि हळूहळू आटत जाते. समुद्राला तर ओहोटीभरती रोजचीच असते, थोडासा वारा वाहिल्याबरोबर लाटा येतात, आणि झंझावाताने तुफान होते. एवढे कशाला? नदी जरी आपणास एकच दिसत असली तरी तिच्यातील पाण्याच्या प्रत्येक परमाणूला त्याच्यामागून येणारा परमाणु समुद्राच्या बाजूला लोटीत असतो. तो समुद्रात पोचला तरी स्थिर रहात नाही, कारण समुद्रातील पाण्याचे परमाणू इतस्ततः सारखे धावत असतात.

तेजोधातूची अनित्यता याहूनही स्पष्ट आहे. मोठाले जंगल जाळून टाकणारा अग्नीही ते संपल्यावर आपोआप विझून जातो. आकाशातील वीज, सूर्याची ऊष्णता, इत्यादिकांत वारंवार किती फेरफार होतात हे सर्वविश्रुतच आहे.

वायुधातू याहीपेक्षा चंचल आहे. सकाळी हवा शांत असली तर संध्याकाळी अकस्मात् जोराने वाहू लागते, व एखादे वेळेला तुफानही होते, आणि पुन्हा एकाएकी तुफान नाहीसे होऊन सर्वत्र सामसूम होऊन जाते.

याप्रमाणे बाह्यरूपस्कंधात स्थूळ फेरफारांचे अवलोकन करून योग्याने क्रमाक्रमाने सूक्ष्म फेरफारांचे निरीक्षण करण्यास शिकले पाहिजे; आणि मग आपल्या देहातील रूपस्कंध कसा बदलत जातो या विचाराला लागले पाहिजे. मी मुलगा होतो तेव्हा किती उंच होतो, व त्यानंतर कस-कसा वाढत गेलो, व माझ्या शरीरात कोणकोणते फेरफार झाले, याचे त्याने मनन केले पाहिजे. याप्रमाणे सबाह्याभ्यंतरीच्या रूपस्कंधाची अनित्यता पूर्णपणे जाणल्यावर मग वेदनास्कंधाचा विचार करावा. आपण सकाळी मोठ्या आनंदात असतो, म्हणजे आपल्या वेदना सुखकारक असतात, त्याच संध्याकाळी आपण आजारी पडल्यामुळे किंवा अशाच अन्य काही कारणांनी दुःखकारक होतात, आणि रात्री पुन्हा गाढ झोप लागली म्हणजे उपेक्षा-कारक होतात. म्हणजे सुख, दुःख आणि उपेक्षा या तीन वेदनांचा अनुभव आपणास वारंवार येत असतो, आणि जितका जितका विचार करावा तितकी तितकी त्यांची अनित्यता स्पष्टपणे आपल्या निदर्शनास येते.

संज्ञा म्हणजे पदार्थमात्राची कल्पना. स्त्री पुरुष, गाई बैल, वृक्ष वन-स्पती, यांमध्ये जो फरक दिसतो तो संज्ञेच्या योगाने. एकाच जड सृष्टीचे अनेक पदार्थ बनलेले असतां जिच्यामुळे त्यांचे आपण भिन्न स्वरूपाचे आकलन करीत असतो, त्या मानसिक शक्तीला संज्ञा म्हणतात. वेदना-स्कंध जसा अनित्य आहे, तसा संज्ञास्कंधही आहे. लहानपणी निरनिराळी खेळणी किंवा पतंग वगैरे पदार्थ यांची संज्ञा जशी आनंदकारक होते तशी ती मोठेपणी होत नाही. तरुणपणी कादंबऱ्या किंवा असेच दुसरे वाङ्मय प्रिय असते, तसे ते वृद्धपणी नसते. आज आपण ज्याच्याकडे मित्रभावाने पहातो, त्यानेच आपला काही भयंकर अपराध केला तर पूर्वीची संज्ञा

पालटून त्याच्याविषयी शत्रुसंज्ञा, अथवा– आपण फारच सावधगिरीने वागलो तर– मध्यस्थसंज्ञा उत्पन्न होते. ज्या तरुणीवर तरुण आसक्त होऊन तिची मर्जी संपादण्यासाठी प्राण खर्ची घालण्यास तयार असतो, तिचे प्रेम दुसऱ्या तरुणावर आहे असे समजून आल्याबरोबर त्याला तिचे दर्शन विषतुल्य वाटते. तिच्याशी आपण मैत्रीने वागलो एवढा विचार देखील त्याच्या मनाला संताप देत असतो. अशा रीतीने प्रिय-अप्रिय संज्ञांची वारंवार उलथापालथ होत असते.

संस्कारांचीही तीच गती. आपण एखाद्या कर्मठ घराण्यात जन्मलो आहो असे समजा. लहानपणापासून वडिलांच्या सहवासाने स्नानसंध्या करणे, देवांची पूजा करणे, असे, संस्कार आपल्या आंगी खिळून गेल्या-सारखे दिसतात. इतक्यात आपण समाजसुधारणा, स्वदेशी, स्वराज्य, इत्यादिक विलक्षण चळवळींच्या तावडीत सांपडलो, तर स्वतःलाच आश्चर्य वाटेल इतकी आपल्या संस्कारात क्रांती होऊन जाते. कित्येकांना केवळ मत्स्यमांसादिकाचे दर्शनही असह्य असते. तेच एकदा विलायतची यात्रा करून आले, म्हणजे मत्स्यमांसाहाराचे गोडवे गाऊ लागतात. अथवा ज्या कुळांत मांसाहार पिढ्यानपिढ्या चालू आहे, अशा कुळांत जन्म पावूनही कित्येक तो सोडून देतात, आणि शाकाहाराच्या प्रसारासाठी अत्यंत परिश्रम करतात. अर्थात् असे संस्कार फारच थोडे आहेत की, ज्याची लहानपणा-पासून सारखी उलथापालथ होत नसते.

चक्षुर्विज्ञान, श्रोत्रविज्ञान, घ्राणविज्ञान, जिह्वाविज्ञान, कायविज्ञान आणि मनोविज्ञान असे विज्ञानाचे सहा भेद आहेत. त्यांचे फेरफार समजणे फार सोपे आहे. लहान मूल तांब्यारुप्याची नाणी पहाते, पण ती आपल्या खेळण्याइतक्या किमतीची नाहीत अशी त्याची समजूत असते. पण तेच मूल मोठे झाल्यावर पैसे असले तर खाऊ विकत घेता येतो हे त्याला समजू लागते, व पुढे तरुणपणी क्रमाक्रमाने पैशाच्या सदुपयोगाचा आणि दुरुप-योगाचा त्याला बोध होतो. एखादा सुज्ञ मनुष्य आपल्या आयुष्यातील एका वर्षाचे जर नीट परीक्षण करील, तर आपल्या विचारात क्रांती कशी होत चालली आहे, हे त्याला स्पष्ट दिसून येईल. त्याशिवाय आता चक्षुर्विज्ञान,

तर क्षणात श्रोत्रघ्राणादिक विज्ञान असा या विज्ञानाचा पालट क्षणोक्षणी होत असतो, तो निराळाच.

अशा रीतीने निर्भयपणे अनित्यतेची भावना केल्याबरोबर कोणत्याही पदार्थाला पकडून राहिल्यास दुःख होते हे आपण जाणतो. ज्या बाह्यसृष्टीत विलक्षण घडामोडी चाललेल्या आहेत, तिचाच एखादा भाग हा माझा बाग आहे किंवा ही माझी शेतवाडी आहे, असे जो अज्ञ मनुष्य गृहीत धरून बसेल व त्यात आसक्त होऊन राहील, त्याला दुःख होणे अगदी साहजिक आहे. बागेची नासाडी झाली किंवा दुसऱ्या काही कारणाने तो त्याच्या हातून गेला, तर त्याला अतोनात दुःख होते. हीच गोष्ट इतर स्थिर आणि चर पदार्थांची आहे.

अरियपरियेसनसुत्तात भगवान् म्हणतो, "भिक्षुहो, मी सुद्धा **संबोधिज्ञान** होण्यापूर्वी बोधिसत्त्वावस्थेत, स्वतः जराधर्मी असताना, जन्माच्या फेऱ्यात सांपडलेल्या वस्तूंच्या ( पुत्र, दारा, दासी, दास इत्यादिकांच्या ) मागे लागलो होतो. ( म्हणजे माझे सुख त्यांजवर अवलंबून आहे असे मला वाटे. ) स्वतः जराधर्मी असताना, व्याधिधर्मी असताना, मरणधर्मी असताना, शोकधर्मी असताना, जरा, व्याधि, मरण, शोक यांच्या फेऱ्यात पडलेल्या वस्तूंच्याच मागे लागलो होतो. तेव्हा माझ्या मनात असा विचार आला की, मी स्वतः जन्म, जरा, मरण, व्याधि व शोक यांनी संबद्ध असता त्यांनीच संबद्ध जे पुत्रदारादिक त्यांच्या मागे लागलो आहे, हे ठीक नव्हे; तर मग मी या जन्मजरादिकांनी होणारी हानी पाहून अजात, अजर, अव्याधि, अमर आणि अशोक असे जे परमश्रेष्ठ **निर्वाणपद** त्याचा शोध करावा हे योग्य आहे." हा भगवंताचा बोधिसत्त्वावस्थेतील अनुभव सर्वांनाच लागू पडण्यासारखा आहे.

बाह्यसृष्टीतील पदार्थांना पकडून बसल्यास जसे दुःख होते, तसेच ते आपल्या पंचस्कंधांला पकडून बसल्यास होते. आपले रूप असे रहावे किंवा तसे व्हावे असा आपण विचार केला तरी व्याधीच्या आणि जरेच्यायोगे ते भलत्याच स्थितीत जाते. वेदना, संज्ञा, संस्कार, आणि विज्ञान यांचीही हीच गोष्ट आहे. त्यांना पकडून बसल्याने आपल्या दुःखात अधिक भर पडते, याचसाठी म्हटले आहे की, 'यदनिच्चं तं दुक्खं'.

जे दुःखकारक ते आत्मा होऊं शकत नाही. आत्मा म्हणजे सुख-दुःखातीत, कूटस्थ, अविनाशी पदार्थ. तो या पंचस्कंधात नाही. आणि म्हणूनच मनुष्यप्राण्यांमध्ये आपणाला कायमचा उच्चनीचपणा येणे शक्य नाही. अलगद्दूपमसुत्तात भगवान् म्हणतो, "म्हणून भिक्षुहो, जे तुमचे नव्हे, ते सोडून द्या. ते सोडून दिल्यास चिरकाल तुमचे हित होईल, चिरकाल तुम्हाला सुख मिळेल. तुमचे काय नव्हे ? रूप तुमचे नव्हे...वेदना तुमच्या नव्हत...संज्ञा तुमची नव्हे...संस्कार तुमचे नव्हत... विज्ञान तुमचे नव्हे. ते सोडा. ते सोडल्यास चिरकाल तुमचे हित होईल, चिरकाल तुम्हाला सुख मिळेल. भिक्षुहो, या जेतवनात पडलेला पालापाचोळा लोक घेऊन जातील, जाळतील, किंवा त्याचे दुसरे काही तरी करतील. त्या वेळी, 'आम्हाला लोक घेऊन जातात, जाळतात, किंवा आमचे दुसरे काही तरी करतात', असे तुम्हांला वाटेल काय ?" भिक्षु म्हणाले, "भदन्त, आम्हाला असे वाटणार नाही; कारण; हा पालापाचोळा आमचा आत्मा किंवा आत्मीय नाही." भगवान् म्हणाला, "त्याप्रमाणे भिक्षुहो, रूप... वेदना... संज्ञा ...संस्कार... विज्ञान तुमचे नाही. ते सोडून द्या. ते सोडून दिल्यास चिरकाल तुमचे हित होईल, चिरकाल तुम्हास सुख मिळेल."

याप्रमाणे अनित्यताभावनेच्यायोगे दुःखता आणि अनात्मता स्पष्ट दिसून आल्यावर योग्याच्या चित्तात अप्रतिम आनंद उत्पन्न होतो. त्याचे वर्णन धम्मपदात येणेप्रमाणे केले आहे:–

> सुञ्ञा गारं पविट्ठस्स सन्तचित्तस्स भिक्खुनो ।
> अमानुसी रती होति सम्मा धम्मं विपस्सतो ॥
> यतो यतो सम्मसति खन्धानं उदयब्बयं ।
> लभति पीतिपामोज्जं अमतं तं विजानतं ॥

एकान्तस्थळी जाऊन शांत चित्ताने यथार्थतया पदार्थांचे निरीक्षण करणाऱ्या भिक्षूला अमानुष (दैवी) आनंद प्राप्त होतो. जो जो तो स्कन्धांचा उदय आणि व्यय यांचे निरीक्षण करतो तो तो त्याला प्रीतिप्रमोद मिळत जातो. सुज्ञांना हे अमृत वाटते.

एखादा उत्तम वादक तंतुवाद्य वाजवूं लागला व त्यातून त्याच्या कलेला अनुसरून बारीक मोठे स्वर निघू लागले म्हणजे आपण क्षणभर तल्लीन होऊन जात असतो; आपणाला उपचारसमाधि प्राप्त होते तर मग पदार्थमात्राला हालवणारी जी अनित्यता तिच्याशी तादात्म्य पावल्याने योग्याला अत्युच्च प्रकारची अमृततुल्य समाधि प्राप्त झाली तर त्यात नवल कसले ? अर्थात् या विपश्यनाभावनेने योग्याला चारही ध्याने प्राप्त होतात, एवढेच नव्हे तर आर्य अष्टांगिक मार्गाचे त्याला सहजासहजी ज्ञान होते. आर्य अष्टांगिक मार्ग, सम्यक् दृष्टि, सम्यक् संकल्प, सम्यक् वाचा, सम्यक् कर्मान्त (कर्म), सम्यक् आजीव, सम्यक् व्यायाम, सम्यक् स्मृति आणि सम्यक् समाधि, या आठ अंगांचा बनला आहे. त्याची व्याख्या मी एक दोन ठिकाणी [१] केली असल्यामुळे तिची येथे पुनरुक्ती करीत नाही. गायनवादनात ज्याप्रमाणे तालसुराची समता असावी लागते त्याप्रमाणे परिवर्तनशील जगात आर्य अष्टांगिक मार्गाच्या योगेच साम्य [२] ठेवणे शक्य आहे; आणि ज्याला अनित्यतेचे रहस्य समजले त्याला हे काम अगदी सोपे आहे. अनित्यतेच्या योगे वर्तमान जगताशी आपण तादात्म्य पावतो, एवढेच नव्हे तर अतीत आणि अनागत जगताशी तादात्म्य पावण्याला समर्थ होतो, व मनुष्यजातीच्या श्रेष्ठ सेवेचे वैयक्तिक कर्तव्य आपणाला पूर्णपणे अवगत होते; व त्या ज्ञानाचा विकास अष्टांगिक मार्गाच्या रूपाने होत असतो. हा मार्ग त्या ज्ञानाचे दृश्य फळ होय.

अनित्यताभावनेच्या योगे चार ध्याने आणि अष्टांगिक मार्गाचे रहस्य प्राप्त होते, एवढेच नव्हे, तर योग्याला क्रमाक्रमाने चार लोकोत्तर आर्यमार्ग व फळे प्राप्त होतात. विपश्यनाभावनेच्यायोगे प्रथम ध्यानादिक चार ध्यानांपैकी एखादे ध्यान प्राप्त होऊन, सक्कायदिट्ठि (आत्मा हा भिन्न पदार्थ असून तो नित्य आहे अशी दृष्टि), विचिकिच्छा (बुद्ध, धर्म आणि संघ यांजविषयी शंका किंवा अविश्वास), आणि सीलब्बतपरामास (स्नानादिव्रतांनीच मुक्ति मिळेल असा विश्वास), या तीन संयोजनांचा (बंधनांचा) जर नाश

---

१. 'बुद्ध, धर्म आणि संघ' परिशिष्ट ३ रे, व बुद्धचरित्र–लेखमालेतील चवथा लेख पहावा.

२. अन्तं दुक्खस्स पप्पुय्य चरन्ति विसमे समं। (देवतासंयुत्त)

करू शकला, तर तो स्रोत आपत्ति मार्गांत येतो, त्याला स्रोतआपत्तिमार्गस्थ व त्या मार्गांत स्थिर झाल्यावर स्रोतआपत्तिफलस्थ म्हणतात. त्यानंतर त्याच किंवा अन्य ध्यानाच्यायोगे कामराग, द्वेष आणि मोह हे दुर्बळ झाले म्हणजे तो सकृदागामिमार्गांत येतो. त्याला सकृदागामिमार्गस्थ, आणि त्या मार्गांत स्थिर झाल्यावर सकृदागामिफलस्थ म्हणतात. त्यानंतर कामराग ( कामवासना ), पटिघ ( क्रोध ), या दोन संयोजनांचा पूर्णपणे उच्छेद करून तो अनागामि-मार्गांत येतो. त्याला अनागामिमार्गस्थ, व त्यांत स्थिर झाल्यावर अनागामि-फलस्थ म्हणतात. त्यानंतर रूपराग ( ब्रह्मलोकादि प्राप्तीची इच्छा ), अरूपराग ( अरूपदेवलोकप्राप्तीची इच्छा ), मान ( अहंकार ), उद्धच्च ( भ्रांतचित्तता ), आणि आवज्जा ( अविद्या ) या शिल्लक राहिलेल्या पांच संयोजनांचा समूळ नाश करून तो अर्हन्मार्गांत येतो. त्याला अर्हन्मार्गस्थ, व त्या मार्गांत स्थिर झाल्यावर अर्हत्फलस्थ म्हणतात. अशा पूर्णावस्थेला पोंचलेल्या व्यक्तीच्या ताडी खालील गाथा शोभण्यासारख्या आहेत.

**सुसुखं वत जीवाम वेरिनेसु अवेरिनो ।**
**वेरिनेसु मनुस्सेसु विहराम अवेरिनो ॥**
**सुसुखं वत जीवाम आतुरेसु अनातुरा ।**
**आतुरेसु मनुस्सेसु विहराम अनातुरा ॥**
**सुसुखं वत जीवाम उस्सुकेसु अनुस्सुका ।**
**उस्सुकेसु मनुस्सेसु विहराम अनुस्सुका ॥**
**सुसुखं वत जीवाम येसं नो नत्थि किञ्चन ।**
**पीतिभक्खा भविस्साम देवा आभस्सरा यथा ॥ ***

* वैऱ्यामध्ये अवैरी होऊन आम्ही सुखाने जगतो; वैरी मनुष्यांत आम्ही अवैराने वागतो. आतुरांमध्ये अनातुर होऊन आम्ही सुखाने जगतो; आतुर मनुष्यांत आम्ही अनातुरपणे वागतो. उत्सुकांमध्ये अनुत्सुक होऊन आम्ही सुखाने जगतो; उत्सुक मनुष्यांत आम्ही अनुत्सुकपणे वागतो. ज्या आम्हाला काहीच नाही ( नामरूपात्मक पदार्थांची आसक्ति नाही ), ते आम्ही सुखाने जगतो; आभास्वर देवांप्रमाणे आम्ही प्रेमरूपी अन्न ग्रहण करतो.

# खरा समाजधर्म

साधुचरित श्री. धर्मानंद कोसंबी हे सनातनी हिंदूंच्या ब्राह्मणी संस्कृतीत वाढलेले. भगवान बुद्धांचे चरित्र लहानपणीच वाचून त्यांच्या उपदेशाकडे ते ओढले गेले; आणि त्यानी महाकष्टाने तिब्बत, सीलोन, ब्रम्हदेश आणि सियाम सारख्या देशांत जाऊन तेथील बौद्ध धर्म शिकून घेऊन बौद्ध विद्येची परंपरा स्वदेशी परत आणली. बौद्ध धर्माची जरी त्यांनी दीक्षा घेतली होती तरी बौद्ध धार्मिकांचे ते अंध अनुयायी बनले नाहीत. बौद्ध विद्येच्या प्रचारासाठी अनेकवार अमेरिकेत आणि एकवार रशियात गेले असताना त्यानी तेथील अर्थमूलक समाजधर्माचे अभ्ययन केले. लाला हरदयाळसारख्यांच्या सहवासात आल्याने समाजवाद आणि साम्यवाद या विषयी त्याना सहानुभूति वाटू लागली. गुजरात विद्यापीठात येऊन तेथे बौद्ध विद्येचा प्रसार करीत असताना जैन धर्माचा त्यानी सहानुभूतिपूर्वक खोल अभ्यास केला. महात्मा गांधींच्या सिद्धान्ताचा केवळ अभ्यास करून स्वस्थ न बसता त्यांनी त्यांच्या चळवळीत भागही घेतला.

अशा रीतीने मानवी समाजावर ज्या ज्या प्रधान विचारांचा आणि धार्मिक वृत्तींचा पगडा आहे त्या सर्वांचा आपुलकीने अभ्यास करून त्यांनी त्यांवर आपली स्वतंत्र प्रज्ञा चालविली आणि आपल्या परिपक्व अभिप्रायांचे सार त्यानी दोन–तीन पुस्तकात आपल्याला दिले आहे. बौद्ध विद्या प्राप्त करण्यासाठी आणि तिचा फैलाव करण्यासाठी स्वतः काय काय केले हे त्यांनी '**निवेदन**' आणि '**खुलासा**' या आत्मचरित्रपर दोन ग्रंथांत नमूद करून ठेवले आहे.

इतक्या कष्टाने मिळविलेली बौद्ध विद्या आहे तरी काय याची सवि- स्तर कल्पना देण्यासाठी त्यानी मराठीत कितीतरी पुस्तके लिहिली आहेत. त्या पुस्तकांवरून त्यांची गाढ विद्वत्ता जशी दिसून येते त्याचप्रमाणे लोक– कल्याणाविषयीची त्यांची कळकळही दिसून येते.

अधिकारयुक्त वाणीने बौद्ध धर्माचे इतके सोपे विवेचन दुसरे कोणीही केलेले दिसून येत नाही.

"**बुद्धचरित्र**" भाग १ आणि २ यात भगवान बुद्धाविषयीची विश्वसनीय अशी अद्यतन सर्व माहिती येऊन जाते. "**बुद्ध धर्म आणि संघ**" या लहानशा पुस्तकात पुस्तकाच्या नांवाप्रमाणे तिन्ही गोष्टींची अगदी प्राथमिक माहिती आहे. "**बुद्धलीला-सार-संग्रह**" या त्यांच्या अत्यंत लोकप्रिय ग्रंथांच्या पहिल्या भागात बुद्धाच्या पूर्व-जन्मांविषयीच्या जातककथा असून त्यांत बोधिसत्त्वाने चारित्र्यांतील निरनिराळ्या पारमिता कशा प्राप्त केल्या याची पौराणिक माहिती दिली आहे. दुसऱ्या भागात बुद्धाचे चरित्र आहे; आणि तिसऱ्यांत बुद्धाचा उपदेश अगदी थोडक्यात दिलेला आहे.

बौद्ध-साहित्याचा प्रधान ग्रंथ "त्रिपिटक", यांतील विनयपिटकाचा सारांश त्यांनी '**बौद्ध संघाच्या परिचया**'त दिला आहे.

बौद्ध लोकांत ज्या प्रकरणाची महती गीतेसारखी मानली आहे त्या '**धम्मपदाचे**' भाषांतर आणि त्यानंतर तितकेच लोकप्रिय असलेले शान्तिदेवाचार्यांच्या "**बोधिचर्यावताराचे**" भाषांतर त्यांनी मराठीत उपलब्ध करून दिले आहे.

बौद्ध लोकांच्या योगमार्गाविषयीची यथार्थ कल्पना आपल्याला त्यांच्या "**विशुद्धि मार्ग**" या लहानशा पुस्तकात सुंदर रीतीने मिळते.

या खेरीज त्यानी इतरही लहान मोठी पुस्तके लिहिली आहेत. पण जीवनविषयक आणि धर्मविषयक स्वतःचे परिपक्व विचार त्यानी स्वतःच्या स्वतंत्र मौलिक अशा तीन ग्रंथांत ग्रथित केले आहेत.

कोणकोणत्या सामाजिक आणि राजकीय कारणांमुळे बुद्ध भगवानाने राज्यत्याग केला आणि संन्यास घेतला याविषयींची स्वतःची अगदी स्वतंत्र उपपत्ति नाटकाच्या रूपाने त्यानी "**बोधिसत्त्व**" या ग्रंथात दिली आहे.

वैदिक काळापासून धर्मविचारात परिवर्तन कसे होत गेले; धर्मक्रान्ति बरोबर निरनिराळे पुरोहितवर्ग कसे निर्माण झाले आणि धर्माच्या शुद्ध कल्पनेला संप्रदायांच्या निरनिराळ्या व्यूहांतून मुक्त होताना कसे सायास पडले, हे सर्व स्वतःच्या कल्पनेप्रमाणे त्यांनी "**हिंदी संस्कृति आणि**

**अहिंसा"** या वादग्रस्त पुस्तकात नमूद केलेले आहे. आणि त्यानंतर वेदकाळाच्या पूर्वीपासून या देशातील ऋषिमुनींनी जो तपस्यामूलक अहिंसा धर्म चालविला होता त्याची परिणति भगवान पार्श्वनाथाच्या चातुर्याम धर्मात कशी झाली आणि त्यानंतर याच चातुर्याममूलक समाज-धर्माचा आजवर कसकसा विस्तार होत आला आहे हे त्यानी प्रस्तुत ग्रंथात मुद्देसूद रीतीने मांडले आहे. येथेही स्वतःला जे वाटले ते सडेतोडपणाने सांगताना त्यामुळे वादाच्या किती वावटळी उठतील याची पर्वा त्यानी मुळीच केलेली नाही.

धर्म म्हणजे जीवन—धर्म. त्यात व्यक्तिगत जीवन आणि सामाजिक जीवन ही दोन्ही येतात; आणि सामाजिक जीवनात आर्थिक आणि राजकीय हे प्रधान भाग टाळता येत नाहीत. धर्म-शास्त्र जर खरे जीवन-धर्म-शास्त्र असेल तर त्याला राजकारण आणि अर्थकारण यांचे वावडे बाळगून चालावयाचे नाही.

अर्थात् चातुर्यामात्मक समाज-धर्माचा ऊहापोह करताना धर्मानंदजींना समाजवाद, साम्यवाद, गांधीवाद यांच्या विषयीचे स्वतःचे विचार मांडावेच लागले. आणि तसे करीत असताना काँग्रेस आणि मुस्लिम लीग यांचे संबंध, काँग्रेसचे आंतरराष्ट्रीय राजकारण वगैरे गोष्टींविषयी देखील त्यांना लिहावेच लागले.

त्यांच्या या आर्थिक आणि राजकीय मीमांसेशी सर्वांनाच एकमत होणे शक्य नसणार. विशेष अनुभवाने स्वतःचे विचार बदलण्याची तयारी धर्मानंदजींमध्ये नेहमीच दिसून येई. पण येथील सर्व विवेचनात साधुचरित धर्मानंद कोसंबींची जनहिताची तळमळ, निःस्पृहता, सांप्रदायिक अभि-निवेशाचा अभाव आणि परम कोटीची सत्यनिष्ठा हे गुण प्रामुख्याने दिसून येतात.

कोणताही धर्म घ्या, त्याला ऐहिक दृष्ट्या मजबूत करण्यासाठी त्याच्या अनुयायांनी त्याचे धिंडवडे काढलेच आहेत. या बाबतीत सनातनी, बौद्ध, जैन, मुसलमान, ख्रिस्ती कोणतेच धर्म अपवादात्मक नाहीत. समाजवाद, साम्यवाद आणि गांधीवाद याही पंथांच्या अनुयायांत हे दोष शिरले नाहीत किंवा शिरणार नाहीत असे म्हणता यावयाचे नाही. धर्मानंद

कोसंबीनी स्वतः बौद्ध आहोत म्हणून त्या पंथाला कोठेही संभाळून घेतले नाही.

महावीरांनी पार्श्वनाथांच्या चातुर्याम धर्माचा विस्तार केला. पार्श्वनाथाचा संप्रदाय आज कोठेही स्वतंत्रपणे दिसत नसल्यामुळे त्याच्या चातुर्याम धर्माची सांप्रदायिक विकृति अुपलब्ध नाही, म्हणूनच कदाचित् धर्मानंदजीना पार्श्वनाथांच्या चातुर्याम धर्माचे विशेष आकर्षण वाटले असेल.

पार्श्वनाथांचा चातुर्याम धर्मच महावीराच्या पंचमहाव्रतात परिणत झाला आहे. तोच धर्म बुद्धाच्या अष्टांगिक मार्गात आणि पातंजल योगाच्या यमनियमांमध्ये प्रगट झाला आहे. गांधीच्या आश्रमधर्मात देखील चातुर्याम धर्मच प्रधानपणे दृग्गोचर होत आहे. स्वराज्य मिळेतोपर्यंत सबंध राष्ट्राला सत्य आणि अहिंसेची दीक्षा द्यावी आणि स्वराज्य मिळाल्यानंतर अस्तेय आणि अपरिग्रहमूलक समाजव्यवस्था स्थापन करावी आणि अशा रीतीने अैहिक आणि पारमार्थिक मोक्ष प्राप्त करून देणारा सर्वोदय साधावा अशी गांधींची कार्यपद्धति दिसते.

वेदान्ताच्या मुळाशी देखील चातुर्याम धर्म आहेच. तसे पाहिले तर चातुर्याम धर्म म्हणजे मनुष्याने स्वतःच्या असामाजिक वृत्ति दूर करून विश्वकुटुंब स्थापन करण्याची पूर्व तयारी करणारा समाजधर्म होय. समाजवाद घ्या किंवा साम्यवाद घ्या, लोकशाही घ्या किंवा अराजकवाद घ्या; सत्य, अहिंसा, अस्तेय आणि अपरिग्रह या चार सामाजिक सद्गुणांवाचून कोणतीही समाजरचना स्थिरपणे सिद्ध होअू शकणार नाही. या चार यामांबरोबर निदान संयमाच्या रूपांत ब्रह्मचर्य हा पांचवा याम वाढविलाच पाहिजे आणि या सर्वांच्या मुळांशी आत्मौपम्य वृत्ति बाळगून त्या वृत्तीचा विश्वात्मैक्यापर्यंत विकास केलाच पाहिजे; ही गोष्ट पटावयास वेळ लागणार नाही.

जुने धर्म जर भविष्यकाळात टिकवावयाचे असतील तर त्यांच्या भोवती जमलेली संकुचिततेची अधार्मिक जाळी दूर केलीच पाहिजे, आणि मग सध्या मनुष्यजातीपुढील महान आणि बिकट प्रश्न सोडविण्याची शक्ति या धर्मांच्या सिद्धांतांमध्ये आहे असे सिद्ध करून दिले पाहिजे. जैनांनी आपला अहिंसा धर्म कुत्र्या मांजराचे जीव वाचविण्यात आणि बटाटे, वांगी

न खाण्यात संपूर्ण होतो असे न मानता विश्वव्यापी आर्थिक पिळणूक, असमानता, अन्याय आणि अत्याचार यांचा प्रतिकार करण्यात अहिंसा कशी वापरावयाची आणि ती कशी यशस्वी करून दाखवावयाची या कसोटीवर त्यांनी आपला अहिंसा धर्म कसून दाखविला पाहिजे. महात्मा गांधींनी हे करून दाखविले म्हणूनच अहिंसा धर्म जगात सजीव आणि प्रतिष्ठित झाला. धर्मज्ञ लोकांनी धर्माची चर्चा व्याकरण आणि तर्काच्या शास्त्रार्थातून बाहेर काढून आणि क्षुद्र रूढीच्या बचावाचे प्रयत्न सोडून देऊन व्यक्ति आणि समाज यांच्या समग्र जीवनाच्या भूमिकेवर करून दाखविली पाहिजे. धर्मानंद कोसंबींनी या दिशेने केलेला हा पहिलाच आणि म्हणून विशेषपणे अभिनंदनीय प्रयत्न आहे...

प्रस्तुत निबंधाच्या प्रस्तावनेत जुन्या काळाच्या जैन लोकांच्या मांसाहाराविषयी उल्लेख आला आहे. गुजरातमध्ये ही चर्चा तीन वेळा कडवेपणाने झालेली माझ्या पाहण्यात आहे. प्राचीनकाळी सगळेच जैन मांसाहार करीत असत असे कोणी म्हटलेले नाही. जैन धार्मिक-साहित्यात कित्येक जैन मांसाहार करीत असल्याचा उल्लेख निर्विवाद सापडतो. आजच्या धार्मिक लोकांना त्या वस्तूची चर्चा न आवडणे स्वाभाविक आहे. कारण मांसाहार त्यागाविषयी अत्यंत आग्रह जर कुणाचा असेल तर तो आजच्या जैनांचा आहे; व समाज या नात्याने त्यांनी तो उत्तम रीतीने पाळूनही दाखविला आहे. मांसाहार धर्म्य आहे असे कोणीच म्हणू शकणार नाही. पशु, पक्षी, बकरी, कोंबडी, मासे, खेकडे वगैरे प्राण्यांना मारून स्वतःचे पोट भरणे हे एखादे थोर कृत्य आहे असे कुणीच सिद्ध करू पहात नाही. आजच्या काळी सार्वत्रिक मांसाहार त्याग कितपत शक्य आहे याविषयी वाद होऊ शकेल. मानवजातीच्या मंद प्रगतिकडे पाहता आजच्या स्थितीत मांसाहारी लोकांना घातकी, क्रूर किंवा अधार्मिक म्हणणे योग्य होणार नाही. पण मांसाहार न करणे हाच उत्तम धर्म आहे याविषयी कोठेही दुमत नाही. प्राचीन काळी कित्येक जैन उघडपणे मांसाहार करीत असत असा ऐतिहासिक पुरावा मिळाला म्हणून आजच्या जैनांनी मांसाहार करावा असे कोणीच म्हणत नाही; किंवा आजचे जैन मांस खाण्यासाठी जुन्या

पुराव्याचा उपयोग करतील असाही संभव नाही. मांसाहार न करणे हेच श्रेष्ठ जीवन आहे हा जैन धर्माचा उपदेश असंदिग्ध आहे.

अशा स्थितीत जुन्या काळी परिस्थिती काय होती याविषयींच्या चर्चेने चिडून जाण्याचे खरोखर काहीच कारण नव्हते. फार तर एवढेच सिद्ध होईल ना कि मांसाहाराच्या बाबतीत आजच्या जैन लोकांनी महावीर स्वामींच्या काळापेक्षा बरीच प्रगति केली आहे. यात वाईट वाटण्याजोगे काय आहे ?

पंडित सुखलालजींनी एक गोष्ट सुचविली आहे तिचाही विचार करण्याजोगा आहे. ते म्हणतात की महावीर स्वामींचा अहिंसा धर्म, प्रचारक-धर्म असल्यामुळे त्यात निरनिराळ्या जातींचा वेळोवेळी प्रवेश झाला आहे. अनेक सनातनी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, जसे, महावीर स्वामींचा उपदेश पटून, जैन झाले, त्याचप्रमाणे कित्येक क्रूर, वन्य आणि मागासलेल्या जातींचे लोक ही उपरति होऊन जैन धर्मात शिरले होते. असे लोक जैन धर्माचा स्वीकार केल्यानंतर देखील बरेच दिवस मांसाहार करीत असल्यास नवल नाही. तेव्हा जुन्या काळी कित्येक जैन मांसाहार करीत होते असे सिद्ध झाल्याने सर्वच जैनांना मांसाहार विहित होता असे अनुमान काढणे चुकीचे होईल. मांसाहार त्यागाच्या बाबतीत जैन धर्माने मानवी प्रगतीत सर्वांत अधिक भर घातली आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. ब्राह्मण धर्म, वैष्णव धर्म, महानुभावी धर्म इत्यादी पंथात देखील मांसाहार त्यागाचा आग्रह दिसून येतो. या सर्वांनी मिळून थोर कामगिरी केली आहे. पण या सर्वांनी मांसाहारी लोकांशी स्वतःचे दळणवळण बंद करून आणि रोटीबेटी व्यवहाराचा प्रतिबंध करून स्वतःचा प्रचारच कुंठित केला आहे हीही गोष्ट विसरता कामा नये.

रोटीबेटी व्यवहार बंद केल्यानंतरच्या काळात निरामिषाहारी लोकांनी स्वतःच्या या तत्त्वाचा प्रचार कोठेही सफळतापूर्वक केल्याचा दाखला नाही. उलट निरामिषाहारी लोकच शिथिल होऊन हळूहळू चोरून किंवा उघडपणे मांस खाऊ लागल्याची उदाहरणे जेथे तेथे सापडतात. अहिंसा धर्म जोवर अग्निसारखा उज्ज्वळ आणि पावक असेल तोवर त्याला इतरांच्या संपर्काचे भय नसणार. हा धर्म रूढी म्हणून जडपणे टिकू लागला म्हणजेच

त्याला स्वतःच्या आसपास बहिष्काराच्या भिंती बांधून स्वतःचे रक्षण करावे लागते आणि मग तो निःसत्वपणे ' जगत ' राहतो.

प्रस्तुत निबंधाच्या शेवटी श्री. धर्मानंद कोसंबीनी पार्श्वनाथांच्या मारणांतिक सल्लेखनेचा थोडासा उहापोह केला आहे पार्श्वनाथाप्रमाणे स्वतः देखील याच प्रकारे देह सोडावा असा धर्मानंदजींचा संकल्प होता व तो त्यांनी अमलात आणण्याची सुरवातही केली होती. पण महात्मा गांधीनी त्यांना त्यापासून परावृत्त केले. पण एकदा जगण्याची वृत्ति जी त्यानी मागे खेचली ती पुन्हा दृढ होईना; आणि त्यामुळे त्यांचा देहांत झाला. मारणांतिक सल्लेखनेला यामुळे तात्विक चर्चेहून अधिक महत्त्व आले आहे.

मारणांतिक सल्लेखना म्हणजे प्रायोपवेशन अथवा आमरण उपवास.

आपल्या हातून अक्षम्य महापातक घडले असेल तर कित्येक लोक प्रायश्चित्त म्हणून अन्नत्याग करून देह सोडतात. केलेल्या प्रतिज्ञेचे पालन होऊ शकले नाही म्हणून देहत्याग केल्याची उदाहरणे आपण वाचतो. "विकारी वासना उत्कट झाली आहे आणि संयम उरला नाही असा स्वतःविषयी अनुभव आला असताना आपल्या हातून आता पाप खात्रीने घडणार असे ज्याला वाटू लागेल त्याने पाप टाळण्यासाठी वाटल्यास स्वेच्छेने देहत्याग करावा; तसे करण्याचा त्याला अधिकार आहे. पण हातून पाप होऊन गेल्यानंतर उपरति झाली असता प्रायश्चित्त करून शुद्ध होणेच चांगले. पापाविषयी उपरति झाल्यानंतर वैतागाने देहत्याग करणे अयोग्य आहे" असा महात्मा गांधीजींचा अभिप्राय आहे.

वृद्धावस्था झाली आहे; हातून शारीरिक किंवा मानसिक कसलीच सेवा होऊ शकत नाही; आत्मोद्धारासाठी कराव्या लागणाऱ्या साधनेचें पालन करण्याचे सामर्थ्यही उरले नाही; आता आपण केवळ पृथ्वीला म्हणजेच समाजाला भाररूप झालो आहोत; असे ज्याना वाटते त्यानी खितपत पडून राहण्यापेक्षा प्रायोपवेशन करून मरण गाठावे हा एक शुद्ध सामाजिक धर्म आहे. पांडव, विदुर वगैरे पौराणिक व्यक्तींनी या धर्माचे पालन केले आहे. बंगाल्यात पावहारी बुवानी अशाच रीतीने देहत्याग केल्याचे उदाहरण स्वामी विवेकानंदांनी नमूद करून ठेवले आहे. एखादा दुर्धर आणि सांसर्गिक रोग जडला असताना आपण यातून वाचू शकत

नाही अशी मनाची खात्री झाली म्हणजे मनुष्याने प्रायोपवेशन करून देह सोडणे योग्य आहे. आपले जीवन समाजाला बाधक होऊ नये अशी चिंता ज्याप्रमाणे प्रत्येकाने बाळगावयाची असते त्याचप्रमाणे आपले मरणही समाजाला बाधता कामा नये अशी काळजी बाळगणे समाजधर्माला धरूनच आहे.

आत्महत्या करणे हा एक सामाजिक गुन्हा आहे असे सर्वत्र मानले जाते. आत्महत्या करणाऱ्याला मोक्ष मिळत नाही, त्याची अधोगती होते असे सर्व धर्मशास्त्रे देखील म्हणतात. कायदा आणि धर्मशास्त्र याची ही दृष्टी आणि वरील प्रायोपवेशन धर्म याची एकवाक्यता कशी करावयाची हा एक प्रश्न आहे.

मनुष्याला केव्हा ना केव्हा मरण हे आपोआप येणारच आहे; पण ते स्वेच्छेने, आपल्याला वाटेल तेव्हा आपल्यावर ओढवून घेण्याचा हक्क मनुष्याला आहे किंवा नाही हाच प्रश्न या चर्चेच्या मुळाशी आहे.

'तुला आत्महत्या करण्याचा हक्क नाही.' असे म्हणणारा समाज कित्येक गुन्हेगारांना मरणाची शिक्षा ठोठावतोच. यावरून असे अनुमान काढावयास हरकत नाही की ज्याला जगण्यात काही सार उरले नाही असे वाटेल त्याने केवळ स्वतःच्या अभिप्रायावरून मरणाला कवटाळू नये. पण या बाबतीत समाजाची सल्लासंमति आणि आशीर्वाद घेऊनच मरणाचा अंगीकार करावा.

पण व्यक्तिस्वातंत्र्याचा विचार करता मरणाच्या बाबतीत मनुष्य समाज— परतंत्र आहे किंवा काय याचाही विचार करावा लागेल. घोडा, कुत्रा, गाय वगैरे पाळलेल्या जनावरांना त्यांची अंतिम सेवा म्हणून मरण देण्याचा धर्म आजकाल मान्य केला जातो. आणि कुष्ठ रोगासारख्या व्याधीने पीडित झालेल्या मनुष्याची परोपरीने सेवा केल्यानंतर अगदी शेवटची सेवा म्हणून त्याला मरण देण्याची जबाबदारी सबंध समाजाने स्वीकारावी किंवा नाही या विषयाची चर्चा जेथे जबाबदार लोक करीत आहेत तेथे आमरण अनशनाचा अधिकार विशिष्ट परिस्थितीत देखील मनुष्याला नाही असे कुणी म्हणू शकणार नाही. कोणत्या परिस्थितीत मनुष्याला तो अधिकार पोहोचतो याची चर्चा होणे आवश्यक आहे.

प्रस्तुत निबंधात धर्मानंद कोसंबींनी जो विचार मांडला आहे तो स्वतः अमलात आणण्याचा प्रयत्न करून त्यानी या चर्चेला जिवंतपणा आणला आहे. समाजाने केव्हा तरी या प्रश्नाची सांगोपांग चर्चा केलीच पाहिजे. चातुर्याम हा जसा सामाजिक जीवनधर्म आहे त्याचप्रमाणे सल्लेखन हा सामाजिक मरणधर्म आहे. दोन्ही मिळून व्यापक समाज–धर्म होतो.

धर्मानंद कोसंबींचा हा विद्वत्तापूर्ण निबंध वाचल्यानंतर कित्येकांच्या मनांत अशी शंका जरूर यावयाची की धर्माच्या कलेवरांतून जर ईश्वर, आत्मा, परलोक, ईश्वरप्रेरित ग्रंथ, मरणोत्तर जीवन आणि पुरोहित वर्ग या सर्व वस्तू काढून टाकल्या तर धर्मात धर्मत्व असे काय राहिले ? चातुर्याम, संयम आणि अंगमेहनत एवढ्याच गोष्टींचा धर्म बनूं शकेल काय ? गेल्या पिढीच्या प्रारंभी धर्माधर्मांच्या वैमनस्याला कंटाळून गेलेले कित्येक लोक म्हणत असत की सोवळे नीतिशिक्षण आणि नागरिकांची कर्तव्ये एवढयांचेच शिक्षण द्यावे आणि सगळ्याच धर्मांना शिक्षणातून आणि जीवनातून फाटा द्यावा. त्या भूमिकेत आणि धर्मानंद कोसंबींच्या भूमिकेत विशेष असा फरक कोणता ? उत्तरादाखल म्हणता येईल की भूमिका जर शुद्ध असेल तर फरक असलाच पाहिजे असा आग्रह का धरावा ? सामान्य नीतिशिक्षणाविषयी त्या काळचे धार्मिक लोक म्हणत असत की कोऱ्या नीतिशिक्षणामध्ये मनुष्याच्या हृदयाचा संपूर्ण कब्जा घेण्याचे सामर्थ्य नाही. सामान्य नीतिशिक्षण मनुष्याला जगात कसे वागावे हे सांगते, पण तसे का वागावे हे सांगू शकत नाही. ती शक्ति धर्मातच आहे. ईश्वरदत्त किंवा ईश्वरप्रेरित धर्मग्रंथ अथवा ईश्वराचा कोणी प्रेषित पैगंबर यांचेवर श्रद्धा असल्याशिवाय आणि परमात्म्यासारखे, निदान अंतरात्म्यासारखे स्थायी तत्त्व आधार म्हणून स्वीकारल्याशिवाय मनुष्याच्या हातून आत्मसमर्पणासारखे किंवा आत्मबलिदानासारखे दिव्यकर्म होऊच शकत नाही. जीवनाचा अंतिम आधार एखाद्या गूढ अतीन्द्रिय अनश्वर अशा तत्त्वांवर असल्याशिवाय मनुष्याला श्रद्धारूपी पाथेय मिळूच शकत नाही आणि श्रद्धेवाचून उच्च जीवन संभवतच नाही.

उलट पक्षी सांगता येईल की चातुर्याम धर्मात आत्म्याचा जसा स्वीकार नाही तसा निषेधही नाही. चातुर्याम धर्म व्यक्तीसाठी आणि समाजासाठी संपूर्ण धर्म आहे. ज्या कुणाला आत्म्या-परमात्म्याचा आधार

हवा असेल त्याने तो अवश्य घ्यावा. चातुर्याम धर्माला अशा आधाराची जरूर नाही. चातुर्याम हीच आमची दैवते आहेत असे धर्मानंदजी म्हणतात. वेदान्त म्हणतो की विश्वात्मैक्य स्वीकारल्यावाचून कोणताही समाज-धर्म सिद्ध होऊ शकत नाही. अस्तेय, अपरिग्रह, ब्रह्मचर्य आणि अहिंसा ही विश्वात्मैक्यावरच आधारलेली आहेत आणि विश्वात्मैक्य हेच परम सत्य आहे या सत्याहून निराळा ईश्वर नाही.

पण या चर्चेत उतरावयास बौद्ध धर्मानंदजी तयार नव्हते. आपणही ही चर्चा क्षणभर टाळून त्यांच्या या पारमार्थिक निबंधाचे श्रद्धा-प्रज्ञा-पूर्वक परिशीलन करू या.

अगदी शेवटच्या दिवसांत श्री धर्मानंदजींनी आम्हाला स्वतःची दोन हस्तलिखित पुस्तके दाखविली—

१ ) पार्श्वनाथाचा चातुर्याम धर्म आणि

२ ) बोधिसत्व नाटक

धर्मानंदजींच्या स्मारकातील एक अंग म्हणून त्यांचे समग्र साहित्य निरनिराळ्या भाषेत प्रसिद्ध करण्याचे आम्ही ठरविले तेव्हा चातुर्याम धर्माच्या संपादनाची व प्रकाशनाची जबाबदारी मी मजकडे घेतली. पुस्तक छापण्यासाठी जो पैसा गुंतवावा लागेल तो निपाणीचे माझे मित्र स्व. श्री अक्षयचंदजी यांनी सार्वजनिक कामासाठी काढून ठेवलेल्या रकमेतून त्याच्या वारसाकडून मला मिळाला. बोधिसत्त्व नाटकाचे प्रकाशन करण्याची जबाबदारी श्री. लाडांनी आपलेकडे घेतली आहे. तेही पुस्तक चातुर्याम धर्माच्या मागोमाग लवकरच प्रकाशित होईल.

श्री धर्मानंदजींचे तिसरे अप्रकाशित पुस्तक म्हणजे शांतिदेवा-चार्यांच्या बोधिचर्यावताराचे मराठी भाषांतर. हे पुस्तक धर्मानंदजीचे शिष्य प्राध्यापक भागवत हे आपल्या धर्मचक्र मासिकात क्रमशः प्रसिद्ध करीत आहेत. हे भाषांतर पुस्तकरूपाने धर्मानंद ट्रस्ट यथाकाळी प्रसिद्ध करील. बाकीचे लिखाण ग्रंथरूपाने किंवा लेखरूपाने पूर्वी प्रकाशित झालेले असले तरी आज जवळ जवळ दुर्मिळ झालेले आहे. त्यांचेही प्रकाशन निरनिराळ्या भाषेत करावयाचे आहे.

चातुर्याम धर्माच्या संपादनाचे काम मी मजकडे घेतले पण त्या कामी पूर्ण लक्ष देऊ शकलो नाही. प्रुफे तपासणे आणि प्रस्तावना लिहिणे याचा आता सराव होऊन गेला आहे. पण प्रत्येक पानाचा मथळा आणि खालील टीपा मुख्य संपादक क्वचितच पहात असतात. माझेकडूनही या बाबतीत गफलत झाल्यामुळे टीपांतून अमुक पृष्ठ पहा असा उल्लेख जेथे आहे तेथे मुळात हस्तलिखिताची पृष्ठे देणेच शक्य होते. छापताना ते आकडे बदलून छापील पानांचे आकडे देणे आवश्यक होते. ते बरोबर दिले गेले असतील अशा विश्वासाने मी चालले आणि शेवटी पाहतो तो ती चूक राहूनच गेली आहे. वाचकांची क्षमा मागून शुद्धिपत्र देण्याखेरीज दुसरा अिलाज राहिला नाही. वाचकांपेक्षाही श्री. धर्मानंदजींची क्षमा मागितली पाहिजे. ते अशा बाबतीत अतिशय चौकस असत. त्यांना यत्किंचित चूकही खपत नसे.

**काका कालेलकर**

# पार्श्वनाथाचा चातुर्याम धर्म

## प्रस्तावना

बुद्धसमकाली जैनांना निर्ग्रन्थ (निगण्ठ) म्हणत. त्रिपिटक वाङ्मयात ह्या निर्ग्रन्थांचा उल्लेख अनेक ठिकाणी आला आहे. त्यात दोन स्थळीं 'चातुर्यामसंवरसवुतो विहरति' असा निर्देश आहे. बुद्धघोषाचार्याने याचा भलताच अर्थ केला असल्यामुळे मला हे वाक्य मुळीच समजले नाही. १९२२ सालच्या नोव्हेंबर महिन्यात मी गुजराथ विद्यापीठाची सेवा स्वीकारली. तेथे काम करीत असता पण्डित सुखलालजी आणि पंडित बेचरदासजी या दोन सज्जन जैन विद्वानांचा व माझा चांगला परिचय झाला. त्यांनी मला वरील वाक्याचाच नव्हे, तर त्रिपिटकात जैनासंबंधी जो मजकूर आढळतो त्याचा नीट अर्थ समजावून दिला. त्यांचा माझा परिचय झाला नसता, तर मी अद्यापिहि जैन धर्माच्या सिद्धांतासंबंधी अज्ञानच राहिलो असतो. त्यांजपासून जैन धर्माचे जे ज्ञान मला मिळाले, त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

विशेषतः चातुर्यामाचा अर्थ मला स्पष्ट समजला, आणि तेव्हापासून मी या यामांचा विचार करू लागलो. त्यायोगे मला असे दिसून आले की, आजला जी काही श्रमणसंस्कृति शिल्लक राहिली आहे, तिचा आदिगुरु पार्श्वनाथ होय; आणि बुद्धाप्रमाणेच तोहि श्रद्धेय आहे. ह्या चातुर्यामावर मी काही ठिकाणी व्याख्याने देऊन पार्श्वनाथावरची माझी श्रद्धा प्रगट केली. परंतु अशा ह्या सोज्वल धर्माला सध्याची अवकळा का आली, याविषयी मनात विचार येऊ लागले. माजी डॉक्टर भाण्डारकर मला वारंवार प्रश्न विचारीत असत की, अितका उन्नत बौद्ध धर्म हिंदुस्थानातून पार नष्ट कसा झाला? सामान्य लोकांत त्याचे नाव देखील का राहिले नाही? हा प्रश्न सोडविण्याचा यथामति प्रयत्न मी 'हिंदी संस्कृति आणि अहिंसा' या पुस्तकात केला आहे; आणि जैन धर्माला अशी दशा का आली याची चर्चा या लेखात आहे.

बौद्ध आणि जैन धर्माला सांप्रतची दशा येण्याला मुख्य कारण झाले संप्रदायाचा परिग्रह. धम्मपदात म्हटल्याप्रमाणे—

**असारे सारमतिनो सारे चासारदस्सिनो।**
**ते सारं नाधिगच्छन्ति मिच्छासंकप्पगोचरा॥**

( असार गोष्टीत सार मानणारे व सार गोष्टीत असार पाहणारे आणि मिथ्या संकल्पात वावरणारे लोक सार प्राप्त करू शकत नाहीत. )

हे सांप्रदायिक लोक भलत्याच गोष्टीला महत्त्व देऊन धर्म रहस्यापासून दूर गेले. याचा मला स्वतःलाच एक चांगला अनुभव आला.

बुद्धसमकाली मांसाहाराची प्रथा कशी होती हे दाखविण्याच्या उद्देश्याने 'पुरातत्त्व' त्रैमासिकात मी एक लेख लिहिला. त्याकाळच्या सर्वच प्रकारच्या श्रमणांत मांसाहार प्रचलित होता असे मी त्या लेखात सप्रमाण प्रतिपादले. त्याच लेखात काही फेरफार करून 'भगवान बुद्ध' या पुस्तकाचे मी ११ वे प्रकरण लिहिले. नागपूरच्या सुविचार प्रकाशन मंडळाने, ज्यांत हे प्रकरण आहे ते, 'भगवान बुद्ध' पुस्तकाचे उत्तरार्ध १९४१ साली प्रसिद्ध केले. ते प्रकरण काही दिगम्बर जैनांच्या निदर्शनास आले, आणि त्यांनी यवतमाळला एक संस्था स्थापन करून तिच्याद्वारे माझ्यावर निषेधाचा भडिमार केला. व कोर्टात फिर्याद करण्याचा धाक घातला. शेवटी मी नागपूरच्या 'भवितव्य' साप्ताहिकात एक पत्र लिहून ह्या माझ्या टीकाकारांना जाहीर उत्तर दिले. तेव्हापासून वऱ्हाडातील ही चळवळ थंडावली.

पण आमचे जैन सनातनी बांधव स्वस्थ बसले नाहीत. १९४४ साली कलकत्त्यापासून काठेवाडपर्यंत अनेक सभा भरवून त्यांनी माझ्या निषेधाचे ठराव पास केले. त्यांत संतोषाची एक गोष्ट घडून आली ती ही की, माझा निषेध करण्याला आपसात सतत भांडणारे मूर्तिपूजक श्वेताम्बर, स्थानकवासी श्वेताम्बर व दिगम्बर जैन एक झाले. माझ्याशी वादविवाद करण्याला अनेक जैन साधू व गृहस्थ सज्ज झाले. ह्या सर्वांना पृथक् पृथक् उत्तरे देत बसणे शक्यच नव्हते. यास्तव मी त्यांना 'जन्मभूमि' या गुजराथी दैनिकाच्या द्वारे अशी विनंति केली कीं, त्यांनी हायकोर्टातील एका गुजराथी जज्जाला सरपंच निवडावे व त्यासमोर सर्व आक्षेप मांडावे; आणि मी माझ्या पक्षाचे समर्थन करतो. ते ऐकून सरपंचाने निकाल द्यावा. तो जर माझ्याविरुद्ध झाला तर मी जैनांची जाहीर माफी मागतो; पण त्यांच्याविरुद्ध झाला, तर तो वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध करण्यात यावा; म्हणजे यापुढे हा वादच रहाणार नाही. परंतु ही गोष्ट जैनांना पसंत पडली नाही, आणि ही चळवळ आपोआपच बंद पडली. तथापि मधून मधून एखादा सनातनी जैन अद्वातद्वा पत्र लिहिण्याची तसदी घेतच असतो.

परंतु हे माझे जैन बांधव क्षणभर असा विचार करीत नाहीत की, मांसाहार न करणे हे जैन धर्माचे रहस्य, की चातुर्यामधर्म हे रहस्य ? जर चातुर्याम धर्म हे रहस्य, तर त्याला अनुसरून जैन साधु व गृहस्थ वागतात काय ? उदेपूरच्या केसरिया नावाच्या जैन मंदिरात श्वेताम्बरांनी व दिगम्बरांनी एकमेकांवर गोळ्या घालून खून पाडले. संमेत शिखरावरील पार्श्वनाथाच्या मंदिरांतील पूजेवर हंमेश खटले चालू असतात व ते बहुधा प्रिव्ही कौन्सिलपर्यंत जातात. आजपर्यंत ह्या खटल्यांत लक्षावधी रुपये खर्च झाले आहेत व पुढे किती होतील हे कोणी सांगू शकत नाही. गिरनार वगैरे ठिकाणीही ही भांडणे चालूच आहेत. पण ती चातुर्यामाला किती विसंगत आहेत याचा कोणीही सनातनी जैन विचार करीत नाही. त्यांनी माझ्यावर एवढी तोहमत आणली, तरी त्यांच्यावरचे माझे प्रेम कायम आहे. हा दोष त्यांचा नसून सांप्रदायिकतेचा आहे, आणि सांप्रदायिकते- पासून बौद्ध आणि खिस्ती लोकही अलिप्त नाहीत. खिश्चनांनी तर आपसांत भांडून रक्ताच्या नद्या वाहविल्या. तेव्हा जैनांना तरी दोष का द्या ? परंतु अशा सांप्रदायिकतेपासून मुक्त होण्याची खटपट करणे आपले कर्तव्य आहे. तिच्यातून पार पडून चातुर्याम धर्माचे महत्त्व आम्हाला समजावे व आम्ही त्या धर्माच्या आचरणाने मानवसमाजाचे कल्याण करण्यास समर्थ व्हावे, याचसाठी माझा हा प्रयत्न आहे. यांत माझे दोष असतील ते अवश्य सुधारावे, आणि गुण ग्रहण करून आत्मपरहित तत्पर व्हावें हीच काय ती माझी सर्वांस विनंति.

बनारस

ता. २९ जून १९४६ **धर्मानंद कोसम्बी**

---

## पुस्तकांच्या नांवाचे संक्षेप

श्र. भ. म. = **श्रमण भगवान महावीर**, हिंदी;

लेखक **मुनि श्री कल्याण विजयजी गणी.**

भ. बु. पू. = भगवान बुद्ध, पूर्वार्ध
भ. बु. उ. = भगवान बुद्ध, उत्तरार्ध } प्रकाशक सुविचार प्रकाशक मंडळ, नागपूर.

# पार्श्वनाथाचा

# चातुर्याम धर्म

## त्रिषष्टी–शलाका–पुरुष

जैनांचे श्वेताम्बर व दिगम्बर असे मुख्य दोन सम्प्रदाय आहेत. हे दोन्ही संप्रदाय त्रिषष्टी (६३) शलाका-पुरुष मानतात. प्राचीन काळी तशाच निमंत्रित माणसांना शलाका (सळया) पाठवीत असत. त्या दाखविल्या म्हणजे निमंत्रित स्थानी प्रवेश मिळत असे.[१] ह्या पद्धतीवरून निवडक पुरुषांना शलाका-पुरुष म्हणण्याचा प्रघात पडला असावा. जैन ग्रन्थांत असे निवडक किंवा प्रसिद्ध पुरुष ६३ सांगितले आहेत ते असे—

ऋषभ, अजित, संभव, अभिनन्दन, सुमती, पद्मप्रभ, सुपार्श्व, चन्द्रप्रभ, पुष्पदन्त, शीतल, श्रेयांस, वासुपूज्य, विमल, अनन्त, धर्म, शान्ति, कुन्थु, अर, मल्लि, सुव्रत, नमि, नेमि, पार्श्व आणि वर्धमान, हे २४ **तीर्थंकर**;

भरत, सगर, मघवा, सनत्कुमार, शान्ति, कुन्थु, अर, सुभौम, पद्म, हरिषेण, जयसेन, आणि ब्रह्मदत्त, हे १२ चक्रवर्ती; विजय, अचल, सुधर्म, सुप्रभ, सुदर्शन, नन्दी, नन्दीमित्र, राम आणि पद्म, हे **९ बलदेव**;

त्रिपृष्ठ, द्विपृष्ठ, स्वयंभू, पुरुषोत्तम, पुरुषसिंह, पुरुषपुण्डरीक, पुरुषदत्त, नारायण (लक्ष्मण) आणि कृष्ण, हे **९ नारायण**;

आणि अश्वग्रीव, तारक, मेरक, मधुकैटभ, निशुम्भ, बलि, प्रहरण, रावण आणि जरासंघ, हे ९ (त्यांचे) **प्रतिशत्रु** मिळून ६३ होतात.

ह्यांपैकी शान्ति, कुन्थु व अर हे चक्रवर्ति होऊन तीर्थंकर झाले. त्यांची गणना तीर्थंकरात झाली आहे आणि पुन: चक्रवर्तीतही झाली आहे.

---

१. विसुद्धिमग्गदीपिका २।२७ पहा.

## तीर्थंकरांची उंची व आयुष्य

| | उंची | आयुष्य वर्षे |
|---|---|---|
| ऋषभ | ५०० धनुष्ये[१] | ८४ लक्ष पूर्व[२] |
| अजित | ४५० ,, | ७२ ,, ,, |
| सम्भव | ४०० ,, | ६० ,, ,, |
| अभिनंदन | ३५० ,, | ५० ,, ,, |
| सुमति | ३०० ,, | ४० ,, ,, |
| पद्मप्रभ | २५० ,, | ३० ,, ,, |
| सुपार्श्व | १०० ,, | २० ,, ,, |
| चन्द्रप्रभ | १५० ,, | १० ,, ,, |
| पुष्पदत्त | १०० ,, | २ ,, ,, |
| शीतल | ९० ,, | १ ,, ,, |
| श्रेयांस | ८० ,, | ८४ लक्ष |
| वासुपूज्य | ७० ,, | ७२ ,, |
| विमल | ६० ,, | ६० ,, |
| अनन्त | ५० ,, | ३० ,, |
| धर्म | ४५ ,, | १० ,, |
| शान्ति | ४० ,, | १ ,, |
| कुन्थु | ३५ ,, | ९५ हजार |
| अर | ३० ,, | ८४ ,, |
| मल्लि | २५ ,, | ५५ ,, |
| सुव्रत | २० ,, | ३० ,, |
| नमि | १५ ,, | १० ,, |
| नेमि | १० ,, | १ ,, |
| पार्श्व | ९ हात | १०० |
| वर्धमान | ७ ,, | ७२ |

१. ति. प. ४।५७९–५८२. एक धनुष्य ४ हात किंवा ६ फूट. ति. प. ४।५८५–५८७ पहा.

२. ८४ लक्षांचे एक पूर्वांग आणि ८४ लक्ष पूर्वांगाचे एक पूर्व, म्हणजे ७७ लक्ष ५६ हजार कोटि वर्षे ( सर्वार्थसिद्धि अ. ३।३१ ).

## बुद्धांशी तुलना

यांची तुलना बुद्धवंसात वर्णिलेल्या २५ बुद्धांशी करणे योग्य वाटते.

| | उंची | आयुष्य वर्षे | स्त्रिया |
|---|---|---|---|
| दीपंकर | ८० हात | १ लक्ष | ३ लक्ष |
| कोण्डञ्ञ | ८८ ,, | १ ,, | ३ ,, |
| मंगल | ८८ ,, | ९० हजार | ३० हजार |
| सुमन | ९० ,, | ९० ,, | ६३ ,, |
| रेवत | ८० ,, | ६० ,, | ३३ ,, |
| सोभित | ५८ हात | ९० हजार | ४३ हजार (?) |
| अनोमदस्सी | ५८ हात | १ लक्ष | २३ ,, |
| पदुम | ५८ ,, | १ ,, | ३३ ,, |
| नारद | ८८ ,, | ९० हजार | ४३ ,, |
| पदुमुत्तर | ५८ ,, | १ लक्ष | ४३ ,, |
| सुमेध | ८८ ,, | ९० हजार | ४८ ,, |
| सुजात | ५० ,, | ९० ,, | २३ ,, |
| पियदस्सी | ८० ,, | ९० ,, | ३३ ,, |
| अत्थदस्सी | ८० ,, | १ लक्ष | ३० ,, |
| धम्मदस्सी | ८० ,, | १ ,, | ४० ,, |
| सिद्धत्थ | ६० ,, | १ ,, | ४८ ,, |
| तिस्स | ६० ,, | १ ,, | ३० ,, |
| पुस्स | ५८ ,, | ९० हजार | २३ ,, |
| विपस्सी | ८० ,, | ८० ,, | ४३ ,, (?) |
| सिखी | ७० ,, | ७० ,, | २४ ,, |
| वेस्सभू | ६० ,, | ६० ,, | ३० ,, |
| ककुसंध | ४० ,, | ४० ,, | ३० ,, |
| कोनागमन | ३० ,, | ३० ,, | १६ ,, |
| कस्सप | २० ,, | २० ,, | ४८ ,, (?) |
| गोतम | — ,, | — ,, | ४० ,, |

तीर्थंकरांच्या कथा ज्या ग्रन्थांत सापडतात, त्यांच्यापेक्षा बुद्धवंस प्राचीन आहे. तेव्हा प्रथमतः बौद्ध भिक्षूंनी अशा असंभाव्य दन्तकथा लिहिण्यास सुरुवात केली, आणि त्या लोकप्रिय होतात असे पाहून जैन साधूंनी त्यांच्यावर ताण केली असावी. अशा असत्याच्या चढाओढीमुळे बौद्धांचे आणि जैनांचेच नव्हे, तर सर्व हिंदुस्थानचे केवढे नुकसान झाले, याचा या लेखात यथायोग्य स्थळी विचार करण्यात येईलच.

ह्या दन्तकथांत एक गोष्ट विशेष आहे ती ही की, श्वेताम्बर जैन मल्लि तीर्थंकर स्त्री होती असे मानतात. पण ते दिगम्बरांना मान्य नाही. त्यांच्या मते स्त्री केवली होणे शक्यच नाही. का की, स्त्री नग्न राहू शकत नाही !

वर दिलेल्या ६३ शलाका-पुरुषांच्या कथा हेमचन्द्राचार्यांनी 'त्रिषठी शलाका-पुरुषचरित्र' नावाच्या ग्रन्थात वर्णिल्या आहेत; त्यांपैकी पार्श्वनाथाच्या कथेचा सारांश तेवढा येथे देतो.

## पार्श्वाची कथा

वाराणसीच्या अश्वसेन राजाच्या पत्नीला (वामादेवीला) चैत्र कृष्ण चतुर्दशीच्या दिवशी विशाखा नक्षत्रात गर्भ प्राप्त झाला, व ती पौष कृष्ण दशमीच्या दिवशी अनुराधा नक्षत्रात पुत्र प्रसवली. इन्द्रादिक देवांनी त्याचे स्तोत्र गाइले; आणि अश्वसेन राजाने कैदींना बन्धमुक्त करून मोठ्या थाटाने पुत्रजन्मोत्सव केला. वामादेवीने तो पुत्र उदरात असता अंधारी रात्र असून देखील आपल्या बाजूस (पार्श्वतः) सरपटणारा सर्प पाहिला होता. राजाला ती आठवण झाली, आणि त्याने मुलाचे नाव पार्श्व ठेवले. पार्श्व वयात आला, तेव्हा तो ९ हात उंच होता.

त्या काली अश्वसेन राजापाशी एक अनोळखी दूत आला. राजाने त्याला येण्याचे कारण विचारले असता तो म्हणाला, "महाराज, मी कुशस्थली नगरीच्या प्रसेनजित् राजाकडून आलो आहे. त्या राजाला प्रभावती नावाची एक अत्यंत सुस्वरूप कन्या आहे. ती आपल्या सखींसह अुद्यानात विहरत असता, तेथे पार्श्वनाथाच्या स्तुतीने भरलेले गीत किन्नरी गात होत्या, ते तिने ऐकले, आणि तेव्हापासून ती पार्श्वनाथावर अनुरक्त

झाली आहे. ही गोष्ट तिच्या आईबापांना समजली, तेव्हा त्यांना फार आनंद झाला, आणि त्यांनी तिला इकडे पार्श्वनाथापाशी पाठविण्याचा बेत केला.

"हे वर्तमान यवन (नांवाच्या) कलिंग राजाला समजले, आणि तो आपल्या दरबारात म्हणाला, 'मी येथे असताना प्रभावतीशी लग्न करणारा पार्श्व कोण? आणि हा कुशस्थलीचा राजा तिला मला का देत नाही? पण दानाची वाट याचक पाहतात, आणि शूर जबरदस्तीने घेतात. का की, सर्व वस्तु शूरांच्याच आहेत.' असे म्हणून त्याने मोठ्या सैन्यासह येऊन कुशस्थलीला वेढा दिला आहे; कोणालाही आतबाहेर जाता येत नाही. मी त्यातून रात्री निसटलो."

हे त्या दूताचे भाषण ऐकून अश्वसेन क्रुद्ध होऊन म्हणाला, "हा भिकारी यवन माझ्यासमोर काय करील? आणि मी असताना तुम्हाला भीती कोणाची? आताच तुमच्या नगराच्या रक्षणासाठी सैन्य पाठवितो." असे म्हणून त्याने रणभेरी वाजविण्यास हुकूम केला.

पार्श्व त्यावेळी क्रीडागृहात होता. त्याने तो भेरीशब्द व एकत्रित झालेल्या सैनिकांचा मोठा घोष ऐकला, आणि पित्याजवळ जाऊन त्याने प्रश्न केला की ही तयारी कशासाठी आहे? पित्याने त्या दूताला दाखविले व त्याजकडून मिळालेली बातमी पार्श्वाला सांगितली. तेव्हा पार्श्व म्हणाला, "तात, तुम्ही या स्वारीवर न जाता मलाच पाठवा." अश्वसेन म्हणाला, "मुला, हे तुझे वय क्रीडा करण्याचे आहे. त्वां घरीच आनंदात रहावे यात मला हर्ष वाटतो." पार्श्व म्हणाला, "तात, ही एक माझी क्रीडाच होईल. यास्तव आपण घरीच असावे."

याप्रमाणे पार्श्वाच्या आग्रहामुळे त्याला अश्वसेनाने लढाईवर पाठविले. त्याने कुशस्थलीला जाऊन यवनाचा पुरा पराजय केला, आणि यवन त्याला शरण आला. पार्श्वनाथाने यवनाला 'पुनः असे करू नये,' असे बजावून त्याच्या राज्यात परत जाण्याची परवानगी दिली. त्यानंतर प्रसेनजित् राजाने पार्श्वाचा मोठा गौरव केला. आणि प्रभावतीच्या प्रेमाचे वर्तमान त्याला सांगितले. तेव्हा पार्श्व म्हणाला, "पित्याच्या आज्ञेने मी केवळ तुमचे रक्षण करण्यासाठी इकडे आलो, तुमच्या कन्येला वरण्यासाठी आलो नाही."

ते ऐकून प्रभावती फार खिन्न झाली. पण पित्याने तिचे सांत्वन केले; आणि तिला बरोबर घेऊन तो पार्श्वनाथासह वाराणसीला आला. तेथे अश्वसेनाने त्याचे योग्य स्वागत केले. प्रसेनजिताने त्याला प्रभावतीचा वृत्तांत सांगितला; आणि अश्वसेनाच्या आग्रहास्तव पार्श्वनाथाने तिचे पाणिग्रहण केले.

त्या काली कठ नांवाचा एक तापस वाराणसीबाहेर पंचाग्निसाधनादिक तप करीत होता. सगळे नागरिक त्याला पाहण्यासाठी जात. पार्श्वही तिकडे गेला. त्याला त्या तापसाच्या धुनीत जळणाऱ्या एका लांकडात एक मोठा सर्प दिसला, आणि तो म्हणाला, " काय हे अज्ञान ! हा तपस्वी असून याला दया नाही ! आणि दयेवाचून धर्म कसला ? " कठ म्हणाला, " राजपुत्र हत्ती घोडे इत्यादिकच जाणतात; पण आम्ही मनी धर्म जाणतो."

त्यावर पार्श्वाने आपल्या नोकरांकडून ते जळणारे लाकूड बाहेर काढवून फोडविले. त्यातून जरासा जळलेला धरण नांवाचा नाग निघाला. पार्श्वाने लोकांना त्याला नमस्कार करावयास लावले. लोकांनी पार्श्वाच्या अंतर्ज्ञानाची स्तुति केली. ती ऐकून कठाने आणखीही खडतर तप आरंभिले. आणि मरून तो मेघमाली नांवाचा असुर झाला.

इकडे पार्श्व भगवान् आपले कर्मफल भोगून संपले असे जाणून प्रव्रज्या घेण्यास सिद्ध झाला, आणि विशाला नांवाच्या शिबिकेत बसून अरण्यातील आश्रमात गेला. तेथे त्याने आपल्या वस्त्रालंकारांचा त्याग केला. इंद्राने त्याला वस्त्रे पुरविली. त्याच्याबरोबर ३०० राजांनी प्रव्रज्या घेतली.

एकदा पार्श्वनाथ प्रवास करीत एका तापसाश्रमाला आला, आणि तेथे एका विहिरीजवळ वटवृक्षाखाली राहिला. तेव्हा पूर्वजन्मीचे वैर स्मरून मेघमाली असुराने पुष्कळ भयंकर शार्दूल उत्पन्न करून त्याजवर सोडले. परंतु पार्श्वनाथाची समाधि ढळली नाही; आणि ते शार्दूल कोठल्याकोठे निघून गेले ! त्यानंतर मेघमालीने अनुक्रमे पर्वताएवढे हत्ती, आपल्या नांग्यानी पाषाण फोडणारे विंचू, निर्दय अस्वले, दृष्टिविष सर्प आणि भयंकर वेताळ उत्पन्न करून पार्श्वावर सोडले; पण ते सर्व तेथल्या तेथेच नष्ट झाले. तेव्हा मेघमालीने कल्पान्त मेघासारखा पाऊस पाडला. त्यामुळे पूर आला, व पार्श्वनाथाच्या नाकापर्यंत पाणी पोचले. त्या वेळी

धरण नागराजाचे आसन कंपित झाले. आणि त्याने जाणले की, पूर्व-जन्मीचा कठ या जन्मी मेघमाली होऊन पार्श्वनाथाला उपद्रव करीत आहे. तो आपल्या राण्यांसह पार्श्वाजवळ आला, आणि त्याने आपल्या शरीराने पार्श्वनाथाला वेढून सात फणांनी त्यावर छत्र धारण केले, आणि त्याच्या राण्यांनी पार्श्वनाथासमोर सुंदर नृत्य आरंभिले. पार्श्वनाथ जसा मेघमालीच्या कृत्यांनी तसाच त्या नृत्याने देखील विचलित झाला नाही.

मेघमाली एकसारखा पाऊस पाडीतच होता. ते पाहून धरण नागराजा क्रुद्ध झाला, आणि म्हणाला, "अरे, हे तू काय करतोस ? त्या प्रसंगी लांकडाच्या आत असलेला सर्प जळतो आहे असे जाणून जर प्रभूने तुला पापापासून निवृत्त करण्याचा प्रयत्न केला, तर त्यात तुझे अहित काय केले ? प्रभूचा सदुपदेशही तुझ्या वैराला कारण झाला !" ते वचन ऐकून मेघमाली भयभीत झाला, व पार्श्वनाथाला शरण गेला.

पार्श्वनाथ तेथून वाराणसीला आला व उद्यानात एका घातकी वृक्षाखाली राहिला. तेथे, ज्या दिवशी त्याच्या दीक्षेला ८४ दिवस पुरे झाले, त्या दिवशी म्हणजे चैत्र कृष्ण चतुर्दशीला सकाळी त्याच्या घाती कर्मांचा नाश झाला व त्याला केवल ज्ञान प्राप्त झाले.

त्या प्रसंगी देव-देवी, नर-नारी आणि साधु-साध्वी त्याला नमस्कार करून यथोचित स्थानी राहिले. ते वैभव उद्यानपालाने पाहिले आणि राजवाड्यात जाऊन ते अश्वसेनाला नमस्कारपूर्वक निवेदित केले. अश्वसेन वामादेवीसह सहपरिवार पार्श्वनाथापाशी आला आणि त्याला नमस्कार व प्रदक्षिणा करून इन्द्राजवळ बसला. इन्द्राने व अश्वसेनाने पार्श्वनाथाचे स्तवन केले.

## पार्श्वनाथाचा धर्मोपदेश

तदनंतर पार्श्वनाथाने धर्मोपदेश केला तो असा—ह्या जराव्याधि-मृत्यूने भरलेल्या संसाररूपी महारण्यात धर्माशिवाय दुसरा त्राता नाही; म्हणून त्याचीच कास धरावी. तो धर्म सर्वविरति व एकदेशविरति[१] असा

१. याचे वर्णन हेमचंद्राचार्याने केले नाही. परंतु तत्वार्थाधिगमसूत्रांत पहिल्याचे हे दहा प्रकार दिले आहेत, ते असे—क्षमा, मार्दव, आर्जव (सरलता),

दोन प्रकारचा आहे. पैकी पहिला संयमादिक दहा प्रकारचा साधूसाठी; आणि दुसरा पांच अणुव्रते, तीन गुणव्रते व चार शिक्षाव्रते मिळून बारा प्रकारचा गृहस्थांसाठी जाणावा.

ही व्रते पाळण्यात ( गृहस्थांकडून ) अतिचार घडला, तर ती पुण्यप्रद होत नाहीत. यास्तव पांच अणुव्रतात प्रत्येकी पांच अतिचार वर्ज्य करावे.

रागाने ( प्राण्याला ) बांधणे, नाककान छेदणे, अधिक भार लादणे, ताडन करणे आणि उपाशी ठेवणे हे अहिंसा अणुव्रताचे पांच अतिचार वर्ज्य करावे.

खोटा उपदेश, विचार न करता बोलणे, गुप्त गोष्टीचा स्फोट करणे, विश्वास ठेवून सांगितलेली गोष्ट दुसऱ्यास सांगणे आणि खोटा लेख तयार करणे हे सत्य अणुव्रताचे पांच अतिचार वर्ज्य करावे.

चोरीला संमति देणे, चोरीचा माल घेणे, विरोधी राजाच्या राज्यांत जाणे, बनावट माल तयार करणे आणि मापांत कमीजास्त करणे हे पांच अस्तेय अणुव्रताचे अतिचार आहेत; ते वर्ज्य करावे.

वेश्या किंवा परस्त्री–गमन, कुमारी किंवा विधवा-गमन, दुसऱ्याचे लग्न ( किंवा प्रेम ) जुळविणे, स्त्रीसंगाचा अतिरेक आणि सृष्टिविरुद्ध मैथुन हे पांच ब्रह्मचर्य अणुव्रताचे अतिचार आहेत; ते वर्ज्य करावे.

धनधान्यांचा, सामान्य धातूंचा, गाईघोडे वगैरे जनावरांचा, शेती-वाडीचा व घरांचा आणि सोन्यारुप्याचा आपण ठरविलेल्या मर्यादेपलीकडे संग्रह करणे हे अपरिग्रह अणुव्रताचे पांच अतिचार वर्ज्य करावे.

---

शौच ( निर्लोभता ), सत्य, संयम, तप, त्याग, आकिंचन्य आणि ब्रह्मचर्य. यांत अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह या पांच महाव्रतांचा समावेश होतोच. ही पांच महाव्रते गृहस्थ पूर्णपणे पाळू शकत नाहीत म्हणून त्यांच्या ह्या व्रतांना अणुव्रते म्हणतात. दिग्विरति, देशविरति आणि अनर्थदण्डविरति ही तीन गुणव्रते, आणि सामायिकव्रत, प्रोषधव्रत, उपभोगपरिभोगपरिमाणव्रत आणि अतिथिसंविभागव्रत ही चार शिक्षाव्रते होत. ह्या बाराही व्रतांचे स्पष्टीकरण न करता हेमचन्द्राचार्याने त्यांचे अतिचार तेवढे दिले आहेत. त्यांपैकी पांच अणुव्रतांचे अतिचार येथे दिले आहेत, आणि बाकी ७ व्रतांचा खुलासा तत्त्वार्थाधिगमसूत्राच्या सर्वार्थसिद्धी टीकेच्या ( अ. ७, सूत्र २१ ) आधारे केला आहे. हेमचन्द्राचार्याने दिलेले ह्या ७ व्रतांचे अतिचार विस्तारभयास्तव गाळले आहेत.

दिग्विरति म्हणजे अमुक दिशेला अमुक मर्यादेपलीकडे न जाणे. देशविरति म्हणजे अमुक गांवात किंवा प्रदेशात न जाणे. काया, वाचा आणि मन यांच्या प्रयोगाला दण्ड म्हणतात.[१] ह्यांचा दुरुपयोग करणे अनर्थदण्ड होय. त्यापासून विरति अनर्थ–दण्डविरति. ह्या तीन विरति पांच अणुव्रतांना गुणकारक आहेत; म्हणून यांस गुणव्रतें म्हणतात.

अशा काली व ठिकाणी मी हे व्रत किंवा व्रते आचरीन असा नियम करणे सामायिक व्रत होय. दोन अष्टमी व दोन चतुर्दशी हे चार प्रोषध दिवस, त्या दिवशी पवित्र स्थानी जाऊन उपवास करणे प्रोषधव्रत होय. खाण्यापिण्याला उपभोग म्हणतात, आणि अंथरूण, पांघरूण, वस्त्र, शयन, आसन, घर इत्यादिकांना परिभोग म्हणतात. त्यांत परिमाण ठेवणे उपभोग–परिभोग–परिमाणव्रत होय. अतिथींना, साधूंना, भिक्षा देणे अतिथिसंविभाग-व्रत होय. ही चार व्रतें पांच अणुव्रतांचे शिक्षण देतात, म्हणून यांना शिक्षा-व्रतें म्हणतात.

तो उपदेश ऐकून पुष्कळ लोकांनी, वामादेवीने, प्रभावतीने आणि तेथल्या तेथेच राज्य हस्तिसेनाला देऊन अश्वसेनाने प्रव्रज्या घेतली.

## पार्श्वनाथाच्या शासनदेवता

कूर्म वाहन व मस्तकावर नागाची फणा असलेला, डावीकडील दोन हातांनी नकुल व सर्प धारण करणारा, उजवीकडील दोन हातांनी फळ व सर्प धारण करणारा असा श्यामवर्ण चतुर्भुज गजानन यक्ष पार्श्वनाथाची शासनदेवता झाला. त्याचप्रमाणे कोंबड्यावर व सर्पावर बसणारी, उजवी-कडील दोन हातांनी पद्म व पाश धारण करणारी, डावीकडील दोन हातांनी फळ व अंकुश धारण करणारी स्वर्णवर्णा पद्मावती देवी पार्श्वनाथाची दुसरी शासनदेवता झाली.

## पार्श्वनाथाचे निर्वाण

येथपर्यंत त्रिषष्टी–शलाका–पुरुषचरित्राच्या ९ व्या पर्वाच्या दुसऱ्या व तिसऱ्या सर्गांचा सारांश सांगितला. चवथ्या सर्गांत सागरदत्त आणि बन्धुदत्त ह्या दोन व्यापाऱ्यांच्या पूर्वजन्मींच्या आणि त्या जन्मींच्या कथा

१. मज्झिम निकाय उपालिसुत्त पहा.

आहेत. त्यांपैकी सागरदत्ताने पार्श्वनाथाला जिनरत्न प्रतिमा कशी स्थापावी असा प्रश्न केला व पार्श्वनाथाने कथन केलेल्या विधीप्रमाणे त्या मूर्तीची त्याने स्थापना केली आणि प्रव्रज्या घेतली. बंधुदत्त नागपुरीचा राहणारा. तो व त्याची पत्नी प्रियदर्शना या दोघांनी पार्श्वनाथापासून गृहस्थव्रत स्वीकारले, आणि नागपुरीच्या नवनिधिस्वामी राजाने प्रव्रज्या घेतली.

याप्रमाणे धर्मोपदेश करीत फिरत असतां पार्श्वनाथाचे साधुशिष्य १६ हजार, साध्वी ३८ हजार, श्रावक एक लक्ष ६४ हजार आणि श्राविका ३ लक्ष ७७ हजार झाल्या.

पार्श्वनाथ आपले निर्वाण आसन्न आहे असे जाणून संमेत पर्वतावर गेला व तेथे ३३ साधूंसह ३० दिवस अनशनव्रत (उपवास) करून श्रावण शुक्ल अष्टमी विशाखा नक्षत्रात निर्वाण पावला. तो गृहस्थाश्रमात तीस वर्षे आणि संन्यासाश्रमात ७० वर्षे राहिला.

## दिगम्बरांचा मतभेद

त्रिषष्टी-शलाका-पुरुषचरित्र श्वेतांबर संप्रदायाचा ग्रंथ आहे. त्यातील बऱ्याच गोष्टी दिगंबराना मान्य नाहीत. त्यांपैकी पार्श्वनाथाच्या चरित्रासंबंधी आहेत त्या अशा—पार्श्वनाथाचा जन्म ते पौष कृष्ण एकादशीला विशाखा नक्षत्रात (ति. प. ४।५४८) आणि निर्वाण श्रावण शुक्ल सप्तमीला विशाखा नक्षत्रात (ति. प. ४।१२०७) मानतात. त्यांच्या मते पार्श्वनाथ कुमार ब्रह्मचारी होता, व तो केवली (जीवन्मुक्त) झाल्यावर कवलाहार (अन्नाहार) करीत नसे; कारण केवलींना अन्नाची जरूरीच रहात नाही. अर्थात पार्श्वनाथाने निर्वाणकाली अनशन केले ही गोष्ट त्यांना पसंत नाही. ह्या वादात जैनेतरांना मुळीच महत्त्व वाटणार नाही. एखादा संप्रदाय बनल्यानंतर क्षुल्लक गोष्टीत कसे मतभेद होतात हे तात्पर्य मात्र सर्वांनीच ग्रहण करण्याजोगे आहे.

## पार्श्वनाथाच्या कथेत इतिहासाचा अभाव

पार्श्वनाथाची वरील सर्व कथा काल्पनिक आहे हे वर वर वाचणाऱ्यालाही तेव्हाच दिसून येईल. पार्श्वनाथाच्या काली कलिंग देशात यवन नांवाचा राजा राज्य करीत होता हे संभवतच नाही. दुसऱ्याही गोष्टी

तशाच आहेत. त्याचा जन्म वाराणसीत झाला हे संभवनीय आहे. पण त्याचा बाप तेथील राजा होता याला मुळीच आधार नाही. वज्जींच्या किंवा मल्लांच्या राज्यांप्रमाणे काशीचे राज्य गणसत्ताक होते. परंतु बुद्ध-समकाली त्यांचें स्वातंत्र्य नष्ट होऊन त्यांचा समावेश कोसल देशात झाला होता. पार्श्वनाथ काशी स्वतंत्र असताना जन्मला किंवा त्यांचा समावेश कोसल देशात झाल्यावर जन्मला हे सांगता येत नाही. त्याकाली चांगल्या वस्त्राला 'काशिक वस्त्र' व चांगल्या चंदनाला 'काशिक चंदन' म्हणत, यावरून काशीचे गणराजे प्रगमनशील होते असे अनुमान करता येते. अशा देशात पार्श्व जन्मला असल्यास नवल नाही.

## पार्श्वनाथ ऐतिहासिक नव्हता काय ?

येथे असा प्रश्न उद्भवतो की, पार्श्वाच्या कथा जर काल्पनिक आहेत, तर खुद्द पार्श्व देखील काल्पनिक का नसावा ? ह्याला उत्तर हे की, ह्या सर्व दंतकथा असल्या तरी त्रिपिटक ग्रंथात जैनांसंबंधाने आणि जैनांच्या आगमात पार्श्वासंबंधाने जी माहिती मिळते, तिजवरूनच पार्श्वनाथ ऐतिहासिक पुरुष होता असा निष्कर्ष निघतो.

त्रिपिटकात निर्गन्थांचा उल्लेख अनेक ठिकाणी आला आहे. त्याच्यावरून असे दिसते की, निर्गन्थ संप्रदाय बुद्धाच्यापूर्वी पुष्कळ वर्षे अस्तित्वात होता. वप्प नांवाचा शाक्य निर्गन्थांचा श्रावक होता असा उल्लेख अंगुत्तर निकायात सांपडतो,[1] व त्या सुत्ताच्या अट्ठकथेत हा वप्प बुद्धाचा चुलता होता असे म्हटले आहे.[2] म्हणजे गोतम बुद्धाच्या जन्मापूर्वी किंवा अल्प वयातच निर्गन्थांचा धर्म शाक्य देशात पोंचला होता, असे म्हणावे लागते. महावीरस्वामी बुद्धसमकालीन. तेव्हा हा धर्म-प्रचार त्याने केला नसून तो त्याच्यापूर्वीच्या निर्गन्थांनी केला होता असे समजणे योग्य आहे.

---

१. एकं समयं भगवा सक्केसु विहरति कपिलवत्थुस्मिं ।
अथ खा बप्पो सक्को निगण्ठ सावको इ. ।
अंगुत्तर, चतुक्कनिपात, चतुत्थपण्णासक, वग्ग ५ वा ।

२. वप्पोति दसबलस्स चुल्लपिता । अंगुत्तर अट्ठकथा, सयामसंस्करण २ । ४७४.

ह्या प्राचीनतर निर्ग्रन्थांचा नेता पार्श्वनाथ होता असा उल्लेख जैन-ग्रंथात अनेक ठिकाणी आहे. त्यापैकी एक महत्त्वाचा उतारा येथे देतो. पार्श्व तीर्थंकराचा प्रख्यात शिष्य केशी आपल्या मोठ्या शिष्यशाखेसह श्रावस्तीला आला आणि तिन्दुक नांवाच्या उद्यानात उतरला. वर्धमान तीर्थंकराचा प्रसिद्ध शिष्य गोतमही मोठ्या शिष्यशाखेसह श्रावस्तीला आला आणि कोष्ठक नांवाच्या उद्यानात उतरला. त्या दोघांच्या शिष्यसंघात ह्या दोन संप्रदायांच्या मतान्तरासंबंधी चर्चा होऊ लागली. तेव्हा, ज्येष्ठ कुल केशीचे आहे असे जाणून गोतम आपल्या शिष्यशाखेसह तिन्दुक उद्यानात आला, आणि त्याने केशीची भेट घेतली. त्या प्रसंगी केशीने त्याला प्रश्न विचारला की,

**चाउज्जामो य जो धम्मो जो इमो पंचसिक्खिए ।**
**देसिओ वद्धमाणेण पासेण य महामुणी ॥**
**एककज्जपवन्नानं विसेसे किं नु कारणं ।**
**धम्मे दुविहे मेहावी कथं विप्पच्चयो न ते ॥**

[ हे महामुनि, चातुर्याम धर्म पार्श्वाने उपदेशिला, आणि तोच पंच-व्रतांचा वर्धमानाने उपदेशिला. एकाच कार्यात उद्यत झालेल्या या दोघात फरक का ? ह्या द्विविध धर्माविषयी, हे मेधावी, तुला शंका कशी येत नाही ? ]

त्यावर गोतम म्हणाला,

**पुरिमा उज्जुजड्डाउ वक्कजड्डाय पच्छिमा ।**
**मज्झिमा उज्जुपन्नाउ तेण धम्मे दुहा कए ॥**

[ प्रथम तीर्थंकराचे अनुयायी ऋजु-जड असतात, व शेवटच्या तीर्थं-कराचे अनुयायी वक्र-जड असतात; पण मध्यम ( २२ ) तीर्थंकराचे अनुयायी ऋजु-प्रज्ञ असतात; म्हणून दोन प्रकारचा धर्म होतो. ] याचा अर्थ असा की, ऋषभदेवाचे अनुयायी सरळ पण जड असल्यामुळे आणि वर्धमानाचे अनुयायी वक्र आणि जड असल्यामुळे ते दोघे तीर्थंकर पंचमहाव्रतांचा धर्म उपदेशितात; आणि मधल्या २२ तीर्थंकराचे अनुयायी सरळ आणि प्रज्ञावान् असल्यामुळे ते तीर्थंकर केवळ चातुर्याम धर्म उपदेशितात.

केशीने दुसरा प्रश्न विचारला तो असा--

**अचेलओ अ जो धम्मो जो इमे संतरुत्तरो ।**
**देसिओ वद्धमाणेण पासेण य महामुणी ॥**
**अेक-ज्ज-पवन्नाणं विसेसे किं नु कारणं ।**
**लिंगे दुविहे मेहावी कहं विप्पच्चयो न ते ॥**

[ हे महामुनि, वर्धमानाने अचेलक ( दिगम्बर ) धर्म आणि पार्श्वाने तीन, दोन किंवा एक वस्त्र बाळगण्याचा धर्म उपदेशिला. एका कार्यात उद्यत झालेल्या ह्या दोघात फरक का ? हे मेधावी, ह्या द्विविध लिंगाविषयी तुला शंका कशी येत नाही ? ]

त्यावर गोतम म्हणाला,

**विन्नाणेण समागम्म धम्मसाहणमिच्छियं ।**
**पच्चयत्थं च लोगस्स नाणाविहविकप्पणं ।**
**जत्तत्थं गहणत्थं च लोगे लिंगपओअणं ॥**

[ केवलज्ञानाने संपन्न होऊन ( ह्या दोन तीर्थंकरांनी ) लोकांच्या विश्वासासाठी, शरीरयात्रेसाठी आणि ज्ञानलाभासाठी भिन्न भिन्न लिंगप्रयोजन उपदेशिले. ( उत्तराध्ययन, २३ वे अध्ययन. ) ]

चातुर्यामाचे पंचमहाव्रतात आणि सचेलकव्रताचे अचेलकव्रतात परिवर्तन करण्याला येथे दिलेली कारणे सबळ दिसत नाहीत, आणि त्यावरून हा संवाद देखील काल्पनिकच असावा असा भास होतो. परंतु समञ्ञफलसुत्तात निर्ग्रन्थाचे वर्णन 'चातुर्यामसंवरसंवुतो' असे केले असल्यामुळे बुद्धकालापर्यंत निर्ग्रन्थ चातुर्याम-धर्मच मानीत असत असे सिद्ध होते. तत्पश्चात् महावीर स्वामीने त्या यामात ब्रह्मचर्यव्रताची भर घातली. त्याचप्रमाणे त्रिपिटकात निर्ग्रन्थ कमीतकमी एक वस्त्र वापरीत होते यालाही आधार मिळतो;[१] पण ते अचेलक ( नग्न ) असत याला आधार नाही. यद्यपि ही माहिती त्रोटक आहे तरी तिच्यावरून पार्श्वनाथ होता व त्याने चातुर्याम-धर्म उपदेशिला असे मानणे योग्य वाटते.

---

१. तविदं भन्ते पूरणेन कस्सपेन लोहिताभिजाति पञ्ञत्ता निगण्ठा एकसाटका। अंगुत्तर छक्कनिपात, दुतियपण्णासक, पठमवग्ग, सुत्त ३।

## चातुर्याम धर्माचा उगम व प्रचार

हा चातुर्याम धर्म असा—सव्वातो पाणातिपातिवाओ वेरमणं, एवं मुसावायाओ वेरमणं, सव्वातो अदिन्नादाणावो वेरमणं, सव्वातो बहिद्धादाणावो वेरमणं ( स्थानांगसूत्र, क्रमांक २६६ ). –सर्व प्रकारच्या प्राण-घातापासून विरति, त्याप्रमाणे असत्यापासून विरति, सर्व प्रकारच्या अदत्तादानापासून ( चोरीपासून ) विरति, सर्व प्रकारच्या बहिर्धा आदानापासून ( परिग्रहापासून ) विरति. या चार विरतींना याम म्हणतात. येथे यमधातु दमनार्थी आहे. या चार प्रकारांनी आत्मदमन करणे हाच चातुर्याम धर्म होय. त्याचा उगम वेदांतून किंवा उपनिषदांतून झालेला नसून वेदाच्या पूर्वी या देशांत प्रचारांत असलेल्या तपस्वी ऋषि-मुनींच्या तपोधर्मापासून झाला आहे.

हे ऋषिमुनी संसारांतील दुःखांना आणि माणसा–माणसांतील असद्व्यवहारांना कंटाळून अरण्यात जात आणि चार प्रकारची तपश्चर्या करीत. त्यापैकी अहिंसा किंवा दया हें एक तप असे. पाण्याच्या बुंदाला देखील दुखवावयाचे नाही अशी ती तपश्चर्या होती.[१] त्यांना असत्य बोलण्याचा प्रसंगच येत नसे. जंगलातील फळांमुळांवर निर्वाह करून राहत असल्यामुळे ते चोरीपासून अलिप्त असत हे सांगावयासच नको. ते एक तर नग्नच राहत अथवा फार झाले तर वल्कले वापरीत, तेव्हा ते पूर्णपणे अपरिग्रहवत पाळीत हे उघड आहे. पण या यामांचा ते प्रचार करीत नसत. त्यामुळे ब्राह्मणांचा आणि त्यांचा खटका कधीच उडाला नाही.

परंतु पार्श्वनाथाने हे याम सार्वजनिक करण्याची खटपट केली. त्याने आणि त्याच्या शिष्यांनी लोकांकडून मिळालेल्या भिक्षेवर निर्वाह करून सामान्य लोकांनाही या यामांचे शिक्षण देण्यास सुरुवात केली, आणि त्याचा परिणाम असा झाला की, ब्राह्मणांचे यज्ञयाग लोकांना अप्रिय होऊ लागले. महावीरस्वामीने, बुद्धाने आणि इतर श्रमणांनीही ह्या दयाधर्माचा प्रचार चालविला, आणि म्हणूनच ब्राह्मणांची श्रमणांवर विशेषतः जैनांवर आणि बौद्धांवर, वक्रदृष्टी झाली.

---

१. हिंदी संस्कृति, विभाग २ । ५–६, भगवान बुद्ध १ । ५४ पहा.

वस्तुतः केवळ ब्राह्मणांना विरोध करण्यासाठी पार्श्वाने हा चातुर्याम-धर्म स्थापला नाही. मनुष्यांमनुष्यांमधील वैमनस्ये नष्ट होऊन समाजात सुखशांति नांदावी हे या धर्माचे ध्येय होते. पण पार्श्वनाथाने अहिंसा घेतली ऋषिमुनींकडून. तेव्हा त्याला तिचे क्षेत्र मनुष्यजातीपुरते आकुंचित आहे, असे त्याने प्रतिपादिले; आणि त्या काळच्या परिस्थितीत सामान्य जनतेला ही अहिंसा आवडली. का की, राजे आणि संपन्न ब्राह्मण त्यांची शेतीची जनावरे जबरदस्तीने घेत व त्यांची यज्ञयागात बेसुमार कत्तल करीत.[१]

## पार्श्वाच्या धर्मात महावीर स्वामीने केलेले फेरफार

वर दिलेल्या उत्तराध्ययन सूत्राच्या उताऱ्यावरून असे स्पष्ट दिसते की, पार्श्वनाथाच्या चातुर्याम धर्मात महावीरस्वामीने चातुर्यामा-ऐवजी पंचमहाव्रते आणि सचेलकत्वाचे ऐवजी अचेलकत्व असे हे दोन प्रमुख फेरफार केले. त्यांपैकी पहिला फेरफार तत्कालीन कुटिलजड–वक्र असून जडबुद्धि–माणसांसाठी करण्यात आला असे तेथे म्हटले आहे. पार्श्वनाथाच्या वेळची माणसे सरळ असून प्रज्ञावान् होती व ती दोनतीनशे वर्षांच्या अवधीत जड आणि वक्रबुद्धि झाली हे संभवत नाही. पार्श्वनाथाच्या अपरिग्रहात ब्रह्मचर्याचा समावेश होत असे. परंतु एकदा हा संप्रदाय बनल्यावर अपरिग्रहाचा अर्थ स्त्रीला जवळ ठेवून संसार वाढवू नये, पण प्रसंगोपात्त स्त्रीसंगाला हरकत नसावी, असा करण्यात येऊ लागला असावा. त्यामुळे चातुर्यामात ब्रह्मचर्यव्रत दाखल करावे लागले. महावीरस्वामीच्या वेळी तपश्चर्येला भलतेच महत्त्व येत चालले होते असे गोतम बोधिसत्त्वाने सहा सात वर्षे केलेल्या खडतर तपश्चर्येवरून सिद्ध होते. बुद्धाने ह्या तपश्चर्येचा त्याग केला, आणि महावीरस्वामीने ती अंगीकारली. त्यामुळे जैन धर्मात अचेलकत्व आले.

## महावीरस्वामी आणि मक्खलि गोसाल

" महावीरस्वामीने प्रव्रज्या घेतल्यावर दुसऱ्या वर्षी मक्खलि गोसाल त्याला भेटला. गोसाल त्याचा शिष्य होऊ पहात होता; पण महावीर-

१. भगवानबुद्ध. प्रकरण २ पहावे.

स्वामीने त्याचा स्पष्टपणे अंगीकार केला नाही. तथापि, गोसाल त्याच्या-बरोबर सरासरी आठ वर्षें होता. त्यानंतर त्याने सहा महिने तपश्चर्या करून तेजोलेश्या प्राप्त केली, आणि फलज्योतिषाचा चांगला अभ्यास केला. त्या-मुळे तो प्रसिद्धीस आला; व त्याने आजीवक पंथाची स्थापना केली.[१] ”

महावीरस्वामीच्या प्रव्रज्येला २७ वे वर्ष चालू असता गोसाल श्राव-स्तीला रहात होता. तो आपणाला जिन म्हणवीत असे. पण तो जिन नव्हे, असे महावीरस्वामी म्हणे. त्यामुळे वाद उपस्थित झाला, आणि गोसालाने महावीरस्वामीवर तेजोलेश्या सोडली, व तो म्हणाला, “ आयुष्मन् काश्यप,[२] माझ्या ह्या तपस्तेजाने तूं पित्त आणि दाह ज्वराने पीडित होऊन सहा महिन्याच्या आंत मरशील.” त्यावर महावीरस्वामीने उत्तर दिले, “ गोसाल, तुझ्या तपस्तेजाने तुझेच शरीर दग्ध झाले आहे. मी अद्यापि १६ वर्षे जगणार आहे. परंतु तूच पित्तज्वराच्या पीडेने सात दिवसांच्या आतच मरशील.” तेव्हा गोसाल तेथून आपल्या निवासस्थानी गेला. त्याच्या तेजोलेश्येने त्याच्याच शरीरात प्रवेश केल्यामुळे त्याची अवस्था दयनीय झाली होती. दाह शान्त करण्यासाठी तो एक आंब्याची कोय सारखी चोखीत होता, दारू पीत होता आणि माती मिसळलेले पाणी अंगावर शिंपडीत होता. उन्मादवश होऊन. तो नाचत होता, गात होता व हालाहला कुंभारणीला ( जिच्या भाण्डशालेत तो रहात असे ) नमस्कार करीत होता. अशा परिस्थितीत त्याचा मृत्यु समीप आला असता तो आपल्या शिष्यांना म्हणाला,[३] “ भिक्षु हो, आता मी लवकरच मरणार आहे. मी मेल्यावर तुम्ही माझ्या प्रेताच्या डाव्या पायाला मुंज गवताची दोरी बांधा व माझ्या तोंडावर तीनदा थुंका. मग त्या दोरीला धरून माझे प्रेत श्रावस्तीच्या सर्व चौकांतून आणि बाजारांतून फिरवा, व उद्घोषित करा की, हा मंखलि गोसालक जिन होण्याचे ढोंग करीत होता, पण जिन न होताच मरण पावला ! ”

---

१. श्रमण भगवान् महावीर पृ. २५–३७.

२. महावीरस्वामी काश्यपगोत्री होता, म्हणून त्याला काश्यप म्हणत.

३. श्र. भ. म. पृ. १२२–१३८.

" गोसालच्या शिष्यांनी हालाहलेच्या भाण्डशालेच्या आतच एक श्रावस्तीचा नकाशा तयार केला व गोसालच्या प्रेताला त्याच्या आदेशाप्रमाणे तेथेच फिरविले. हे नाटक संपल्यावर त्यांनी त्या प्रेताला स्नान घालून व वस्त्राने झाकून पालखीत बसविले आणि साऱ्या श्रावस्तीत फिरवून त्याचे योग्य क्रियाकर्म केले."

## मक्खलि नांवाचा विपर्यास

मंख नांवाची ऐक तमासगिर जाति होती. त्या जातीत जन्मला म्हणून गोसालाला मंखलिपुत्र म्हणत असे जैन ग्रंथकारांचे म्हणणे.[१] असे आहे तर त्याला मंखपुत्र का म्हटले नाही? त्यात 'लि' कसा आला? बुद्धघोषाचार्याने तर याच्यावरही ताण केली आहे. त्याने दिलेली मक्खलि शब्दाची व्युत्पत्ति याप्रमाणे–मक्खलि हे त्याचे नाव व गोशालेत जन्मला म्हणून त्याला गोसाल (गोशाल) म्हणत असत. तो चिखलांतून तेलाचा घडा घेऊन जात असता त्याचा मालक म्हणाला, "बाबारे खाली पडू नकोस (मा खलि).[१] पण तो चुकून खाली पडला, आणि मालकाच्या भयाने उठून पळू लागला. मालकाने त्याचे धोतर पकडले. ते मालकाच्याच हाती सोडून तो नागडाच पळाला. ह्या माखलि शब्दावरून त्यास मक्खलि म्हणू लागले.[२]

मक्खलीच्या नांवावर अशा कोटया करून व त्यासंबंधी भरमसाट दन्तकथा लिहून जैन आणि बौद्ध ग्रंथकारांनी आपला कोतेपणा मात्र प्रगट केला आहे. वर दिलेली मक्खलीची कथा जैन आगमातच आहे. तिच्यात तथ्य कितपत आहे ते पाहू.

मक्खलि आजीवक संप्रदायाचा नेता होता. पण त्या संप्रदायाचा तो संस्थापक नव्हता. त्याच्या पूर्वी नन्दवच्छ व किस संकिच्च असे त्या संप्रदायाचे दोन नेते होते.

एके समयी भगवान् राजगृह येथे गृध्रकूट पर्वतावर राहत होता. तेव्हा आयुष्मान् आनन्द भगवन्तापाशी आला आणि भगवन्ताला नमस्कार करून एका बाजूला बसला व म्हणाला, " भदन्त, पूरण काश्यपाने ज्या

१. श्र. भ. म. पृ. २८३.

२. दीघा. अ. १ । १८१–१८२; मज्झिम अ. २ । ३१४.

सहा अभिजाती सांगितल्या आहेत, त्या अशा—पारधी कसाई वगैरे क्रूर कर्मे करणाऱ्या लोकांची कृष्णाभिजाति. कुकृत्यांवर श्रद्धा ठेवणाऱ्या श्रमणांची नीलाभिजाति. एक वस्त्र बाळगणाऱ्या निर्ग्रन्थांची लोहिताभिजाति. आजीवक श्रावक गृहस्थांची हरिद्राभिजाति. आजीवक श्रमण व श्रमणी यांची शुक्ला-भिजाति. नंद वच्छ ( वत्स ), किस संकिच्च ( कुश संकृत्य ) आणि मक्खलि गोसाल यांची परमशुक्लाभिजाति. अशा ह्या सहा अभिजाति पूरण काश्यपाने वर्णिल्या आहेत."[1]

पूरण काश्यप दुसऱ्या एका मोठ्या संप्रदायाचा नेता होता. तो ह्या जाती सांगतो व त्यांत नंद वत्स, कृश संकृत्य व मक्खली गोसाल या तिघांचीच अत्युच्च जातीत गणना करतो. त्यावेळी हेच काय ते जिन होते असे वाटते.

बुद्ध भगवंताला नुकतीच संबोधि प्राप्त झाली होती, आणि पंचवर्गीय भिक्षूंना उपदेश करण्याच्या उद्देशाने तो बनारसला जात होता. बुद्धगयेच्या व गयेच्या दरम्यान त्याला उपक नांवाचा आजीवक भेटला, आणि म्हणाला " आयुष्मन, तुझा चेहरा प्रफुल्लित दिसतो. तुझा आचार्य कोण ? " भगवान् म्हणाला, " बोधिज्ञान मी स्वतःच मिळविले आहे; तेव्हा आचार्य कोण म्हणून सांगू ? " उपक— " तर मग तू अनंतजिन झालास काय ? " भगवान्— " आश्रवांचा क्षय करून माझ्यासारखे जिन होतात. पापधर्मांवर जय मिळविला असल्यामुळे मी जिन आहे. " " असेही असू शकेल. " असे म्हणून उपकाने डोके हालविले व तो आड रस्त्याने निघून गेला.[2]

बुद्ध भगवंताने केलेला जिन शब्दाचा अर्थ उपकाला पटला नाही. का की, त्याच्या मते खडतर तपश्चर्येनेच मनुष्य जिन होऊ शकतो; आणि ते जिन त्याच्याच संप्रदायात होते. दुसऱ्या संप्रदायात ही न्यूनता होती. यास्तव पार्श्वनाथाचा संप्रदाय मागे पडत चालला, आणि आजीवकांचा पुढे आला. तेव्हा आपल्या संप्रदायाचे रक्षण करण्यासाठी महावीरस्वामीला जिन पदवी संपादणे भाग पडले. अर्थात तपश्चर्येचे सर्व प्रकार शिकण्यासाठी तो

---

१. हा सुत्ताचा सारांश आहे. मूळ सुत्त अंगुत्तरनि. छक्कनिपात, दुतिय-पण्णासक, पठमवग्गांत पहावे.

२. मज्झिमनि. अरियपरियसेन सुत्त, महावग्ग १।१४।१५.

मक्खलि गोसालापाशी गेला असल्यास नवल नाही. याचसाठी त्याला वस्त्र-त्याग करावा लागला. प्रव्रज्येच्या वेळी त्याजपाशी एकच वस्त्र होते; म्हणजे एकचेलक निर्गन्थांपैकी तो एक होता. गोसालाच्या सहवासात राहिल्या-नंतर त्याला ते सोडणे भाग पडले असावे. वस्त्र ठेवून जिन होणे गोसालाच्या दृष्टीने शक्यच नव्हते. महावीरस्वामीने आजीवकांची सर्व तपश्चर्या केली असली, तरी तो आपला चातुर्याम धर्म सोडण्यास तयार नव्हता. तो धर्म सोडून त्याने मक्खलीचा नियतिवाद स्वीकारला असता तर तोही एक त्या पंथातील जिन झाला असता. सगळी तपश्चर्या संपल्यावर महावीरस्वामी आपल्या पूर्वीच्या निर्गन्थ संप्रदायात आला असावा. त्याचे नेतृत्व निर्गन्थानी स्वीकारले. तरी त्याचे अचेलकत्व स्वीकारण्यास ते तयार नव्हते. महावीर-स्वामीनेही ह्या बाबतीत आग्रह धरला नसावा. पाहिजे त्याने सचेलक व्हावे किंवा अचेलक व्हावे असे ठरले असावे. का की, पालि त्रिपिटकात निर्गन्थाना अचेलक म्हटले नाही. कमीत कमी त्याजपाशी एक वस्त्र असे हे अंगुत्तर निकायाच्या वर दिलेल्या उताऱ्यावरून स्पष्ट दिसते. बौद्ध वाङ्मयात अचेलक शब्द केवळ आजीवकांना लावला आहे. यावरून अशोकाच्या कालापर्यंत तरी फक्त आजीवकच काय ते नग्न असत असे सिद्ध होते.

### आजीवक मताचा विपर्यास

गोसालाच्या मताचाही बौद्धांनी व जैनांनी बराच विपर्यास केला असावा अशी बळकट शंका येते. सगळे प्राणी नियति (दैव), संगति आणि भाव (स्वभाव) या तीन गुणांनी परिणत होतात असे गोसाल प्रतिपादित असे.[१] मनुष्य शंभर वर्षांच्या आंतबाहेर मरतो किंवा अमुक पदार्थाचे अमुक गुण ही नियति समजली पाहिजे, संगतीची तर वाखाणणी खास बुद्धानेच केली आहे, आणि आमच्या मध्ययुगीन साधुसंतांनी तिच्यावर केवढा जोर दिला आहे.[२] आधुनिक कालातही सोशलिस्ट संगतीला तसेच महत्त्व देतात.[३] स्वभावानेही मनुष्य त्या त्या कार्याला प्रवृत्त

---

१. नियति-संगति-भाव-परिणता. दीघ १ । ३०.

२. हिंदी संस्कृति, पृ. २३४-२३५ पहा.

३. येथे संगति म्हणजे परिस्थिती. Merrie England नांवाच्या पुस्तकात वाचण्यात आलेली एक गोष्ट स्मरते, ती अशी--एका प्रोटेस्टंट

होतो. कोणाला वैद्यक आवडते तर कोणाला राजकारण आवडते. तेव्हा मक्खलि गोसालाला केवळ नियतिवादी ठरवून त्याची टर उडविणे अत्यंत अनुचित आहे. हे कृत्य विशेषत: जैन ग्रंथकारांनी केले आहे. गोसालाचे मत जैनांच्या म्हणण्याप्रमाणे जर त्याज्य होते, तर त्या संप्रदायाचा चांगली लेणी तयार करवून अशोकाने गौरव केला असता काय ? अशोकाने जशा तीन गुहा तशाच त्याच्या नातवाने (दशरथाने) तीन गुहा आजीवकांना दिल्याचे शिलालेख प्रसिद्ध आहेत. अशोकाच्या सप्तम शिलालेखात तेवढा निर्गन्थांचा उल्लेख आहे; पण अशोकाने त्यांना लेणे किंवा विहार बांधून दिल्याचा उल्लेख कोठेच सांपडत नाही. बौद्ध संघाच्या मागोमाग अशोक

---

पार्टीने लंडनच्या चाळींतून सैरावैरा फिरणाऱ्या तीन हजार मुलांना गोळा करून कानडांत नेले व तेथे एका मोठ्या शेतावर ठेवले, आणि त्यांच्या शिक्षणाची उत्तम व्यवस्था केली. ही मुले इंग्लंडांत तशीच बेकार फिरत राहिली असती तर त्यांपैकी बहुतेक समाजाला अपायकारक झाली असती. परंतु कानडांतील त्या मोकळ्या शेतावर ती चांगली वाढली, व त्यांपैकी एकही गुन्हेगार निघाला नाही.

पहिल्या महायुद्धानंतर रशियात लाखो मुले अनाथ होऊन इतस्तत: भटकूं लागली. त्यांच्या अधोगतीला पारावार राहिला नाही. त्यांना सुधारण्यासाठीं देरझेंस्की नांवाच्या सोव्हियेत कमिसारने वसाहती स्थापन केल्या. त्यांपैकी खारकोव्ह शहराजवळची मोठी वसाहत मी १९३२ साली पाहिली. ह्या वसाहतीत शे दीडशे मुली व दोनशें सव्वादोनशें मुलगे होते. त्यांच्यासाठी तीनशें एकर शेती व बोअरिंग मशीन तयार करण्याचा कारखाना होता. ह्या कारखान्यांत एकावेळी ४० मुले काम शिकत. रोज चार तास बौद्धिक शिक्षण व चार तास शेतीचे किंवा कारखान्यांत यंत्रे तयार करण्याचे शिक्षण आळीपाळीने देण्यांत येत असे. मुलींची वसाहत निराळी व मुलांची निराळी होती; पण सर्वांसाठी एक थिएटर होते व मधून मधून तेथे विद्यार्थी व विद्यार्थिनी नाटके करीत. त्यांची अंतर्गत व्यवस्था बहुमताने त्यांनीच पहावी असा नियम होता; आणि तशाच प्रसंगाशिवाय शिक्षक लोक त्यांच्या व्यवहारांत हस्तक्षेप करीत नसत. एकंदरीत व्यवस्था इतकी उत्तम होती की, सनाथ मुलांना देखील त्यांचे आईबाप ह्या वसाहतीत पाठविण्यास उत्सुक असत; पण त्यांना दाखल करणे शक्य नव्हते. ह्या वसाहतीतील मुलांमुलींना जर पूर्वीप्रमाणेच भटकूं दिले असते, तर त्यांपैकी बहुतेक मुले भयंकर गुन्हेगार निघाली असती. अशा मुलांना देरझेंस्कीने कशा प्रकारे सुधारले हा इतिहास फार रम्य आहे.

आजीवकांचा जो आदर करीत असे, तो केवळ त्यांच्या तपश्चर्यैमुळे नसून त्यांच्या सद्वर्तनामुळे असला पाहिजे. याला एक दाखला संयुत्तनिकायाच्या संगाथावग्गात सांपडतो.... मक्खलि गोसालाला उद्देशून सहली देवपुत्र म्हणतो—

तपोजिगुच्छाय सुसंवुतत्तो
वाचं पहाय कलहं जनेन ।
समो सवज्जा विरतो सच्चवादी
न हि नून तादी पकरोति पापं [१] ॥

[ तपश्चर्येच्या योगे हिंसामय पापाचा त्याग केल्यामुळे ज्याचे मन सुसंवृत झाले आहे, जो सत्यवादी लोकांशी कलह उत्पन्न होईल अशी वाणी सोडून आणि निंद्य कर्मापासून विरत होऊन समभावाने वागतो, तो कधीही पाप करीत नाही. ]

हे त्या काळचे लोकमत देवपुत्राच्या तोंडी घातले आहे. अशा सत्पुरुषाची यथास्थित निंदा करून जैनांनी आणि बौद्धांनी आपल्या पंथांचे कल्याण केले आहे असे मला वाटत नाही. " त्या त्या प्रकरणी सर्व संप्रदायांचा गौरव ठेवावा. असे केल्याने आपल्या संप्रदायाची अभिवृद्धि होते, व दुसऱ्या पंथावर उपकार होतो. याच्या उलट जो वागतो, तो आपल्या पंथाची हानी करतो, व दुसऱ्या पंथाला अपकार करतो. जो कोणी आपल्या पंथाचा गौरव करतो आणि परकीय पंथाची निंदा करतो, तो आपल्या पंथाच्या भक्तीमुळे करतो. का की, आपल्या पंथाची तो वाखाणणी करू इच्छितो. " [२] हा अशोकाचा उपदेश जैनांनी आणि बौद्धांनी मुळीच लक्ष्यात ठेवला नाही. अशा विपर्यासामुळे आरंभी ह्या दोन संप्रदायांचा थोडासा फायदा झाला असला, तरी त्यांची असहिष्णुता वाढत गेली, आणि त्यामुळे आपसातच तट पडून हे दोन्ही संप्रदाय क्षीण झाले. ' अत्तपासण्डं छनति ' अथवा ' उपहनति ' हे अशोकाचे वचन खरे झाले म्हणावयाचे !

---

१. देवपुत्तसंयुत्त, नानातित्थियवग्ग.

२. बारावा शिलालेख.

नन्दवच्छ, किस संकिच्च आणि मक्खलि गोसाल हेच काय ते त्या काळी जिन होते. अर्थात् आजीवकानांच जैन म्हणावयास पाहिजे. परंतु त्या संप्रदायाचा अनेक कारणानी ऱ्हास होत गेला, आणि निर्ग्रन्थ आपल्याच तीर्थंकराला खरा जिन मानू लागले, व कालांतराने आपणाला जैन म्हणवू लागले. बुद्धालाही बौद्ध जिन म्हणत, पण त्या नांवाला त्यांनी इतके महत्त्व दिले नाही. हे एका अर्थी चांगले झाले. नाहीतर खरे जैन कोण ह्याविषयी रणे माजली असती !

## चातुर्याम धर्माचा बुद्धाने केलेला विकास

वप्प शाक्य निर्ग्रन्थांचा श्रावक असल्याचा उल्लेख तर आलाच आहे.[१] तेव्हा निर्ग्रन्थांचा चातुर्याम धर्म शाक्यदेशात प्रचलित होता हे उघड आहे. परंतु त्या देशात निर्ग्रन्थांचा आश्रम असल्याचा उल्लेख कोठेच सांपडत नाही. यावरून असे दिसते की, निर्ग्रन्थ श्रमण मधून मधून शाक्य देशात येऊन आपल्या धर्माचा उपदेश करीत असत. शाक्यात आळारकालामाचे श्रावक जास्त होते. का की, त्याचा आश्रम खुद्द कपिलवस्तु नगरातच होता.[२] आळाराच्या समाधिमार्गाचा अभ्यास गोतम बोधिसत्वाने लहानपणीच केला;[३] आणि गृहत्याग केल्यावर तो प्रथमतः आळाराच्याच आश्रमात गेला,[४] व त्याने योगमार्गाचा अभ्यास पुढे चालविला. आळाराने त्याला समाधीच्या सात पायऱ्या शिकविल्या. नंतर तो उद्रक रामपुत्राकडे गेला. व त्याकडून समाधीची आठवी पायरी शिकला. पण तेवढ्याने त्याचे समाधान झाले नाही. का कीं, त्या समाधीने मनुष्यांतील भांडणे मिटणे शक्य नव्हते. तेव्हा बोधिसत्त्व उद्रक रामपुत्राचा आश्रम सोडून राजगृहाला आला. तेथील श्रमण संप्रदायात त्याला निर्ग्रन्थांचा चातुर्यामसंवरच विशेष पसंत पडला असावा. का की, त्याने पुढे शोधून काढलेल्या आर्य अष्टांगिक मार्गात या चातुर्यामाचा समावेश केला आहे.

परंतु त्याकाळी ह्या चातुर्यामाला गौणत्व येऊन तपश्चर्येला महत्त्व आले होते. आजीवक संप्रदायातच काय ते जिन होते, आणि जिन झाल्या-

---

१. पृष्ठ १४ पहा. २. भगवानबुद्ध पूर्वार्ध, पृ. ८६–८७. ३. भ. बु. पू. १००–१०१. ४. भ. बु. पू. ११२–११४.

शिवाय धर्मोपदेश करण्याचा अधिकार येत नाही असे सर्वांना वाटे. याच-साठी महावीरस्वामीने गोसालाच्या मदतीने खडतर तपश्चर्या केली, आणि त्यानंतरच निर्गन्थांनी त्याला आपला पुढारी मानले. अर्थात् गोतम बोधि-सत्त्वालाही तपश्चर्येची कमाल करून आपला मार्ग चोखाळणे योग्य वाटले. सरासरी सहा वर्षे तपश्चर्या केल्यावर त्याची खात्री झाली की, आपल्या कर्मयोगाला देहदण्डनाचा काही उपयोग नसून ते उलट हानिकारक आहे. दुसरे असे की, केवळ चार यामांनी भागावयाचे नाही; त्यांना समाधीची आणि प्रज्ञेची जोड दिली पाहिजे. चार याम शिव (कल्याणप्रद) आहेत, समाधि शांत व सुन्दर आहे, आणि प्रज्ञा सत्यबोधकर आहे.

आजीवक काय की निर्गन्थ काय, ही जी तपश्चर्या करीत ती कशासाठी ? पूर्वजन्मींच्या कर्मांचा नाश करून आत्म्याला कैवल्य मिळावे म्हणून.[१] पण ज्या आत्म्यासाठी ही तपश्चर्या करावयाची त्याचे अस्तित्वच काही श्रमण मानीत नसत. अशा मताचा पुरस्कर्ता अजित केसकंबल होता.[२] आत्मा अमर असून त्याला कशाचीच बाधा होत नाही असे पूरणकाश्यप प्रतिपादित असे;[३] आणि त्याच्या मतालाही मानणारे पुष्कळ होते असे देवपुत्र संयुत्तांतील खालील गाथेवरून दिसून येते.

बुद्धाजवळ येऊन असम देवपुत्र ही गाथा म्हणतो—

**अिध छिन्दितमारिते हतजानीसु कस्सपो ।**
**न पापं समनुपस्सति पुञ्ञं वा पन अत्तनो ।**
**स वे विस्सासमाचिक्खि सत्था अरहति माननं ॥**

[ मारहाण आणि लूटफाट करण्यांत आत्म्याला पाप किंवा पुण्य नाही कश्यप असे पाहतो. तो धर्मगुरु (शास्ता) मोक्षाची खात्री देतो; यास्तव तो माननीय आहे. ]

---

१. इति पुराणानं कम्मानं तपसाव्यन्तीभावा, नवानं कम्मानं अकरणा आयतिं अनवस्सवा, आयतिं अनवस्सवा कम्मक्खयो, कम्मक्खया दुक्खक्खयो, दुक्खक्खया वेदनाक्खयो, वेदनाक्खया सब्बं दुक्खं निज्जिण्णं भविस्सती ति । चूळदुक्खक्खन्धसुत्त, मज्झिमनिकाय, मूलपण्णासक ।

२. भ. बु. उत्तरार्ध १५–१६, ३. भ. बु. उ. १४.

तेव्हा अशा आत्मवादात खरा कोण आणि खोटा कोण ? अशा ह्या वादांपासून सत्कर्म योगाला फायदा नसून बाधा होत होती हे गोतम बोधिसत्त्वाला स्पष्ट दिसले, आणि त्याने आत्म्याला आत न आणता आपला मार्ग काढण्याचा प्रयत्न चालविला. तो जेव्हा त्याला मिळाला, तेव्हाच तो बुद्ध झाला. त्याच्या अष्टांगिक मार्गाला आत्म्याची आवश्यकता मुळीच नाही. ह्या जगात दुःख विपुल आहे, त्याचे कारण मानवांची तृष्णा, आणि तिच्या आत्यंतिक निरोधाकडे नेणारा हा अष्टांगिक मार्ग. ह्या मार्गाचे विवरण ‘हिंदी संस्कृति आणि अहिंसा’ (पृ. ७६–८२) व ‘भगवान बुद्ध’ (पूर्वार्ध पृ. १३६–१४३) ह्या दोन पुस्तकांत येऊन गेले असल्यामुळे येथे त्याची पुनरावृत्ती करीत नाही.

ह्या आर्य अष्टांगिक मार्गाचा समावेश शील, समाधि व प्रज्ञा ह्या तीन स्कन्धांत होतो. सम्यक् वाचा, सम्यक् कर्म व सम्यक् आजीव ह्या तीन अंगांचा समावेश शील स्कन्धात होतो; सम्यक् व्यायाम, सम्यक् स्मृति व सम्यक् समाधि ह्या तीन अंगांचा समावेश समाधिस्कन्धात होतो; आणि सम्यक् दृष्टि व सम्यक् संकल्प ह्या दोन अंगांचा समावेश प्रज्ञास्कन्धात होतो.[१] शीलस्कन्ध बुद्ध धर्माचा पाया आहे. शीलावाचून अध्यात्ममार्गांत प्रगती होणे शक्य नाही. पार्श्वनाथाच्या चार यामांचा ह्याच शीलस्कन्धांत समावेश केला आहे,[२] आणि त्याच्याच रक्षणासाठी आणि अभिवृद्धीसाठी समाधीची व प्रज्ञेची आवश्यकता आहे. भगवान् बुद्धाने शीलाला किती महत्त्व दिले आहे हे एक तेवढे आकंखेय्यसुत्त (मज्झिमनिकाय) वाचले तरी समजून येण्याजोगे आहे. अर्थात् बुद्धाने पार्श्वनाथाच्या चारही यामांचा पूर्णपणे स्वीकार केला हे स्पष्ट होते. त्या यामांना त्याने आळारकालामाच्या समाधीची आणि स्वतः शोधून काढलेल्या चार आर्यसत्य रूपी प्रज्ञेची जोड दिली; आणि त्या यामांना तपश्चर्या व आत्मवाद यांजपासून मुक्त केले.

बुद्धाने तपश्चर्येचा त्याग केला, म्हणून त्याला व त्याच्या शिष्यांना तपस्वी लोक चैनी म्हणत. यासंबंधी दीघनिकायांतील पासादिकसुत्तांत

---

१. चूळवदेल्लसुत्त, मज्झिमनिकाय पहा. २. हिंदी संस्कृति पृ. ७९–८०. शील, समाधि व प्रज्ञा याचे वर्णन ‘बुद्ध, धर्म आणि संघ’ या पुस्तकांतील दुसऱ्या व्याख्यानात आले आहे. ते तेथे पहावे.

भगवान् चुन्दाला म्हणतो– " हे चुन्द, अन्य सांप्रदायिक परिव्राजक म्हणतील की, शाक्यपुत्रीय श्रमण चैन करतात. त्यांना म्हणावे की, चैन चार प्रकारची आहे. एखादा अज्ञ माणूस प्राण्यांना मारून चैन करतो, ही पहिली चैन. एखादा चोरी करून चैन करतो, ही दुसरी चैन. एखादा खोटे बोलून चैन करतो, ही तिसरी चैन. एखादा उपभोग्य वस्तूंचा यथेच्छ उपभोग घेऊन चैन करतो, ही चौथी चैन ( कामसुखल्लिकानुयोग ). ह्या चार चैनी हीन, ग्राम्य, पृथक्‌जनसेवित, अनार्य व अनर्थकारक आहेत. " म्हणजे बुद्धाच्या मते चार याम पाळणे हीच खरी तपश्चर्या आहे.

पार्श्वनाथ आत्मवादात पडत असल्याचा दाखला बौद्ध किंवा जैन वाङ्मयात सांपडत नाही. परंतु बुद्धसमकालीन निर्गन्थांनी आत्मा स्वीकारला. तपश्चर्येच्या व चार यामांच्या द्वारे पूर्वजन्मीच्या पापकर्माचा क्षय करून आत्म्याला दुःखापासून मुक्त करावे हेच त्यांचे ध्येय असे, असे वर सांगण्यात आलेच आहे.[१] आपण ह्या आत्मवादात का पडत नाही, याला उत्तर भगवान् बुद्धाने ह्याच पासादिक सुत्तांत दिले आहे. भगवान् म्हणतो– " हे चुन्द, अन्य सांप्रदायिक परिव्राजक विचारतील की, मरणोत्तर आत्मा उत्पन्न होतो की नाही इत्यादिक प्रश्नांचे श्रमण गोतमाने स्पष्टीकरण का केले नाही ? त्यांना म्हणावे की, आयुष्मन्ता, हे हितकर नाही, धर्मोपयोगी नाही, ब्रह्मचर्याला आधारभूत नाही... निर्वाणाला कारणीभूत होत नाही. तेव्हा ते विचारतील की, श्रमण गोतमाने कशाचे कशाचे स्पष्टीकरण केले आहे ? त्यांना म्हणावे की, हे दुःख, हा दुःखाचा समुदय, हा दुःखाचा निरोध व हा दुःखनिरोधगामी मार्ग, याचे भगवन्ताने स्पष्टीकरण केले आहे. ते का ? कारण ते हितकर आहे, धर्मोपयोगी आहे, ब्रह्मचर्याला आधारभूत आहे... निर्वाणाला कारणीभूत आहे. "[२]

## योगसूत्रांतील याम

यद्यपि निर्गन्थांनी ( जैनांनी ) तपश्चर्या अंगीकारली व आत्मवाद सोडला नाही, तथापि चार यामांचे प्रचारकार्यही चालू ठेवले. चार यामांत

---

१. पृष्ठ ४६५ वरील पहिली टीप पहावी.

२. हा सारांश आहे. हाच मजकूर चूळमालुंक्यपुत्तसुत्तांतही आला आहे. भ. बु. उ. पृ. २५–२७ पहा.

महावीरस्वामीने ब्रह्मचर्याची भर घातली. हे ब्रह्मचर्य शक्य तेवढे गृहस्थांनीही पाळले पाहिजे असा जैन साधूंचा उपदेश होता. 'अहिंसासत्यास्तेय ब्रह्मचर्या परिग्रहा यमाः' (योगसूत्र २।३०) या योगसूत्रात या यामांना यम म्हटले आहे, आणि 'जातिदेशकालसमयानवच्छिन्नाः सार्वभौमा महाव्रतम्' यात महाव्रते म्हटले आहे. म्हणजे पार्श्वनाथाचे याम व महावीरस्वामीची महाव्रते या दोहोंचाही येथे उल्लेख आहे. योगसूत्र बरेच आधुनिक आहे. त्याच्यापूर्वी योगिसंप्रदायाने हे याम कधी स्वीकारले हे सांगता येत नाही. एवढे खरे की, त्या संप्रदायाने या यामांचा प्रचार मुळीच केला नाही. हे याम त्यांनी सार्वजनिक केले असते, तर योगसूत्र जैन आणि बौद्ध वाङ्मयाइतकेच ब्राम्हणांच्या तिरस्काराला पात्र झाले असते. काही योग्यांनी एकान्तात या यामांचा अभ्यास करण्यास ब्राह्मणांची हरकत नव्हती. का की, ते त्यांच्या वैदिक हिंसेच्या आड येत नव्हते.

## बौद्ध आणि जैन धर्मांचा प्रसार

आजीवक, निर्गन्थ, बौद्ध वगैरे श्रमणसंघ मगध आणि कोसल देशात उदयाला आले, आणि आरंभी ह्या दोन देशात व आजूबाजूच्या राज्यांत आपापल्या धर्माचा प्रचार करीत असत. ही स्थिती अशोकाच्या कारकीर्दीत पालटली. त्याने ह्या श्रमणसंघांना चांगले उत्तेजन दिले. बौद्ध संघाचा तर तो भक्तच होता, आणि बौद्ध धर्माच्या प्रचारार्थ त्याने केलेले प्रयत्न प्रसिद्धच आहेत. असे असले तरी इतर श्रमणसंघांना तो औदार्याने वागवीत असे. विशेषतः आजीवक संघावर त्याची बरीच मर्जी होती असे बाराबार (गयेजवळ) डोंगरांतील त्याच्या लेण्यांत सापडलेल्या शिलालेखांवरून दिसून येते.[१] आजीवकांच्या मागोमाग तो निर्गन्थसंघाचीही काळजी घेत असावा असे त्याच्या सातव्या स्तंभलेखावरून अनुमान करता येते.

अशोकाचा नातू संप्रति जो उज्जयनीचा राजा होता तो प्रथमतः जैन संघाचा भक्त झाला असे श्वेतांबर जैनांचे म्हणणे.[२] त्यानंतर कलिंग देशात खारवेल राजा जैनसंघाचा भक्त झाला. मगध देशात निर्गन्थ बहुधा सवस्त्र असत; क्वचितच अचेलक होत. परंतु जसजसे ते दक्षिणेकडे जाऊ

---

१. वर पृष्ठ ४६५ पहा.

२. The Cambridge History of India, Vol. I. 166.

लागले तसतसे नग्नत्वाकडे झुकत गेले, आणि इकडे जे पश्चिमेकडे गेले, त्यांनी आपले सवस्त्रत्व सोडले नाही. याचे मुख्य कारण हवा असावी. त्याच्या मागे राजे लोकांची अभिरुचीही कारण असू शकेल. नग्न जैन साधूंना जिनकल्प व सवस्त्र साधूंना स्थविरकल्प म्हणतात. त्यांविषयी सविस्तर चर्चा पण्डित कल्याणविजयजी गणी यांनी आपल्या 'श्रमण भगवान् महावीर' पुस्तकाच्या ६ व्या परिच्छेदात केली आहे. एवढे खरे की, कलिंगाच्या मार्गाने जे जैन साधू दक्षिणेत गेले, ते जिनकल्पी, व जे उज्जयनीच्या मार्गाने गुजराथेत आले ते स्थविरकल्पी झाले. ह्या दोन्ही संप्रदायांनी जैन धर्माचा पुष्कळ प्रचार केला. परंतु व्रतबंधनात बद्ध झाल्यामुळे ते हिंदुस्थानाबाहेर जाऊ शकले नाहीत ते काम बौद्धसंघाने केले. इकडे इराणपासून पूर्वेला चीनपर्यंत बौद्धभिक्षूंनी सर्व देशात बौद्ध धर्म फैलावला.

## बौद्ध आणि जैन श्रमणांचा ऱ्हास

माणसामाणसात भांडणे आणि मारामाऱ्या अनादिकालापासून चालतच आल्या आहेत. त्यांना कंटाळून जंगलात जाऊन तपश्चर्या करणारे ऋषिमुनी बुद्धपूर्वकाली फक्त हिंदुस्थानातच होते. त्यांचेही संघ असत. पण ते सामाजिक व्यवस्थेत हस्तक्षेप करीत नसत. जंगलात वास केल्याने जंगली प्राण्यांसंबंधी आदर ठेवणे त्यांना भागच होते. तेव्हा दया हा एक त्यांच्या तपश्चर्येचा प्रकारच होऊन बसला. पण ही दया प्राण्यांपुरतीच होती. इकडे मनुष्यसमाजांत मारामाऱ्या होत, त्याबद्दल ते उदासीन असत. इतकेच नव्हे, तर यज्ञात केली जाणारी पशुहिंसाही बंद करण्याचा त्यांनी प्रयत्न केला नाही.

ह्या ऋषींचा दयाधर्म सार्वजनिक करण्याचा प्रयत्न प्रथमतः पार्श्वनाथाने केला. चोऱ्या, असत्य आणि परिग्रह सोडल्यावाचून मनुष्य-समाजात दयाधर्माचा प्रसार होणे कठीण हे त्याने जाणले आणि त्याप्रमाणे आपला चातुर्याम धर्म उपदेशण्यास सुरुवात केली. त्याकाळचे राजे लोक ऋषिमुनींना फारच मानीत असत. तेव्हा त्यांच्याच मार्गाने जाणाऱ्या ह्या श्रमणांना त्यानी विरोध केला नाही. पण त्यानी यज्ञयाग सोडले नाहीत. बुद्धसमकालीन प्रसेनजित् आणि बिम्बिसार यज्ञ करीतच होते. त्यांच्या राज्यात श्रमणांना धर्मोपदेश करण्यास मुभा होती, एवढेच काय ते. तेव्हा श्रमणांचा

विशेष संबंध सामान्य जनतेशी असे. फार झाले तर एखादद्दुसरा मध्यम वर्गातील व्यापारी त्याना रहाण्यास विहार किंवा उपाश्रय बांधून देऊन मदत करी. पण त्यांचा निर्वाह विशेषतः भिक्षाटनावरच अवलंबून असे. अर्थात् त्यांचा धर्म बहुजन समाजाच्या हितसुखासाठी होता ( बहुजन-हिताय बहुजनसुखाय ).

परंतु अशोककालानंतर हा मनु पालटला. अशोकाने श्रमणसंघांचा मानमरातब फार वाढविला. त्यामुळे त्याच्याचवेळी ह्यांत विशेष सांप्रदायिकता आली व हे आपसात भांडू लागले. ती भांडणे मिटविण्याचे प्रयत्न अशोकाच्या शिलालेखांत आणि स्तंभलेखांत स्पष्टपणे उल्लेखलेले आहेत. पण त्याच्या प्रयत्नांना यश आले नाही. श्रमणांचा सांप्रदायिक परिग्रह वाढत गेला. होता होता आजीवक वगैरे श्रमणसंप्रदाय नष्टच झाले; बौद्ध आणि जैन असे दोनच काय ते बाकी राहिले. परंतु ह्यांची परिग्रहदृष्टी वाढत गेल्यामुळे आपसांत भांडणे सुरू झाली. जैनांत श्वेताम्बर व दिगम्बर असे दोन, व बौद्धांत महायान आणि स्थविरवाद–ज्याला महायानी हीनयान म्हणत–असे प्रामुख्याने दोन तट पडले; आणि, पुनः या तटांतही पुष्कळ भेद उत्पन्न झाले, जसे सामान्य लोक संपत्ति-परिग्रहासाठी भांडतात, तसे हे श्रमणसंप्रदाय परिग्रहासाठी भांडू लागले.

मज्झिम निकायातील अलगद्दूपमसुत्तात भगवान् बुद्ध म्हणतो–भिक्षु हो, एखादा प्रवासी एखाद्या मोठ्या नदीजवळ किंवा तलावाजवळ येईल आणि पाहील की, ते तीर सुरक्षित नाही, तेथे भय आहे आणि परतीर सुरक्षित असून निर्भय आहे; पण तेथे परतीरी जाण्यास नौका किंवा पूल नाही. तशा प्रसंगी तो कोरडी लाकडे आणि गवत गोळा करून त्याचा ताफा तयार करील व त्याच्या आश्रयानें ती नदी किंवा तलाव तरून पार जाईल. तेथे तो म्हणेल की, ह्या ताफ्याचे माझ्यावर केवढे उपकार; तेव्हा याला खांद्यावर किंवा डोक्यावर घेऊन जाणे चांगले ! असे म्हणणाऱ्या त्या माणसाने त्या ताफ्याविषयी आपले कर्तव्य केले असे होईल काय ?

भिक्षु म्हणाले, ‘ नाही भदंत ’

भगवान् म्हणाला-हा ताफा मला उपयोगी पडला असे म्हणून त्या माणसाने त्याला तीरावर किंवा पाण्यात सोडून निघून जाणेच योग्य आहे. ह्या

ताफ्यासारखाच मी धर्म उपदेशिला आहे. तो धर्म निस्तरणासाठी होय, ग्रहणासाठी नव्हे. हे जाणून तुम्ही धर्माचाही परिग्रह करता कामा नये, मग अधर्माची गोष्ट काय सांगावी ?

परंतु हे सगळे उपदेश पुस्तकांतच राहिले. श्रमण आपापले संप्रदाय डोक्यावर घेऊन फिरू लागले, आणि त्यासाठी त्यांना राजांची मनधरणी करणे भाग पडले. आपल्या विहारांच्या रक्षणासाठी बौद्ध भिक्षूंनी राजाची मदत घेतल्याचे एक उदाहरण मी 'हिंदी संस्कृति आणि अहिंसा' या पुस्तकांत दिले आहे (वि. २।१०७–११२). आता येथे जैन साधूंची काही उदाहरणे देतो.

## कालककथा

विक्रम संवत्च्या पूर्वी कांही वर्षे उज्जयिनी येथे गर्दभिल्ल राजा राज्य करीत होता. त्यावेळी जैन साधु कालकाचार्य आपल्या जैन साध्वी बहिणी-सह तेथे आला. गर्दभिल्ल राजाने त्या साध्वीला जबरदस्तीने आपल्या अंतःपुरात नेऊन ठेवले. तेव्हा कालकाचार्य एकटाच सिंधुनदीच्या प्रदेशांत गेला. तेथे शाहि नांवाचे शकमांडलिक राजांचे राज्य होते. त्यांना कालका-चार्याने वश केले व त्यांना काठेवाडच्या मार्गाने उज्जयिनीला आणून गर्दभिल्लाचा पराजय केला. ह्या लढाईत गर्दभिल्ल मरण पावला. (ही कथा ऐतिहासिक आहे किंवा नाही याबद्दल वाद आहे. The Cambridge History of India, पृष्ठ 167-168 आणि 532 पहा.)

## बप्पभट्टि सूरिकथा

बप्पभट्टीचे मूळचे नाव सूरपाल. त्याच्या बापाचे नांव बप्प आणि आईचे नांव भट्टि. त्याची हुषारी पाहून सिद्धसेनसूरि नांवाच्या जैन आचा-र्याने त्याला दीक्षा देण्याचे ठरविले. परंतु आईबापांचा तो एकुलता मुलगा असल्यामुळे ती कबूल होईनात. शेवटी आचार्याच्या अत्याग्रहास्तव सूर-पालाला आपणां दोघांचे नांव ठेवावे ह्या अटीवर त्यांनी आचार्याच्या स्वाधीन केले. आचार्याने त्याला त्याच्या सातव्या वर्षी दीक्षा दिली आणि भद्रकीर्ति असे नांव ठेवले. पण त्याच्या आईबापाशी केलेल्या कराराप्रमाणे त्याला बप्पभट्टि असेच सर्व म्हणत.

बप्पभट्टि थोडा मोठा झाल्यावर त्याची व आम नांवाच्या तरुणाची भेट झाली. आमाची आई कनोजच्या यशोबर्मा राजाची राणी होती. तिच्या सवतीच्या खटपटीमुळे राजाने तिला हद्दपार केले, आणि ती गुजराथेत रामसण नांवाच्या गांवी येऊन राहिली. पुढे ती सवत मेल्यावर यशोवर्म्याने आमाच्या आईला परत बोलावले; पण आम गुजराथेतच राहिला. बप्पभट्टि आमाला घेऊन आपल्या आचार्याजवळ गेला व आचार्याने आमाला आश्रय दिला, आणि बप्पभट्टीबरोबर तोही अभ्यास करू लागला.

कालान्तराने यशोवर्मा मरण पावला, आणि आमाला कनोजची गादी मिळाली. त्याने बप्पभट्टीला बोलावून आणून आचार्यपद दिले. गौड देशाचा राजा धर्म याचे व आमाचे वैर होते. त्या दोघांनी असे ठरविले की, सरहद्दीवर एकत्र होऊन दोन्ही तरफेच्या पण्डितांनी वाद करावा, आणि ज्याच्या पण्डिताचा जय होईल त्या राजाला इतराने आपले राज्य द्यावे. त्याप्रमाणे सरहद्दीवर एका ठिकाणी हे दोन्ही राजे आले. आमाच्या बाजूने बप्पभट्टि व धर्माच्या बाजूने बौद्ध पण्डित वर्धनकुञ्जर यांची निवड करण्यात आली. त्या दोघांचा वाद सहा महिने चालला व अखेरीस बप्पभट्टीचा विजय झाला. त्याने आम राजाला समजावून धर्म राजाचे राज्य परत करविले, आणि तेव्हांपासून त्याची व वर्धनकुञ्जराची मैत्री झाली.

बप्पभट्टीचे नन्नसूरि आणि गोविंदसूरि असे दोन गुरुबन्धु होते. त्यांची तो आमराजापाशी वारंवार स्तुती करी. एकदा वेष पालटून आम नन्नसूरीकडे गेला. तेथे छत्रचामरादिक लावून बसलेल्या नन्नसूरीला पाहून आमाने त्याजवर टीका केली. दुसऱ्यांदा जेव्हा आम तिकडे गेला तेव्हा नन्नसूरि जैन मंदिरात बसून वात्स्यायन कामसूत्रावर व्याख्यान देत होता. तेव्हा आमाने जाणले की, हा विद्वान् खरा, पण सच्चरित साधु नव्हे.

आमाची समजूत घालण्यासाठी गोविंदसूरीने आदिनाथ चरित्राचे एक नाटक रचले, आणि त्याचा प्रयोग दरबारात करविला. त्यांत असा वीररस आणला होता की, त्यामुळे राजाच्या अंगांत शौर्याचा संचार झाला, आणि तो तलवार उगारून उठला. तेव्हा अंगरक्षकांनी त्याला सावध केले की, हे युद्ध नसून नाटक आहे! नन्नसूरि आणि गोविंद-सूरीही वेश पालटून त्या सभेत बसले होते. त्या प्रसंगी गोविंदसूरि प्रकट

होऊन म्हणाला, "राजन्, हे नाटक तुम्हाला खरे वाटले हे योग्य आहे काय? जर नाही, तर नन्नसूरीने वात्स्यायन कामशास्त्राचे व्याख्यान केले असता तुम्हाला शंका का यावी?" ते ऐकून आम राजाने क्षमा मागितली.

एकदा आम राजाने समुद्रपाल राजाच्या राजगिरी किल्ल्यावर हल्ला केला; पण किल्ला हाती येईना. तेव्हा बप्पभट्टीच्या सल्ल्याने नुकत्याच जन्मलेल्या भोजकुमाराला (आमाच्या नातवाला) तेथे आणले व त्याला पालखीतून पुढे करून हल्ला केल्याबरोबर किल्ला हाती आला.

आम राजा संवत् ८९० साली मरण पावला, आणि त्याचा मुलगा दुन्दुक गादीवर आला. एका वेश्येला लंपट होऊन तो आपल्या मुलाला—भोजाला—मारू पहात होता. पण भोजाच्या मामाने त्याला पाटलीपुरात आपल्या घरी नेऊन ठेवले. त्यानंतर दुन्दुकाने त्याला परत आणण्यासाठी बप्पभट्टीला तगादा लावला. बप्पभट्टीने कांहीतरी सबब सांगून काही समय व्यतीत केला; पण शेवटी दुन्दुकाच्या अत्याग्रहास्तव भोजाला आणण्यासाठी तो पाटलीपुराला गेला. जर भोजाला नेले, तर दुन्दुक त्याला ठार मारणार, व न नेले तर आपणाला व अन्य जैन साधूंना उपद्रव करणार अशा पेचात बप्पभट्टी सापडला, आणि त्यांतून मुक्त होण्यासाठी २१ दिवस उपास करून त्याने इहलोक सोडला. त्यावेळी तो ९५ वर्षांचा होता. त्याचा जन्म संवत् ८०० मध्ये झाला; ८०७ मध्ये त्याला दीक्षा दिली; ८११ मध्ये आमराजाने त्याची आचार्यपदी स्थापना केली; आणि ८९५ मध्ये तो परलोकवासी झाला.[१]

त्यानंतर भोजकुमार आपल्या मामाबरोबर कान्यकुब्जला गेला. तेथे राजवाड्याच्या दरवाजावर एक माळी फळे विकीत होता. त्यांपैकी तीन ताडाची फळे त्याने भोजकुमाराला अर्पण केली. ती घेऊन तो सरळ राजवाड्यांत घुसला, आणि तेथे सिंहासनावर बसलेल्या आपल्या पित्याच्या छातीत ती फळे मारून त्याला त्याने ठार केले, आणि आपण गादीवर बसला. नंतर तो आमविहार नांवाच्या तीर्थाला गेला. तेथे बप्पभट्टीचे दोन विद्वान्

१. येथे बप्पभट्टि ११ वर्षांचा असताना आचार्य झाल्याची कथा असंभवनीय दिसते. दुसऱ्या गोष्टीतही किती सत्य आहे हे सांगता येत नाही.

शिष्य होते. त्यांनी भोजाचा आदरसत्कार न केल्यामुळे भोज नाराज झाला, आणि त्याने नन्नसूरि व गोविंदसूरि यांस बोलावून आणून त्यांची गुरुपदीं स्थापना केली. त्यानंतर त्याने पुष्कळ राजांवर जय मिळविला; आणि तो आम राजापेक्षांही जिनशासनाची जास्त उन्नती करू लागला.

## हेमचन्द्रसूरि

हेमन्द्रसूरीचा जन्म धंधुका शहरात संवत् ११४५ व्या वर्षी झाला. ११५० साली त्याला दीक्षा देण्यात आली, आणि त्याचे अध्ययन पुरे झाल्याबरोबर ११६६ साली जैन संघाच्या आचार्यपदी त्याची स्थापना करण्यात आली. तेव्हा तो खंबातहून पाटणला जाण्याला निघाला.

त्यावेळी पाटणला सिद्धराज राजा राज्य करीत होता. तो पक्का शैव होता. त्याने बांधलेला सहस्रलिंगी तलाव वाळूने भरून गेला होता. तो काही वर्षांपूर्वी बडोदा सरकारच्या पुराणवस्तुसंशोधन खात्याने शोधून काढला. हेमचन्द्रसूरि त्या शहराच्या बाजारातून जात असताना वाटेत सिद्धराज हत्तीवरून आपल्या लवाजम्यासह येत होता; त्याला पाहून हेमचन्द्र बाजूच्या एका दुकानात उभा राहिला, व राजा तिकडे आल्यावर त्याने राजाच्या स्तुतीने भरलेला एक श्लोक म्हटला. तो ऐकून राजा प्रसन्न झाला, आणि हेमचन्द्राला म्हणाला की, तुम्ही रोज दुपारी येऊन माझी करमणूक करीत चला. तदनंतर सिद्धराजाने माळवा जिंकला, आणि त्या प्रसंगी हेमचन्द्रसूरीने त्याचे स्तोत्र गाइले.

एकदा अवंतीच्या भाण्डारातील पुस्तके राजा पहात होता. त्यांत त्याला भोजव्याकरण आढळले. तेव्हा तो हेमचन्द्रसूरीला म्हणाला, "आमच्या देशातही असे व्याकरण पाहिजे. ते तुम्ही रचा व माझा मनोरथ पूर्ण करा." त्यावर हेमचन्द्रसूरि म्हणाला, "यापूर्वी रचलेली आठ व्याकरणे काश्मीर देशात आहेत. ती पाहूनच नवीन व्याकरणाची रचना करता येईल." राजाने ताबडतोब आपल्या नोकरांना काश्मीरला पाठवून ती व्याकरणे आणविली, आणि त्यांना अनुसरून हेमचन्द्रसूरीने 'सिद्धहेम' नावाचे व्याकरण रचले. ह्या व्याकरणाच्या दरएक पादाच्या अंती एक एक श्लोक आहे. त्या श्लोकात मूळराज[1] आणि त्याच्या वंशज राजांची वर्णने

१. मूळराज सिद्ध राजाच्या घराण्याचा मूळपुरुष होता.

आहेत. ३२ व्या पादाच्या शेवटी चार श्लोक आहेत; त्यात सिद्धराजाची प्रशस्ती केली आहे. ते व्याकरण लिहून काढण्यासाठी राजाने ३०० लेखक गोळा केले, आणि त्यांच्याकडून त्या व्याकरणाच्या प्रती करवून अंग, वंग, कलिंग, लाट, कर्णाटक, कोंकण, महाराष्ट्र, सौराष्ट्र, वत्सुकच्छ, मालव, सिंधु, सौवीर, नेपाल, पारसीक, मुरुंड, गंगेच्यापार हरद्वार, काशी, चेदि, गया, कुरुक्षेत्र, कान्यकुब्ज, गौड, श्रीकामरूप, सपादलक्ष, जालंदर, खस, सिंहल, महाबोध, बोड, कौशिक इत्यादि देशात त्या व्याकरणाचा विस्तार केला.

एकदा चतुर्भुज नावाच्या जैन मंदिरात हेमचन्द्रसूरीचा शिष्य रामचन्द्र मुनि नेमिनाथावर व्याख्यान देत होता. त्यात पाण्डवांच्या दीक्षेचे वर्णन आले. ते ऐकून ब्राह्मण अप्रसन्न झाले, आणि त्यांनी राजाजवळ तक्रार केली की, ' हे श्वेताम्बर जैन साधू साफ खोटे बोलतात. पाण्डव हिमालय पर्वतावर गेले, आणि तेथे केदारनाथाची पूजा करून त्यांनी इहलोक सोडला. असे असता हे शूद्र श्वेताम्बर पाण्डवांनी जैन धर्माची दीक्षा घेऊन शत्रुंजय पर्वतावर देह विसर्जन केल्याची खोटी कथा सांगत आहेत. अशा असत्य-वादींना योग्य दण्ड झाला पाहिजे.

सिद्धराजाने हेमचन्द्रसूरीला बोलावून ह्या प्रकरणाची चौकशी केली. हेमचन्द्र म्हणाला, "आमच्या ग्रंथात तसे आहे. पण ते पाण्डव महाभारता-तील नव्हत. अशी गोष्ट सांगतात की, भीष्माने आपल्या शरीराचे दहन कोणालाच न जाळलेल्या ठिकाणी करावे असे युद्धारंभी आपल्या परिवाराला सांगून ठेवले होते. त्याप्रमाणे त्याचे प्रेत एका निर्जन टेकडीवर नेण्यात आले. तेथे अकस्मात् अशी आकाशवाणी झाली—

**अत्र भीष्मशतं दग्धं पाण्डवानां शतत्रयम् ।**
**द्रोणाचार्य सहस्रं तु कर्णसंख्या न विद्यते ॥**

(येथे १०० भीष्मांना, ३०० पाण्डवांना, १००० द्रोणांना आणि असंख्य कर्णांना जाळले आहे.)

अशा अनेक पाण्डवांपैकी जैन पाण्डवही असतील. कारण शत्रुंजय पर्वतावर त्यांच्या मूर्ती आहेत."

सिद्धराज म्हणाला, "हे जैन मुनि बोलतात ते सत्य आहे." आणि तो हेमचन्द्रसूरीला म्हणाला, "तुमच्या आगमाप्रमाणे तुम्ही सत्यकथन करता, त्यांत दोष नाही."

येणेप्रमाणे सिद्धराजाकडून सत्कृत झालेला श्रीहेमचन्द्रप्रभु जैन-शासनरूपी आकाशांत सूर्यासमान प्रकाशता झाला. एकदा देवबोध नांवाचा भागवत धर्मी आचार्य पाटणला आला. सिद्धराज राजकवी श्रीपालाबरोबर त्याच्या भेटीला गेला असता त्याने श्रीपालाचा तेथल्यातेथेच एक श्लोक रचून अपमान केला. तथापि राजाच्या सांगण्यावरून श्रीपालाने त्याच्याशी काव्यचर्चा केली. देवबोध आचार्याची विद्वत्ता पाहून राजा प्रसन्न झाला, आणि त्याने त्याला एक लक्ष द्रम्म (रुपये) दान दिले. श्रीपाल कवीला हे राजाचे कृत्य आवडले नाही. त्याने देवबोधावर पाळत ठेवली, आणि देवबोध आपल्या परिवारासह सरस्वती नदीच्या काठी दारू पीत बसला असता राजाला तेथे नेऊन ते दृश्य दाखविले. राजाने देवबोधाला आपल्या राज्यात ठेवून घेतले; पण पूर्वीप्रमाणे त्याचा मान राहिला नाही, आणि त्याच्यावर भिक्षेवर निर्वाह करण्याची पाळी आली. तेव्हा अभिमान सोडून तो हेमचन्द्रसूरीपाशी गेला. हेमचन्द्रसूरीने त्याला आपल्या अर्धासनावर बसवून त्याचा बहुमान केला, आणि सिद्धराजाकडून त्याला आणखी एक लक्ष द्रम्म देवविले.

सिद्धराजाला मुलगा नव्हता. त्यासाठी त्याने यात्रा केली. त्याने आपल्याबरोबर हेमचन्द्रसूरीला घेतले. प्रभासपट्टणांतील शिवालयात राजा-बरोबर शिवाची स्तुती करून हेमचन्द्रसूरीनेही शिवाला नमस्कार केला; का की, अविरोध हेच मुक्तीचे परम कारण आहे.

तेथून राजा कोटिनगराला (कोडिनारला) आला. ह्या प्रसंगी हेमचन्द्र-सूरीने तीन दिवस उपास करून तेथील अंबिका देवीची आराधना केली. देवीने साक्षात् दर्शन देऊन म्हटले, 'हे मुनि, माझे वचन ऐक. ह्या राजाच्या नशिबात संतती नाही. याच्या चुलत भावाचा मुलगा कुमारपाल याच्या पश्चात् गादीवर येईल.'

ही गोष्ट जेव्हा सिद्धराजाला सांगण्यात आली, तेव्हापासून तो कुमारपालाचा खून करण्याच्या विचारास लागला. कुमारपालाला हे वर्तमान

समजले, आणि तो जटाधारी शैव संन्यासी होऊन फिरू लागला. राजाच्या चार पुरुषांनी बातमी दिल्याप्रमाणे राजाने जवळ जवळ त्याला पकडलेच होते. पण तो मोठ्या शिताफीने निसटला, आणि हेमचन्द्रसूरीच्या उपाश्रयात गेला. हेमचन्द्रसूरीने त्याला ताडपत्रात लपविले आणि राजपुरुषांना त्याची दाद लागू दिली नाही. त्यानंतर कुमारपाल कापालिक आणि कौल होऊन सात वर्षे भटकत होता. सिद्धराज संवत् ११९९ मध्ये मरण पावला; तेव्हा कुमारपाल पाटणला आला, आणि अमात्यांनी त्याला गादीवर बसविले.

गादीवर बसल्यावर कुमारपालाने अजमेरच्या अर्णोराजावर ११ स्वाऱ्या केल्या; पण त्याला यश आले नाही. तेव्हा त्याने अजितनाथ तीर्थंकराला नवस करून अर्णोराजावर स्वारी केली व त्याला जिंकले. आपण केलेल्या नवसाला अनुसरून कुमारपालाने तारंगाजीवर २४ हात उंच अजितनाथाचे मंदिर बनविले व त्यात १०१ आंगळे उंचीची अजितनाथाची मूर्ति स्थापन केली. हेमचन्द्रसूरीच्या उपदेशाप्रमाणे त्याने आणखीही पुष्कळ जैनमंदिरे बांधली.

संवत् १२२९ मध्ये ८४ वर्षांच्या वयात हेमचन्द्रसूरीने इहलोक सोडला.

## ह्या चरित्रांचा निष्कर्ष

वरील तीन चरित्रे प्रभावक चरित्र नांवाच्या ग्रन्थातून घेतली आहेत. मूळ ग्रन्थ प्रभाचन्द्रसूरीने विक्रम संवत् १३३४ मध्ये संस्कृतात लिहिला. त्याचे गुजराथी भाषांतर भावनगरच्या श्रीजैन आत्मानंद सभेने संवत् १९८७ मध्ये प्रसिद्ध केले आहे. पण्डित कल्याण विजयजी मुनि यांनी या ग्रन्थाला प्रस्तावना लिहिली असून 'प्रबंधपर्यालोचन' नांवाचा लेख जोडला आहे. त्यांच्या त्या लेखावरून व मूळ ग्रन्थातील मजकुरावरून वरील तीन चरित्रे अतिसंक्षेपाने लिहिली आहेत. त्यात काही न्यूनता राहिली असल्यास वाचकांनी क्षमा करावी.

गर्दभिल्ल राजाने कालकाचार्याच्या बहिणीला जबरदस्तीने आपल्या जनानखान्यात ठेवले हे कृत्य अत्यंत निंद्य खरे पण त्याचा सूड उगविण्यासाठी शाही राजांना आणून त्यांची हत्या करविणे जातिदेशकालसमयानवच्छिन्न सार्वभौम अहिंसामहाव्रत पाळणाऱ्या सूरीला उचित होते असे

म्हणता येत नाही. त्याने संन्यास सोडून हे कृत्य केले असते, तर कदाचित् ते क्षम्य म्हणता आले असते.

बप्पभट्टीचे आयुष्य आमराजाच्या दरबारात गेले. भिक्षूंनी राजाशी निकट संबंध ठेवण्याचा निषेध पालि वाङ्मयात अनेक ठिकाणी आढळतो, आणि अशा रीतीने राजाशी संसर्ग ठेवण्याचे एकही उदाहरण सापडत नाही. बौद्ध भिक्षु राजवाड्यात उपदेश करण्यासाठी जात होते; पण इतर बाबतीत ते बहुधा उदासीन असत. राजाशी अतिपरिचय करणाऱ्या भिक्षूंचा इतर भिक्षु विशेष आदर करीत नसत. ही स्थिती महायान संप्रदायाच्या वेळी पालटली असण्याचा संभव आहे. पण जैन संप्रदायात राजाशी सख्य ठेवणे भूषणास्पद मानण्यात येत होते हे अनेक सूरींच्या चरित्रावरून स्पष्ट दिसते. आम राजाला किल्ला मिळत नाही, तर तो कसा काबीज करावा हे बप्पभट्टि सांगतो. आम राजाचा मुलगा दुन्दुक अत्यंत दुर्गुणी होता तरी त्याची संगत सोडण्यास बप्पभट्टि तयार होत नाही ! त्याच्या संबंधी मुनि श्री कल्याण विजयजी आपल्या प्रबंधपर्यालोचनात म्हणतात,

" बप्पभट्टीचा काल शिथिलाचाराचा होता, आणि बप्पभट्टि व त्याचे गुरुबन्धु प्रायः यानाचा उपयोग करीत, असे प्रबन्धात आलेल्या अनेक प्रसंगावरून दिसून येते. तथापि त्यांनी राजाला आपल्या बाजूला वळवून जैन समाजावर जो उपकार केला, तो खरोखरच अनुमोदनीय आहे. " (पृ. ६७).

राजाश्रयाने काही मंदिरे व उपाश्रय बांधले गेले यालाच कल्याणविजयजी उपकार म्हणत असावे !

सिद्धराज पक्का शैव, पण विद्वान् लोकांना मान देणारा; त्याची स्तुति करून हेमचन्द्रसूरि त्याचा मित्र होतो, आणि आठ व्याकरणे उपलब्ध असता केवळ सिद्धराजासाठी नववे व्याकरण लिहितो व त्याला 'सिद्धहेम' नाव देतो. राजाची मर्जी संपादण्याचा हा केवढा प्रयत्न ! हेमचन्द्रसूरीच्या सहवासात राहूनही सिद्धराज कुमारपालाचा खून करू पाहतो, आणि

हेमचन्द्रसूरि त्याचा निषेध करीत नाही ! असे असता तो प्रभावक होतो![1] तात्पर्य, कालकाचार्यापासून आजपावेतो जैन समाजाचे मत हे की, राजाश्रयाने किंवा श्रीमंत वर्गाच्या साहाय्याने जो जैन मंदिरे बांधतो व उपाश्रयांची अभिवृद्धि करतो तो श्रेष्ठ जैनाचार्य होय.

परंतु ह्या कृत्यांनी चातुर्याम धर्माचा किंवा पंच महाव्रतांचा विकास झाला काय ? काव्ये, नाटके अथवा पुराणे लिहून राजांचे मनोरंजन ब्राह्मणही करीत. मग त्यांच्यात आणि ह्या जैन आचार्यांत फरक कोणता ? ब्राह्मणांच्या काव्य-नाटक-पुराणांसमोर जैनांची काव्य-नाटक-पुराणे फिकी पडली आणि लुप्तप्राय झाली. अलीकडेच त्यांची थोडीशी प्रसिद्धी होत आहे. पण ती ब्राह्मणी ग्रन्थांना मागे टाकतील हे संभवनीय नाही. जैन धर्माला आश्रय देणारे राजे गेल्याबरोबर जैन मंदिरांची आणि उपाश्रयांची मातब्बरीही नष्ट झाली. तेव्हा एवढ्या खटपटीने जैन आचार्यांनी काय मिळविले ?

## जैन उपासक

राजे लोकांची हिंसा, असत्य, चोरी किंवा लूट आणि परिग्रह यांचा निषेध करणे श्रमणांना अशक्य होते. तेव्हा त्यानी आपल्या मंदिरांना आणि उपाश्रयांना जेवढे मिळेल, तेवढे संपादण्याचा बेत केला असावा. त्यात स्वतः चातुर्याम धर्म त्यागतो आहो याचा विचार त्यांच्या मनात आला नाही. याचे कारण ते पूर्णपणे सांप्रदायिक झाले. आता आपल्या उपासकांना खूष ठेवण्यासाठी अपरिग्रहाचा अर्थ ते कसा काय करीत असत याचा थोडक्यात विचार करू.

## आनन्द उपासक

उपासकदशा नावाचे जैन अंगात एक अंग आहे. त्यात दहा उपासकांच्या कथा वर्णिल्या आहेत. त्यांपैकी पहिली आनन्द उपासकाची कथा.

---

१. प्रभावक शब्दाची व्याख्या श्रीकल्याणविजयजीनी येणे प्रमाणे केली आहे— जैन शास्त्रात हा पारिभाषिक शब्द समजला जातो. अतिशय ज्ञानाने, उपदेशशक्तीने, वादशक्तीने, किंवा विद्यादिक गुणांनी ( जैन शास्त्राचा ) उत्कर्ष करणारा जैन आचार्य असा याचा अर्थ समजावा.

आनन्द उपासक वाणिज्यग्राम नावाच्या नगरात राहत होता. तेथे जितशत्रु नावाचा राजा राज्य करीत होता. आनन्द गृहपतीपाशी चार कोटी सोन्याची नाणी जमिनीत गाडलेली, चार कोटी व्यापारात लावलेली, चार कोटी धनधान्य जनावरे इत्यादिकांत (प्रविस्तरात) लावलेली असत, आणि दहा दहा हजार गाईंचे चार कळप होते. शिवनन्दा नावाची त्याची अत्यंत सुस्वरूप बायको होती.

वाणिज्यग्राम नगराबाहेर कोल्लाक नावाचा संनिवेश होता. तेथे आनन्द गृहपतीचे पुष्कळ आप्तमित्र राहत असत. त्या संनिवेशात एकदा महावीरस्वामी आला, आणि जितशत्रुराजा त्याच्या दर्शनाला गेला. आनन्द गृहपतीला ते वर्तमान समजल्यावर तोही तिकडे गेला, आणि त्या सभेत धर्मोपदेश ऐकत बसला. उपदेश समाप्त झाल्यावर राजा व लोक स्वगृही गेले. पण आनन्द गृहपती तेथेच राहिला, व महावीरस्वामीला म्हणाला, "भगवन्, निर्गन्थशासनात मी श्रद्धा बाळगतो आणि त्या शासनाचा अंगिकार करतो पण मी गृहस्थाश्रमाचा त्याग करण्यास असमर्थ आहे ; यास्तव पाच अणुव्रते आणि सात शिक्षाव्रते मिळून बारा व्रतयुक्त गृहस्थधर्म ग्रहण करतो."

महावीरस्वामी म्हणाला, "हे देवानुप्रिय, ह्या कामी विलंब करू नकोस." तेव्हा आनंद गृहपतीने महावीरस्वामीजवळ स्थूल प्राणघाताचे प्रत्याख्यान केले की, मी आजीवन कायावाचामने प्राणघात करणार नाही आणि करविणार नाही; असत्याचे प्रत्याख्यान केले की, मी कायावाचामने असत्याचरण करणार नाही आणि करविणार नाही. त्याने स्वस्त्रीसंतोषव्रत स्वीकारले ते असे एका शिवनन्दाभार्येशिवाय कुठल्या स्त्रीशी मी संग करणार नाही; इच्छाविधीचे (परिग्रहाचे) परिमाणव्रत स्वीकारले ते असे–चार कोटी गाडून ठेवलेल्या, चार कोटी व्यापारात घातलेल्या आणि चार कोटी प्रविस्तरात लावलेल्या सोन्याच्या नाण्यांशिवाय अन्य सोन्याच्या नाण्यांचा मी त्याग करतो, पाचशे नांगर चालतील एवढीच शेती ठेवीन, जास्त ठेवणार नाही; ४० हजार गाईशिवाय अन्य गाईंचा त्याग करतो; चार मोठी जहाजे व चार होड्या यांच्याशिवाय अन्य नौका ठेवणार नाही. पांचशे गाड्यांपेक्षा जास्त गाडे ठेवणार नाही; त्यानंतर त्याने उपभोग

परिभोगाची मर्यादा ठरविली. ( ते प्रकरण विस्तारभयास्तव येथे देत नाही ) नंतर महावीरस्वामी आनन्दाला म्हणाला, " जीवाजीव जाणणाऱ्या श्रमणोपासकाच्या सम्यक्त्वाचे हे पाच अतिचार आहेत. ( १ ) संशय ठेवणे, ( २ ) दुसऱ्या संप्रदायाची इच्छा, ( ३ ) शंका काढणे, ( ४ ) अन्य संप्रदायाची स्तुती करणे ज्यामुळे श्रोत्यांना तो संप्रदाय आवडेल; आणि ( ५ ) अन्य सांप्रदायिकांची मैत्री. " त्यानंतर महावीरस्वामीने पाच अणुव्रतांचे व सात शिक्षाव्रतांचे अतिचार,[१] आणि अंती मारणान्तिकसल्लेखना-व्रताचे अतिचार सांगितले. जैन उपासक, उपासिका व साधु, साध्वी यांपैकी कित्येक हे व्रत आचरीत असत. व्याधीने अथवा वृद्धावस्थेने शरीर जर्जरित झाले असता ते उपास किंवा प्रायोपवेशन करून प्राण सो ीत. अद्यापिही हे व्रत क्वचित् आचरण्यात येते. ह्या व्रताला ' अपश्चिम मारणान्तिकसल्लेखना जोषणाराधना ' म्हणतात. ह्या व्रताचे हे पाच अतिचार— ( १ ) इहलोकाची आशा, ( २ ) परलोकाची आशा, ( ३ ) काही दिवस जगण्याची आशा, ( ४ ) इष्टमित्रपुत्रदारादिकांच्या भेटीची आशा आणि ( ५ ) मरणोत्तर कामोपभोगांची आशा.

पाच अणुव्रते व सात शिक्षाव्रते ग्रहण केल्यावर आनन्द उपासक म्हणाला, " भगवन्, आजतागायत, राजाभियोग ( राजाचा कायदा किंवा हुकूम ), गणाभियोग ( जातीचा नियम ), बलाभियोग ( बळजबरी ), देवाभियोग ( नवस वगैरे ), गुरुनिग्रह ( गुरूने दिलेली ताकीद ), आणि उपजीविकेचे भय यांशिवाय अन्य तीर्थिक श्रमणांना किंवा अन्य देवतांना नमस्कार करणे मला योग्य नव्हे. तीर्थिकांनी बोलावल्यावाचून त्यांच्याशी संभाषण करणे योग्य नाही. त्याचप्रमाणे त्यांना अन्नपान, वस्त्रपान इत्यादिक देणे योग्य नाही. परंतु हे पदार्थ मी योग्य प्रकारे निर्ग्रन्थांना देत जाईन. " असे बोलून आनन्द उपासक महावीरस्वामीला नमस्कार करून घरी गेला, आणि त्याने शिवनन्देलाही ही व्रते स्वीकारण्यास उपदेश केला. त्याप्रमाणे तिने महावीरस्वामीजवळ जाऊन ही व्रते पूर्ण केली.

---

१. पांच अणुव्रतांचे अतिचार वर दिलेच आहेत. सात शिक्षाव्रतांचे अतिचार विस्तारभयास्तव देत नाही. त्या सातांपैकी पहिल्या तीन व्रतांना गुणव्रते म्हणतात. पृ. ४५१–५२

व्रते स्वीकारून १४ वर्षें पुरी झाल्यावर आनन्द उपासकाने आपली सारी संपत्ती आपल्या वडील मुलाच्या स्वाधीन केली, आणि आपण घर सोडून पोषधशालेत ( धर्मसाधनशालेत ) जाऊन राहिला. तेथे व्रतनियम पूर्णपणे पाळून उपासकत्वाची वीस वर्षें पुरी झाल्यावर तीस दिवस उपवास करून सल्लेखनाव्रताने तो स्वर्गलोकाला गेला.

## कामदेव उपासक

दुसरा उपासक कामदेव. चंपा नगरीत राहणारा. त्याची पत्नी भद्रा. त्याजपाशी सहा कोटी सोन्याची नाणी गाडलेली, सहा कोटी व्यापारांत लावलेली व सहा कोटी प्रविस्तरांत लावलेली होती, आणि ६० हजार गाई होत्या. आनन्द उपासकाप्रमाणेच त्यानेही महावीरस्वामीपाशी गृहस्थधर्म स्वीकारला; आणि काही वर्षांनी आपल्या थोरल्या मुलाच्या स्वाधीन सर्व संपत्ती करून तो पोषधशालेत जाऊन राहिला. तेथे एक देव प्रगट झाला, आणि त्याने भयंकर पिशाचवेश धारण करून कामदेवाला व्रतापासून च्युत करण्याचा प्रयत्न केला. पण कामदेव निश्चल राहिला. तेव्हा त्या पिशाचाने त्यावर तलवारीचे वार केले. तरी तो ढळेना. तेव्हा त्या देवाने हस्तिवेश घेऊन आपल्या सोंडेने कामदेवाला आकाशात फेकले आणि दातांवर घेऊन पायांखाली तुडविले. तरी कामदेव विचलित झाला नाही. मग त्या देवाने मोठ्या सर्पाचे रूप धारण केले, आणि कामदेवाच्या गळ्याभोवती तीन वेढे घालून तो त्याच्या छातीला डसला. पण कामदेव स्थिर राहिला. तेव्हा त्या देवाने आपले मूळ रूप धारण केले व तो म्हणाला, "इन्द्राचे म्हणणे होते की, तुला व्रतापासून कोणीही विचलित करू शकणार नाही. त्या वचनावर श्रद्धा न ठेवता मी इकडे आलो. हे देवानुप्रिय, तू ऋद्धिमान् आहेस. मी तुझी क्षमा मागतो." असे म्हणून व कामदेवाला वंदन करून तो देव निघून गेला. उपासकत्वाला २० वर्षे झाल्यावर कामदेव ३० दिवस उपास करून सल्लेखनाव्रताने स्वर्गलोकाला गेला.

## चुलणीपिता उपासक

तिसरा उपासक चुलणीपिता, काशीचा राहणारा. त्याजपाशी आठ कोटी सोन्याची नाणी गाडलेली, आठ कोटी व्यापारात लावलेली व आठ

कोटी प्रविस्तरांत लावलेली होती, आणि ८० हजार गाई होत्या. बाकी सर्व आनन्द उपासकाप्रमाणे. तो पोषधशालेत व्रताचरण करीत असताना एका देवाने त्याच्या ज्येष्ठ मुलाला त्याच्यासमोर आणून ठार केले व त्याचे मांस एका कढईत भाजून ते त्याच्या अंगावर टाकले. पण चुलणीपिता स्थिर राहिला. त्या देवाने चुलणीपित्याच्या दुसऱ्या व तिसऱ्या मुलालाही मारून त्यांचे मांसही तसेच फेकले, आणि तो म्हणाला, "हे चुलणीपित्या, जर तू व्रत न सोडशील, तर तुझ्या पुत्राप्रमाणेच तुझ्या आईलाही तुझ्यासमोर मारीन." तेव्हा चुलणीपित्याच्या मनात असा विचार आला की, हा दुष्ट माझ्या जननीलाही मजसमोर मारू पाहतो, याला मी पकडावे हे बरे. असा विचार करून तो उठला; पण देव आकाशात उडाला, आणि चुलणीपित्याच्या हाती खांब आला ! त्याने जो मोठा शब्द केला, तो ऐकून त्याची आई भद्रा तिकडे आली आणि म्हणाली, "पुत्रा, तू मोठ्याने ओरडलास ?" चुलणीपित्याने घडलेले सर्व वर्तमान तिला सांगितले; तेव्हा ती म्हणाली, "तुझे पुत्र खुशाल आहेत. पण तुझ्याकडून (त्या देवाला पकडण्याची बुद्धि झाल्यामुळे) व्रतभंग झाला आहे. यास्तव आलोचना करून दण्ड ग्रहण कर." त्याप्रमाणे सर्व विधी करून कामदेवा-सारखाच तोही स्वर्गवासी झाला.

## सुरादेव उपासक

चवथा उपासक सुरादेव, वाराणसीचा राहणारा. त्याजपाशी सहाकोटी सोन्याची नाणी गाडलेली, सहा कोटी व्यापारात व सहाकोटी प्रविस्तरात लावलेली, आणि ६० हजार गाई होत्या. चुलणीपित्याच्या मुलांप्रमाणेच एका देवाने त्याच्या ज्येष्ठ पुत्राला त्याच्यासमोर ठार मारले, आणि त्यावर सोळा भयंकर रोग घालण्याचे भय दाखवू लागला. तेव्हा त्याच्या मनातही चुलणीपित्यासारखाच विचार आला, आणि तो त्या देवाला पकडण्याला धावला; पण तो देव आकाशात उडाला, आणि याच्या हाती खांब आला ! त्याच्या आरडाओरडीमुळे त्याची पत्नी धन्या तिकडे आली, आणि तिने त्याची समजूत घातली व व्रतभंगाबद्दल दण्ड (प्रायश्चित्त) ग्रहण करण्यास सांगितले. सगळी व्रते आचरून हादेखील इतर उपासकांप्रमाणे स्वर्गवासी झाला.

## चुल्लशतक उपासक

पांचवा उपासक चुल्लशतक, आलभिका नगरीत राहणारा. त्याच्या-जवळ एकंदर १८ कोटी सोन्याची नाणी व ६० हजार गाई होत्या. बाकी सर्व मजकूर आनन्द व कामदेव यांच्या सारखाच. विशेष तेवढा येथे देतो. एक देव येऊन त्याला म्हणाला की, तुझी सारी संपत्ती जिकडे तिकडे फेकून उध्वस्त करतो. तेव्हा चुल्लशतकाच्या मनात चुलणीपित्यासारखाच विचार आला, आणि त्या देवाला पकडण्याला तो धांवला. देव निघून गेला व ह्याच्या हाती खांब आला. ह्याच्या आरडाओरडीने ह्याची पत्नी बहुला तिकडे आली, आणि तिने याला सावध करून प्रायश्चित्त करावयास लावले. तोही इतर उपासकांप्रमाणे स्वर्गाला गेला.

## कुण्डकोलिक उपासक

सहावा उपासक कुण्डकोलिक, कांपिल्यपुर नगरात राहणारा. पुष्पा नांवाची त्याची पत्नी. त्याजपाशी एकंदरीत १८ कोटी सोन्याची नाणी व ६० हजार गाई होत्या. तो एकदा अशोकवन नांवाच्या उद्यानात व्रताचरण करीत होता. ह्या प्रसंगी एक देव येऊन त्याला म्हणाला, " हे देवानुप्रिय, गोशाल मंखलि पुत्राचा धर्म उत्तम आहे. त्यांत उत्थान बल, कर्म, पुरुष पराक्रम नाही. भगवान् महावीर स्वामीचा धर्म खोटा आहे." कुण्डकोलिक म्हणाला, " जर उत्थान वगैरे नाही आणि भगवान् महावीर स्वामीचा धर्म खोटा, तर तूं ऋद्धि कशी मिळविलीस ? " देव—" मी ही ऋद्धि उत्थाना-दिकावाचूनच मिळविली. " कुण्डकोलिक—" हे तुझे म्हणणे मिथ्या आहे. " ते ऐकून तो देव निरुत्तर झाला आणि निघून गेला.

हे वर्तमान महावीर स्वामीला समजले, तेव्हा त्याने कुण्डकोलिकाचे अभिनन्दन केले. कुण्डकोलिक देखील स्वर्गाला गेला.

## शब्दालपुत्र उपासक

सातवा उपासक शब्दालपुत्र, पोलासपुर नगरांत राहणारा कुंभार. तो पूर्वी आजीवक उपासक होता, त्याजपाशी एकंदरीत तीन कोटी सोन्याची नाणी व दहा हजार गाई होत्या. त्याच्या बायकोचे नांव अग्निमित्रा. त्याचे

भाण्डयांचे पांच कारखाने असून त्यांत पुष्कळ माणसे काम करीत. तो एकदा अशोकवन नांवाच्या उद्यानांत जाऊन आजीवक मताप्रमाणे व्रत पाळीत होता. त्या प्रसंगी एक देव तेथे येऊन त्याला म्हणाला, "हे देवानुप्रिय, येथे उद्या एक दयावान् महापुरुष येणार आहे. तो जिन असून त्रिलोकपूज्य आहे. यास्तव तू त्याला नमस्कार करून त्याची सेवा कर."

शब्दालपुत्र म्हणाला, "दयावान् जिन त्रिलोक्यपूज्य माझा धर्माचार्य गोसाल मंखलिपुत्रच आहे. त्याला मी वंदन करीन आणि त्याची सेवा करीन."

दुसऱ्या दिवशी महावीरस्वामी तिकडे आला. त्याच्या भेटीला पुष्कळ लोक गेले. ते वर्तमान ऐकून शब्दालपुत्र देखील त्याच्या भेटीला गेला, आणि त्याला प्रदक्षिणा व वंदन करून त्याची भक्ती करता झाला. तेव्हा महावीरस्वामीने त्याला म्हटले की, काल देवाने जे तुला सांगितले, ते गोशालाला उद्देशून मुळीच नव्हते. ते ऐकून शब्दालपुत्राने आपल्या कारखान्यात राहण्यासाठी महावीरस्वामीला निमंत्रण दिले, व त्याप्रमाणे महावीरस्वामी या ठिकाणी जाऊन राहिला. तेथे मातीची भांडी सुकविण्याचे काम चालू होते. तेव्हा महावीरस्वामी शब्दालपुत्राला म्हणाला, "हे शब्दालपुत्र, ही सारी भांडी प्रयत्नावांचून झाली आहेत काय?" शब्दालपुत्र–"ही प्रयत्नाने झाली नाहीत. जे काही होते ते नियतच असते. त्याला प्रयत्नाची जरूरी नाही." महावीरस्वामी–"जर कोणी ही भांडी फोडली किंवा कोणी अग्निमित्रेशी सहवास करू लागला, तर तू काय करशील?" शब्दालपुत्र "त्याला मी शाप देईन, त्याच्यावर प्रहार करीन, त्याला ठार मारीन." महावीरस्वामी––"तर मग सर्व काही नियतीने घडते हे तुझे म्हणणे मिथ्या आहे." ते ऐकून शब्दालपुत्राला सम्यक् ज्ञान प्राप्त झाले, आणि त्याने महावीर स्वामीपाशी गृहस्थधर्म स्वीकारला. त्याच्या सांगण्यावरून अग्निमित्राही निर्गन्थ उपासिका झाली. तदनंतर महावीरस्वामी तेथून दुसरीकडे गेला.

शब्दालपुत्र महावीरस्वामीचा उपासक झाला हे वर्तमान गोशालाने ऐकले, आणि तो आपल्या शिष्यांसह पोलासपुराला आला. शब्दालपुत्राने त्याला नमस्कार केला नाही किंवा त्याचा आदरसत्कार केला नाही, आणि

महावीरस्वामीची सविस्तर स्तुती केली,[१] व तो गोशालाला म्हणाला, "तूं माझ्या धर्माचार्याबरोबर (महावीरस्वामी बरोबर) वाद करू शकशील काय ?" गोशाल--"नाही, जसा एखादा जवान एखाद्या बकऱ्याला किंवा मेंढ्याला घट्ट पकडील, तसा भगवान् महावीर मला वादात पकडील, म्हणून मी त्याच्याशी वाद करण्यास समर्थ नाही." शब्दालपुत्र-- "हे देवानुप्रिय, तू माझ्या गुरूची योग्य स्तुती केलीस, यास्तव तुला राहण्यास मी जागा देतो." त्याप्रमाणे गोशाल शब्दालपुत्राच्या कारखान्यात राहिला, आणि त्याने शब्दालपुत्राला परत आपल्या संप्रदायांत घेण्यासाठी बराच प्रयत्न केला; पण तो सफल झाला नाही. तेव्हा गोशाल तेथून निघून गेला.

याप्रमाणे वागत असता शब्दालपुत्राची चवदा वर्षें व्यतीत झाली. पंधराव्या वर्षाच्या मध्याला एका देवाने येऊन त्याच्यासमोर त्याच्या तीन पुत्रांना एकामागून एकाला ठार केले व त्यांचे भाजलेले मांस त्याच्या अंगावर टाकले. आणि तो देव अग्निमित्रेला मारण्यास उद्युक्त झाला. तेव्हा शब्दालपुत्र त्याच्या अंगावर धांवला. पण तो देव आकाशात उडाला व याच्या हाती खांब आला. ह्याने केलेली आरडाओरड ऐकून अग्निमित्रा तिकडे आली, आणि मुलगे सुखरूप असल्याचे सांगून याच्या कुविचारांबद्दल याला तिने प्रायश्चित्त करावयास लावले. (ही व यापुढची सर्व कथा चुलणीपित्याच्या कथेसारखीच समजावी.)

### महाशतक उपासक

आठवा उपासक महाशतक, राजगृह नगरात राहणारा. त्याजपाशी एकंदरीत २४ कोटी सोन्याची नाणी व ८० हजार गाई होत्या. त्याला तेरा बायका, त्यांत रेवती प्रमुख होती. रेवतीजवळ आठ कोटी सोन्याची नाणी व ८० हजार गाई होत्या. बाकी बारा पत्नींपाशी एक एक कोट सोन्याची नाणी व दहा दहा हजार गाई होत्या. आनन्द उपासकाप्रमाणेच महाशतकही महावीर स्वामीचा उपासक झाला. त्याने आपण तेरा बायकां-

---

१. मज्झिमनिकायात उपालीसुत्त आहे. त्यात उपालि निर्गन्थसंप्रदाय सोडून बुद्धोपासक होतो, आणि महावीरस्वामी त्याच्या घरी आल्यावर त्याच्याशी असेच वर्तन करतो व बुद्धाची फार स्तुती करतो. हे साम्य लक्ष्यात ठेवण्याजोगे आहे.

खेरीज इतर स्त्रीशी संग करणार नाही व रोज ६८ शेर सोन्याचाच व्यवहार करीन अशी व्रते घेतली. बाकी सर्व व्रते आनन्दउपासकासारखीच जाणावी.

रेवतीने आपल्या सवतींपैकी सहांना शस्त्रप्रयोगाने व सहांना विष-प्रयोगाने ठार करून त्यांची सर्व संपत्ती आपण घेतली; आणि ती यथेच्छ मद्य व मांस सेवन करू लागली. काही काळाने राजगृह नगरात प्राणिवध बंद करण्यात आला. तेव्हा तिने, आपल्या कळपांतील रोज दोन गाईंचे पाडे (गोणपोयए) मारून त्यांचे मांस तयार करण्यास हुकूम दिला. त्याप्रमाणे तिचे नोकर तिला रोज दोन पाड्यांचे मांस देत असत. ते खाऊन आणि दारू पिऊन ती राहत होती.

उपासकत्वाला १४ वर्षे झाल्यावर महाशतक आपल्या ज्येष्ठ पुत्राच्या स्वाधीन सर्व संपत्ती करून पोषधशाळेत जाऊन राहिला. त्याला उपभोगांकडे वळविण्याचा रेवतीने पुष्कळ प्रयत्न केला; पण तो सिद्धीस गेला नाही. पुनः एकदा रेवतीने तसाच प्रयत्न केला. तेव्हा महाशतक तिला म्हणाला, "तूं सातव्या रात्री अलसक रोगाने मरशील व नरकात पडशील." आपणावर तो रागावला असे जाणून रेवती घरी गेली, आणि सातव्या रात्री मरण पावून नरकात पडली. हे वर्तमान महावीरस्वामीला समजले, तेव्हा त्याने आपल्या गौतम नांवाच्या शिष्याला पाठवून महाशतकाला कटुवचन बोलल्याबद्दल प्रायश्चित्त करावयास लावले. अन्ती महाशतकाने एक महिना उपास करून प्राण सोडला, व तो स्वर्गाला गेला.

## नन्दिनीपिता उपासक

नववा उपासक श्रावस्ती नगरीत राहणारा नन्दिनीपिता नांवाचा गृहपती. त्याजपाशी एकंदर १२ कोटी सोन्याची नाणी व ४० हजार गाई होत्या. अश्विनी नांवाची त्याची पत्नी. त्याची बहुतेक कथा आनन्द उपासका-सारखी.

## सालिहीपिता उपासक

दहावा उपासक श्रावस्ती नगरीत राहणारा सालिहीपिता. त्याज-पाशी एकंदर १२ कोटी सोन्याची नाणी आणि ४० हजार गाई होत्या. त्याच्या पत्नीचे नाव फल्गुनी. त्याला काही उपसर्ग न होता वीस वर्षे

कामदेवाप्रमाणेच सर्व आचरण करून तो स्वर्गाला गेला. ह्या दहाही उपासकांनी २० वर्षे श्रमणोपासना केली.

## श्रमणांची श्रीमन्त वर्गावर मदार

राजांच्या मागोमाग श्रीमंत सावकारांना खूष करण्याचा प्रयत्न जैन साधूंनी कसा केला, हे वरील कथांवरून स्पष्ट होते. अनाथपिण्डिक वगैरे बुद्धाचे उपासक आणि विशाखा वगैरे उपासिका मध्यम वर्गातील होत्या. त्यांना फार श्रीमंत ठरविण्याचा प्रयत्न विनयपिटकांत केल्याचे दिसून येते. त्याचेच अनुकरण ह्या कथांत केले आहे. महावीरस्वामीच्या हयातीत इतके श्रीमंत लोक होते हे संभवतच नाही. बिचाऱ्या शब्दालपुत्र ( सद्दालपुत्त ) कुंभाराला देखील या जैन साधूंनी कोट्यधीश बनविले ! खरे पुसाल तर त्यावेळी जैन साधु काय की बौद्ध भिक्षु काय, कुंभार लोहार इत्यादिक श्रमजीवी वर्गाशीच जास्त संबंध ठेवीत असत. मज्झिमनिकायांतील घटिकारसुत्तांत काश्यप बुद्धाचा आणि घटिकार कुंभाराचा किती परिचय होता याचे वर्णन आहे. घटिकार घरी नसताही काश्यप बुद्ध त्याच्या कुटीत जाऊन त्याच्या भांड्यांतून अन्न घेऊन जेवीत असे. गौतम बुद्धाने परिनिर्वाणापूर्वी चुन्द लोहाराचे अन्नदान घेतल्याची कथा सुप्रसिद्ध आहे. असे असता जैन साधूंनी सगळ्या जैन उपासकांना अत्यंत श्रीमन्तांच्या कोटीत नेऊन ठेवले. याचा अर्थ असा की, सामान्य जनतेशी त्यांचा संबंध सुटला; श्रीमंतांवाचून जैन संप्रदाय चालू राहणे अशक्य झाले.

इ. सनाच्या ११ व्या शतकाच्या सुमारास बौद्ध भिक्षूंची देखील अशीच स्थिती झाली असावी. इ. स. १०२६ मध्ये स्थिरपाल व वसंतपाल या दोन श्रीमंत बंधूंनी सारनाथ येथील सर्व बौद्ध इमारतींची डागडुजी केल्याचा उल्लेख तेथील एका शिलालेखात आहे.[१] बुद्ध आणि महावीर स्वामी यांच्या वेळी श्रमणांची सर्व मदार सामान्य जनतेवर असे. सामान्य लोकांकडूनच त्यांना भिक्षा मिळे. एखादा मध्यम वर्गीय अनाथपिण्डिकासारखा गृहस्थ अथवा विशाखेसारखी उपासिका त्यांच्यासाठी विहार किंवा उपाश्रय

---

१. Guide to the Buddhist Ruins of Sarnath, " by Rai Bahadur Daya Ram Sahani पहा.

बांधी, व त्यांच्या राहण्याची व्यवस्था करी. राजे लोक त्यांचा आदर करीत व आपल्या राज्यांत राहण्यास त्यांना मोकळीक देत; पण राजांशी ते श्रमण विशेष परिचय ठेवीत नसत. पण अशोकापासून हा मनु पालटला. राजांशिवाय आणि श्रीमंतांशिवाय विहार, उपाश्रय आणि मंदिरे बांधणे आणि चालू ठेवणे अशक्य होत गेले, आणि या वर्गाला खूष ठेवण्यासाठी श्रमणांना चातुर्यामधर्माला तिलांजली द्यावी लागली.

राजा म्हटला म्हणजे तो हिंसकच असावयाचा. बहुधा तो आपल्या भाऊबंदाना व कधी कधीं आपल्या बापालाच मारून गादीवर येई, व त्यानंतर वारंवार लढाया करून आपल्या राज्याचे रक्षण किंवा विस्तार करी. त्याने या श्रमणांना आश्रय दिल्यावर हिंसेबद्दल यांना ब्र काढणे शक्यच नव्हते. त्याला खूष ठेवण्यासाठी हे श्रमण वाटेल त्या दंतकथा रचीत; म्हणजे सत्याचा याम किंवा महाव्रत साफ सोडून देत. ज्याने सत्य सोडले तो कोणते पाप करणार नाही ? चूलराहुलोवाद सुत्तांत[१] भगवान् बुद्ध राहुलाला म्हणतो,

"एवमेव खो राहुल यस्स कस्सचि सम्पजान मुसावादे नत्थि लज्जा, नाहं तस्स किञ्चि पापं कम्मं अकरणीयं तिवदामि।" (त्याचप्रमाणे, हे राहुल, ज्या कोणाला जाणून बुजून खोटे बोलण्यास लाज वाटत नाही, त्याला कोणतेही पाप अकर्तव्य नाही असे मी म्हणतो.)"

जैनांच्या पंच महाव्रतांपैकी हे एक व्रत. त्याचा आपण भंग करीत आहो, हे विलक्षण कल्पित कथा रचणाऱ्या जैन साधूंच्या ध्यानात कसे आले नाही याचे आश्चर्य वाटते ! अथवा यात आश्चर्य कसलें ? एकदा संप्रदाय बनला आणि त्याचा परिग्रह झाला, म्हणजे त्याच्या रक्षणासाठी कोणतेही पाप क्षम्य वाटावयास लागते. सगळ्या संप्रदायांचा हाच इतिहास आहे.

प्रथमतः बौद्ध भिक्षूंनी अशा दन्तकथा रचण्यास सुरुवात केली, आणि त्या लोकप्रिय होतात असे पाहून जैन साधूंनी बौद्ध भिक्षूंवर त्यांच्याहीपेक्षा अतिशयोक्तीने भरलेल्या कथा रचून मात केली. तुम्ही

---

१. या सुत्ताचा उल्लेख अशोकाने भाब्रूशिला लेखात केला आहे. 'भगवान बुद्ध' उत्तरार्ध तिसरे परिशिष्ट पहा.

म्हणता की, दीपंकरबुद्धाची उंची ८० हात व आयुष्य एक लक्ष वर्षे होते, तर आम्ही म्हणतो की, आमच्या ऋषभदेवाची उंची दोन हजार हात व आयुष्य ८४ लक्ष पूर्व म्हणजे ७० लक्ष ५६ हजार कोटी वर्षे ! मग तुमचा दीपंकर बुद्ध श्रेष्ठ की आमचा ऋषभदेव श्रेष्ठ ? बोला ! बौद्ध भिक्षूंनी उंच्यात आणि आयुष्यात बायकांचीही भर घातली. काल्पनिक बुद्धाची गोष्ट राहू द्या, खुद्द गौतमबुद्धाला गृहस्थाश्रमात असताना ४० हजार बायका होत्या असे त्यांनी लिहिले. सगळ्या कपिलवस्तूची एवढी लोकसंख्या नसावी हे त्यांच्या ध्यानीमनी आले नाही. जैन साधूंनी बायका चक्रवर्तीसाठी राखून ठेवल्या. श्वेताम्बरांच्या मते चक्रवर्तींना एक लक्ष ब्याण्णव हजार बायका असत.[1] पण दिगम्बरांच्या मते त्या अवघ्या ९६ हजारच असत.[2] कदाचित् दिगम्बर जैन साधूंवर मात करण्याचा हा श्वेताम्बर साधूंचा प्रयत्न असेल ! अशा ह्या गप्पात चातुर्याम-धर्म बुडून लुप्त झाला असल्यास आश्चर्य कोणते !

ह्या श्रीमंत वर्गाला खूष ठेवण्यासाठी जैन साधूंनी आणि बौद्ध भिक्षूंनी प्राकृत आणि पालि भाषेचा त्याग करून संस्कृत भाषा अंगीकारली; त्या भाषेत पुराणे, काव्ये आणि दर्शने रचली. पण एवढेही करून त्यांच्या संप्रदायांची अभिवृद्धि झाली नाही. का की, सामान्य जनतेचा त्यांना पाठिंबा राहिला नाही. जैन साधूंनी आपल्या संघांत देखील जातिभेद स्वीकारल्यामुळे[3] तो संप्रदाय काही वरिष्ठ जातीच्या—विशेषतः वैश्य जातीच्या—साहायाने कसाबसा अस्तित्वात राहिला. बौद्ध भिक्षूंनी शेवट-पर्यंत आपल्या संघात जातिभेद आणला नाही. तसे करता येणे त्यांना शक्य नव्हते. का की, बौद्ध धर्म जातिभेद नसलेल्या देशात पूर्वीच फैला-वला होता. तेव्हा इकडे जातिभेदाचे बंड वाढत गेल्यावर त्यांना हा देश सोडून जावे लागले हे योग्यच झाले.

बप्पभट्टीच्या जन्मापूर्वी ३१ व्या वर्षी म्हणजे इ. स. ७१२ साली महम्मद इब्न कासीम याने सिंध देश काबीज केला; आणि तेव्हापासून

१. हिंदी संस्कृति आणि अहिंसा, वि. २।११६ पहा.

२. तिलोयपण्णत्ती, वि. ४।१३७२–७३.

३. भगवान बुद्ध, उत्तरार्ध पृ. ९१–९३ पहा.

मुसलमानांचे पाऊल ह्या देशात पुढेच पडत गेले. पण बप्पभट्टीसारखे राजाश्रयात दंग होऊन गेलेले. सगळ्या हिंदु समाजावर ओढवणाऱ्या ह्या संकटाचा विचार करण्यास त्यांस सवड कशी मिळावी? हेमचन्द्रसूरीचा काल ह्याहीपेक्षा जास्त आणीबाणीचा होता. त्याच्या जन्मापूर्वी सरासरी ४८ व्या वर्षी महंमूद गझनीने सोमनाथाचे मंदिर लुटले. त्याच्या स्वाऱ्यांनी सर्वत्र हाहाःकार माजून राहिला होता. हेमचन्द्रसूरीच्या कालातही मुसलमानांची आक्रमणे बंद पडली होती असे नव्हे. पण त्यांची आमच्या सूरींना काय काळजी? कांही मंदिरे बांधण्यात आली व काही ग्रन्थ लिहिण्यात आले. मग झाला की नाही जैन शासनाचा विजय?

### धर्मकीर्तीचे दोन श्लोक

धर्मकीर्ति आपल्या प्रमाणवार्तिकात म्हणतो–

**वेदप्रामाण्यं कस्यचित्कर्तृवादः स्नाने धर्मेच्छा जातिवादावलेपः।**
**सन्तापारम्भः पापहानायचेति ध्वस्तप्रज्ञानां पञ्चलिङ्गानि जाड्ये[1]॥**

(ज्यांची प्रज्ञा ध्वस्त झाली आहे, त्यांपैकी कोणी वेदप्रामाण्य, कोणी जगत्कर्तृत्वाद, कोणी स्नानात धर्मबुद्धि, कोणी जातीचा गर्व, तर कोणी पापक्षालनासाठी देहदण्डन घेऊन बसतो. त्यांच्या जडतेची ही पाच चिन्हे आहेत.)

हे पाच प्रकार धर्मकीर्तीच्या वेळी म्हणजे इ. सनाच्या ७ व्या शतकाच्या आरंभी अस्तित्वात होते. त्या सर्वांत जातिवाद अत्यंत बळावत चालला होता. पण तो मोडण्याचा प्रयत्न ह्या श्रमणांनी केला नाही.

दुसरा एक श्लोक श्रीधरदासाने सदुक्तिकर्णामृतात धर्मकीर्तीचा म्हणून उद्धृत केला आहे,[2] तो असा–

**शैलैर्बन्धयति स्म वानरहृतैर्वाल्मीकिरम्भोनिधिं**
**व्यासः पार्थशरैस्तथापि न तयोरत्युक्तिरुद्भाव्यते।**

---

१. प्रमाणवार्तिक, राहुल सांकृत्यायन यांचे संस्करण, The Journal of the Bihar and Orissa Research Society, Vol. XXIV, 1938, Parts I. II.

२. Punjab Sanskrit Book Depot (Lahore) संस्करण, पृ. ३२७.

वागर्थौ तु तुलाधृताविव तथाप्यस्मत्प्रबन्धानयं
लोको दूषयितुं प्रसारितमुखस्तुभ्यं प्रतिष्ठे नमः ॥

वानरांनी आणलेल्या पर्वतांनी वाल्मीकीने आणि अर्जुनाच्या बाणांनी व्यासाने समुद्रावर सेतु बांधला; असे असता त्यांच्या अतिशयोक्तीवर कोणी टीका करीत नाही. पण माझ्या प्रबंधात शब्द आणि अर्थ जणू काय तोलून घातलेले असताही त्यांची निंदा करण्यास ह्या लोकांनी तोंड उघडलेलेच असते ! बाई प्रतिष्ठे, तुला नमस्कार असो !

वाल्मीकीने आणि व्यासाने वाटेल तेवढ्या अत्युक्ति किंवा अतिशयोक्ति केल्या असल्या, तरी त्यांच्याविरुद्ध कोणी ब्र काढीत नसे. कारण राजेरजवाड्यांत व श्रीमंत लोकांत ते ऋषि समजले जात, आणि त्यांच्याविरुद्ध बोलल्याने विद्वानांची प्रतिष्ठा नष्ट होण्याचा संभव होता. पण तरुण धर्मकीर्तीवर टीका केल्याने प्रतिष्ठा वाढत होती. 'काय म्हणे वार्तिक लिहितो. लेक न्याय शिकला कधी ? पण झाला ग्रन्थकार.' अशी टीका केल्याने पण्डितांचा मान वाढत असे. तेव्हा धर्मकीर्ति म्हणतो की, प्रतिष्ठे तुला नमस्कार असो; तूं खोट्याचे खरे व खऱ्याचे खोटे करण्यास समर्थ आहेस.

सर्व काली असा प्रकार असावयाचाच. राजेरजवाड्यात ज्या गोष्टींची चहा होत असे तिला 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायाने लोक मानीत. मुसलमानांच्या कारकिर्दीत पडद्याची प्रथा जशी फैलावली, तशीच गुप्तांच्या कारकिर्दीत रामायण आणि महाभारत ही काव्ये फैलावली. पण त्यांचा जोर प्रमाणवार्तिकासारखे बहुजनसमाजाला न समजणारे ग्रन्थ लिहून कमी करता येणे शक्य नव्हते. बौद्धांच्या जातकासारख्या कथा जर लोकांना प्रिय झाल्या, तर ही काव्ये का प्रिय होऊ नयेत ? ज्या महायान संप्रदायाचा धर्मकीर्ति होता, त्या संप्रदायाने तर हजारो बोधिसत्वांची आणि देवदेवतांची कल्पना करून असत्यकथांत कितीतरी भर घातली ! तेव्हा,

न परेसं विलोमानि न परेसं कताकतं ।
अत्तनो व अवेक्खेय्य कतानि अकतानिच[1] ॥

---

१. धम्मपद ५०.

(इतरांच्या न्यूनता आणि इतरांचे करणे आणि न करणे याचा विचार न करतां आपल्याच कार्यांचा आणि अकार्यांचा विचार करावा.)

ह्या न्यायाने धर्मकीर्तीने प्रथमतः आपलाच संप्रदाय सुधारण्याच्या प्रयत्नास लागावयास पाहिजे होते. ते काम न्यायशास्त्रावर उत्कृष्ट ग्रन्थ लिहून होणे शक्यच नव्हते. प्रतिष्ठेला बाजूला सारून पुनः एकदा, पार्श्वनाथा-प्रमाणे आणि बुद्धाप्रमाणे सरळ सामान्य जनतेकडे वळून त्यांना सत्याचे शिक्षण द्यावयास पाहिजे होते. अर्थात् ते काम संस्कृतात न करता सामान्य भाषेतच करावयास पाहिजे होते. पण धर्मकीर्ति काय की इतर श्रमण आणि ब्राह्मण काय, सारेच संप्रदायात गुरफटलेले. ते बहुजनांच्या हिताचा प्रयत्न कसा करू शकतील?

ब्राह्मणांचा तर जातिवादावलेप इतका जाड झालेला की त्यांच्यांतून त्यांना लोकहित दिसणेच शक्य नव्हते. राजाला जे आवडेल ते करून आपले आणि आपल्या जातीचे वर्चस्व राखता आले कीं त्यांना धन्य वाटे. अशा परिस्थितीत,

> राजा विलुम्पते रट्ठं ब्राह्मणोच पुरोहितो ।
> अत्तगुत्ता विहरत जातं सरणतो भयं ॥

(राजा आणि पुरोहित ब्राह्मण राष्ट्र लुटीत आहेत. तेव्हा आता स्वतःवरच अवलंबून रहा. ज्याला तुम्ही शरण समजता त्यापासूनच भय उत्पन्न झाले आहे.)

अशाप्रकारे पदकुसल जातकांतील बोधिसत्वाप्रमाणे लोकांना जागृत करणारा सत्पुरुष निपजावा कसा? श्रमण काय की ब्राह्मण काय सर्वच राजाच्या लुटीत सामील झालेले, आणि इतर जनता अज्ञानांत बुडालेली, मग लोकोद्धार करणार कोण? सर्व समाज मेंढपाळ नसलेल्या मेंढरांच्या कळपाप्रमाणे विसरून गेला, आणि मुसलमानांच्या स्वाऱ्यांच्या भक्षस्थानी पडला.

## बायबलांतील दहा परमेश्वरी आज्ञा

आता श्रमण ब्राह्मणांना सोडून बायबलात चातुर्यामासंबंधी काय माहिती मिळते याजकडे वळू. आमच्या सध्याच्या राज्यकर्त्यांचा हा पवित्र

ग्रंथ आहे आणि त्याचा पाश्चात्य संस्कृतीवरच नव्हे तर इस्लामी धर्मावर देखील विलक्षण प्रभाव पडला आहे. त्या ग्रंथात परमेश्वराने मूसाला (मोझेसला) दिलेल्या १० आज्ञांचे फार महत्त्व समजले जाते. सिनाई पर्वताच्या मस्तकावर परमेश्वर ( यहोवा ) मूसाला म्हणतो–

( १ ) मला सोडून दुसऱ्या देवांची पूजा करू नकोस.

( २ ) कोणत्याही प्रकारची मूर्ती किंवा प्रतिमा करू नकोस. आणि त्यांना पुजू नकोस.

( ३ ) आपल्या परमेश्वराचे नांव व्यर्थ घेऊ नकोस.

( ४ ) विश्राम करण्याचा दिवस पवित्र ठेव.

( ५ ) आईबापांचा मान ठेव.

( ६ ) हत्या करू नकोस.

( ७ ) व्यभिचार करू नकोस.

( ८ ) चोरी करू नकोस.

( ९ ) खोटी साक्ष देऊ नकोस.

(१०) परकीय वस्तूचा लोभ धरू नकोस. ( Exodus : निर्गमन ३–१७ )

ह्या दहा आज्ञांत पहिल्या तीन परमेश्वरासंबंधी आहेत, चवथी दर सातव्या दिवशी सुटी पाळण्यासंबंधाने व पांचवी आईबापांचा मान ठेवण्यासंबंधी आहे. बाकी पाचात काही अंशी चार याम किंवा पंच महाव्रते येतात. सहाव्या आज्ञेत अहिंसा, सातवीत गृहस्थ ब्रह्मचर्य, आठवीत अस्तेय, नववीत सत्य आणि दहावीत अंशतः अपरिग्रह आला आहे. परंतु जुन्या करारांत ह्या आज्ञांचा अर्थ निराळाच समजला जात असे. तो कसा हे खालील विवेचनावरून दिसून येईल.

## मोझेसचे पूर्वचरित्र

जेकबचा धाकटा मुलगा जोजेफ ( युसूफ ) सतरा वर्षांचा असता त्याला त्याच्या सावत्र भावांनी जंगलात बांधून ठेवले, आणि इजिप्ताला जाणाऱ्या इस्मायली व्यापाऱ्यास विकले. त्यानी त्याला इजिप्ताच्या राजाच्या

(फेरोच्या) एका अधिकाऱ्यास विकले. त्या अधिकाऱ्याची त्याच्यावर फार मर्जी बसली. परंतु त्या अधिकाऱ्याच्या बायकोने त्याच्यावर खोटा आळ आणला, आणि त्यामुळे जोजेफला कैदेत घातले. त्याच जेलमध्ये फेरोच्या शागिर्दांचा सरदारही होता. त्याला एक स्वप्न पडले. जोजेफने त्या स्वप्नाचा अर्थ असा लावला की, फेरोची त्या सरदारावर पुनः मर्जी बसेल. ते भविष्य खरे ठरले, आणि सरदार पुनः राजवाड्यात काम करू लागला.

दोन वर्षानंतर राजाला एक स्वप्न पडले की, आपण नदीच्या किनाऱ्यावर उभा असताना नदीतून चांगल्या लठ्ठ सात गाई निघाल्या, व कुरणात चरू लागल्या; इतक्यात त्यांच्या मागोमाग रोडक्या सात गाई निघाल्या व त्यांनी त्या लठ्ठ गायांना खाऊन टाकले. ते स्वप्न पाहून राजा जागा झाला. पुनः झोपल्यावर त्याला दुसरे स्वप्न पडले की, धान्याच्या एका रोप्याला एकदम चांगली सात कणसे आली. आणि त्यांच्या मागोमाग दुसरी बारीक सात कणसे येऊन त्यांनी त्या लठ्ठ कणसांना खाऊन टाकले.

दुसऱ्या दिवशी राजाने आपल्या ज्योतिष्याना ह्या स्वप्नांचा अर्थ विचारला; पण त्यांना तो सांगता येईना. तेव्हा त्याच्या शागिर्दांच्या सरदाराला जोजेफची आठवण झाली, आणि त्याने राजाला सर्व वर्तमान निवेदित केले. राजाने तावडतोब जोजेफला आणवून या स्वप्नांचा अर्थ विचारला. जोजेफ म्हणाला, "या स्वप्नाचा अर्थ असा की, सात वर्षे सुबत्तेची येणार आणि त्यांच्या मागोमाग सात वर्षे दुष्काळाची येऊन सर्व सुबत्ता खाऊन टाकणार. तेव्हा आतापासूनच सावध रहावे."

राजाने सुबत्तेच्या काळी धान्य गोळा करण्यासाठी व त्यानंतर दुष्काळात ते विकण्यासाठी जोजेफलाच सर्वाधिकारी नेमले. त्याचा बाप व भाऊ कनानमध्ये रहात होते. तेथेही भयंकर दुष्काळ पडल्यामुळे जेकबने धान्य आणण्यासाठी आपल्या मुलांना इजिप्तला पाठविले. जोजेफने त्यांना आपली ओळख न देता यथास्थित धान्य दिले व धान्याचे पैसेही त्यांच्याच गोणांत घालून ठेवले. पण जेव्हा ते पुनः धान्य खरीदण्यास आले, तेव्हा त्याने आपली सर्व ओळख दिली आणि आपल्या गणगोतास

इजिप्तला आणावयास लावले. फेरोने त्यांना चांगली जमीन इनाम दिली. तेव्हापासून इजिप्तमध्ये यहुदी लोकांची संख्या एकसारखी वाढत गेली.

दीडशे वर्षानंतर म्हणजे इसवीसनापूर्वी १६ व्या शतकात दुसरा एक फेरो गादीवर आला. यहुदी लोकांची अभिवृद्धि त्याला आवडली नाही, आणि त्यांना गुलाम बनवून त्याने भारी कामाला लावले. तरी त्यांची संख्या एकसारखी वाढतच होती. तेव्हा यहुदी दायांना त्याने असा हुकूम केला की, यहुदी स्त्रीला मुलगा झाला, तर त्याला ताबडतोब मारावे. यहुदी जातीच्या लेवी गोत्रातील एका स्त्रीला मुलगा झाला. त्याला फार दिवस लपवून ठेवणे शक्य नव्हते; म्हणून तिने एका पेटाऱ्याला चिकणी माती व राळ सारवून त्या तीन महिन्याच्या बालकाला त्यात घालून तो पेटारा नील नदीच्या कांठी लव्हाळ्यात ठेवला. तिची मुलगी आपल्या भावाची काय वाट होते हे दुरून पाहत होती. इतक्यात राजकन्या तेथे स्नाना-साठी आली. तिने तो पेटारा पाहिला, आणि आपल्या नोकरांकडून आणवून उघडविला. तो तरुण बालक रडू लागला. तिला दया आली आणि ती म्हणाली, "हा यहुदी बालक असावा." तेव्हा त्याची बहीण राजकन्येला म्हणाली, "मी ह्याच्यासाठी एक दाई आणू काय?"

राजकन्येने त्या मुलीला दाई आणण्यासाठी पाठविले : ती आपल्या आईला घेऊन आली. राजकन्येने बालकाला तिच्या स्वाधीन केले आणि म्हणाली, "याला लागणारा सर्व खर्च मी देत जाईन." याप्रमाणे तो मुलगा आपल्या आईपाशीच वाढला. जेव्हा तो मोठा झाला, तेव्हा आईने त्याला राजकन्येच्या स्वाधीन केले. त्याला पाण्यातून बाहेर काढले म्हणून त्याचे नाव मोझेस (उद्धृत) ठेवण्यात आले व तो राजकन्येचा मुलगा झाला.

आपल्याच आईपाशी वाढल्यामुळे त्याला आपण कोण हे माहीत होते. मोठा झाल्यावर आपल्या जातभाईकडे जाऊन तो त्यांची दुर्दशा पाहात असे. एकदा एक मिश्री मनुष्य यहुदी माणसाला मारीत होता ते त्याने पाहिले आणि संतापून त्या मिश्री माणसाला एकान्तस्थळी मारून वाळूत लपविले. दुसऱ्या दिवशी दोन यहुदी आपसात भांडत असताना त्याने पाहिले. तो त्यांपैकी एकाला म्हणाला, "तू आपल्याच जातभाईला

का मारतोस ?" तो म्हणाला, "मला विचारणारा तू कोण ? तू मिश्री माणसाला मारले तसे मलाही मारणार आहेस काय ?" आपले कृत्य उघडकीला आले असे मोझेसने जाणले. फेरोला हे समजल्याबरोबर मोझेसला मारण्याचा त्याने बेत केला. पण मोझेस तेथून पळाला व मिद्यान प्रदेशात जेथ्रो ( चित्रो ) नावाच्या पुजाऱ्यापाशी राहिला. पुजाऱ्याने त्याला आपली मुलगी दिली, आणि तो पुजाऱ्याची मेंढरे राखून आपला उदरनिर्वाह करीत असे.

अशा स्थितीत मोझेसला यहोवाचा साक्षात्कार झाला, आणि आपल्या बांधवांना मुक्त करण्यासाठी तो इजिप्तला गेला. त्यावेळी पहिला राजा मरण पावला होता व त्याच्याजागी दुसरा फेरो राज्य करीत असे. मोझेस आपल्या लेवी गोत्रापैकी हारूनला बरोबर घेऊन सरळ राजापाशी गेला, आणि आपल्या लोकांना गुलामगिरीपासून मुक्त करण्याची त्याने मागणी केली. परंतु तो क्रूर राजा त्यांना सोडीना. तेव्हा यहोवाने मिश्री लोकांवर अनेक संकटे आणली. राजा घाबरून गेला आणि त्याने यहुदी लोकांना दुसरीकडे नेण्यास मोझेसला परवानगी दिली. मोझेस आपल्या लोकांना घेऊन कनानकडे चालला असता फेरोने पुनः त्यांना पकडून आणण्यासाठी सैन्य पाठविले. पण यहोवाने तांबडा समुद्र दुभंग करून यहुदी लोकांना वाट दिली, आणि त्यांच्या मागोमाग येणाऱ्या शत्रुसैन्याला तेथे पोचल्याबरोबर समुद्र मिटवून बुडविले. तेथून प्रवास करीत मोझेस व इतर यहुदी लोक सिनाई पर्वताजवळ आले. तेव्हा यहोवाने मोझेसला पर्वतशिखरावर बोलावून वर सांगितलेल्या १० आज्ञा दिल्या. त्यानंतर यहोवाने अनेक राजकीय, सामाजिक आणि धार्मिक नियम घालून दिले, आणि अखेरीस आपल्या बोटांनी लिहिलेल्या दोन पाट्या दिल्या. (Exodus 31, 18)

तिकडे मोझेस देवाचे नियम ऐकण्यात गुंतला असता इकडे लोकांनी आपली सोन्याची कुण्डले हारूनपाशी आणून दिली, आणि त्याने ती गाळून एक गाईचे वासरू बनविले व लोक त्याची पूजा करू लागले. ( ही पूजा इजिप्तमध्ये होती. ) मोझेस सिनाई पर्वतावरून खाली उतरला आणि हा प्रकार पाहून संतप्त झाला, व आपल्या लेवी गोत्राच्या लोकांना त्याने

इतरांवर तुटून पडण्यास हुकूम केला. त्यांनी तीन हजार लोकांची कत्तल केली (Exodus 32, 28).

## यहोवा देवाचा स्वभाव

यहोवा केवळ यहुदी लोकांचा देव. त्याला इतर लोकांविषयी दया-माया मुळीच नव्हती. यहुदी लोकांना इजिप्तमधून मुक्त करण्यासाठी त्याने जी अनेक संकटे मिश्री लोकांवर आणली त्यांतील शेवटचे हे की, त्यांची आणि त्यांच्या जनावरांची प्रथम अपत्ये मारून टाकली. तेव्हाच फेरोने यहुदींना निघून जाण्यास परवानगी दिली. (Exodus 12, 29) त्याने मोझेसच्या मार्फत सर्व यहुदी लोकांना सांगून ठेवले होते की, मिश्री लोकांकडून जे कांही सोने, रुपे आणि जवाहीर मिळण्याजोगे असेल तेवढे सारे उसने घेऊन ठेवा (Exodus 11, 2). त्याप्रमाणे ते घेऊन यहुदी इजिप्तमधून निघाले (Exodus 12, 35). त्याने जे नियम घालून दिले, त्यांत लहान सहान अपराध्यांना ठार मारण्याची शिक्षा सांगितली आहे. उदाहरणार्थ, जो यहोवाचे नांव व्यर्थ घेईल त्याला सर्वांनी दगड फेकून ठार मारण्याची शिक्षा (Levitaus 24, 14). त्याने मिद्यानमधील सर्व पुरुषांची व ज्या स्त्रियांनी पुरुषसंग केला असेल त्यांची कत्तल करण्यास सांगितले असता यहुदी सरदारांनी बायकांना जिवंत ठेवले, त्यामुळे रागावून यहुदी लोकांत प्लेग फैलावला. मग मोझेसने बायकांची कत्तल करावयास लावल्याने तो शान्त झाला. (Numbers 31, 15)

एकदा कोरा, दाथान, अबिराम, ओन आणि रूबेनचे मुलगे यांनी मोझेस विरुद्ध कुरकूर करण्यास सुरुवात केली; तेव्हा त्यांना यहोवाने पृथ्वी दुभंग करून तिच्या पोटांत गाडले, आणि त्यांच्या बरोबरच्या २५० लोकांना जाळून टाकले. (Numbers 16, 32, 35)

मोझेसच्या मरणानंतर जोशुआ (यहोशू) यहुदी लोकांचा पुढारी झाला. त्याच्याकडून तर यहोवाने अत्यंत भयंकर कृत्यें करविली. जोशुआने हजारो लोकांची कत्तल केली, अनेक शहरे साफ जाळली आणि कितीतरी राजांना फांशी दिले! त्याची ती कृत्ये वाचली म्हणजे कृष्णार्जुनांनी केलेल्या खांडववन दहनाची आठवण होते.

## हत्या करू नकोस इत्यादि आज्ञांचा अर्थ

यहोवा स्वतः जर हत्या करीत होता व भक्तांकडून करवीत होता, तर हत्या करू नकोस या आज्ञेचा अर्थ तरी कोणता? निरपराधी यहुदीची हत्या करू नकोस एवढाच त्याचा अर्थ. तुझ्या राज्यात निरपराध्याचा रक्तपात होऊ नये (Deuteronomy 19, 10) परंतु 'तुझ्या डोळ्यात करुणा येऊ देऊ नकोस; पण प्राणासाठी प्राण, डोळ्यासाठी डोळा, दातासाठी दात, हातासाठी हात आणि पायासाठी पाय जाऊ दे (Deuteronomy 19, 21)[1] खुद्द यहोवाला बळी द्यावयाचा असेल तर निरपराध्याची हत्या करण्यास हरकत नाही. उदाहरणार्थ, जेफ्याने आपल्या एकुलत्या एक मुलीला यहोवाला बळी दिले (Judges 11.34-39) खोटी साक्ष देऊ नकोस याचाही अर्थ असा की, एका यहुद्याने दुसऱ्या यहुद्याविरुद्ध खोटी साक्ष देऊ नये; परंतु दुसऱ्या राज्यात गुप्त दूत पाठवून ते राज्य काबीज करण्यास हरकत नाही. जोशुआने जेरिको घेताना हे कृत्य केले (Judges 2.). 'चोरी करू नकोस' याचाही अर्थ असाच की, यहुद्याची यहुद्याने वस्तु चोरू नये; पण इतर राज्ये अवश्य लुटावी. आणि ती लुटल्यावर लूट कशी वाटावी हे खुद्द यहोवानेच सांगितले आहे (Numbers 31, 26–30); आणि त्यांत काही भाग यहोवाचाही आहे. 'व्यभिचार करू नकोस' याचाही अर्थ हाच की, एका यहुद्याने दुसऱ्या यहुद्याच्या स्त्रीशी संबंध ठेवू नये; पण इतर देशांतील तरुण मुलींना त्यांच्या संमतीवाचून आपसात वाटून घेण्याला यहोवाची परवानगी आहे (Numbers 31, 18). तात्पर्य हे सर्व नियम किंवा आज्ञा यहुदी लोकांनी आपसात पाळण्यासाठी आहेत. इतरांना मारणे, लुटणे, त्यांच्या बायकांचे अपहरण करणे इत्यादि सर्व क्षम्यच नव्हे पण कर्तव्य आहे. तेव्हा ह्या बायबलमधील आज्ञांचा आणि पार्श्वनाथाच्या चार यामांचा मिलाफ होणे शक्य नाही.

मोझेसच्या पूर्वी आणि समकाली जी लहान मोठी राज्ये होती त्यांत अशा तऱ्हेचे नियम होतेच. पण ते देवाने दिलेले नसून राजाने किंवा बादशहाने केलेले असत. मोझेसने स्वतःच असे नियम केले असते, तर

1. Also Exodus 21–23–24

यहुदी लोकांनी ते मानले नसते. यासाठी यहोवाच्या नांवावरच सर्व नियम घालावे लागले असे वाटते.

## यहोवा आणि दुसरे देव

यहोवा आणि इतर देवात मुख्य फरक हा की, तो एकटाच आहे, त्याला बायको नको किंवा साथी नको. दुसरे, त्याला आपल्या मूर्ति नकोत. त्याला इतर देव असह्य आहेत. तो म्हणतो, "दुसऱ्या देशातील लोकांशी संधी करू नकोस ... पण त्यांची पूजास्थाने मोडून टाक आणि मूर्ति फोडून टाक ... ... का की, तू दुसऱ्या देवाची पूजा न करावी; कारण मी जो देव तो मत्सरी आहे; त्या माझे नांव मत्सरी असे आहे," (Exodus 34, 12, 14). तिसरे, तो राष्ट्रीय देव आहे. यहुदी राष्ट्रासाठी यहुदी लोकांचीही हत्या करण्यास तो तयार असतो. आमचे देव स्वतः किंवा अवतार रूपाने कोणत्या तरी दैत्यांना, दानवांना, राक्षसांना किंवा माणसांना मारतातच पण ते केवळ भूभार हरण करण्यासाठी किंवा गोब्राह्मणासाठी. एक तेवढा परशुराम अवतारच आपल्या जातीसाठी निःक्षत्रिय पृथ्वी करणारा होता. पण त्याने ब्राह्मणी राज्य स्थापले नाही; आणि पुनः क्षत्रिय राहिले ते राहिलेच ! यहोवाने कनानमधील सर्व लोकांना नष्ट करून तो प्रदेश यहुदी जातीला दिला, आणि तेथे त्यांचे राज्य स्थापले.

## क्रिस्ताचा यहोवा

यहुदी लोकांवर अनेक संकटे आली. त्यांत सर्वात मोठे म्हटले म्हणजे इ. सनापूर्वी सहाव्या शतकाच्या आरंभी त्यांना बाबिलोनच्या नेबूकद नेझार बादशहाने पकडून बाबिलोनला नेले. तेथे ते ७० वर्षे राहिले (Jeremiah 25. 11) क्रिस्ताच्या वेळी देखील यहुदी लोकांची स्थिती फारशी समाधानकारक नव्हती. यद्यपि हेरोद नांवाचा त्यांचा एक राजा होता, तथापि त्याच्या हाती सर्व सत्ता नव्हती. तो मांडलिक होता व वरिष्ठ अधिकार रोमन बादशहाच्या हाती होते. त्या बादशहाचा एक अधिकारी जरूशलेममध्ये असे, व प्रजाजनांचे विशेष हितसंबंध तो पहात असे. आपण यहोवाची पूजा विधिपूर्वक करीत नसल्यामुळे ही संकटे आपणावर येतात, अशी यहुदी लोकांची ठाम समजूत होती; आणि यहोवा आपल्या

पापाबद्दल आपणाला क्षमा करून कोणी तरी मुक्तिदाता ( Messiah ) पाठवील अशी त्यांची दृढ श्रद्धा असे, व अद्यापि आहे. पण ख्रिस्ती लोक यहोवाने पाठविलेला मुक्तिदाता ख्रिस्तच आहे असे मानतात. ते यहुदी लोकांना मान्य नाही.

ख्रिस्ताच्या उपदेशात पर्वतावरील उपदेश श्रेष्ठ समजला जातो. त्यात ख्रिस्ती म्हणतो, "तुम्ही पूर्वीच्या लोकांचे म्हणणे ऐकलेच असेल की, तू हत्या करू नकोस; आणि जो हत्या करील तो न्यायदण्डाला पात्र होईल. पण मी म्हणतो की, जो विनाकारण आपल्या बांधवांवर रागवेल तो न्यायदण्डाला पात्र होईल; आणि जो आपल्या बांधवाला निरुपयोगी मनुष्य म्हणेल तो महासभेत दण्डाला पात्र होईल. यास्तव तू जर देवाला भेट आणलीस आणि तेथे तुला आपल्या बांधवांशी विरोध असल्याची आठवण झाली, तर ती तेथेच ठेवून आपल्या बांधवाची प्रथम समजूत घाल आणि मग ती भेट देवाला दे ...

"तुम्ही पूर्वींच्या लोकांकडून ऐकले आहे की, तू व्यभिचार करू नकोस. पण मी म्हणतो की, जो कोणी कामवासनेने स्त्रीकडे पाहतो, तो तिच्याशी आपल्या हृदयातच व्यभिचार करतो ...

"तुम्ही ऐकले आहे की, डोळ्याला डोळा दांताला दांत." पण मी म्हणतो की, दुष्टत्वाचा प्रतिकार करू नका; पण जो तुझ्या उजव्या गालावर थप्पड मारील, त्याच्यापुढे डावा गालही कर. आणि जर कोणी कोर्टात फिर्याद करून तुझा कोट घेईल त्याला सदरा देखील देऊन टाक.

"तुम्ही ऐकले आहे की, तू आपल्या शेजाऱ्यावर प्रेम कर, आणि शत्रूचा द्वेष कर. पण मी म्हणतो की, तुम्ही शत्रूशी मैत्री करा, जे तुम्हाला शाप देतात त्यांना आशीर्वाद द्या, आणि, जे तुमचा धिक्कार करतात व तुम्हाला कष्ट देतात, त्यांजबद्दल तुम्ही प्रार्थना करा. या योगे स्वर्गीय पित्याची ( देवाची ) तुम्ही लेकरे व्हाल. का की, तो सूर्याला वाइटावर आणि चांगल्यावर प्रकाशवितो, आणि अन्यायीवर व न्यायीवर पाऊस पाडतो...यास्तव स्वर्गीय पित्यासारखे तुम्ही परिपूर्ण व्हा." ( Matthew 5. 21-48 ).

अपरिग्रहासंबंधाने क्रिस्त म्हणतो, "कोणताही मनुष्य दोन मालकांची सेवा करू शकत नाही. का की, तो त्यांपैकी एकावर प्रेम करील आणि दुसऱ्याचा द्वेष करील; अथवा एकाचा आदर व दुसऱ्याचा तिरस्कार करील. तुम्ही परमेश्वराची आणि संपत्तीची सेवा करू शकणार नाही. म्हणून मी तुम्हाला म्हणतो-जीविताची चिंता करू नका की. तुम्ही काय खाल व काय प्याल; शरीराचीही चिंता करू नका कीं, शरीराला कशाने आच्छादू. अन्नापेक्षा जीवन श्रेष्ठ नाही काय ? आणि कपडयापेक्षा शरीर श्रेष्ठ नव्हे काय ?"

या उपदेशावरून असे दिसून येतें की, क्रिस्ताचा देव मोझेसच्या यहोवाहून फारच भिन्न होता. 'डोळ्याला डोळा व दाताला दात' ही यहोवाची नीति क्रिस्ताच्या देवाला मुळीच पसंत नाही. तो सर्वांचाच पिता, आम्ही इतरांना क्षमा केली तर तो आम्हालाही क्षमा करील. अर्थात् तो अत्यंत न्यायी आणि दयाळू आहे. तथापि त्याच्यात थोडासा यहोवाचा स्वभावही राहून गेला. त्यांची प्रार्थना जी क्रिस्ताने सांगितली आहे, तिच्यात 'आणि तू आम्हाला वाईट मार्गाला लावू नकोस'[१] हेही वाक्य आहे. असे असले तरी क्रिस्ताने आणि त्याच्या संतांनी पाश्चात्य-देशात मोठीच विचारक्रांती घडवून आणली; वर्णभेद आणि जातिभेद न बाळगता माणसांनी परस्परांवर प्रेम केले पाहिजे हे प्रथमतः पाश्चात्यांना त्यानीच शिकविले. आरंभी आरंभी तर क्रिस्ती समाज अपरिग्रही असे. काही संपत्ती असली, तर ती ते सार्वजनिक कार्याला लावीत. म्हणजे पार्श्वनाथाच्या चार यामांचा त्यांनी पुष्कळ अंशी अंगीकार केला आहे असे म्हटले पाहिजे.

क्रिस्ताचा देव जरी दयाळू व सर्व मनुष्यांचा पिता होता, तरी यहुदी लोकांवर त्याची खास कृपा होती असे क्रिस्ताचे ठाम मत होते. तो आपल्या प्रमुख बारा शिष्यांना म्हणतो, "परदेशीयांच्या बाजूला जाऊ नका आणि सामारितन लोकांच्या शहरांत प्रवेश करू नका, परंतु यहुदींच्या कळपांतून सुटलेल्या व्यक्तींकडे (The lost sheep of the house of Israel) जा" (Matthew 10. 5-6). एकदा कनानमधील एक बाई क्रिस्ताकडे

1. Matthew 6. 13, and Luke 11–4.

आली, आणि भूताने पछाडलेल्या आपल्या मुलीला मुक्त करण्यासाठी प्रार्थना करू लागली. तेव्हा क्रिस्त म्हणाला, "मला यहुदींच्या कळपातून सुटलेल्या व्यक्तींसाठी पाठविण्यात आले आहे." पुनः तिने प्रार्थना केल्यावर क्रिस्त म्हणाला, "मुलांची रोटी घेऊन कुत्र्यांना खाऊ घालणे योग्य नव्हे." ( Matthew 15, 22-26 )

## सेंट पॉलचा प्रचार

क्रिस्ताच्या स्वर्गवासानंतर त्याच्या अनुयायांचा छळ यहुदी लोकांत पॉल-ज्याला यहुदी सॉल म्हणत-हा एक प्रमुख होता. दमास्कस येथील क्रिस्ती पुढाऱ्यांना पकडून यरूशलेमच्या प्रमुख धर्माधिकाऱ्याकडे पाठविण्याच्या उद्देशाने तो तिकडे जात असता दमास्कसजवळ त्याला एकाएकी देदीप्यमान प्रकाश दिसला आणि तो खाली पडला; आणि 'सॉल सॉल, तूं माझा छळ का करतोस ?' अशी आकाशवाणी त्याला ऐकू आली. 'प्रभु, तूं कोण आहेस' असा पॉलने प्रश्न केला, तेव्हा त्याला उत्तर मिळाले की, 'ज्याचा तूं छळ करतोस तो मी क्रिस्त आहे'... पॉल उठला, पण डोळे दिपून गेल्यामुळे त्याला दिसेना. बरोबरच्या लोकांनी त्याला हाताला धरून शहरात नेले. तीन दिवस त्याला दिसेना व अन्न चालेना. शेवटी अनानियास नांवाच्या क्रिस्त-भक्ताने त्याला बरे केले, आणि बाप्तिस्मा दिला. तेव्हापासून तो अत्यंत उत्साही क्रिस्तभक्त झाला. तोदेखील प्रथमतः यहुदी लोकांनाच धर्मोपदेश करी; पण ते ऐकेनात व त्याच्या विरुद्ध जाऊ लागले, व त्याला मारण्याचा त्यांनी कट केला. तेव्हा त्याने परदेशीयांना उपदेश करण्याचा निश्चय केला. एका ठिकाणी तो यहुद्यांना म्हणतो, "मला हे योग्य होते की, प्रथमतः देवाचा शब्द तुम्हाला उपदेशावा; पण तुम्ही त्याचा निषेध करता आणि आपणाला अमृतत्वाला अयोग्य समजता हे पाहून आम्ही आता परदेशीयांकडे वळतो." ( Acts 13-46 )[1]

पॉलवर अनेक संकटे आली पण त्याने क्रिस्ती धर्माचा प्रचार करण्याचे काम सोडले नाही. एकदा त्याला यरूशलेम मधील यहुदी लोक ठार मारणार होते, पण तेथील रोमन क्याप्टनने बचावले आणि रातोरात रोमन गव्हर्नरकडे पाठवून दिले. यहुदी लोकांनी त्याला आपल्या ताब्यात

1. Also Acts 18-6, 28-25-28.

घेण्याचा प्रयत्न केला; पण पॉलने ' मी कैसरला अपील करतो ' असे म्हट-ल्याने त्याला तुरुंगांत ठेवून मागाहून रोमला पाठविणे भाग पडले. त्याला रोमन तुरुंगात बिड्या घालून ठेवले होते, तरीदेखील तो तेथे धर्मप्रचार करी. रोमला पोचल्यावर तो भाड्याच्या घरात राहत होता. तेथूनही त्याने पुष्कळ धर्मप्रचार केला. याप्रमाणे सेंट पॉलच्या प्रयत्नाने क्रिस्ती धर्म रोमन साम्राज्यात फैलावला.

## कोंस्तांतीन बादशहाचा क्रिस्ती धर्माला आश्रय

यद्यपि क्रिस्ती धर्माचा सारखा प्रचार चालला होता, तथापि रोमन बादशहांकडून क्रिस्ती लोकांचा बराच छळ करण्यात आला. सरते शेवटी कोंस्तांतीन बादशहाने ह्या धर्माला आश्रय दिल्याने हा छळ नाहींसा झाला, आणि क्रिस्ती धर्म प्रबळ होऊन बसला. कोंस्तांतीन बादशहाने इ. स. ३२५ साली एक क्रिस्ती आचार्यांची धर्मसभा बोलावली; आणि त्या सभेत क्रिस्ती संघाचे संघटन करण्यात आले. अशोकाच्या आश्रयामुळे जसा बौद्ध संघ, तसाच कोंस्तांतीनाच्या आश्रयाने क्रिस्ती संघ परिग्रही झाला, आणि पार्थिव संपत्तीत त्याची उन्नती व आध्यात्मिक संपत्तीत अवनती होत गेली. अर्थात् क्रिस्ताने उपदेशलेला अपरिग्रह बाजूला राहिला, असत्याचा आणि हिंसेचा प्रादुर्भाव झाला आणि राजांच्या लुटीतील बराच भाग क्रिस्ती संघाला मिळू लागला. म्हणजे पार्श्वनाथाचे चारही याम क्रिस्ती संघांतून नष्ट होत गेले !

## इस्लाम धर्माचा प्रसार

क्रिस्ती संघांची आर्थिक उन्नती आणि आध्यात्मिक अवनती चालली असता इ. सनाच्या सहाव्या शतकाच्या उत्तरार्धात ( इ. स. ५७० च्या सुमारास ) अरब देशांत महम्मदाचा जन्म झाला. अरब लोक शेकडो देवतांची पूजा करीत. वयांत आल्यावर महम्मद ह्याविषयी विचार करू लागला यद्यपि त्याला लिहिता वाचता येत नसे, तथापि, आसपासच्या यहुदी पण्डितांकडून त्याने बायबलचे चांगले ज्ञान संपादन केले; आणि वयाच्या चाळीसाव्या वर्षापासून तो एकेश्वरी धर्माचा उपदेश करू लागला. आरंभी याची बायको खदीजा आणि हाताच्या बोटांनी मोजण्याजोगे

काही गृहस्थ त्याचे भक्त झाले. पण हळू हळू त्याच्या मताचा मक्केत प्रसार होऊ लागला. तेव्हा तेथील अधिकाऱ्यांनी त्याला मारण्याचा बेत केला. तो महम्मदाला समजला व तो आपल्या वयाच्या ५१ व्या वर्षी सप्टेंबर २०, ६२२ रोजी रातोरात मदीनेला गेला. ह्या त्याच्या निर्गमनाला हिजरत म्हणतात, व त्या दिवसापासून हिजरी शक मानला जातो.

मदीनेमध्ये महम्मदाला पुष्कळ अनुयायी मिळाले, आणि त्यांच्या साहाय्याने त्याने मक्का काबीज केली. पार्श्वनाथ, बुद्ध अथवा क्रिस्त यांच्या अहिंसा धर्माला महम्मद मुळीच मानीत नसे हे उघड आहे. तो यहुदी लोकांच्या मूळच्या यहोवाकडे वळला. यहोवात आणि महम्मदाच्या अल्लात फरक एवढाच की, यहोवा केवळ यहुदी लोकांची काळजी वागवितो आणि अल्ला जे इस्लाम धर्म स्वीकारतील त्या सर्वांची काळजी वाहतो. महम्मद जातपात कांहीच मानीत नसल्यामुळे आणि त्याचे शस्त्रबल वाढत गेल्यामुळे इस्लाम धर्म त्वरित फैलावला.

महम्मद वयाच्या ६२ व्या वर्षी परलोकवासी झाला. त्याच्यानंतर अबू बक्र गादीवर आला. तो इ. स. ६३४ साली परलोकवासी झाला आणि ओमर गादीवर आला. तो ६४३ मध्ये परलोकवासी झाला. ह्या दोन खलीफांनी इस्लामाचा पुष्कळच प्रचार केला. ह्या दोघांचीही राहणी फार साधी असे. त्यामुळे सामान्य लोकांवर त्यांचा फार प्रभाव पडे. त्यांच्यामागे जे खलीफा झाले ते फार चैनी असत, तरी इस्लामच्या प्रचारात त्यांनी कसूर केली नाही.

## तरवारीच्या जोरावर क्रिस्ती धर्माचा प्रचार

इस्लाम धर्माचा संसर्ग क्रिस्ती धर्माला बाधल्यावाचून राहिला नाही. खलीफा आणि मुसलमान राजे जसा इस्लाम धर्माचा प्रचार तलवारीच्या जोरावर करीत तसेच क्रिस्ती राजेही शस्त्रबळावर आपल्या धर्माचा प्रचार करू लागले. यांत फ्रान्स आणि जर्मन देशाच्या शार्लमेन बादशहाने पुढाकार घेतला ( इ. स. ७७१–८१४ ). अर्थातच पोपचा या कार्याला पूर्ण आशीर्वाद होता. पुढे स्वतः पोपने धर्मयुद्धाचे धुरीणत्व पत्करले. धर्मयुद्धाला अरबी भाषेत जिहाद व ल्याटिन भाषेत क्रुजाद म्हणत. इंग्रजीत

याला क्रुसेड (Crusade) म्हणतात. पोपच्या नेतृत्वाखाली इ. स. १०९७ पासून १२५० पर्यंत क्रिस्ती राजेरजवाड्यांनी मुसलमानांबरोबर सात धर्मयुद्धे केली !

धर्म–संरक्षणासाठी याच्याहीपेक्षा एक भयंकर साधन पोपने अमलात आणले. इ. स. १३ व्या शतकात त्या काळच्या पोपने इन्क्विजिशन (Inquisition) नांवाची एक संस्था स्थापिली. ह्या संस्थेचे सभासद पाद्रीच असत आणि त्यांनी दिलेल्या निकालाविरुद्ध अपील चालत नसे. क्रिस्ती धर्माच्या म्हणजे पोपने आणि त्याच्या पाद्री मंडळाने केलेल्या नियमाविरुद्ध कोणी चालतात अशी शंका आली की, त्यांना इन्क्विजिशनमध्ये आणीत आणि एक तर त्यांना जिवंत जाळीत किंवा गाडून टाकीत. ही संस्था १८ व्या शतकापर्यंत चालू होती. जुन्या गोवा शहरात ह्या संस्थेची जागा अद्यापि दाखवितात, आणि त्या संस्थेची आठवण आली की, अद्यापि लोकांच्या अंगावर कांटा उभा रहातो !

ज्या धर्मगुरूने ‘ उजव्या गालावर थप्पड मारली, तर डावा गाल देखील पुढे करा ’ असा अत्यंत अहिंसक उपदेश केला, त्याच्याच नांवावर त्याच्याच अनुयायांनी केलेली ही कृत्ये वाचली किंवा ऐकली म्हणजे मनुष्यस्वभावाविषयी एक प्रकारची घृणा व निराशा उत्पन्न झाल्यावाचून रहात नाही.

## राष्ट्रीयत्वाचा विकास

अशा कृत्यांनी सामान्य जनतेची पोप आणि पाद्री यासंबंधी आदरबुद्धी कमी होणे साहजिक होते. त्यात मध्यम वर्गात वाढत चाललेल्या ग्रीक आणि ल्याटिन भाषेच्या ज्ञानाची भर पडल्यामुळे लोक धर्मापेक्षा राष्ट्रीयत्वाकडे विशेष झुकत गेले, आणि जिकडे तिकडे स्वदेशाभिमानाचा प्रसार होत गेला. याला बायबलाचीही मदत मिळाली. जुन्या करारातील यहोवा पूर्णपणे जातीय देव होता. त्याच्या जागी राष्ट्रीयत्व येण्याला विलंब लागला नाही. ग्रीक लोकांचे कायदे कानून आपल्या शहरापुरतेच असत. तथापि त्यांच्या इतिहासाने आणि तत्त्वज्ञानाने युरोपियन राष्ट्रीयत्वाला बरीच मदत केली. आजकाल युरोपात चालणारे कायदे रोमन लोकांच्या कायद्यावरून घेतले आहेत हे सर्वविश्रुतच आहे.

केवळ राष्ट्रीयत्वाने पोटापाण्याचा आणि ऐषआरामाचा प्रश्न सुटणे शक्य नव्हते. यास्तव वसाहतींविषयी धडपड सुरू झाली. ह्या शर्यतीत प्रथमत: स्पेन देश पुढे गेला, आणि त्यानंतर इंग्लंडने आघाडी मारली. ह्या राष्ट्रीयत्वाचा जन्मच हिंसेतून झाला, आणि हिंसेनेच ते वाढत गेले. त्याचा सर्व इतिहास लिहिण्याचे हे स्थळ नव्हे. एवढे सांगितले म्हणजे पुरे की आजला सोविएत रशियाशिवाय सर्व जग ह्या राष्ट्रयत्वाच्या कचाट्यात सांपडले आहे, आणि त्यामुळे उत्तरोत्तर भयंकर युद्धे होत आहेत.

## राष्ट्रीयत्वावर सोव्हिएटचा इलाज

हे राष्ट्रीयत्व रशियात फार प्रबळ नव्हते. यद्यपि झार रशियन जातीला महत्त्व देत, तरी इतर जातीविषयी ते विशेष तिरस्कार बाळगीत नसत. प्रसिद्ध कवी पुष्किन याचा आजा निग्रो होता. तुर्कीच्या सुलतानाचा तो गुलाम होता. त्याला सुलतानाने भेटीदाखल झारला दिले. झारची त्याच्यावर फार मर्जी बसली, आणि झारने त्याला सरदार करून दुसऱ्या एका सरदाराच्या मुलीशी त्यांचे लग्न लावले. हा प्रकार इंग्लंडात किंवा अमेरिकेत घडून येणे असंभवनीय आहे. पुष्किन त्या निग्रोच्या मुलीचा मुलगा. पण त्याला आपल्या आज्याविषयी अभिमान किती ! युगोनिअी अनेगिन् ह्या काव्याच्या आरंभीच तो आपल्या आफ्रिकन रक्ताची थोरवी गातो ! असा हा देश राष्ट्रीयत्वाच्या सीमा उल्लंघन करण्यास समर्थ झाला यात आश्चर्य कसले ?

राष्ट्रीयत्वाचा फायदा उठविणारा मध्यम वर्गही रशियात जोरदार नव्हता; आणि जेव्हा झारशाही नष्ट झाली तेव्हा लेनिनला सर्व राष्ट्रांना समानतेचे हक्क देण्याला मुळीच सायास करावा लागला नाही. कावकाज, तुर्कोमन, उजबेक इत्यादिक सर्व मागसलेले लहानसहान देश रशियन देशाप्रमाणेच आजला पूर्ण स्वातंत्र्य अनुभवीत आहेत. रशियाच्या विजयाला जी कारणे झाली त्यात हे प्रमुख आहे.

## सोव्हिएटचा इलाज इतर देशांना शक्य नाही

इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका वगैरे देशात देशाभिमान इतका मुरला आहे की, त्यांचेवर सोविएतचा इलाज लागू पडणे अशक्य झाले आहे.

इतकेच नव्हे, तर ह्या इलाजाचा शस्त्राने आणि राजनीतीने प्रतिकार करण्यास ही राष्ट्रे सतत प्रयत्न करीत आहेत. सोव्हिएटची सत्ता स्थापन झाल्याबरोबर जर इंग्लंडने त्याच तत्त्वावर आपल्या साम्राज्याचे संघटन केले असते, तर नुकतेच संपलेले महायुद्ध उद्भवले नसते. पण तसे करण्याला इंग्लंडच्या मध्यम वर्गाने आपल्या स्वार्थाचा त्याग करावयास पाहिजे होता. जर तो त्यांना करता आला असता तर,

> अवश्यं यातारश्चिरतरमुषित्वापि विषया
> वियोगे को भेदस्त्यजति न जनो यः स्वयममून् ।
> व्रजन्तः स्वातंत्र्यादतुलपरितापाय मनसः
> स्वयं त्यक्ता ह्येते शमसुखमनन्तं विदधते ।।

( चिरकाल भोगून देखील विषयोपभोग [ शेवटी ] खात्रीने सोडून जातातच. जो त्यांचा त्याग करीत नाही त्याच्यात आणि स्वयंत्याग करतो त्याच्यात भेद कोणता ? ते भोग आपोआप जातात तेव्हा भयंकर मनस्तापाला कारणीभूत होतात; परंतु स्वतःच त्यांचा त्याग केला तर अनंत शान्तिसुख देतात. ) ह्या भर्तृहरीच्या वचनाप्रमाणे जगात अनंत शान्तिसुख स्थापन करता आले असते.

### दोन शक्तींची टक्कर

एका बाजूला 'आपणासारिखे करिती तात्काळ' या वचनाला अनुसरणाऱ्या बोलशेविकांची शक्ती व दुसऱ्या बाजूला जगात वैषम्य कायम ठेवू पहाणारी अँग्लोअमेरिकनांची शक्ती, अशा ह्या दोन शक्तींची आजला टक्कर होऊ पाहत आहे, आणि जर का ती खरोखरच घडून आली, तर अनंत शान्तिसुखाच्या ऐवजी अनंत मानवदुःख फैलावणार आहे. अमेरिकेची, इंग्लंडची आणि रशियाची जी आज राजकारणे चालली आहेत, ती ही टक्कर टाळण्यासाठी नसून तिच्यामुळे इतरांचा चुराडा व आपला बचाव व्हावा एवढ्यासाठीच होत. ह्या टक्करीत केवळ ह्या शक्तींचाच चुराडा होणार नसून आमच्यासारख्या पुष्कळ असहाय देशांचाही चुराडा होण्याचा संभव आहे. तेव्हा आतापासूनच ही टक्कर कशी टाळता येईल याचा विचार करणे सर्वांचेच कर्तव्य आहे. कोणी म्हणेल की, आमच्यासारख्या दुर्बलांच्या विचारांचा फायदा काय ? विचार खुद्द

अमेरिकनांनी, इंग्रजांनी आणि बोल्शेविकांनी करावयास हवा. माझ्या मते ही टक्कर होणे किंवा न होणे हे बरेचसे आमच्यावरही अवलंबून आहे. ह्या प्रकरणी आम्हाला जर तटस्थ राहता आले, तर ह्या टक्करीचा वेग बराच कमी होईल, व कदाचित् ती टाळताही येईल.

## मुख्य इलाज चातुर्यामांचा

महात्मा गांधींनी गेल्या २५ वर्षांत अहिंसा आणि सत्य हे दोन याम व्यवहार्य करून दाखविले आहेत. त्यांचा स्वीकार केल्याने हिंदुस्थानचे नुकसान न होता फायदा झाला आहे. ह्या दोन यामांना अस्तेय व अपरिग्रह या दोहोंची जोड मिळाली, तर हिंदुस्थानचा विकास आणखी चांगला व त्वरित होईल. महात्मा गांधी व त्यांचे आश्रमवासी अनुयायी अपरिग्रह व अस्तेय व्रत पाळतातच; पण त्यांना सार्वजनिक कार्यासाठी सपरिग्रही श्रीमंत वर्गावर विसंबून रहावे लागते. ह्या वर्गाने बहुतेक संपत्ती व्यापारी लुटीने ( जिला ते फायदा म्हणतात, ) मिळविलेली असते. अर्थात् त्यांना चारही याम पसंत नाहीत. आपल्या संपत्तीच्या रक्षणासाठी ते खुशाल हिंसेचा प्रयोग करतील; असत्य हे तर त्यांच्या धंद्यातील प्रमुख साधन आहे. असे असता राष्ट्रीय कार्यासाठी महात्मा गांधींना ह्या वर्गाची मदत घेणे आवश्यक झाले आहे. याला आपण आपद्धर्म म्हणू; पण तो जर असाच वाढत गेला, तर सद्धर्माचे सिंहासन बळकावून बसेल यात शंका नाही. तेव्हा आतापासूनच ह्या वर्गापासून सावध राहिले पाहिजे.

ह्या वर्गाला आम्ही स्पष्ट सांगावयास पाहिजे ते हे की, “ बाबांनो तुम्ही चातुर्यामाचा पुरा भंग करून संपत्ती कमावता, असे असून तुमचे दान आम्ही एवढ्याचसाठी घेतो की, ह्या देशातील बहुजन समाजाचे कल्याण व्हावे आणि क्रांतीचा प्रसंग न येता अहिंसेच्या द्वारे नवीन समाजरचना स्थापता यावी. ह्या रचनेत इंग्लंड व अमेरिका देशांतील धनिकांप्रमाणे तुम्ही सर्वाधिकारी होऊन बसाल अशी आशा बाळगणे व्यर्थ आहे. तुमची हत्या न करता तुमच्या परिग्रहापासून तुम्हाला मुक्त करण्याचा आमचा प्रयत्न आहे; आणि त्याला तुही गुण्यागोविंदाने प्रोत्साहन द्यावे यातच तुमचे कल्याण आहे.” हा प्रचार स्पष्टपणे आतापासूनच सुरू झाला पाहिजे.

## राष्ट्रीयत्व नको

ह्या प्रचारात राष्ट्रीयत्व मिसळता कामा नये. ह्या राष्ट्रीयत्वामुळे आरंभी आरंभी इंग्लंडचा फायदा झाला, तरी त्याचे परिणाम गेल्या दोन महायुद्धात होऊन इंग्लंडचे जवळ जवळ दिवाळेच निघाले आहे, आणि इंग्लंड लवकरच स्पेनच्या पंक्तीला जाऊन बसेल अशी चिन्हे स्पष्ट दिसत आहेत. मग त्या राष्ट्रीयत्वाने इंग्लंडने मिळविले काय ? अनंत इतिहासात 'दो दिवसांची' साम्राज्यसत्ता !

आम्हाला हे राष्ट्रीयत्व आरंभापासूनच बाधक होईल. इंग्रजांशी सामना करण्यासाठी जरी आम्ही आज एकवटलो, तरी ही एकी राष्ट्रीयत्वामुळे लवकरच नष्ट होईल. कर्नाटक व महाराष्ट्र, आंध्र व तामीळ, बंगाल व बिहार ह्या व अन्य सर्व देशात लहानसहान गोष्टींवर भांडणे उपस्थित होतील, व हिंसक आणि परिग्रही लोकांच्या हाती सत्ता जाईल; आणि तेणेकरून बहुजनसमाजाचे अतोनात नुकसान होईल. हे संकट टाळावयाचे असेल, तर आजपासून ह्या राष्ट्रीयत्वाविरुद्ध चळवळ चालू केली पाहिजे. आपापल्या भाषेचा व संस्कृतीचा सर्वांनी अवश्य विकास करावा; पण परस्परांविषयी असहिष्णुता नसावी. राष्ट्रीयत्वाचे व्यसन बळावले, तर ही चुरस सहज उत्पन्न करता येईल.

## धार्मिक सांप्रदायिकतेपासून धोका

धार्मिक सांप्रदायिकतेची कटुक फळे आज आम्हाला चाखावी लागत आहेत. मुसलमानांच्या अज्ञानाचा व त्यांच्या अनुषंगाने उत्पन्न होणाऱ्या कोत्या स्वार्थाचा फायदा घेऊन इंग्रजानी त्यांना इतर समाजापासून विभक्त केले आणि त्यांच्या दंग्याधोप्यांना उत्तेजन देऊन आपली सत्ता कायम करण्याचा निंद्य प्रयत्न केला. यायोगे त्यांनी हिंदुस्थानचे आणि आपले दुःख वाढविले आहे. पहिल्या महायुद्धानंतर सोविएत रशियापासून चांगला धडा शिकून जर इंग्रजांनी सोविएत सारखीच साम्राज्याची सुधारणा केली असती, तर दुसऱ्या महायुद्धाचा प्रसंगच आला नसता. पण तसे करण्याऐवजी जिकडे तिकडे त्यांनी भेदनीतीला अत्यंत उत्तेजन दिले, ह्या कामी त्यांना धार्मिक सांप्रदायिकतेची चांगली मदत झाली. तिकडे त्यांनी प्रोटेस्टंट आयर्लंडला क्याथलिक आयर्लंडपासून विभक्त केले;

आपल्या साम्राज्याच्या वाटेवर प्यालेस्टाईनमध्ये यहुदी लोकांना उत्तेजन देऊन तेथे एक अल्पसंख्याकांची विलक्षण राज्यपद्धती उभी केली. आमच्या इकडे ब्रह्मदेश निराळा केला; आणि हिंदुमुसलमानांच्या भांडणांना आणखी उत्तेजन दिले. परिणामी दुसरे महायुद्ध उद्भवले, आणि अमेरिकेची मनधरणी करून इंग्रज कसेबसे पार पडले. परंतु अद्यापि त्यांना आपल्या धोरणाबद्दल पश्चात्ताप झाला नाही. त्यांच्या युक्त्या प्रयुक्त्या आजलाही चालू आहेत; आणि त्यात इंग्लंडचा समूळ नाश झाल्यावाचून नष्ट होणार नाही अशी चिन्हे स्पष्ट दिसत आहेत.

हिंदुस्थानच्या प्रगतीच्या मार्गात इंग्रजांनी मुस्लिम लीगची मोठी भिंत खडी केली आहे, आणि ती ते तोडू इच्छीत नाहीत. हिंदु समाजाने ही भिंत उभारण्यास बरीच मदत केली आहे. सोविएत पुढाऱ्यांप्रमाणे आमच्या पुढाऱ्यांना जर सामान्य जनतेची खरी कळकळ असती व मार्क्सवादाने सर्वांचे हित कसे साधता येते हे माहीत असते, तर पहिल्या महायुद्धानंतर रशियाबरोबर आम्हीही मुक्त झालो असतो. पण आम्ही आमच्या अपाया-चाच मार्ग स्वीकारला. मुसलमान इंग्रजांच्या हुलकावणीला बळी पडल्याबरोबर आम्ही आर्य समाज, शिवाजी उत्सव, गणपति उत्सव, रजपुतांच्या शौर्याच्या कथा, हिंदु-विश्वविद्यालय इत्यादिकांना एकसारखे उत्तेजन देत गेलो; आणि तेणेकरून हिंदु-मुसलमानांची वितुष्टे आणखी वाढत गेली. आता तरी ताळ्यावर येऊन ह्या धार्मिक सांप्रदायिकतेला आम्ही एकदा कायमची मूठमाती दिली पाहिजे. हिंदु काय की मुसलमान काय सर्वांची आर्थिक दशा एकच आहे. 'धर्म धोक्यात आहे' हा प्रचार लुच्च्या लोकांनी आपला स्वार्थ साधण्यासाठी चालविला आहे. त्याला कोणीही बळी पडता कामा नये.

## कम्युनिस्टांचा प्रचार

सामान्य जनतेची कष्टद दशा सर्वांच्या निदर्शनास आणून श्रमजीवी लोकांचे संघसामर्थ्य वाढविण्याचा कम्युनिस्टांचा प्रयत्न आहे. त्याबद्दल त्यांचे अभिनंदन करणे योग्य आहे. परंतु कधी कधी आपल्या साध्यासाठी ते भलत्याच मार्गाचा अवलंब करतात, व लोकांच्या अनादराला पात्र होतात. मुस्लिम लीगला मदत करण्याचा त्यांचा प्रयत्न अशाच मार्गांपैकी

आहे. काँग्रेस आणि मुस्लिम लीग ह्या द्वंद्वातून कम्युनिस्ट संस्थान निष्पन्न होईल असे त्यांस वाटत असल्यास न कळे. पण ते शक्य नाही. काँग्रेसमध्ये बरेच दोष असले तरी सामान्य लोकांची तिला कळकळ आहे, आणि लीगचा फक्त आपल्या पोळीवर तूप ओढण्याचा प्रयत्न आहे. अशा द्वंद्वातून कम्युनिस्ट राजसत्ता निघणे शक्यच नाही; मात्र इंग्रजी सत्ता दृढ होत आहे. मुसलमान श्रमजीवी लोकांना हे जेव्हा समजेल, तेव्हाच त्यांची कम्युनिस्टांना मदत मिळेल. त्यांच्यात जातिभेदाचे बंड कमी असल्यामुळे ते कम्युनिझमकडे लवकर वळतील. पण लीगला मदत केल्याने त्यांचे धर्मवेड वाढेल व कमुनिझमपासून ते दूर जातील. तेव्हा कम्युनिस्टांनी अशा आडवाटेत न शिरता आपला प्रचार सरळ मार्गानेच करणे हितावह आहे.

## सोशालिस्टांचा प्रचार

कम्युनिस्टांचे आणि सोशालिस्टांचे सिद्धांत एक असून देखील त्यांच्यात सापत्नभावाचे वैर आहे. कम्युनिस्टांना स्वतःची अक्कल नसून ते मास्कोच्या ओंजळीने पाणी पितात असे सोशालिस्टांचे म्हणणे आहे; आणि इतर देशांतील सोशालिस्टांप्रमाणेच हिंदी सोशालिस्ट देखील केवळ नांवानेच मार्क्सवादी आहेत असे कम्युनिस्टांना वाटत आहे. दोघांनाही क्रांती पाहिजे आहे, पण मार्ग भिन्न आहेत. लोकांनी हिंसात्मक मार्गाचा अवलंब केल्यावाचून क्रांती होणार नाही असे दोघांचेही म्हणणे आहे.

परंतु रशियाची व आमच्या देशाची स्थिती अत्यंत भिन्न आहे हे हे दोघही लक्षात ठेवीत नाहीत. रशियात शेतकऱ्यांना आणि कामकऱ्यांना सक्तीचे लष्करी शिक्षण मिळत असे. असे असता देखील लढाईच्या मैदानावर झारचा पराभव होईपर्यंत कम्युनिस्टांचा आणि सोशालिस्टांचा काही इलाज चालला नाही. तोपर्यंत त्यांचा प्रचार अहिंसात्मकच असे. लोकांना एकवटण्याचा ते उपदेश करीत, व प्रसंगोपात्त आमच्या सत्याग्रह्यांप्रमाणे जेलमध्ये अथवा सैबेरियात हद्दपारीवर जात. म्हणजे स्वतः कष्ट सोसून ते लोकांना शिक्षण देत. झारचा पराजय झाल्यावर त्यांना संधी मिळाली, व तिचा फायदा लेनिनने घेतला. असा फायदा आमच्या कम्युनिस्टांना आणि सोशालिस्टांना मागल्या किंवा नुकत्याच संपलेल्या युद्धानंतर करून घेता आला नाही. का की, अमेरिकेच्या आणि खुद्द रशियाच्या मदतीने इंग्रज

विजयी झाले. आता ह्या दोघांनाही पुढल्या महायुद्धाची वाट पहात बसावे लागेल. अशी मार्गप्रतीक्षा करीत बसण्यापेक्षा सत्याच्या आणि अहिंसेच्या उपायांनीच श्रमजीवी लोकांना जागृत करणे श्रेयस्कर होणार नाही काय? सत्य त्यांच्या बाजूला आहेच आणि अहिंसेचा जर त्यांनी शुद्ध मनोभावाने अंगीकार केला तर हिंदुस्थानचेच नव्हे तर सर्व जगाचे हित साधण्यास ते समर्थ होतील.

## सोव्हिएट संघाला भांडवलवाल्यांचे भय

अमेरिकन आणि इंग्रज भांडवलवाले कोणत्या ना कोणत्या निमित्ताने आपणावर हल्ला करू पाहतात असे सोविएत पुढाऱ्यांना भय वाटत आहे; आणि ते अस्थानी आहे असे म्हणता येत नाही. इकडे चीनमध्ये चांग-कै-शेकला पुढे करून अमेरिकन आपला डाव साधू पाहत आहेत, तर हिंदुस्थानात मुस्लिम लीगचे खोड काँग्रेसच्या गळ्यात अडकवून हिंदुस्थानला सोविएत विरुद्ध खडा करण्याचा डाव इंग्रज खेळत आहेत, अशी शंका रशियन मुत्सद्यांना येत आहे. हिंदुस्थानापासून सोव्हिएट संघाला निर्धास्त करण्याचा प्रमुख उपाय असा की, काँग्रेसने अपरिग्रही आणि अस्तेयी समाज बनविण्याचे ध्येय पूर्णपणे अंगीकारावे. श्री. जवाहरलाल नेहरू व इतर सोशालिस्ट काँग्रेसमध्ये आहेतच. पण ते पक्के देशाभिमानी आहेत. देशाभिमान आणि सोशालिझम यांच्या संयोगाने फासिझम उत्पन्न होतो असा अनुभव इटालीत व जर्मनीत आला आहे. तसा काही प्रकार हिंदुस्थानात घडून आला, तर हिंदुस्थानापासून सोविएत संघाला भय उत्पन्न होईल, यात शंका नाही. पण काँग्रेसने सर्वथैव अपरिग्रहाचे ध्येय स्वीकारल्यावर हे भय बाळगण्याचे सोविएत संघाला कारणच राहणार नाही.

जवळपासच्या राष्ट्रांवर हल्ला करून आम्हास वसाहती मिळवावयाच्या नाहीत, एवढेच नव्हे, तर आमच्या देशातच आम्ही अशी समाज-रचना करू पाहतो की, तिच्यात कोणीही परिग्रही किंवा स्तेयावर (लुटीवर) जगणारा माणूस राहणार नाही. परंतु ही समाज-रचना रशियन क्रांती सारखीच झाली पाहिजे असा कोणी आग्रह धरू नये. सत्याच्या आणि अहिंसेच्या मार्गाने ती करता येईल अशी आम्हास खात्री वाटते. आमची

सत्य आणि अहिंसा ही तत्त्वे स्वराज्य मिळविण्यापुरती नसून सगळ्या जगाचे हित साधण्यासाठी आहेत. आम्ही तुमच्यावर हल्ला करणार नाही एवढेच नव्हे तर, जर का इंग्रज आणि अमेरिकन भांडवलवाल्यांनी सोव्हिएटशी युद्ध मांडले, तर ते मोडण्यासाठी आम्ही आटोकाट प्रयत्न करू, अशी एकदाची सोव्हिएट पुढाऱ्यांची खात्री झाली, म्हणजे ते आमच्या-पासूनच नव्हे, तर काही अंशी अमेरिकन व इंग्रज भांडवलवाल्यांपासूनही निर्धास्त होतील. काँग्रेस, सोशालिस्ट व कम्युनिस्ट या सर्वांनी मिळून हे धोरण स्वीकारले, तर भांडवलवाल्यांच्या आणि सोविएत संघाच्या टक्करीत आमचा देश सांपडण्याचे आम्हाला भय राहणार नाही; आणि जर आम्ही या चातुर्यामाच्या द्वारे सात्त्विक बळ संपादिले, तर ही टक्कर अजीबात टाळता येईल.

## मुस्लिम लीगचे काय करावे ?

काँग्रेसमध्ये, सोशालिस्टांमध्ये व कम्युनिस्टांमध्ये जी त्यागवृत्ती आहे तिचा लीगमध्ये पूर्ण अभाव आहे. इकडे 'धर्म धोक्यात आहे' अशी आरडाओरड करून मते मिळवावयाची व ती मिळाल्यावर तिकडे आपल्या पोळीवर तूप ओढीत बसावयाचे, असा लीगच्या पुढाऱ्यांचा क्रम आहे. असे असता काँग्रेस आणि कम्युनिस्ट त्या पुढाऱ्यांची खुशामत करतात, हे मोठे आश्चर्य नव्हे काय ? त्यायोगे स्वराज्य किंवा कम्युनिस्ट राज्य संपादू असे वाटणे शुद्ध वेडेपणा आहे. लीगवाल्यांना स्वराज्य नको आणि कम्युनिझमही नको; फक्त नोकऱ्या पाहिजेत, आणि त्या देण्यासाठी इंग्रज पाहिजेत. इंग्रजांना हे चांगले माहीत आहे, आणि लीगवाल्यांना आड घालून हमेश ते आपला डाव साधीत आहेत. तेव्हा कोणीही लीगचे समाधान करण्याचा प्रयत्न करणे निरर्थक आहे. त्यांना व इंग्रजांना एकमेकांना मिठी मारून लोभाच्या चिखलात लोळू द्यावे, आणि सध्या तरी त्यांची उपेक्षा करावी हेच योग्य आहे. पण मुसलमान जनतेचा ते बुद्धिभेद करतात, त्याला काय करावे ? काँग्रेसने अपरिग्रहाचे आणि अस्तेयाचे ध्येय पूर्णपणे अंगीकारल्या-बरोबर गरीबीने गांजलेले हिंदु काय की मुसलमान काय, सर्वच काँग्रेसच्या बाजूचे होतील यांत शंका नाही. आजचे लीग पुढारी तेवढे इंग्रजांना चिकटून राहतील. पण त्यांचे लोकांवर मुळीच वजन राहणार नाही.

तात्पर्य, अंतर्गत काय की आंतरराष्ट्रीय काय, सर्व गुंतागुंतीचे प्रश्न पार्श्वनाथाच्या चार यामांच्या द्वारे सोडवता येण्याजोगे आहेत; श्रद्धा पाहिजे आणि वेळोवेळी त्यांचे प्रयोग करण्याला प्रज्ञा पाहिजे एवढेच काय ते.

## चातुर्यामाचे शिक्षण

चातुर्यामाच्या द्वारे जगाचे कल्याण साधावयाचे असल्यास त्याचे शिक्षण सार्वत्रिक झाले पाहिजे. याचा अर्थ असा नाही की, जैन किंवा बौद्ध साधूंना प्रत्येक शाळेत पाठवून चातुर्यामाचे अथवा अष्टांगिक मार्गाचे शिक्षण देण्यास लावणे. असे केले, तर हे साधु आपली भांडणे शाळेतच सुरू करतील व त्या योगे चातुर्यामाचा प्रसार न होता हिंसेचाच प्रसार होईल.

तर मग चातुर्यामाचे शिक्षण कसे काय द्यावे? जसे आजला पदार्थविज्ञान शास्त्राचे किंवा मानसशास्त्राचे शिक्षण दिले जाते, तसे ते दिले पाहिजे. चातुर्यामाचे प्रयोग प्रथमतः पार्श्वनाथाने केले. ते कितपत सफल झाले, आणि पुढे त्यांचा विपर्यास होण्याला काय कारणे झाली हे सर्व शिक्षकांनी विद्यार्थ्यांस शिकविले पाहिजे. ह्या चातुर्यामाचा बुद्धाने आपल्या अष्टांगिक मार्गाच्या द्वारे चांगला विकास केला. राजकीय सत्ता एकसत्ताक आणि हिंसात्मक राहिल्यामुळे बुद्धाचे प्रयोगही निष्फल झाले. त्यानंतर क्रिस्ताने या यामांचे प्रयोग केले. परंतु त्यांत यहोवाची भेसळ झाल्यामुळे त्यांपासून उपायापेक्षा अपायच जास्त झाला. या यामांना मनुष्योपयोगी शारीरिक मेहनतीची जोड दिली, तर ते टिकाऊ होतील हे महात्मा टॉलस्टायने आपल्या लेखांनी सिद्ध केले; पण प्रत्यक्ष प्रयोग करून दाखविणे त्यांना शक्य झाले नाही. दुसरी गोष्ट ही की, त्यांनी यहोवाला सोडले नाही, आपले तत्त्वज्ञान नवीन करारावर स्थापण्याचा प्रयत्न केला. परंतु आजला युरोपात सुशिक्षित लोकांची बायबलवर किंवा परमेश्वरावर श्रद्धा राहिली नाही; आणि त्यामुळे टॉलस्टायचे तत्त्वज्ञानही लोकांना पटले नाही. महात्मा गांधींनी अहिंसा आणि सत्य यांच्या योगे एक मोठी चळवळ उठविता येते हे प्रत्यक्ष सिद्ध करून दाखविले. पण हे याम अद्यापिही प्रयोगावस्थेत आहेत; त्यांना, खुद्द गांधीजीच, अहिंसेचे आणि सत्याचे प्रयोग म्हणतात.

## ह्या प्रयोगांना धोका

हे प्रयोग सांप्रदायिक होता कामा नयेत. अमुक एक सूत कांतावे, भगवद्गीतेचे पारायण करावे, सकाळी संध्याकाळी भजन करावे इत्यादिक गोष्टीत हे प्रयोग मिसळले गेले, तर ते प्रयोग सत्याचे आणि अहिंसेचे प्रयोग न राहता, तो एक संप्रदाय होईल, व त्यापासून उपायापेक्षा अपायच जास्त होईल.

दुसरी गोष्ट, या प्रयोगांना परमेश्वरापासून आणि आत्म्यापासून दूर ठेवले पाहिजे. परमेश्वर किंवा आत्मा आहे की नाही याचा शोध शास्त्रज्ञांनी अवश्य करावा. परमेश्वराविषयी शास्त्रज्ञ कांहीच सांगू शकत नाहीत. अर्थात् ह्या बाबतीत ते अज्ञेयवादी आहेत. आत्म्याविषयीं जे शोध चालले आहेत, यांत 'आत्मा अत्यंत अस्थिर किंवा अनित्य आहे' हा बौद्धांचा सिद्धांतच खरा समजण्यात येत आहे. जशी विद्युत्शक्ति, तशीच आत्मशक्ती. तिचा उपयोग जसा वाईट कामी तसाच चांगल्या कामी करता येणे शक्य आहे. ही आत्मशक्ती झेंघिशखान, तैमूरलंग, महम्मद, गझनी इत्यादिकांमध्ये जशी होती, तशीच पार्श्वनाथ, महावीर, बुद्ध, क्रिस्त इत्यादिकांमध्येही होती. एकानी मनुष्यांच्या संहाराच्या कामी, दुसऱ्यांनी मनुष्याच्या विकासाच्या कामी त्या शक्तीचा उपयोग केला, एवढेच काय ते.

आजकाल जो शास्त्रज्ञानाचा विकास झाला आहे तो परमेश्वरावर भार घालून झालेला नाही; प्रत्युत, (उलट) शास्त्रज्ञांना वारंवार परमेश्वरभक्तांशी लढूनच आपले शोध अमलात आणावे लागले. तेव्हा चातुर्यामांच्या प्रयोगांत परमेश्वराची कल्पना मिसळण्यापासून संप्रदायापलीकडे दुसरे कांही निष्पन्न होणे शक्य नाही.

## अहिंसा

इकडे लोकांना पिळून यथास्थित पैसा मिळवावा, आणि तिकडे एक पिंजरापोळ काढावा, अथवा ते शक्य नसल्यास कुत्र्यांना आणि वानरांना तूपरोट्या चाराव्या व मुंग्याना साखर घालावी हा अहिंसेचा अर्थ होऊन बसला आहे! मासे मारून गरीबांच्या अन्नात भर घालावी, असे जेव्हा गांधीजी प्रतिपादितात, तेव्हा या लोकांना गांधीजी नुसते दांभिक वाटतात.

जैन भिक्षु मांसाशन करीत होते असे कोणी म्हटले, तर ते त्याला जेलमध्ये पाठविण्यास तयार होतात ! अशी ही आजकालची अहिंसा !

परंतु पार्श्वनाथाने किंवा बुद्धाने अशा अहिंसेला मुळीच महत्त्व दिले नाही. मनुष्याकडून मनुष्याची जी हिंसा होते ती नष्ट करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. अर्थात् त्यांची अहिंसा प्रथमतः मनुष्याला लागू होती. तसे नसते, तर त्यांनी यज्ञयागांबरोबरच शेतीचा देखील निषेध केला असता. कारण शेतीत प्राण्यांची जितकी हिंसा होते तितकी ती यज्ञात होणे शक्य नाही. जैन साधूंनी तर ह्याच्याही पुढे जाऊन स्वयंपाक न करण्याचा उपदेश केला असता. कारण स्वयंपाकात वनस्पतिकायांची आणि इतर कायांची केवढी हत्या होते ! अहिंसेला सत्य, अस्तेय आणि अपरिग्रह या तीन यामांची जोड दिल्याने सिद्ध होते की, ही अहिंसा मनुष्यसमाजा-साठी होती. व्यवहारात लोकांना लुटून मुंग्यांना साखर घालण्यासाठी ती अहिंसा नव्हती. जैन आणि बौद्ध धर्म राजाश्रित झाल्यानंतर त्या अहिं-सेचा असा विपर्यास झाला. तिला ह्या सांप्रदायिकतेपासून सोडवून पुनः कार्यक्षम करणे हेच अहिंसेचे खरे प्रयोग होत.

## सत्य

सत्याच्या प्रयोगांत हटाग्रह कामाचा नाही. पृथ्वी फिरत नाही असे पोपचे ठाम मत असल्यामुळे त्याने ग्यालिलिओचा अनन्वित छळ केला. 'इदं सच्चं मोघमज्जं' (हेच काय ते सत्य व इतर झूट )अशा आग्रहामुळे कितीतरी युद्धे उद्‌भवली ! पण अद्यापि मनुष्य हा आग्रह सोडण्यास तयार नाही. आमची डिमोक्रासी तेवढी सत्य, तुमचे कम्युनिझम असत्य, अशा हटाग्रहाने आजला आणखी एक महायुद्ध उत्पन्न होऊ पहात आहे. अशा प्रसगी सत्याचा विचार अहिंसा, अस्तेय आणि अपरिग्रह या तीन यामांना अनुसरून व्हावयास पाहिजे. ही जी आमची डिमोक्रासी, जिला आम्ही सत्य समजतो, ती ह्या तीन यामावर अधिष्ठित आहे काय ? तिच्या रक्षणा-साठी जर आम्हास अणुबॉंबचा प्रयोग करावा लागतो, तर ती अहिंसेवर अधिष्ठित नाही; तिच्यासाठी मागासलेल्या लोकांचे स्वातंत्र्य अपहरण करून त्यांना व्यापाराने लुटावे लागते, तर ती अस्तेयावर अधिष्ठित नाही. तिच्या-साठी जगातील सर्व सोने गोळा करावे लागते, तर ती अपरिग्रहांवर अधि-

ष्ठित नाही. तेव्हा अशा डिमोक्रासीसाठी युद्ध करणे शुद्ध वेडेपणा आहे. क्रुसेडसारखी धर्मयुद्धे केवळ अज्ञानामुळे झाली; त्यात सत्याचा लवलेश नव्हता, तसा आमच्या डिमोक्रसीतही तो नाही. हे जर अमेरिकनांनी आणि इंग्रजांनी जाणले, तर आजला जी युद्धाची तयारी चालली आहे ती तेव्हाच बंद पडेल.

पदार्थविज्ञानात नवीन नवीन शोध लागत आहेत. ते सत्य आहेत खरे, पण ते जर अहिंसा, अस्तेय आणि अपरिग्रह या यामांना खच्ची करणारे असले, तर त्यांपासून फायदा न होता दुःख मात्र वाढेल. शास्त्रज्ञांनी निरनिराळे बॉंब शोधून काढले, त्यात शेवटचा शोध अणुबॉंबचा आहे. त्याचा उपयोग अमेरिकन आपला परिग्रह वाढविण्यासाठी करू पाहत आहेत. "हे पहा, आमच्या हाती हे अजब शस्त्र आहे. तेव्हा तुम्ही गुपचुपपणे आमच्या परिग्रहाला संमति द्या आणि तो तसाच चालू राहण्यासाठी आमचे व्यापारी स्तेय (लूट) वृद्धिंगत होऊ द्या. दक्षिण अमेरिकेतील खाणी काय, किंवा इतर व्यापार काय सर्व आमच्या हाती आहे, तसाच चीनचा व्यापार आम्हास पाहिजे, व जगावर आमचे वर्चस्व झाले पाहिजे. याला तुम्ही आडकाठी कराल, तर डिमोक्रासीच्या नावाने तुमच्यावर अणुबॉंब पडण्यास उशीर लागणार नाही. जो काही धर्म आहे तो आमच्या डिमोक्रासीत आहे." अशा ह्या डिमोक्रासीपासून सर्व जगातील मनुष्यांना सावध करणे विचारी माणसांचे कर्तव्य आहे.

## अस्तेय

दुसऱ्याच्या वस्तु चोरणे किंवा लुटणे निषिद्ध आहे, असे सर्वच समजतात. चोर किंवा लुटारू आपल्या कृत्याचे समर्थन करू शकत नाहीत. परंतु व्यापारी लुटीचे असे नाही. अधिकाऱ्यांना लांच देऊन काळ्या बाजारात किंवा अन्य उद्योगाने एखाद्याने मोठी संपत्ती मिळविली, तर त्याची सर्वत्र वाहवा होते. अमेरिकेत अशा माणसाला 'कॅप्टन ऑफ इन्डस्ट्री' म्हणतात. आणि पुनः त्याने जर का थोडा बहुत दानधर्म केला, तर मग त्याच्या स्तुतीला पारावारच राहत नाही. अशा ह्या समाजात अस्तेय व्रत कसे येणार? व्यापार आणि सट्टे करून जर हुशार लोक निर्वाह करू लागले व इतर त्यांचे गोडवे गाऊं लागले, तर तो समाज अस्तेयव्रती होणेच शक्य

नाही. ह्या व्यापारासाठी असत्य अवश्य पाहिजे आणि परिग्रह झाला की, त्याच्या रक्षणासाठी हिंसा पाहिजेच पाहिजे. आणि ती सुलभपणे करता यावी यासाठी डिमोक्रसीसारखी ढोंगे पुढे केली पाहिजेत. म्हणजे स्तेयाच्या आणि असत्याच्या योगे परिग्रह, व परिग्रहाच्या रक्षणासाठी हिंसा आणि असत्य असे हे विषारी चक्र ( Vicious Circle ) सारखे फिरतच रहावयाचे !

## अपरिग्रह

काही लोकांनी सर्वसंग सोडून अपरिग्रही व्हावे व काहींनी तलवारीच्या किंवा व्यापाराच्या जोरावर गबर होऊन ह्या अपरिग्रही लोकांना पोसावे हा अपरिग्रहाचा विपर्यास होय. सगळा समाज अपरिग्रही झाल्यावाचून समाजाचे हित होणे शक्यच नाही. अशा अपरिग्रही समाजाची रचना आजला रशियात होत आहे; आणि आपल्या मुलुखाच्या आसपास अशीच समाजरचना स्थापण्याचा प्रयत्न सोविएत पुढारी करीत आहेत. पण ते इंग्रज आणि अमेरिकन धनिकांना पसंत नाही, आणि सोविएत मुत्सद्यांना हाणून पाडण्याचा त्यांचा प्रयत्न चालू आहे.

फारसे प्रयत्न न करता हिंदुस्थानचे राज्य हस्तगत झाल्याबरोबर भूमध्यसमुद्रावर आपले वर्चस्व स्थापण्याचा इंग्रजांनी प्रयत्न केला; जिब्राल्टर आणि माल्टा ही दोन ठाणी हस्तगत केली, व इजिप्त देश आपल्या सत्तेखाली आणला. त्यांनी पूर्वेकडे ब्रह्मदेश, मलाया वगैरे देश काबीज केले. अमेरिकेने एकामागून एक युरोपियन राजांना दक्षिण अमेरिकेतून घालवून दिले, व अंती क्यूबा बेटाच्या रक्षणार्थ जाऊन स्पेनकडून फिलिपाईन बेटेही काबीज केली. ह्या सगळ्या कृत्यांना अमेरिकनांनी 'मन्रो डॉक्ट्रिन' हे गोड नांव दिले आहे, पण जेव्हा सोविएत आत्मरक्षणासाठीच आपल्या जवळच्या राज्यांत कम्युनिस्टिक राज्यपद्धती स्थापू पाहत आहेत. तेव्हा आपल्या साम्राज्याचा उदोउदो करणारे इंग्रज व मन्रो डॉक्ट्रिनचा उदोउदो करणारे अमेरिकन एकदम आरडाओरड करू लागले आहेत की, सोविएत आपला पसारा ( Expansion ) वाढवू पहात आहेत ! 'तुम्ही जर दुसऱ्यांच्या देशांत जाऊन त्यांच्यावर आपले वर्चस्व लादता, तर सोविएत सरकारने जवळपासच्या देशांत कम्युनिझमचा प्रसार केला, तर त्यांत तुमचे

काय गेले ? ' "आमचे काय गेले ? म्हणजे ! जर का हळूहळू कम्युनिझमचा प्रसार होत गेला, तर मग आमच्या साम्राज्याची आणि आमच्या मन्रो डॉक्ट्रिनची धडगत आहे काय ? कम्युनिझम आमच्या घरीदारी येऊन थडकणार नाही काय ? याचसाठी जरूर पडल्यास अणुबाँबनी देखील कम्युनिझमचा प्रतिकार करण्यास आम्ही तयार आहोत; आणि जर का आमच्या मजूर वर्गाचे आम्हांस भय नसते, तर हे काम आम्ही केव्हाच आरंभिले असते.

परंतु जशी सोविएत समाजाची रचना होत आहे, तशीच जर ती जगांतील सर्व राष्ट्रांत झाली नाही, तर जग लढायांपासून मुक्त होईल ही गोष्ट मिथ्या आहे. सगळी राष्ट्रे अपरिग्रही बनली, तरच जगांत अहिंसा आणि सुखशांती नांदेल.

### ब्रह्मचर्य

कांही साधूंनी ब्रह्मचारी रहावे व राजेरजवाड्यांनी वाटेल तेवढ्या बायका आणि वेश्या ठेवाव्या, अशा ब्रह्मचर्यापासून समाजाला विशेष फायदा होत नसतो हे स्पष्ट आहे. वेश्या आणि त्यांच्याशी संबंध ठेवणारे पुरुष याजपासून समाजांत भयंकर रोग कसे फैलावतात, हे सर्वांस माहित आहे. ही माहिती खुद्द वेश्यांना आणि त्यांच्याशी संबंध ठेवणाऱ्या अज्ञ माणसांना करून देण्यासाठी सोविएत रशियात निरनिराळ्या प्रकारांनी प्रचारकार्य चालू आहे. जोपर्यंत बहुपत्नीत्व आणि वेश्याव्यवसाय समाजातून नष्ट झाले नाहीत. तोपर्यंत समाजाला ब्रह्मचर्याची जाणीव झाली नाही असे म्हटले पाहिजे.

एकपत्नी व्रतात देखील विषयसेवनाचा अतिरेक कामाचा नाही. आजकाल सुशिक्षित लोकांना संतती फारशी नको आहे. एक-दोन मुले झाली की संततिनियमन करण्याकडे त्यांची प्रवृत्ती होते. ह्या संतति-नियमनात जो मोठा धोका आहे तो हा की, स्त्रीपुरुषांची कामतृष्णा कमी न होता वाढत जाते, व त्यायोगे त्यांच्या मनावर आणि शरीरावर भलतेच परिणाम होतात. यापेक्षा लोकोपयोगी कामात दक्ष राहून स्त्रीपुरुषांनी ब्रह्मचर्य पाळण्याचा अभ्यास करणे श्रेयस्कर आहे. ते कसे पाळावे याचे शिक्षण तरुण-तरुणींना देण्यात येणे आवश्यक आहे.

यद्यपि हे व्रत पार्श्वनाथाने उपदेशिले नाही. तथापि त्याच्या अपरिग्रह यामांत याचा समावेश होतो.

## इतर व्रते

पार्श्वनाथाने फक्त चातुर्याम धर्म उपदेशिला असे जैनांच्या आगम ग्रंथातच सांगितले असता त्याच्या उपदेशात ब्रह्मचर्यच नव्हे, तर आणखीही सात व्रते हेमचन्द्राचार्याने घुसडली आहेत. खरे म्हणाल तर चार यामांचा यथार्थ अर्थ समजून अभ्यास करणाऱ्याला ही व्रते कुचकामाची आहेत. उदाहरणार्थ, दिग्विरति आणि देशविरति घ्या[1] जो चातुर्याम धर्म नीटपणे पाळील त्याला 'मी अमुक तमुक दिशेला किंवा अमुक तमुक प्रदेशात जाणार नाही.' असा नियम करण्याचे काय कारण ? किंबहुना हा नियम समाजाला घातक होईल. का की, याम पालन करणारा मनुष्य ज्या ज्या दिशेला आणि ज्या ज्या प्रदेशात जाईल त्या त्या ठिकाणी आपल्या स्वतःच्या उदाहरणाने चातुर्यामाचे महत्त्व इतरांना पटवून देईल. सर्व दिशांना आणि सर्व प्रदेशांत जाऊन चातुर्याम धर्माचा प्रचार करणे हे त्याचे कर्तव्य असता त्याने असे नियम घालून घेणे अनुचित नव्हे काय ? सुदैवाने बौद्ध धर्मात असे नियम किंवा व्रते नाहीत. त्यामुळेच तो धर्म इतका पसरला. जैनांनी अशी व्रते करून आपल्या धर्मालाच नव्हे, तर हिंदूंच्या संस्कृतीला देखील आकुंचितत्व आणले. 'अटकेपलीकडे जाऊ नये', वा 'समुद्रपर्यटन करू नये', असे आत्मघातकी नियम अशा व्रतांतूनच निघाले. जैनांनी तपश्चर्येला भलतेच महत्त्व दिल्यामुळे ही व्रते निघाली असावी.

## अंगमेहनत

अंगमेहनतीला जैन आणि बौद्ध ग्रंथांत महत्त्व दिलेले नाही. ह्या संप्रदायांचे साधु तर अत्यंत पराधीन. त्यांना जमीन खोदता येत नाही, झाडाची लहानशी डहाळी देखील तोडता येत नाही, स्वयंपाक करता येत नाही, आपले घर किंवा कुटी बांधता येत नाही. या सर्व बाबतीत त्यांनी आपापल्या उपासकांवर अवलंबून राहिले पाहिजे. ह्या सगळ्या कामात जी लहानसहान प्राण्यांची हिंसा होते, ती गृहस्थांकडून करविली

---

१. पृ. ४५१ पहा.

तर त्यात पाप नाही, स्वतः केली तरच पाप, असे त्यांच्या कर्मकाण्डाचे (विनयाचे) मत दिसते. ह्या दोन धर्माच्या अवनतीला जी अनेक कारणे झाली त्यांपैकी हे एक प्रमुख कारण समजले पाहिजे. यायोगे जैन साधूंचा आणि बौद्ध भिक्षूंचा ऐदीपणा लवकर वाढला, व ते समाजाला भारभूत होऊन बसले. अशा लोकांचे संप्रदाय राजाची आणि श्रीमंतांची खुशामत केल्यावाचून चालणे शक्यच नव्हते.

महावीर व बुद्ध यांच्या समकाली हे श्रमण-संघ फार लहान होते, व ते वर्षातून आठ महिने सारखे प्रचार-कार्य करीत फिरत असत. तेव्हा त्यांच्या आड ही बंधने येऊ शकली नाहीत. पण हेच संघ जेव्हा मोठमोठाल्या विहारात आणि उपाश्रयात राहू लागले, तेव्हा त्यांचा ऐदीपणा सामान्य जनतेला जाणवू लागला, आणि यांना राजे व श्रीमंत लोकांवर अवलंबून राहणे भाग पडले; आणि हे संप्रदाय जेव्हा लुप्तप्राय झाले, तेव्हा सर्वसाधारण जनांना त्यांबद्दल मुळीच दुःख झाले नाही.

क्रिस्ताचे बहुतेक शिष्य अंगमेहनत करणारे होते. त्या संप्रदायात अंगमेहनतीचा निषेध कधीच करण्यात आला नाही. परंतु पाद्री लोक राजाश्रित होऊन परिग्रही झाले, आणि पोपसाहेबांनी तर राजसत्ता बळकावण्याला कमी केले नाही. त्यामुळे क्रिस्ती धर्म अप्रिय होत गेला आणि क्रमशः त्याला सध्याची दशा आली.

अंगमेहनतीला सोशालिस्टांनी अत्यंत महत्त्व दिले. 'जो काम करील त्यालाच अन्न मिळेल' हा त्यांचा सिद्धान्त. टॉलस्टायने हा सिद्धान्त धर्ममार्गात आणला. आध्यात्मिक उन्नतीला अंगमेहनतीची अत्यंत आवश्यकता आहे असे आपल्या उत्तर वयातील लेखात टॉलस्टायने विशदपणे प्रतिपादिले. हाच सिद्धान्त महात्मा गांधींनी आपल्या प्रवृत्तींना लागू केला आहे. याच्यावाचून चातुर्याम धर्म टिकावू होणे शक्य नाही, हे इतिहास सिद्ध करीत आहे. अंगमेहनत न करणारा धनिक वर्ग आणि त्या वर्गावर पोसणारे धर्मोपदेशक व अध्यापक जोपर्यंत दुनियेत आहेत, तोपर्यंत सामान्य जनतेच्या सुखसमाधानाची आशा बाळगणे व्यर्थ आहे. हे लोक डिमोक्रासी, धर्म इत्यादिक नांवाखाली श्रमजीवी लोकांची दिशाभूल करून त्यांना युद्धाच्या खाईंत लोटल्यावाचून राहणार नाहीत. ह्या ऐदी लोकांचे उच्चाटन

सोव्हिएत रशियाप्रमाणे करणे आम्हाला शक्य नाही. का की, आमचे साधन शस्त्र नसून अहिंसा आहे. किंतु प्रचाराच्या शस्त्राचा उपयोग आम्हास करता येतो, आणि तो शस्त्रास्त्रांपेक्षाही अधिक गुणकारी आहे.

## इतिहासाचे शिक्षण

सध्या जे शाळांतून आणि कालेजांतून इतिहासाचे शिक्षण दिले जाते, ते निरुपयोगी आहे, एवढेच नव्हे, तर कधी कधी बाधकही आहे. फलाण्या राष्ट्राने किंवा व्यक्तीने असे आणि तसे पराक्रम केले, अशी रसभरित वर्णने ऐकून विद्यार्थ्यांची दिशाभूल होणे अगदी साहजिक आहे. ह्या पराक्रमाचा परिणाम काय आहे याचे स्पष्टीकरण करणे अत्यावश्यक आहे. अलेक्झांडरच्या नेतृत्वाखाली ग्रीक लोकांनी असे आणि तसे पराक्रम केले; पण त्यांचा परिणाम काय झाला याचा नीट विचार करावयास नको काय ? ह्या पराक्रमामुळे इतर देशांना तर दुःखे भोगावीच लागली; पण ग्रीक लोकांची तरी उन्नती झाली काय ? त्यांच्या दुर्दशेला हेच पराक्रम कारण झाले नाहीत काय ? ग्रीक लोकांनी जे वाङ्मय व कलाकौशल्य निर्माण केले, त्यांचा ह्या पराक्रमाशी मुळीच संबंध नाही. ग्रीक देश आजच्या अवनत स्थितीला आला असला, तरी त्यांच्या पूर्वजांच्या वाङ्मयाची आणि कलाकौशल्याची सर्वत्र चहा होत आहे.

ग्रीकानंतर रोमन आले. त्यांनी जवळजवळ सर्व युरोप व आफ्रिकेचा उत्तर किनारा जिंकला. पण शेवटी राहिले काय ? याचा पराक्रमी वर्ग पार नष्ट झाला व गुलाम तेवढे बाकी राहिले. रोमन कायद्याचा जो त्यांनी विकास केला, त्याची आजला देखील सर्वत्र वाहवा होत आहे, आणि आजचे युरोपियन कायदे त्याच्याच पायावर आधारलेले आहेत. पण ह्या रोमन कायद्याचा आणि रोमन लोकांच्या विजयाचा काही संबंध नाही. त्यांनी इतर राष्ट्रे जिंकली नसती तरी त्यांचा कायदा लोकप्रिय झालाच असता.

त्यानंतर अर्वाचीन कालात स्पेनचा उदय झाला. पराक्रमी स्पॅनिश लोकांनी तिकडे दक्षिण अमेरिकेत आणि इकडे फिलिपाईन बेटात आपले हातपाय फैलावले. पण शेवटी राहिले काय, तर आजकालचा फ्रांकोचा स्पेन !

इंग्रजांनी स्पॅनिश लोकांवर ताण केली. तिकडे अमेरिकेत त्यांनी मजबूत वसाहत स्थापली आणि जवळ जवळ अर्धी आफ्रिका व एशियाचा

बराचसा भाग आपल्या छत्राखाली आणला. पण ह्या साऱ्या पराक्रमांनी इंग्लंडचे हित कितपत झाले ? धनिक वर्ग मातब्बर झाला, आणि मजुरांना थोडे जास्त वेतन मिळाले एवढेच काय ते! पण एवढ्याचसाठी त्यांनी खाणीच्या रूपाने आपला देश तर पोखरून टाकलाच, आणि जगावरची सुंदर सुंदर जंगले नाबूद करून टाकली! आता शिल्लक राहिले काय? कर्जबाजारीपणा! ज्या उत्तर अमेरिकनांची ते हेटाळणी करीत असत, त्यांचीच कास धरून कसे बसे तरी त्यांनी आपले साम्राज्य सांभाळले आहे. पण त्यापासून फायदा कोणता, असा जर तुम्ही प्रश्न केलात, तर त्यांपैकी कोणीही सयुक्तिक उत्तर देऊ शकेल असे दिसत नाही.

नेपोलियनच्या नेतृत्वाखाली फ्रेंच लोकांनी अनेक पराक्रम केले; फ्रेंचांची छाप सर्व युरोपावर बसली. पण परिणाम काय झाला? फ्रेंचांचेच अनुकरण करून जर्मनीने फ्रान्सला परास्त केले, आणि आजला फ्रान्स देश दयनीय स्थितीला पात्र होऊन बसला आहे.

आमच्या लहानपणी मराठ्यांच्या इतिहासाचा एकसारखा उदो उदो करण्यात येत असे. एका राजकारणी शूर कवीचे 'तुम्ही ते मराठे, तुम्ही ते मराठे। तुम्ही चारिले सर्व शत्रूंस कांटे।' हे श्लोकार्ध आहे. मराठे आणि कांटे हे यमक जुळले खरे, आणि तेणेकरून मराठ्यांना उत्तेजनही येत असेल. पण त्याचा उपयोग काय? हे शत्रूंना कांटे चारणारे मराठे आजला काय करीत आहेत? मुंबईतील गलिच्छ चाळीत अत्यंत गर्दी करून व दिवसभर आणि कधी कधी रात्रभर गिरण्यांतील कोंडलेल्या हवेत काम करून कसे-बसे कालक्रमण करीत आहेत!

तात्पर्य काय की, शस्त्रबलाने इतरांना जिंकून जे आपली उपजीविका व चैन करू पाहतात, त्यांच्या कर्मांची विषारी फळें खाण्याची त्यांच्या वंशजांवर पाळी आल्यावांचून राहात नाही. धम्मपदांत म्हटल्याप्रमाणे--

**मधुवा पञ्ञती बालो याव पापं न पच्चति।**
**यदा च पच्चती पापं (अथ) बालो दुक्खं निगच्छति॥**

(जोपर्यन्त पाप पक्व होत नाही, तोपर्यन्त मूर्खाला ते मधासारखे गोड वाटते. पण ते जेव्हा विपक्व होते, तेव्हा मूर्ख दुःख भोगतो.)--

आरंभी जरी हिंसात्मक पराक्रम गोड वाटले, तरी ते परिणामी अत्यंत दु:खद होतात.

काही एक लाभाची आशा न धरता दुसऱ्या देशात जाऊन धर्मोपदेश करण्याचे उदाहरण इतिहासात एकच तेवढे आमच्या प्राचीन भिक्षूंचे आहे. हे उपदेशक पूर्वेकडील सर्व देशात गेले. त्यांच्या उपदेशाचा परिणाम कसा काय झाला याचा विचार आम्हाला कर्तव्य नाही. पण त्यांच्या उद्योगामुळे एक मोठा फायदा झाला तो हा की, चीन, तिबेट वगैरे देशात आमच्या संबंधाने आदर वाढला. कोणतेही कृत्य निरपेक्षपणे परोपकार स्मरून केले, तर त्याचा परिणाम गोड झालाच पाहिजे. जर्मन शास्त्रज्ञ जर अशाच निरपेक्ष बुद्धीने रशियनांना मदत करते, तर आजला जो ह्या दोन जातीत वैरभाव दिसून येतो, तो तर राहिलाच नसता, आणि जर्मनांना आपले गुरु समजून रशियनांनी त्यांचा फार आदर केला असता. येणेकरून दोन महायुद्धाचे प्रसंग टळले असते; एवढेच नव्हे, तर जगाच्या सुखात चांगलीच भर पडली असती. परंतु,

> **परदुक्खूपदानेन अत्तनो सुखमिच्छति ।**
> **वेरसंसग्गसंसट्ठो वेरा सो न पमुच्चति ॥**

(दुसऱ्याला दु:ख देऊन जो आपल्या सुखाची इच्छा करतो, तो वैरात गुरफटला जाऊन वैरापासून मुक्त होत नाही.)
हा उपदेश युरोपियन राष्ट्रांना कधीच पटला नाही; आणि त्याचे फळ आजला त्यांनाच नव्हे, तर सर्व जगाला भोगावे लागत आहे.

तात्पर्य, हिंसा, असत्य, स्तेय आणि परिग्रह यांच्या योगे कोणत्याही राष्ट्राचे हित झाल्याचा दाखला इतिहास देत नाही. सध्याच्या गुंतागुंतीतून आणि अत्यंत बिकट परिस्थितीतून पार पडण्याला सर्व राष्ट्रांना हा एकच उपाय आहे की, त्यांनी आपल्या धोरणाला या चातुर्यामाची कसोटी लावून पहावी. शस्त्रास्त्रांच्या द्वारे आम्ही हिंसेची तयारी करीत आहो की नाही ? इतर राष्ट्रांना ठकविण्यासाठी आम्ही असत्याचे प्रयोग करतो की नाही ? दुसऱ्या राष्ट्रांना लुटून म्हणजे स्तेयाच्या द्वारे आम्ही संपत्ती गोळा करतो की नाही ? आणि आमच्या परिग्रहामुळे आम्हाला ह्या आणि अन्य पापांचा अंगीकार करावा लागतो की नाही ? याचा विचार

सर्व राष्ट्रांतील पुढाऱ्यांनी अवश्य केला पाहिजे. ह्या चातुर्यामाच्या कसोटीला जर त्यांची कृत्ये उतरली, तर जगातील बरीचशी दुःखे नाहीशी होतील. आणि सर्व राष्ट्रांत सुख शांती नांदू लागेल.

मज्झिम निकायातील सल्लेखसुत्तात भगवान् बुद्धाने म्हटले आहे की– " हे चुन्द विषम मार्गातून मुक्त होण्यास जसा सरळ मार्ग असावा, त्याचप्रमाणे विहिंसक मनुष्याच्या मुक्तीसाठी अविहिंसा आहे ... अदत्तादान ( चोरी किंवा लूट ) करणाऱ्यासाठी दत्तादान मुक्तिमार्ग आहे ... असत्यवादी माणसासाठी सत्य मुक्तिमार्ग आहे .... लोभी माणसासाठी निर्लोभ मुक्तिमार्ग आहे."

जो न्याय येथे व्यक्तीला लागू केला आहे, तोच समाजाला आणि राष्ट्राला लागू होतो.

## धार्मिक कसोटी

चातुर्याम धर्माची कसोटी हीच खरी धार्मिक कसोटी होय. धर्मासाठी तुम्ही युद्ध किंवा कोर्टात फिर्यादी करू लागलात, तर तुम्हाला चातुर्याम धर्म पटला नाही असे म्हणावे लागेल. धर्मासाठी खोटे बोलून किंवा व्यापारी लूट करून तुम्ही पैसे कमवू लागलात, तर तुम्ही ह्या चातुर्यामापासून फार दूर गेलात असे म्हणावे लागेल. मंदिरे किंवा मशीदी बांधण्यासाठी आणि त्यांना अस्तित्वात ठेवण्यासाठी तुम्ही संपत्तीचा संग्रह करू लागलात, तर तुम्हाला अपरिग्रहाचे तत्त्वच समजले नाही असे म्हणावे लागेल.

येथे एखादा श्रीमंत आम्हास असा प्रश्न विचारील की, "अहो, तुम्ही गरीब कुळात जन्मलात; तेव्हा तुम्हाला चातुर्याम धर्म आवडला हे ठीक आहे; पण आमच्या हाती काहीएक परिश्रम न करता ही संपत्ती आली आहे. ती सगळी सोडून आम्ही अपरिग्रही होणे मूर्खपणा नव्हे काय? समजा, आम्ही ती आजच गोरगरिबांना वाटून मोकळे झालो, तर त्यामुळे समाज अपरिग्रही थोडाच होणार आहे. आमच्याजागी दुसरे परिग्रही येतील एवढेच काय ते." ह्यावर आमचे उत्तर– 'ही युक्ती चोरांनाही लढविता येईल. एखादा चोर म्हणेल की, तुम्ही मला चोरीपासून निवृत्त होण्यास सांगता; पण त्यायोगे समाजातील चोरी नष्ट होणार आहे काय?

माझ्या जागी दुसरा चोर येईल, एवढेच काय ते. आता तुमच्या संपत्तीची वाटणी कशी करावी, ह्याच काय तो प्रश्न रहातो. ती गोरगरिबांना वाटून देण्यापेक्षा तिचा विनियोग समाजकार्यांत करावा हे चांगले. ह्या कार्याची कसोटी, ही आहे की, त्याच्या योगे समाज अहिंसक, सत्यवादी, अस्तेयी आणि अपरिग्रही व्हावा. ह्या कसोटीला आजकालचा दानधर्म क्वचित् उतरतो. ट्रस्ट करून लाखो रुपये कोणत्याही सार्वजनिक कार्याला ठेवल्याने समाजाची उन्नती होणार आहे असे समजणे चुकीचे आहे.

तर मग अशा संपत्तीचा विनियोग कसा करावा ? तिचा उपयोग असा करावा की, तिच्या योगे समाज त्वरित चातुर्याम धर्मास अनुसरून वागेल. आजकाल जे ट्रस्ट करण्यात येतात त्यांच्या योगे समाज कधीही अपरिग्रही होणे शक्य नाही. ह्या ट्रस्टच्या निधीला जे व्याज मिळते, तो एक समाजावर कायमचा बोजा होऊन बसतो; आणि पुष्कळ ठिकाणी ट्रस्टी या फंडाचा आपल्याच स्वार्थासाठी उपयोग करून घेतात. राजकोटचे प्रसिद्ध बॅरिस्टर श्री. सीताराम नारायण पंडित म्हणत असत की, ट्रस्टवर माझा विश्वास नाही. ट्रस्टच्या पुष्कळ केसेस मी चालविल्या, आणि त्यात मला असा अनुभव आला की, अशा पैशाचा दुरुपयोग होतो. यास्तव मी जो दानधर्म करतो त्यात अशी खबरदारी घेतो की, तो सर्व पैसा माझ्याच हयातीत सत्कार्याला लागावा ? इतरांनी हे उदाहरण घेण्याजोगे आहे. तुम्हाला जर समाजाला हिंसेपासून, असत्यापासून, चोरी-पासून आणि परिग्रहापासून सोडवावयाचे असेल, तर तुमची संपत्ती तुम्ही 'अहिंसामार्गी सोशॅलिझम'च्या प्रचारासाठी द्या, आणि तिचा विनियोग ताबडतोब करण्यात येईल अशी व्यवस्था करा.

सोशॅलिस्ट हिंसात्मक क्रांतीला महत्त्व देतात; असे असता त्याना मदत करणे चातुर्यामाला विसंगत नव्हे काय ? पुष्कळसे सोशॅलिस्ट अंधानुकरण करणारे आहेत, ही गोष्ट खरी आहे. त्यांना वाटते की, जो प्रकार रशियात घडून आला, तोच इकडे व्हावयास पाहिजे. पण त्यांनी जरा गेल्या पंचवीस वर्षातील महात्मा गांधींच्या चळवळीचे नीट निरीक्षण करून पहावे. आम्ही जर हिंसेचा आणि असत्याचा मार्ग पत्करला असता, तर अल्प कष्टांनी आमची एवढी प्रगती झाली असती काय ? सोशॅलि-

झमच्या प्रसाराला हिंसा नको आहे; शेतकऱ्यांचे आणि कामगारांचे संघटन पाहिजे आणि ते पूर्णपणे सन्मार्गाने करता येण्याजोगे आहे. जो आपली संपत्ती ह्या कार्याला देईल, त्याने तिचा उपयोग सन्मार्गाकडेच होईल, अशी खबरदारी घेतली म्हणजे झाले.

आमच्यासारख्या गरीब कुळात जन्मलेल्या माणसांना चातुर्याम धर्माचा अंगीकार करणे सुलभ आहे. अंधश्रद्धा, चैनीची आणि मानमान्यतेची अभिलाषा हेच काय ते दुर्गुण आम्हाला बाधक आहेत. आमचे पूर्वज ज्या देवतांची पूजा करीत ती सारी हिंसक आहेत; असे असता आम्ही देखील केवळ अंधश्रद्धेमुळे त्याचीच भक्ती करीत आहोत ! आम्ही पैशाच्या मागे का लागलो ? आम्हाला आणि आमच्या मुलाबाळांना चैन करता यावी म्हणून, अथवा लोकांत मानमान्यता मिळावी म्हणून.

## चातुर्याम हेच आमचे दैवत

अशा कोणत्याही दुर्गुणाला बळी न पडता आम्ही—गरीबांनी आणि श्रीमंतांनी-चातुर्याम धर्म हेच आमचे दैवत आहे असे जाणून लोकांत त्यांची भक्ती वाढेल व तद्वारा लोक सुखसमाधानाने नांदू लागतील यासाठी काया, वाचा, मने झटले पाहिजे. चातुर्याम धर्म हाच खरा चतुर्मुखी ब्रह्मा आहे; आणि त्याच्या आराधनेतच आमचा व इतरांचा मोक्ष आहे. या चातुर्याम धर्मरथाची अहिंसादिक चार चाके आहेत. त्यांत काही न्यूनाधिक झाले किंवा त्यांच्यापैकी एखादे चाक मोडले, तर हा धर्मरथ चालणे शक्य नाही. यास्तव केवळ श्रद्धेवर अवलंबून न राहता ह्या चार चक्रांचे वारंवार निरीक्षण करून ती अव्याहत चालू राहतील असा आम्ही सतत प्रयत्न केला पाहिजे. हाच खरा कर्मयोग होय.

## मारणान्तिक सल्लेखनाव्रत

जैनांची जी अनेक व्रते आहेत त्यांचा चातुर्यामाच्या अभिवृद्धीसाठी क्वचित्‌च उपयोग आहे. ही तपे न आचरता चातुर्याम धर्माची अभ्युन्नती करता येते. ह्या तपांपैकी एकच तप किंवा व्रत असे आहे की, त्याचे यथायोग्य पालन केले, तर ते व्यक्तीच्या आणि समाजाच्या हिताला कारणीभूत होईल. ते व्रत म्हटले म्हणजे सल्लेखनाव्रत होय. ते केवळ

असाध्य रोग्यांसाठी आणि जरा-जर्जरितांसाठी आहे. श्रीमंतांना अर्धांग-वायू किंवा कॅन्सरसारखा दुसरा असाध्य रोग झाला, तर ते सारखे बिछान्यावर तळमळत पडतात; आणि त्यांच्या शुश्रूषेसाठी आणि औषधासाठी हजारो किंवा लाखो रुपये खर्च करण्यात येतात. खुद्द त्यांना आणि त्यांच्या नातलगांना वाटते की, मृत्यू लवकर येऊन त्यातून त्यांनी पार पडावे. परंतु अशा प्रसंगी त्या रोग्यांना उपवास करून त्यातून मुक्त होण्याची इच्छा होत नाही; आणि त्यांच्या नातलगांनाही ते कृत्य आवडेलच असे म्हणता येत नाही. सल्लेखनाव्रताचे महत्त्व जर सर्वसंमत झाले, तर असे प्रसंग सहज टाळता येतील.

ह्या व्रताची माहिती वर आलीच आहे. असाध्य व्याधीमुळे किंवा जरेमुळे शरीर दुर्बल झाले, तर जैन साधू व गृहस्थ महिना महिना उपास करून प्राण सोडीत. त्याची बरीच उदाहरणे वर आलीच आहेत. खुद्द पार्श्वनाथानेदेखील याच विधीने संमेत शिखरावर देहत्याग केल्याची कथाही वर आलीच आहे.

या व्रताचा अवलंब करण्यासाठी पूर्वतयारी पाहिजे. तरुणपणीच माणसाने असा विचार केला पाहिजे की, माझे तारुण्य टिकाऊ नाही. एक तर असाध्य रोग ते ग्रासून टाकील अथवा जरेमुळे ते नष्ट होईल. अशा प्रसंगी हे शरीर मला राजीखुशीने मृत्यूच्या हवाली केले पाहिजे. त्यायोगे माझे व माझ्या आप्तमित्रांचे दुःख पुष्कळ कमी होईल. हा संशय मनात बाळगला, तर माणसाच्या हातून कुकृत्यही होणार नाही.

पार्श्वनाथाच्या पूर्वी आणि तत्समकाली गृहस्थदेखील वृद्ध झाले म्हणजे गृहत्याग करून जंगलात जात व तेथे उपास करून प्राण सोडीत. याचे एक उदाहरण महाजनक जातकात सापडते. जनक राजा वृद्ध झाला. तेव्हा त्याने गृहत्याग केला. त्याला मागे वळविण्याचे अनेक प्रयत्न त्याच्या सीवली राणीने केले. पण मागे न वळता जनकाने हिमालयाचा रस्ता धरला. सीवली त्याच्याबरोबर चालली. अंती ती दोघे एका लहानशा शहराबाहेर आली. तेथे दोन रस्ते होते. त्या ठिकाणी जनक सीवलीला म्हणाला,

अयं द्वेधापथो भद्दे, अनुचिण्णो पथाविहि ।
तेसं त्वं एकं गण्हाहि अहमेकं पुनापरं ॥

( वाटसरू ज्यांना अनुसरतात असे हे दोन मार्ग आहेत. त्यांपैकी तू एक स्वीकार व मी दुसरा स्वीकारतो. )

हे ऐकून सीवली निश्चेष्ट होऊन तेथेच पडली; आणि जनक हिमालयाच्या जंगलात शिरला. त्यांच्या मागोमाग त्यांचे अमात्य येत होते. त्यांनी सीवलीला सावध केले, व तिच्या रक्षणाला माणसे ठेवून जनकाचा शोध चालविला; पण त्याचा पत्ता मुळीच लागला नाही, तेव्हा त्या द्वेधा-पथावर जनकाच्या स्मारकासाठी स्तूप बांधून सीवली देवीसह ते माघारे मिथिलेला आले.

पार्श्वनाथाच्या प्रचारकार्यामुळे अशा प्रकारे हिमालयाच्या जंगलात शिरण्याचे कारण राहिले नाही; वाटेल तेथे देहत्याग करता येणे शक्य झाले. बगीचात, धर्मशाळेत, एखाद्या पर्वतशिखरावर, नदीतीरी अथवा समुद्रकाठी जेथे आपले मन प्रसन्न राहील, अशा ठिकाणी, वास करून अनशनव्रत करणे रोगग्रस्तांना आणि जराग्रस्तांना सुलभ झाले. लोकांची ह्या व्रताला सहानुभूती मिळू लागली.

आजकालदेखील जैन साधू आणि गृहस्थ ह्या व्रताचा क्वचित उपयोग करतात ; पण त्याला एक विलक्षण स्वरूप प्राप्त झाले आहे. कोणी एका साधूने किंवा गृहस्थाने ह्या व्रताला आरंभ केला आहे असे समजल्या-बरोबर शेकडो जैन लोक त्याच्या दर्शनाला येतात, व त्या योगे अशा प्रसंगी त्या व्रतस्थाला जी शांती पाहिजे असते, ती मुळीच मिळत नाही. अर्थात ह्या व्रताला एवढे महत्त्व देऊन त्याचे देव्हारे माजविणे इष्ट नाही. होता होईल तो अशा व्रतस्थाला शांती मिळू देणे योग्य आहे. जर का त्याला भुकेच्या वेदना असह्य होऊ लागल्या तर काय करावे? त्याला औषध किंवा इंजेक्शन देणे जैन लोक अनुचित समजतात. पण माझ्या मते त्याला शांत ठेवण्यापुरते औषधोपचार करणे जरूर आहे.

आता ह्या व्रतापासून समाजाला कोणता फायदा याचा विचार करू. असाध्य रोगांतून आणि जरेतून मुक्त होण्यासाठी हे व्रत आचरणे सर्व-साधारण होऊन बसले, तर त्यापासून समाजाचा पुष्कळ व्यय वाचेल.

आजला अशा लोकग्रस्त श्रीमंतांवर आणि गरीबांवर समाजाचा पुष्कळ पैसा खर्च होत आहे. तरी पण अशा लोकांना मारून टाकणे समाजाला शक्य नाही. श्रीमंतांचे त्यांच्या घरी व गरीबांचे हॉस्पिटलात हाल चालू ठेवणे भाग पडत आहे. महारोग्यांना तर जबरदस्तीने समाजापासून दूर करून त्यांच्या पालनपोषणाचा सर्व भार समाजाला घ्यावा लागतो. अशा रोग्यांनी आणि जराजर्जरितांनी अनशनव्रत राजीखुशीने स्वीकारले, तर समाजाचा भार हलका होईल, यात शंका नाही; आणि अशी माणसे समाजातून लुप्त झाली, तर समाजही प्रफुल्लित होईल.

## उपसंहार

चातुर्याम धर्माचा उगम ऋषिमुनींच्या अहिंसा धर्मातून झाला, व तो पार्श्वनाथाने प्रचलित केला. बुद्धाने त्याला समाधीची व प्रज्ञेची जोड देऊन त्याचा विकास केला. क्रिस्ताने यहुदी लोकांच्या यहोवाच्या आधारे त्याच धर्माचा पश्चिमेकडे प्रचार केला. त्याला अंगमेहनतीची जोड देऊन सत्याग्रहाच्या रूपाने राजकीय क्षेत्रातदेखील तो कसा प्रभावशाली करता येईल, हे महात्मा टॉलस्तायने विषदपणे दर्शविले; आणि महात्मा गांधींनी त्याचे प्रत्यक्ष प्रयोग करून ते सिद्धीला जातात हे दाखवून दिले. अर्थात पार्श्वनाथ, बुद्ध, क्रिस्त, टॉलस्ताय व गांधी हे या चातुर्याम धर्माचे मार्गदर्शक आहेत. त्यांचे परिश्रम पूर्णपणे सफल झाले असे म्हणता येत नाही. जैन, बौद्ध व क्रिस्ती लोकांतदेखील हिंसाधर्मावर विश्वास ठेवणाऱ्यांची संख्या फार मोठी आहे, पण त्यांना त्यांचाच धर्म पटवून देणे अशक्य झाले आहे. तथापि निराश होण्याचे कारण नाही; का की, ह्या चातुर्याम धर्माचा सर्वतोपरी विकास करणारे पुष्कळ शास्ते (नेते) भविष्यकाळी निपजतील, असा आमचा पूर्ण विश्वास आहे. ते वारंवार निपजोत व त्यांच्या सत्कर्मांनी सर्व मनुष्यसमाज उन्नत दशेला जावो अशी प्रार्थना करून वाचकांची रजा घेतो.

# बौद्धधर्मावरील चार निबंध

## सूची

